श्रीः

कविवर्य

# मोरोपंतांचें समग्र ग्रंथ.

२

# आर्याभारत

पर्वें

## उद्योग—भीष्म—द्रोण.

संपादक व प्रकाशक

रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर.

मुद्रक

अच्युत चिंतामण भट.

'यशवंत'

छापखाना पुणें.

सन १९१२.

# विषयानुक्रमणिका.

## ५. उद्योगपर्व.

### ( पद्यसंख्या १४०७ ).

**अध्याय ४ था: (पृ० २५):**—संजयकृत पांडवसंदेश कथन (१–१७); अर्जुन व कृष्ण हे नरनारायणावतार, अशी कथा भीष्म सांगतात ( १८–३० ); कर्णकृत निषेध-भीष्मोत्तर-द्रोणसंमति-व्यास धृतराष्ट्राची असंमति ( ३१–४८ ); पांडवसेना-वर्णनार्थ संजयास धृतराष्ट्राज्ञा-संजयमूर्च्छा-विदुरभाषण ( ४९–५८ ); संजयोत्तर व पांडवबळवर्णन ( ५९–६७ ). धृतराष्ट्राचे शोकमय उद्गार ( ६८–८० ) संजयाची स्पष्टोक्ति ( ८१–८५ ) दुर्योधनाचे भाषण व कौरवसामर्थ्यवर्णन ( ८६–९९ ); संजयकृत पांडवीयप्रतिज्ञाकथन ( १००–१०७ ), धृतराष्ट्राचा दुर्योधनास सामोपदेश-दुर्योधनाचा हट्ट-तत्त्यागार्थ धृतराष्ट्राचे पुनः भाषण ( १०८–११९ ).

**अध्याय ५ वा: (पृ० ३७):**—संजययानं-पंत. कृष्णार्जुनकथित 'वाचिक' संजय सांगतो ( १–१४ ): धृतराष्ट्राचें भीतियुक्त भाषण (१५–१८); दुर्योधनाची आत्मश्लाघा ( १९–२६ ). कर्णकृत स्वप्रतापवर्णन ( २७–३२ ); कर्णभीष्मांचें वाग्युद्ध व कर्णाचा भीष्म मरेपर्यंत शस्त्रसंन्यास ( ३३–४९ ); भीष्मास दुर्योधनाचें उत्तर ( ५०–५२ ), विदुरभाषण व व्याधकथा (५३–६१). धृतराष्ट्राच्या प्रश्नावरून संजय अर्जुनकृष्णांचे निरोप सांगतो, व दुर्योधनादिक उठून जातात (६२–६७); संजय, व्यास, धृतराष्ट्र, गांधारी, भीष्म व विदुर यांचें एकांती संमेलन (६८–७२): पांडवबळवर्णन (७३–८२). संजयाचा अध्यात्मोपदेश ( ८३–८७ ) दुर्योधनास धृतराष्ट्र व गांधारी यांचा उपदेश-त्याचा हट्ट (८८–९९). कृष्ण सामार्थ येणार म्हणून संजय सांगतो-धृतराष्ट्राचा हर्ष ( १००–१११ ).

**अध्याय ६ वा: (पृ० ४९):**—कृष्णधर्मसंवाद व कृष्ण कौरवाकडे जाणार (१–१५); भीमकृष्णसंवाद (१६–२५), अर्जुनद्रौपद्यादिकांची कृष्णाशी भाषणें (२६–३०); धर्म कृष्णास पाचविताना कुंतीचे व दुर्योधनादिकाचे कुशल विचारण्यास कळकळीनें सांगतो व अर्जुन तसें च बोलतो ( ३१–४१ ); सुरगण कृष्णभाषणश्रवणार्थ येतात ( ४२–४६ ) धृतराष्ट्रकृत स्वागतव्यवस्था कृष्ण चुकवितो ( ४७–५० ).

**अध्याय ७ वा: (पृ० ५४):**—धृतराष्ट्राची कृष्णस्वागतार्थ विदुरास आज्ञा व कपटत्यागोत्तर विदुरोत्तर ( १–१३ ). दुर्योधनाचा हट्ट-कृष्णास पकडण्याची सल्ला-भीष्म व धृतराष्ट्र यांचा उपदेश ( १४–२९ ), कृष्णस्वागत-धृतराष्ट्रविदुरांस भेट ( ३०–३४ ). विदुराचें भाषण ( ३५–४२ ). कुंतीचे कृष्णास कुशलप्रश्न व कृष्णोत्तर ( ४३–६० ), दुर्योधनादिकांची भेट व तत्कृत भोजनामंत्रणाचा अस्वीकार

( ६१-६९ ); विदुरगृहीं भोजन ( ७०-७९ ); विदुरकृष्णसंवाद ( ८०-८७ ); कौरवसभेत गमन व कृष्णसत्कार ( ८८-९९ ).

**अध्याय ८ वा; (पृ० ६४)**:—कृष्णाचा सामोपदेश (१-२२); भृगुरामाचा उपदेश व दंभोद्भवगर्वपरिहारक नरनारायण ते च हे कृष्णार्जुन असे कथन ( २३-४७ ). कण्वाचे भाषण-मातलिजामाता सुमुखनाग याची कथा-गरुडाचा गर्वपरिहार ( ४८-७८ ); दुर्योधनोत्तर ( ७९ ); नारदोपदेश ( ८०-१०५ ):-विश्वामित्र व वसिष्ठवेषी यम यांची कथा ( ८१-८६ ); शिष्य गालव व विश्वामित्रास गुरुदाक्षिणार्थ माधवीविक्रय ( ८७-१०५ ).

**अध्याय ९ वा; (पृ० ७६)**:—धृतराष्ट्राचे प्रार्थनेवरून (१-२) कृष्ण दुर्योधनास उपदेश करितात ( ७-१९ ) भीष्म, द्रोण, विदुर व धृतराष्ट्र यांचा पुनर्बोध ( २०-२६ ); दुर्योधनाचे स्वकृत्यसमर्थनपर भाषण ( २७-४१ ); कृष्ण दुर्योधनाचे अपराध सांगतो (४२-५२); दुःशासन कृष्णास धाक दाखवितो ( ५३-५४ ); दुर्योधन उठतो ( ५५ ), भीष्माचा शोक ( ५६ ); 'दुर्योधनास कां पकडीत नाहीं ?' असे कृष्ण विचारितो ( ५७-६३ ); गांधारीकडून दुर्योधनास उपदेश ( ६४-८१ ); कृष्णबंधनविचार ( ८२-८५ ); सात्यकिवार्ताकथन व भाषण ( ८६-९० ); विदुरप्रश्न ( ९१-९२ ); कृष्णाचे भाषण ( ९३-९७ ); धृतराष्ट्र दुर्योधनास पुनः आणवितो (९८-९९ ).

**अध्याय १० वा; (पृ० ८६)**:—भगवद्यानं-पंत. धृतराष्ट्र विदुरकृत दुर्योधननिषेध ( १-८ ); कृष्णकृत विश्वरूपप्रकटन व भीष्मादिकास दिव्यदृष्टि ( ९-१५ ); धृतराष्ट्रास दिव्यदृष्टि ( १६-२० ); कृष्णनिर्गमन-धृतराष्ट्र व कृष्ण यांचीं भाषणें ( २१-२८ ); कुंतीस निरोप विचारणें ( २९-३० ); कुंतीचे उत्तर ( ३१-६३ ):-विदुलोपाख्यान ( ३५-४७ ); अर्जुनास निरोप ( ४८-५० ); भीमास निरोप ( ५१-५३ ); नकुळास निरोप ( ५४ ), सहदेवास निरोप ( ५५-५६ ); द्रौपदीस निरोप (५७-६० ); साराश (६१-६३); कर्णासह श्रीकृष्ण जातात ( ६४-६५ ); भीष्मद्रोणादींची उद्विग्नता ( ६६-७१ ); कर्णास निरोप ( ७२ ); धृतराष्ट्राचा प्रश्न ( ७३ ); संजय कृष्णकर्णसंवाद सांगतो ( ७४-१०८ ):-' त्वां कुंतीपुत्रानें पांडवांस सामील व्हावें ' असा कर्णास कृष्णाचा आग्रह ( ७४-७९ ); कर्णाचें उत्तर ( ८०-९३ );

कृष्णाचें भाषण ( ९४-९८ ); कर्णोत्तर व स्वप्रकथन ( ९९-१०४ ); परस्पर प्रेमभेट व दोघांचे परतणें ( १०५-१०८ ).

**अध्याय ११ वा; (पृ० ९९):**—विदुराचे उद्गार (१-२). कुंती कर्णोत्पत्तिकथा सांगते. ( ३-५ ) कर्णास कुंतीचा उपदेश व तदुत्पत्तिकथन ( ६-१८ ). अर्जुनेतरपांडवरक्षणवचनपर कर्णोत्तर ( १९-३० ), कृष्ण धर्मास वृत्त सांगतो. ( ३४-८१ ):-भीष्मोपदेश ( ३६-४३ ); द्रोणोपदेश ( ४४-४८ ), विदुरोपदेश ( ४९-५६ ); गांधारीचा उपदेश ( ५७-६४ ); पूर्वजवृत्तकथन व धृतराष्ट्राचा उपदेश ( ६५-७५ ); कर्णभेदप्रयत्न, स्वतःच्या बंधनाचा प्रयत्न व विदुरस्तुति ( ७६-८१ ); दोन्हीकडील सेनापती ( ८२-८५ ); भीष्मदुर्योधनसंवाद व भीष्मसेनापत्याभिषेक ( ८६-१०० ). धृष्टद्युम्नास पांडवसेनापत्यदान व युद्धभूम्यागमन ( १०१-१०३ ) बळरामाचे धर्माशी भाषण ( १०४-१०९ ). मदतीला आलेल्या रुक्मीचे भाषण व अर्जुनाचे उत्तर ( ११०-१२२ ), क्रुद्ध रुक्मीचा दुर्योधनाकडून धिक्कार ( १२३ ).

**अध्याय १२ वा; (पृ० ११३):**—संजय धृतराष्ट्रास सांगतो—उलूककृताकडून धर्मार्जुनांस निंदापर निरोप व पांडवक्रोध (१-२०). उलूकास कृष्णाचा परत निरोप ( २१-२२ ) भीमाचा निरोप ( २३-२७ ), अर्जुनाचा निरोप ( २८-३७ ); धर्माचा निरोप ( ३८-४५ ), नकुलादींचा निरोप ( ४६ ); भीष्मकृत कौरवबळगणन ( ४८-५९ ) 'अर्धरथ' शब्दानें कर्णाचा संताप व भाषण ( ६०-७० ); भीष्माचें प्रत्युत्तर ( ७१-७५ ) दुर्योधनकृत समेट ( ७६-७९ ) भीष्मकृत पांडवबळवर्णन ( ८०-९३ ); शिखंडि हा युद्धाला अयोग्य आहे ( ९४ ); भीष्मकृत शिखंड्युत्पत्तिकथनारंभ—अंबेचा शाल्वकृत तिरस्कार व तिचा भीष्मनाशार्थ तपादिउद्योगारंभ ( ९५-१०७ ).

**अध्याय १३ वा (पृ० १२५):**—अंबोपाख्यान—पंत. होत्रवाहन—अकृतव्रण व परशुराम अंबेला भेटतात ( १-६ ); परशुराम व अंबा यांचा संवाद व भीष्मनाशार्थ परशुरामप्रयाण ( -२० ) अंबास्वीकारार्थ परशुरामाज्ञा व भीष्माची अमान्यता ( २१-२८ ) रामाचा क्रोध ( २९-३४ ) भीष्मपरशुरामसंवाद व युद्धाची तयारी ( ३५-४७ ) गंगाभीष्मसंवाद—गंगेची रामास प्रार्थना—त्याचे उत्तर—गंगेचा पुनरुपदेश ( ४८-६० ). युद्धारंभ व परशुरामनमन ( ६१-७० ); प्रथमदिनयुद्ध

( ७१–८१ ), द्वितीयदिनयुद्ध ( ८२–१०१ ); तृतीयदिनयुद्ध व परशुराम विव्हल होतो ( १०२–११० ); चतुर्थदिनयुद्ध–भीष्ममूर्छा–वसुकृतरक्षण–गंगेशीं संवाद ( १११–१२५ ): तेविसाव्या दिवशीं वसू भीष्मास प्रस्वापनास्त्रबोध करितात ( १२६–१२९ ), चोविसाव्या दिवसाचे तुमुलयुद्ध–ब्रह्मास्त्रप्रयोग–प्रस्वापनास्त्र-प्रयोगापासून भीष्माची नारदादीकडून निवृत्ति ( १३०–१५५ ): रामभीष्मास जमदग्न्यप्रमुखाचा उपदेश. ( १५६–१६४ ), वसूपदेशानुसार भीष्म धनुष्य टाकून दिलेल्या गुरूस नमस्कार करितात ( १६५–१६९ ); परशुरामाचें भाषण–असंतुष्ट अंबा तपार्थ वनास जाते ( १७०–१८२ ), रामभीष्मनिवर्तन ( १८३–१८५ ); अंबेस शंकराचा वर–भीष्माची देवास प्रार्थना–द्रुपदास स्त्रीपूर्वपुत्रप्राप्तीचा वर–त्याचे पोटीं अंबा येते ( १८६–१९६ ); अंबेचें लग्न–गुह्यस्फोट–द्रुपदाचा व्याही युद्धार्थ येतो ( १९७–२०३ ), द्रुपदाचें स्वस्त्रीशीं भाषण ( २०४–२०६ ). शिखंडींस आश्वासन ( २०७ ), शिखंडीचें तप, स्थूणाकर्ण यक्ष तिचें स्त्रीत्व स्वीकारून आपलें पुरुषत्व तिला देतो ( २०८–२१२ ); द्रुपद व व्याही याचा समेट व जामातृ-सत्कार ( २१३–२१९ ) कुबेराचा स्थूणाकर्णास शाप व उःशाप ( २२०–२२७ ); शिखंडीस यक्षशापामुळें पुरुषत्व कायमचें मिळतें ( २२८–२३० ): शिखंडी युद्धानुचित असण्याचें कारण ( २३१–२३३ ).

**अध्याय १४ वा: (पृ० १४९):**—पांडवबळमथनविषयक दुर्योधनभीष्म-कर्णादींचा संवाद ( १–५ ), कौरवबळमथनविषयक धर्मप्रश्न व अर्जुनोत्तर ( ६–१७ ), युध्दार्थ तयारी ( १८ ), उपसंहार ( १९–२० ).

---

## ६. भीष्मपर्व.

### ( पद्यसंख्या ९१७ ).

**अध्याय १ ला: (पृ० १५३):**—धृतराष्ट्राच्या प्रार्थनेवरून व्यास संजयास दिव्यदृष्टि देतात (**गीति** १–७), संजय युद्धवार्ता सांगतो–भीष्मपतनामुळें धृतराष्ट्राचा शोक व संजयास प्रश्न (८–२७), संजयाचें युद्धवार्ताकथन (२८–११४):–भीष्म-भीमाचा अनुक्रमें कौरवपांडवसेनाधिपत्यस्वीकार (२८–४०), अर्जुनास दुर्गावरदान ( ४१–५१ ), गीताकथन ( ५२–७४ ): धर्म भीष्मनमनार्थ जातो–मागून भीमा-

दिक जातात ( ५५–६० ); कौरवपक्षीयकृत धर्माची टवाळी ( ६१–६६ ); भीष्म-धर्मसंवाद–स्ववधोपायकथनार्थ भीष्मास प्रार्थना–भीष्म पुनः येण्यास सांगतात ( ६७–८१ ); ' सुहृदप्रियश्रवण हे स्वमरणकारण होय, ' असे द्रोण सांगतात ( ८२–८७ ); ' अमरत्वामुळें नाइलाज ' असें कृपाचार्य बोलतात ( ८८–९५ ); शल्यापासून कर्णतेजोवधवरलाभ ( ९६–९९ ); कर्णभेदार्थ कृष्णाचा अयशस्वी प्रयत्न ( १००–१०४ ), शरणागतास अभय पुकारल्यावरून ' युयुत्सु ' धर्माकडे येतो ( १०५–१११ ); धर्माची युध्दार्थ तयारी ( ११२–११४ ).

अध्याय २ राः (पृ० १६६):—प्रथमद्वितीयदिनयुध्द (१–८१):–युध्दारंभ-भीमगर्जना–वीरद्वंद्वें–भीष्मकृत श्वेतराजवध (१–१५); धर्माचें कृष्णाशी खिन्न होऊन भाषण ( १६–२५ ). कृष्णाचे सांत्वनपर उत्तर ( २६–३३ ); धृष्टद्युम्नशिखंडीप्रत धर्माचें भाषण ( ३४–३७ ); भीष्मार्जुनयुद्ध ( ३८–४६ ); धृष्टद्युम्नद्रोणयुद्ध ( ४७–५१ ), भीमकृत कालिंगपराभव ( ५२–५७ ); कृपशल्यद्रौणि व धृष्टद्युम्न यांचे युद्ध ( ५८–५९ ); लक्ष्मणाभिमन्युयुध्द ( ६०–६८ ); युद्धवर्णन ( ६९–७८ ) युध्दोपशम ( ७९–८१ )

अध्याय ३ राः (पृ० १७५):—तृतीयदिनयुध्द (१-५४):–दुर्योधनास भीम मूर्च्छित करितो–दुर्योधनाचे भीष्माप्रत भाषण व घोर युध्द करण्याची भीष्माची प्रतिज्ञा ( १–१० ); भीष्मकृत घोर युध्द–भीष्मार्जुनाचे तुमुलयुद्ध ( ११–२९ ); कृष्णकोप व भीष्मवधार्थ सचक्र धावन (३०–४४) अर्जुनकृत कृष्णनिवारण (४५–५१); अर्जुनकृत महेंद्रास्त्रप्रयोग (५२–५४).

अध्याय ४ थाः ( पृ० १८१ ):—चतुर्थदिनयुध्दः–अभिमन्युभीष्मयुद्ध (१–३) भीष्मार्जुनयुध्द ( ४–८ ), अभिमन्यूचा पराक्रम (९); धृष्टद्युम्नार्जुन व कौरव यांचें युध्द ( १०–१६ ). संजयधृतराष्ट्रसंवाद (१७–२३), शल्य व अभि-मन्युधृष्टद्युम्नयुद्ध ( २४–२६ ). भीमकृत दशसहस्रगजनाश ( २७–३२ ); भीमाचा पराक्रम (३३–४२) भगदत्त गज पुढें करितो ( ४३–४९ ). घटोत्कचाचें लाघव ( ५०–५४ ). भीष्माचे भाषण ( ५५–६१): भीष्मद्रोण परततात (६२);

अध्याय ५ वाः (पृ० १८७ ): -पंचमदिनयुध्दः–धृतराष्ट्रसंजयसंवाद (१-७): भीष्म नरनारायणकथा दुर्योधनास सांगतात (८–२९), भीष्मादि व भीमसात्यकि-धृष्टद्युम्नाभिमन्युशिखंडी याचे युद्ध ( ३०–४२ ); भीष्म व भीमार्जुन यांचें युद्ध

( ४३-४८ ); सात्यकिपराभव ( ४८-५० ); अश्वत्थामार्जुनयुध्द ( ५१-५९ ); अभिमन्युकृत लक्ष्मणपराभव ( ६० ): सात्यकिभूरिश्रवायुद्ध ( ६१-६७ ).

**अध्याय ६ वा; (पृ० १९४)**:—षष्ठदिनयुध्द:-भीमद्रोणयुद्ध (१-६); भीम व्यूहांत शिरून युध्द करितो ( ७-११ ) धृष्टद्युम्नकृत भीमसहाय, मोठें युद्ध व द्रोणकृत धृष्टद्युम्नपराभव ( १२-३४ ); भीमदुर्योधनयुध्द ( ३५-५० ); युध्दावहार ( ५१ ).

**अध्याय ७ वा; (पृ० १९९)**:—सप्तमदिनयुध्द-भीष्मदुर्योधनसंवाद (१-८); पार्थकृत त्रिगर्तपराभव ( ९-१५ ); विराटपराभव व तत्सुतनाश (१६-२०); द्रौणीकृत शिखंडीपराभव व सात्यकिकृत अलबुषमायानाश ( २१-२६ ); धृष्टद्युम्न भीमइरावान्कृत दुर्योधनकृतवर्मानुविदविंदपराभव-भगदत्तकृत घटोत्कचपराभव-शल्यपराक्रम-सहदेवशल्ययुद्ध-धर्मश्रुतायुयुद्ध-कृपचेकितानयुद्ध-अभिमन्युकृत विकर्णादिपुत्रत्रयवध (२७-३७); भीष्माचे घोर युद्ध (३८-५८ ), युध्दावहार ( ५९).

**अध्याय ८ वा; (पृ० २०६ )**:—अष्टमदिनयुध्द-भीमभीष्मयुध्द व सप्तधार्तराष्ट्रहनन (१-५); भीष्मदुर्योधनसंवाद (६-१३ ); इरावानृष्यशृंगियुद्ध-सुयोधन-घटोत्कचयुध्द ( १४-२० ); द्रोणभीमपराक्रम ( २१-३३ ), घटोत्कचाची माया ( ३४-४४ ); भगदत्ताचा पराक्रम ( ४५-५४ ), इरावन्मृत्यु-पार्थशोक-व्यूढोरस्कादि नऊ धार्तराष्ट्रांचा मृत्यु ( ५५-६३ ); भीमार्जुनपराक्रम ( ६४-६५ ); युध्दावहार ( ६६-६८ ).

**अध्याय ९ वा; ( पृ० २१२ )**:—नवमदिनयुध्द-कर्णदुर्योधनाची मसलत ( १-६ ); भीष्मदुर्योधनसंवाद व भीष्मप्रतिज्ञा ( ७-३० ); शकुन्यादींस भीष्मसंरक्षणाज्ञा (३१-३५); अर्जुनाचें भाषण (३६-३८); अभिमन्युपराक्रम (३९-४६); कृपाचें युद्ध, अश्वत्थाम्याचा पराक्रम व द्रोणार्जुनयुध्द (४७-५५ ); अर्जुनकृत सुशर्मेपराभव ( ५६-६२ ); सुयोधन, भगदत्त व भीम याचे पराक्रम ( ६३-६९ ); भीष्माचे घोर युध्द ( ७०-७४ ); कृष्णार्जुनसंवाद ( ७५-७९ ); भीष्मार्जुनयुद्ध ( ८०-९० ); कृष्णाचें भीष्मवधार्थ धावन ( ९१-९७ ); भीष्माचें कृष्णाप्रत भाषण ( ९८-१०३ ); अर्जुन कृष्णास परतवितो (१०४-१०९ ); भीष्मपराक्रम-कौरवविजयहर्ष व युध्दावहार ( ११०-११८ ).

**अध्याय १० वा; (पृ० २२३)**:—दशमदिनयुद्ध-धर्मकृष्णसंवाद (१–२२); भीष्मप्रतिज्ञा व तन्निवारणार्थ भीष्माकडे जाण्याचा विचार–धर्मभीष्मसंवाद ( २३–४८); शिखंडिद्वारां स्ववध करण्याविषयी भीष्मोपदेश, कौरवरक्षित भीष्म व पांडव-पुरस्कृत शिखंडी यांचा घोर संग्राम ( ४९–५६ ); शिखंडीपार्थप्रमुखाचा भीष्मावर हल्ला व भीष्माचा अद्भुत पराक्रम (५७–१०१); भीष्मकृत पार्थस्तुति ( १०२–१०७ ); भीष्मपतन ( १०८–११९ ). सुरस्तुति व आकाशवाणि (१२०–१२३); भीष्माचें उत्तर ( १२४–१२९ ), युद्धावहार ( १३०–१३३ ), पांडवकौरव भीष्मदर्शनास येतात–अर्जुनहस्तें भीष्म उशी घेतात ( १३४–१४१ )· भीष्माचे उद्गार व समेटाची प्रार्थना (१४२–१४७). वैद्यसत्कार–सर्व परत जातात (१४८–१५१); धर्मकृष्णसवाद ( १५२–१६० ).

**अध्याय ११ वा; (पृ० २३८)**:—कौरवपांडव भीष्मदर्शनार्थ जमतात-भीष्म पाणी ' मागतात–अर्जुन त्याची इच्छा पुरवितो ( १–१५ ), भीष्मकृत अर्जुन-स्तुति ( १६–२० ) दुर्योधनास सामोपदेश ( २१–२८ ); सर्व गेल्यावर कर्ण येतो–कर्णभीष्मसंवाद ( २९–७७ ); पाडवास मिळण्याबद्दल भीष्माचा कर्णास उपदेश ( ३४–५३ ); कृतघ्नतादोषभीतीनें कर्णाची त्यास अमान्यता ( ५४–७० ); भीष्मोत्तर (७१–७४); कर्णाचा गहिंवर व परतणें (७५–७७); **आर्याभारत-**वर्णन (७८–८३).

---

# ७. द्रोणपर्व.

## ( पद्यसंख्या २५०१ ).

**अध्याय १ ला; ( पृ० २४७ )**:—प्रथमदिनयुद्ध–शोकार्त धृतराष्ट्राप्रत संजयाचें भाषण–भीष्म पडल्यावर कर्णाच्या सूचनेवरून द्रोणास सैनापत्याचा अभि-षेक-द्रोणमरण (**गीति** १–१६); धृतराष्ट्राचा विलाप, मूर्च्छा व पुनः भाषण (१७–४१); दुर्योधन 'धर्मास पकडून आणीन' असा वर द्रोणाजवळून मिळवितो ( ४२–६० ); धर्मास ही बातमी लागल्यावर त्याचें अर्जुनास ' माझें रक्षण कर ' असे मागणे व अर्जुनोत्तर ( ६१–७४ ); युद्धारंभ व द्रोणपराक्रम ( ७५–८० ); सौभद्राचें अनुक्रमें पौरव, जयद्रथ व शल्य यांशीं युध्द ( ८१–८९ ); भीमशल्ययुद्ध (९०–९४);

वृषसेन व शतानीक, कर्णकृपद्रौणि व द्रौपदेयपार्षतसात्यकि यांचीं युध्दें (९५–१०१); द्रोण पांडवसैन्यास झोडतो (१०२–११०): अर्जुनाचा पराक्रम (१११–११७); युध्दोपशम (११८–१२०); द्रोणाचें दुर्योधनाशी भाषण व अर्जुनाला गुंतवून ठेवण्याची सुशर्माप्रमुखांची–ससप्तकाची–प्रतिज्ञा (१२१–१२८).

**अध्याय २ रा; (पृ० २५८):**—द्वितीयदिनयुध्द–अर्जुन धर्मापासून संसप्तकांशी युध्द करण्याची परवानगी मिळवितो (१–६), अर्जुनसंसप्तकयुद्ध (७–२३); द्रोण धर्मप्रमुख पांडवांस पळवितो (२४–३३); याबद्दल कर्णदुर्योधनसंवाद (३४–३९), पांडव उलटतात–भीमाचा पराक्रम–भगदत्ताच्या हत्तीशी युध्द (४०–५४); भगदत्ताचा पराक्रम–अर्जुनाचे भगदत्ताच्या गजाशी युद्ध (५५–६६): भगदत्ताचा अंकुश आपल्या छातीवर घेतल्याबद्दल अर्जुनाचे कृष्णाशी भाषण–भगदत्ताचा अगोदर वध करण्याबद्दल कृष्णाची सूचना व भगदत्ताचा वध (६७–७६): गांधाररथींचा अर्जुन वध करितो–शकुनीचा पराभव–द्रौणि नीलास मारतो–कर्णबंधूचा वध द्वितीयदिन युद्धाचा परिणाम.(७७–८७)

**अध्याय ३ रा: (पृ० २६७):**—तृतीयदिनयुध्द–दुर्योधनद्रोणसंवाद व द्रोणप्रतिज्ञा (१–१०); चक्रव्यूहरचना–व्यूहभेदार्थ धर्माचा अभिमन्यूस आज्ञा (११–१८). अभिमन्यूचें आश्वासन (१९–२५) सूताशी अभिमन्यूचे भाषण (२६–२९); अभिमन्यूचा पराक्रम (३०–३९); द्रोणादिक अभिमन्यूपासून दुर्योधनास सोडवितात (४०–४८); अभिमन्यूचा पराक्रम व द्रोणाचा संतोष (४९–६०); दुर्योधन कर्णापाशी द्रोणनिंदा करितो (६१–६४); दुःशासनाची गर्वोक्ति (६५–६८), त्याचा पराभव (६९–७५), कर्णाचे पलायन (७६–८०), अभिमन्यूचा पराक्रम (८१–८४); धृतराष्ट्रोद्गार–संजयकथन पुढें चालू–अभिमन्युकृत लक्ष्मणवध, (८५–९५); सर्वांचा एकवटून अभिमन्यूवर हल्ला–अभिमन्यूचा अद्भुत पराक्रम–कौरववीरांचा धैर्यनाश (९६–११३); द्रोणाचें कर्णाशी भाषण (११४–१२१); अभिमन्यूचें युद्ध (१२२–१४०); साभद्रदौःशासनियुद्ध व असावध अभिमन्यूचा वध (१४१–१४५): कौरवांचा आनंद व धर्मादिकांचे दुःख (१४६–१५०).

**अध्याय ४ था: (पृ० २८०):**—चतुर्थदिनयुध्द–धर्माचा शोक (१–५); व्यासकृत सांत्वन (६–९). धर्माच्या प्रश्नावरून व्यास व्यास मृत्युस्वरूप सांगतात–नारद अकंपनास तें च पूर्वी सांगतात (१०–१४); ब्रह्मदेवाचा कोप व मृत्यूची

उत्पत्ति–तिचें तप–तीस विधींचा वर व रोगोत्पत्ति (१५–४२); सृंजयकथा–सृंजयकन्येवरून नारदपर्वतांचा वाद–संजयास नारदद्वारेकरून पुत्रप्राप्ति–पुत्रनाश व संजयांचा शोक (४३–६२);नारदाचा सृंजयास उपदेश व षोडशराजिक आख्यानें–मरुत्तचरित (६३–८०); सुहोत्रचरित (८१–८८); अंगकथा (८९–९२); शिबिकथा (९३–१००).

**अध्याय ५ वा; (पृ० २९०)**:—नारदोपदेश पुढें चालू–रामकथा (१–११); भगीरथकथा (१२–२१); दिलीपकथा (२२–३१); युवनाश्वपुत्र मांधाता याची कथा (३२–४८); ययातिकथा (४९–५७); अंबरीषकथा (५८–६७); शशबिंदुकथा (६८-७८) गयचरित–अग्नीपासून वरप्राप्ति–वैभववर्णन (७९–९९).

**अध्याय ६ वा; (पृ० ३००)**:—रंतिदेवचरित (१–१७); भरतचरित (१८–३३): पृथुचरित (३४–४७); भार्गवरामचरित (४८–६६). व्यासांचा धर्मास उपदेश–सृंजयास नारदाचा बोध–संजयपुत्राचें जीवंत होणें (६७–८६).

**अध्याय ७ वा; (पृ० ३०८)**:–संसप्तक मारून परत येणाऱ्या अशुभशंकी अर्जुनाचे कृष्णाशी भाषण (१–१२) अर्जुनाचा अभिमन्यूसंबंधी आक्रांत (१३–३५); कृष्णकृत सांत्वन (३६–३९) धर्म हकीकत सांगतो (४०–४७): अर्जुनाची मूर्च्छा, सावध होणें व जयद्रथवधप्रतिज्ञा (४८–६३). प्रतिज्ञाभीत जयद्रथास दुर्योधनाचे आश्वासन (६४–७०). जयद्रथास द्रोणाचे अभयदान (७१–८५).

**अध्याय ८ वा; (पृ० ३१५)**:—प्रतिज्ञेच्या कठिणपणाविषयीं अर्जुनाशीं कृष्णाचे भाषण (१–८). अर्जुनाचे उत्तर (९–१७); अर्जुनाचे सांगण्यावरून कृष्ण सुभद्रेचें सांत्वन करितात (१८–२६). सुभद्रेचा विलाप (२७–३२): उत्तरागमन–सुभद्रेची मूर्च्छा–कृष्णकृत सांत्वन (३३–३९); अर्जुनाची शंकरपूजा–कृष्णास झोंप लागेना (४०–५०): रथादि सिद्ध ठेवण्याविषयी दारुकाशीं कृष्णाचे भाषण (५१–५९). कृष्ण अर्जुनास स्वप्नांत दर्शन देऊन भीतीचे कारण विचारितो (६०–६३); अर्जुनाचे उत्तर (६४–६८). पाशुपतास्त्र मिळविण्याविषयीं अर्जुनास उपदेश (६९–७३) समाधींत अर्जुनास कृष्णासह शंकराचे दर्शन (७४–९४); पाशुपतप्राप्ति (९५–१०५). धर्माचे वर्णन–कृष्णाचा सत्कार–पांडववीरांचीं आगमनें–कृष्णाचे आश्वासन–धर्माचा अर्जुनास आशीर्वाद–अर्जुन स्वप्न सांगतो–धर्माज्ञेवरून भीमादिक युद्धार्थ जातात (१०६–१२५).

**अध्याय ९ वा; (पृ० ३२६):**—कृष्ण, अर्जुन व सात्यकि याचे रथारोहण-सात्यकी भीमाचे रक्षणास जातो ( १-१२ ); द्रोणाची व्यूहरचना (१३-१७): कृष्णार्जुनांचें शंखस्फुरण-युद्धारंभ-दुःशासनाचे पलायन ( १८-२४ ); अर्जुन द्रोणाजवळ आशीर्वाद मागतो ( २५-२९ ); द्रोणार्जुनयुध्द ( ३०-३८ ); अर्जुन द्रोणास डावलून, कृतवर्मा, श्रुतायुध, अच्युतायु इत्यादि कौरवपक्षीय वीरांचा पराभव करून व्यूहांत शिरतो ( ३९-६९ ); द्रोणास दुर्योधन दोष देतो ( ७०-७७ ): द्रोणाचे उत्तर ( ७८-८६ ); द्रोण दुर्योधनाशी भाषण करून त्यास दुर्भेद्य कवच लेववून जयद्रथरक्षणार्थ पाठवितो ( ८७-९६ ).

**अध्याय १० वा; (पृ० ३३५):**—भीमादि पांडवीयाचा पराक्रम-द्रोणाचा-यांचें युद्ध (१-११): सात्यकिद्रोणयुद्ध ( १२-२४ ); पार्थाचा पराक्रम-अनुविंदाचा वध-घोड्यांस विश्रांति ( २५-४० ); देवर्षीचे उद्गार ( ४१-४७ ); अर्जुनाच्या घोड्यांची कृष्णाने केलेली चाकरी ( ४८-५१ ); दुर्योधनपार्थयुद्ध-कवचभेद-दुर्योधनाचा पराभव-कृष्णार्जुनाचा शंखनाद-अर्जुनाचे कर्णभूरिश्रवादिकांशी युद्ध (५२-८९).

**अध्याय ११ वा; (पृ० ३४३):**—धर्मद्रोणयुद्ध-धर्माचे पलायन (१-१३ ); धर्म आज्ञा करितो ( १४-१९ ): म्हणून सात्यकि व्यूहांत शिरण्यास निघतो (२०-२७); सात्यकी द्रोणास डावलून इतराना झोडपीत पुनः आलेल्या द्रोणाला हि न जुमानतां व्यूहांत शिरतो (२८-४८); द्रोणकृत पांचालनाश-धर्माच्या आज्ञेवरून भीम व्यूहात शिरण्यासाठी जातो ( ४९-६१ ), द्रोणभीमयुद्ध-भीमकृत द्रोणनिर्भर्त्सना (६२-८९); द्रोणावर गदा टाकणे-भीमाचा पराक्रम-भीम व्यूहांत शिरतो (९०-९४); धर्माचा आनंद (९५-१०२); धृतराष्ट्राचा संताप (१०३-१०६); संजय भीमाने केलेला कर्णपराभवादि पराक्रम वर्णितो (१०७-११५).

**अध्याय १२ वा; (पृ० ३५३):**—दुर्योधनाचे खिन्नयुक्त अन्तःकरणाने द्रोणास प्रश्न (१-६); द्रोणाचे उत्तर (७-११); दुर्योधनाचे युधामन्यु वगैरेशीं युद्ध (१२-१९). भीमकर्णाचें युद्ध व धृतराष्ट्राचा संजयास प्रश्न ( २०-३१); संजय भीमकर्णयुद्ध वर्णितो (३२-१८६):-दुर्जयवध (५७-६१). दुर्मुखवध (६९-७२); कर्णाचे पलायन (८३-८६), धृतराष्ट्राचे भाषण (८८-९१); संजयाचे उत्तर (९२-९६) भीमकृत दुर्धरादि पांचांचा नाश (९७-९९); कर्णाचें पुनः युद्ध व

पलायन (१००–१०५); चित्रादिकांचा वध–शत्रुंजयादिकांचा वध (१०६–१२३); भीमाची विकर्णस्तुति (१२५–१२९); भीमकर्णयुद्धवर्णन (१३०–१७३); कर्णाचें भीमाशीं भाषण (१७४–१७८); भीम कर्णास भुजयुद्धार्थ बोलावितो (१७९–१८०); अर्जुन भीमसहाय्यार्थ येतो (१८२–१८६).

**अध्याय १३ वा; (पृ० ३७१):**—कृष्णकृत सात्यकिस्तुति (१–३); अर्जुनाचें भाषण (४–७)· सात्यकि व भूरिश्रवा यांचे युद्ध (८–६५):— एकमेकावर वाग्बाण (८–१६) सात्यकीचा पराभव व त्यास लत्ताप्रहार–अर्जुन भूरिश्रव्याचा हात तोडितो (१७–२८). भूरिश्रवा व पार्थ यांचा संवाद (३१–३९); भूरिश्रव्याचें प्रायोपवेशन–अर्जुनाचे भाषण (४०–४७) कृष्णार्जुनाचा संतोष-सात्यकि भूरिश्रव्याचे मस्तक तोडितो–त्याचे भाषण (४८–६३); संजय सोमदत्ताच्या वरप्राप्तीची कथा सांगतो (६४–७३) व त्याचें धृतराष्ट्राशीं भाषण (७४–७७).

**अध्याय १४ वा (पृ० ३७९):**—पार्थाची कृष्णास घाई (१–४); दुर्योधनाचें भाषण व कर्णाचे उत्तर (५–१६); पार्थाचा पराक्रम (१७–२५); कर्णार्जुनयुद्ध (२६–३४); पार्थाचा पराक्रम (३५–४२); कृष्णाचे अर्जुनाशी भाषण व खोटा सूर्यास्त करण्याचा विचार (४३–४८); सूर्यावरण व अर्जुनाचें युद्ध (४९–५९); कृष्ण जयद्रथाच्या जन्मकाळची आकाशवाणी, बृहद्रथाचा शाप व तो टाळण्याचा उपाय सांगतो (६०–६५); जयद्रथाचा वध व बृहद्रथाचा मृत्यु (६६–६८); पुनः सूर्यप्रकाश व अर्जुनाचा विजय (६९–८०).

**अध्याय १५ वा; (पृ० ३८६):**—गुरु कृपाचार्यांची मूर्छा व अर्जुनाचा शोक (१–१०); सात्यकीची स्तुति (१३–१८); सात्यकीकृत कर्णपराभव (१०–२५); कर्णकृष्णाचें रथारोहण व भीम अर्जुनास कर्णाची दुर्भाषणें सांगतो (२६–३८); अर्जुनाचें कर्णाशी भाषण (३९–४७); कृष्णकृत अर्जुनाचे अभिनंदन (४८–५५); अर्जुनाचा गाहिंवर (५६–६२); कृष्णार्जुन धर्मास भेटतात (६३–६९); कृष्णधर्मसंवाद (७०–७८); सात्यकी व भीम यांचा सत्कार (७९–८४); दुर्योधनाचा शोक व त्याचें द्रोणाजवळ भाषण (८५–९१); द्रोणाचार्यांचें उत्तर व पांचाळवधप्रतिज्ञा (९३–११३); द्रोणाचे युद्ध (११४).

**अध्याय १६ वा:(पृ० ३९७):**—दुर्योधनकृत द्रोणनिंदा (१–६); कर्णाचा निषेध (७–१७); दुर्योधनाचा पराक्रम–धर्माशीं युद्ध (१८–२५), द्रोणाचार्यांचा

पराक्रम (२६–३३); भीमाचा पराक्रम (३४–४६); सात्यकिसोमदत्तसंवाद (४७–५२) व युद्ध (५३–५५) द्रोण व पार्थ याचा पराक्रम (५६–६३); अश्वत्थामा व घटोत्कच यांचे घोर युद्ध–अश्वत्थाम्याचा अद्भुत पराक्रम व विजय (६४–१२०).

**अध्याय १७ वा. (पृ० ४०८):**—सात्यकि व सोमदत्त यांचे युद्ध–बाल्हीकाचा वध–भीमाचा पराक्रम (१–१३). धर्मद्रोणयुद्ध (१४–१८); द्रोणकृत पाचाळक्षय–पाडवाचा पराक्रम (१९–२२); कर्ण वासवी शक्तीच्या बळावर दुर्योधनास धीर देतो (२३–३०). कृपाची कडक कर्णनिंदा (३१–४१). कर्णाचे उत्तर (४२–४९). कृप पुन. बोलतो (५०–५४) कर्णाची कृपनिंदा (५५–५९). कर्णावर तरवार उपसून धावणाऱ्या अश्वत्थाम्याचें भाषण (६०–६७); दुर्योधन त्यास समजावितो (६८–७३): कर्णार्जुनयुद्ध–दुर्योधनाचें युद्ध (७४–८१), अश्वत्थामा व दुर्योधन यांचा संवाद (८२–९४); अश्वत्थाम्याचा पराक्रम–धृष्टद्युम्न व अश्वत्थामा यांचा संवाद व युद्ध (९५–१०३), धृष्टद्युम्नाचा पराभव व अश्वत्थाम्याचा विजय (१०४–११०).

**अध्याय १८ वा. (पृ० ४१७):**—सात्यकीचें युद्ध-द्रोणधर्मयुद्ध (१–८); धर्म द्रोणाशी युद्ध न करण्याविषयीचा कृष्णोपदेश ऐकतो (९–१३); रात्र व दीपप्रकाश (१४–१८), परस्परांची व्यूहादिरचना-युद्धारंभ (१९–२७). द्रोणघटोत्कचयुद्ध (२८–३१); दुर्योधनभीमयुद्ध (३२–३६); कर्ण सहदेवाचा पराभव करितो (३७–४३): द्रोणशल्यादिक व विराटादिक यांचे युद्ध–विराटाची मूर्च्छा–अलंबुष राक्षसाचें पलायन–परस्परवीराचीं युद्ध (४४–६०); धृष्टद्युम्न व द्रोण यांचे युद्ध (६१–७१), सात्यकीचा पराक्रम (७२–८०); शकुनि अर्जुनावर जातो व पराभव पावतो (८१–८७)..

**अध्याय १९ वा. (पृ० ४२५):**—सात्यकीदुर्योधनयुद्ध, दुर्योधनाचें द्रोणाशी त्वेषपूर्ण भाषण (१-११), कर्णशौर्य-धर्मभीति-वासवी शक्तीच्या परिहारार्थ घटोत्कचास पुढें करण्याविषयी कृष्णाची अर्जुनास सूचना (१२–२१). घटोत्कच ते मान्य करितो (२२-२७), घटोत्कच अलायुधादिकाना झोडतो (२८-३४); भ्यालेल्या कौरवाच्या प्रार्थनेवरून कर्ण घटोत्कचावर वासवी शक्ति टाकून त्यास मारितो (३५–४६);

घटोत्कचाच्या प्रेताखालीं कौरवसैन्याचा झालेला चुराडा (४७-४९); कर्णविजय व कौरवांचा हर्ष (५०-५२).

**अध्याय २० वा; (पृ० ४३०):**—घटोत्कचमरणामुळे पांडवांचा शोक व कृष्णाचा हर्ष (१-३) कृष्ण आपल्या हर्षाचे कारण अर्जुनास सांगतो (४-२१); 'पार्थावर च शक्ति टाकण्यास कर्णास तुम्ही कां सांगितलें नाही?' असा धृतराष्ट्राचा संजयास प्रश्न (२२-२५); संजयाचे उत्तर (२६-४३); कृष्णसात्यकिसंवाद (३७-४३). संजयाचें भाषण पुढे चालू-घटोत्कचाबद्दल धर्माचा शोक व कर्णावर हल्ला (५०-६०) व्यासाचा धर्मास उपदेश (६१-६८); रात्रीचे युद्ध-वीरांस विश्रांति (६९-७७) चंद्रोदय-दुर्योधनाचा द्रोणास सवाल (७८-८५). द्रोणाचें उत्तर (८६-९४); कौरवसैन्याचे दोन भाग व द्रोणाचे दुर्योधनाशी कडक भाषण (९५-१०६).

**अध्याय २१ वा. (पृ० ४३९):**—पार्थाचा पराक्रम (१-११); द्रोणाचा पराक्रम व तद्वधार्थ धृष्टद्युम्नाची प्रतिज्ञा (१२-१९); भीमधृष्टद्युम्नाला निंदून युद्ध करितो-पार्थद्रोणादींचे युद्ध (२०-४१). सात्यकिदुर्योधनांचा प्रेमसंवाद व युद्ध (४२-५१) कर्णभीमादिकांचे युध्द-द्रोणकृत पांचालक्षय (५२-६१); 'अश्वत्थामा मेला' असें खोटें सांगून द्रोणास मारण्याची कृष्णाची सूचना-भीमाचें अनुमोदन (६२-७१). 'अश्वत्थामा' (-नामक हत्ती) मेला असे द्रोणास कळवितात (७२-७५), द्रोणधृष्टद्युम्नयुध्द-सात्यकीचा पराक्रम-पांडवांचा द्रोणावर हल्ला (७६-९४); अशुभ चिन्हे-द्रोणाचा अद्भुत पराक्रम व पांडवसैन्यक्षय (९५-१०७); भृगुप्रमुख ऋषी द्रोणास स्वर्गात बोलावितात (१०८-११३); सत्यवचनी धर्मास अश्वत्थाम्याच्या मृत्यूबद्दल द्रोणाचा प्रश्न (११४-११८), कृष्णभीमांचे आग्रहानें धर्म अस्पष्ट उत्तर देतो (११९-१२७); धर्माचा रथ जमिनीस टेकतो-द्रोणाचा उद्वेग व युद्धशैथिल्य (१२८-१३५); भीमाचें द्रोणाशी दुर्भाषण (१३६-१४३); द्रोणाचा शस्त्रसंन्यास व शरीरसंन्यास (१४४-१५३); धृष्टद्युम्न द्रोणाचें शिर कापतो-कौरवभय (१५४-१६३): हें वृत्त ऐकून अश्वत्थामा खवळून जातो (१६४-१६७).

**अध्याय २२ वा; (पृ० ४५४):**—अश्वत्थाम्याची प्रतिज्ञा व युद्धार्थ प्रयाण (१-१०); अर्जुनाचा द्रोणार्थ विलाप (११-२१); भीमाचें भाषण (२२-३२); धृष्टद्युम्नकृत द्रोणनिंदा (३३-४६); संतप्त सात्यकीचा धृष्टद्युम्नावर कडाखा

(४७–५७): धृष्टद्युम्नाचें त्वेषोत्तर (५८–७७); परस्पराना मारण्यास उद्युक्त झालेल्या सात्यकिधृष्टद्युम्नांचे निवारण (७८–९०).

**अध्याय २३ वा; (पृ० ४६२):**—अश्वत्थामा नारायणास्त्र योजितो (१–५); धर्माचा उद्वेग (६–१९); पाडवसैन्य शस्त्रत्याग करितें–भीमाचे भाषण–अर्जुनाची शाति (२०–२७); भीम असह्य नारायणास्त्राग्नीत शिरतो–कृष्णार्जुन त्याचें निवारण करितात–अस्त्रोपशम (२८–४७). अश्वत्थामा व दुर्योधन यांचा संवाद (४८–५३); अश्वत्थाम्याचे शौर्य–सात्यर्कास झोडपतो–धृष्टद्युम्नादिकांचा पराभव (५४–६५); भीमाचा पराभव (६६–७३); पाचाळांचा क्षय–पार्थ व अश्वत्थामा यांचें युद्ध–अश्वत्थाम्याचे अग्न्यस्त्र व पार्थाचे ब्रह्मास्त्र (७४–१००); अक्षत अशा अर्जुनास पाहून खिन्न झालेला अश्वत्थामा विरक्त होतो (१०१–१०३); व्यासाना अश्वत्थाम्याचा प्रश्न, त्याचें उत्तर व नरनारायणावतारकथानिरूपण (१०४–१२०); युद्धाचा अवहार (१२१).

**अध्याय २४ वा; (पृ० ४७३):**—'केवळ मला च दिसणारा व मला सहाय करणारा भयंकर उग्र पुरुष कोण,?' असा अर्जुनाचा व्यासांस प्रश्न (१–८); व्यास 'तो शंकर' असें सागतात (९–३०); उपसंहार (३१).

॥ श्रीगणेशाय नमः ॥

## कविवर्य मोरोपंतकृत

# आर्या भारत.

## उद्योगपर्व.

(गीतिवृत्त.)

## अध्याय पहिला.

[1]सरसिजनाभ [2]सभेंत द्रुपदविराटादिनिजजनांसहित
बैसुनि मनीं विचारी द्याया साधूनि निजजनास हित. १
प्रभु [3]सभ्यांस म्हणे, 'हो! जें जालें तें तुम्हां सकळ कळलें,
सर्वां [4]साधूंचें मन, परिसुनि धर्मश्रमासि, कळकळलें.  २
वसतां द्वादश वर्षें क्षण हि गडबडों दिली न [5]धी रानीं,
केला स्वजनांत परम दुष्कर अज्ञातवास [6]धीरानीं. ३
आतां सुयोधनानें [7]यांचा यांला विभाग ओपावा,
लोपावा न न्याय, स्वल्प हि [8]राजर्षि हा न कोपावा. ४

१. सरसिज (कमल) आहे नाभीचे ठायीं ज्याच्या तो (श्रीकृष्ण). २. विराटाच्या सभेंत. (अभिमन्यु आणि उत्तरा यांच्या विवाहप्रसंगानें श्रीकृष्णादि मंडळी विराटनगरींत आली आहेत). ३. सभासदांस. ४. सज्जनाचे. बुद्धि. ६. धैर्यवान् अशा पांडवानीं. ७. पक्षांचा. ८. धर्मराज.

सुज्ञ ब्राह्मण कोण्ही तिकडे प्रेषावयासि[1] योजावा,
जो संमत[2] सर्वांला सत्वर कौरवपुरासि[3] तो जावा,'
[4]राम म्हणे, 'दुर्योधन संमत आम्हांसि, पार्थसा मानें,
हे ते कुशळ असावे, साधावा [5]बळिहृतार्थ [6]सामानें.
[7]अक्षज्ञ नसोनि भरीं [8]भरला [9]स्वगुणें चि [10]अर्थ हारविला,
पडतां गांठि [11]गतश्री होय [12]शशी, दोष काय हा रविला?'
'शिव शिव! हर हर!' ऐसें बोलुनि सात्यकि म्हणे, 'अगा! रामा!
धर्मासि दोष लाविल, तरि सोडिल विष्णुच्या [13]अगारा [14]मां.
मानधनासि बळें चि द्यूतक्रीडार्थ बाहिलें [15]कुटिलें,
लुटिलें सर्वस्व, अहो! बळदेव! खळांसि पाहिजे कुटिलें.
यांचें न धर्मयुद्धें हरिलें द्यूतेंकरूनि [16]पद कपटें,
[17]शुचिचें अशुचि न मिरवू, झांकिल हि कसा हरूनि पदकं पटें?
पदर पसरितील [18]शकुनि दुर्योधन कर्ण हे तिघे राया,
नाहीं तरि त्यां माज्या सिद्ध चि आहेत [19]होति घेराया. ११
उपदेशितील अस्मच्छस्त्रें [20]त्यां द्यावयासि पद नमुनीं,
हें न घडतां, न तुमचें यावरि अवलोकितील वदन मुनो. १२
[21]पांचाळ मत्स्य यादव पांडव हे वीर काय सामान्य?
होईल श्रीहंसी[22] हे हंस त्यजुनि [23]वायसा मान्य? १३
मारुनि सुयोधनातें राज्यपदीं बसवितों पहा [24]यांस,

---

१. पाठविण्याला. २. मान्य. ३. हस्तिनापुराला. ४. बलराम. ५. बलयानानें हरण केलेली संपत्ति. ६. सामोपचारानें. ७. द्यूतांत निष्णात. ८. हट्टास पेटला. ९. आपल्या च गुणानें. (द्यूतक्रीडेंतील कमकुवतपणानें). १०. संपत्ति. ११. निस्तेज. १२. चंद्र. १३. वराला. १४. लक्ष्मी. १५. वक्रबुद्धि (दुर्योधनानें) १६. स्थान. (राज्यपद). १७. अन्वयार्थ—शुचिचें (पवित्र मनुष्याचें) पदक (स्थान) अशुचि न मिरवू; [कारण] अशुचि शुचिचें पदक हरूनि पटें (वस्त्रानें) झांकिल हि कसा?. १८. शकुन्यादि त्रिवर्गास. १९. शस्त्रें. २०. दुर्योधनादिकास. २१. द्रुपद वगैरे. २२. राज्यलक्ष्मीरूपी हंसी. २३. कावळ्याला. २४. धर्मराजास.

याचें चि तेजअद्भुत, रामा! आम्हां नको महायास[1].' १४
द्रुपद म्हणे, 'सत्य वदसि, योग्य खळ प्राप्तदर्प[2] हा निधना,
पावेल कसा चतुर हि न करूनि निधिस्थसर्पहानि[3] धना? १५
पळ हि न वळेल सामें दुर्योधन दुष्ट मत्त अंधकसा[4],
पुत्रस्नेहें भुलला नयनिष्ठुर हित वदेल अंध[5] कसा? १६
जरि धीर वीर भीष्म द्रोण प्रख्यात पात्र तन्नमना[6],
तरि दीन चि ते, त्यांच्या त्याचें बहु लाजवील अन्न मना. १७
कर्ण शकुनि तों त्याचे मूर्तकुसंकल्प[7] काय सांगावे?
ज्यांहीं नयहंसांतें[8] निंदावें अनयवायसां गावें. १८
न शके शक्र घनाहीं शमवूं, शमवील त्या नर गंडूनीं[9]?
सांगेल कोण दुसरा, भीष्म हि सांगेल ज्या न रेंगडूनीं[10]? १९
येइल बहूपचारें[11] वंध्योरसिजासि[12] काय ओलावा?
डोलावा हरमूर्धा[13] कुरुपतिपूर्वी च भूप[14] बोलावा. २०
सांगोनि सांगणें तें, प्रेषावा आमुचा पुरोहित हो!
न्यायाला न चुकावें, अंधाचें पुत्रशत उरो, हित हो.' २१
श्रीश[15] म्हणे[16], 'तूं गुरुसा, हे आम्हीं शिष्यसे चि, रायास[17]
स्वपदीं स्थापावें त्वां, यां[18] देवें भोगिला चिरायास[19]. २२
धृतराष्ट्र मानितो तुज, तूं द्रोणाचा सखा, कृपाचा ही;
विश्वास तुझाठायीं यांचा[20] ही आणि त्या[21] नृपाचा ही. २३
झाला विवाह, जातों, सर्वांमागूनि मज हि पाचारा,

१. मोठा प्रयास, त्रास. २. आला आहे गर्व ज्याला, असा. ३. द्रव्याच्या ठेव्यावर बसलेल्या सर्पाचा नाश. ४. शंकराचा शत्रु अंधकासुर, त्याच्यासारखा. ५. धृतराष्ट्र. ६. दुर्योधनाच्या नमस्काराला. ७. मूर्तिमंत दुष्ट विचार. ८. न्यायरूप हंसाला. ९. लांड्यानीं, लहानशा भाड्यानीं. १०. दटावून. ११. पुष्कळ उपचारानें. १२. वांझेचे स्तनास. १३. शंकराचें मस्तक. १४. भगदत्त आदिकरून राजे. १५. लक्ष्मीपति. (श्रीकृष्ण). १६. [विराटास] म्हणे. १७. धर्मराजास. १८. धर्मराजानें. १९. पुष्कळ दिवस कष्ट. २०. धर्मांचा. २१. धृतराष्ट्राचा.

साचा, राया! माज्या चित्तखगा साधुसंग हा चारा.' २४
सत्कारिला विराटें, प्रभु गेला निजपुरा सपरिवार,
बहुधा घेउनि उद्धवसंमत मग मारणार अरिवार. २५
पांडवदूत चि पाहति, नृप न, मुहूर्तास यावयाला, हो!
जो तो म्हणे, 'भल्याच्या साह्यें सार्थक्य या वयाला हो.' २६
प्रेषी द्रुपद गुरुसि, जो संमत जीवीं तसा च काव्या ही,
कीं नरकीं न बुडावा जोडुनि सद्घातपातका व्याही. २७
शल्याद्यास बहाया प्रेषुनि दूत, स्वयें चि वासवि त्या
पाचाराया जाय, प्रणतजनाब्जांचिया शिवा सवित्या. २८
तें परिसतां मन म्हणे त्या हि अनार्यासि 'आर्यसा धावें,
प्रियविजयापूर्वीं च प्रभुला गांठूनि कार्य साधावें.' २९
जाय प्रथम कुरुप, तों निजला होता प्रभु स्वपर्यंकीं,
ज्यासि स्मरुनि निजावें स्वस्थ स्थापूनि शीर्ष अर्यंकीं. ३०
प्रभुच्या शिराकडे तो स्वमहत्वास्तव बसे अंकवि माज्ञी:
होईल काय हंस ब्रह्म्याच्या हि बसला बक विमानीं? ३१
मागुनि गेला अर्जुन, बसला पायांकडे चि पाहत, कीं
या विनतीं श्रीगुरुची बहु, त्या लेश हि नसे, कृपा, हंतकीं. ३२
कैसी असेल अन्य प्रभुच्या दृष्टीसमोर सामान्य?
उठतां चि तोस अर्जुन जाला वृष्णीस मोरसा मान्य. ३३

---

१. हे विराटराजा! २. चित्तरूपी पक्ष्याला. ३. खाद्य. ४. आपल्या परिवारासह. ५. उद्धवाच्या विचार. ६. शत्रुसमुदाय. ७. बृहस्पतीला. ८. शुक्राला. ९. सज्जनाच्या वधाच्या पातकाला. १०. धृतराष्ट्र. ११. अर्जुन. १२. कृष्णाला. १३. नम्र लोक–(भक्त)–रूपी कमळाच्या. १४. कल्याणकारण अशा. १५. सूर्याला. १६. दुर्योधनाचें मन. १७. हलक्या, नीच दुर्योधनाला. १८. [कृष्णाचा] आवडता जो अर्जुन, त्याच्यापूर्वीं. १९. आपल्या पलंगावर. २०. मस्तक. २१. शत्रूच्या मांडीवर. २२. मूर्ख, मूढ. २३. नम्र अशा (अर्जुनावर). २४. दुष्ट (दुर्योधनावर). २५. अर्जुनावांचून इतर.

पार्थ म्हणे, 'प्रार्थाया आलों प्रभुजी! तुला सहायास.'
'कौरव म्हणे, "बहाया प्रथम चि जो पातला, पहा यास. ३४
तुजसीं याचें माजें सम सख्य जसें, तसें च सम नातें,
संत म्हणाति, 'पूर्वागतसाह्याशिवपदीं सदा वस' मनातें.". ३५
देव म्हणे, 'सत्य चि हें, जरि पार्थ प्रथम पाहिला आहे,
सर्व हि संत न्यायें भेद, न आगमनदर्शनीं पाहे. ३६
पूर्वागत तूं जैसा तैसा मज पूर्वदृष्ट हा मान्य,
दोघांचें हि करावें म्यां साह्य प्रिय, तुम्हीं न सामान्य. ३७
तुजहुनि कनिष्ठ अर्जुन बाळकसा, हें मनीं पहा नातें,
रीति दहांची हे कीं पहिलें समजाविती लहानातें. ३८
आहेत एक अर्बुद नारायणनाम गोप मजसम जे
सर्व हि अनंतबळ ते, समजे न परा, परंतु मज समजे. ३९
'ते कीं न्यस्तायुध मीं, यांत तुम्हां मान्य काय दोघांस?'
ऐसें प्रभूत्तम पुसे त्यां दैवादैवसंपदोघांस. ४०
पार्थ म्हणे, 'गोविंदा! न्यस्तायुध तूं चि पाहिजेस मज.'
मागे सैन्य सुयोधन; वर हि वरायासि पाहिजे समज. ४१
मग साह्यार्थ विनविता, राम म्हणे, 'ऐक भारता! राया!
सिद्ध चि मीं स्वजनातें उतरुनियां आधिभार तारायीं. ४२
वदलों विराटनगरीं त्वद्विषयक किमपि जें विहितें सुचलें,
परि परिसित्या हरिसि त्या समयीं न सभेंत तें वचन रुचलें.
दुष्कर कृष्णत्याग, स्वप्राणत्याग हीं न दुष्करसा,
कृष्णाविणें क्षिति[11] मला, नलिनी[12] मधुपासि[13] जेंवि शुष्करसा[14].

१. प्रथम आलेल्यास मदत करणें हा च शंकर, त्याचे चरणीं. २. पूर्वी पाहिलेल्या. ३. टाकिलें आहे शस्त्र ज्यानें असा. ४. देवासुरसंपत्तीच्या ओघांस (यथाक्रम अर्जुन व दुर्योधन यास). ५. बळराम. ६. भरतकुलोत्पन्ना दुर्योधना! ७. मनोव्यथेचें ओझें. ८. तुझ्याविषयीचें. ९. कांहीं. १०. योग्य. ११. पृथ्वी. १२. कमलिनी. १३. भ्रमरास. १४. गेला आहे रस जींतील अशी, सुकलेली.

यास्तव सहाय संप्रति हा बळ न तुजा न पांडुतनयाचा,
निश्चळ निश्चय जाणा, आजि तुम्हीं सर्व आप्तजन यांचा. ४५
जा, आहेसि क्षत्रिय, भांड, न अभिमान सांड, गा! सांच
स्वर्ग असे, काळमुखीं व्हायाचा काय सांडगासा च.' ४६
ऐसें वदोनि रामें आलिंगुनि तो खळेंद्र बोळविला,
रविनें विधुसा, प्रभुनें स्वगृहागत मलिन हीं न पोळविला. ४७
अक्षौहिणी कटक कृतवर्मा दे त्यासि, कीं 'न' येना च,
कुलजा नकार जैसा मेल्यां ही पंगुला नये नाच. ४८
बहु मेळवूनि बल्लव अज्ञ पळत जाय, कृष्ण सोडून,
अधन शिशु जसा टाकुनि चिंतामणि बहु कपर्द जोडून. ४९
चित्तांत म्हणे, 'कैसा केला अरिमीनह्रद अगाध रिता?'
भ्रांति श्रुत स्मरेना कीं हा प्रभु जाहला अगा धरिता. ५०
कृष्ण म्हणे, "पार्था! त्वां अर्बुद बळ हातिचें दिलें अरिला,
जो म्हणतो, 'भांडेना, शस्त्र धरीना,' असा कसा वरिला?" ५१
पार्थ म्हणे, "तूं मुनिनीं चित्तीं षड्रिक्षयार्थ धरिलास,
हरिला समस्त हि श्रिततताप तुवां म्हणुनि म्यां हि वरिलास.
'न धरावें शस्त्र' असो प्रभुचो आहे जरि प्रतिज्ञा, ते

---

१. युद्ध करीं. २. खरोखरा च रणात लढून मरणाऱ्या वीराला स्वर्ग मिळतो. ३. देह. ४. माटग्याप्रमाणे ५ चंद्रासारखा. (रवि स्वगृहीं—सिंहराशीं असतां चंद्र आला तरी त्याला अस्त होत नाहीं, या ज्योतिषशास्त्रातील नियमाकडे येथें कविकटाक्ष आहे). ६. पायदळ १०९३५०+घोडेस्वार ६५६१०+हत्ती २१८७०+रथ २१८७० मिळून २१८७०० संख्या झाली म्हणजे ती अक्षौहिणी सेना झाली ७. 'नाहीं' असे म्हणवे च ना. ८. कुलीनाला. ९. गोप. १०. मूर्ख दुर्योधन. ११. कवड्या. १२. शत्रुरूप माशाचा डोह. १३. अत्यंत खोल, ज्याचा तळ लागत नाहीं असा. १४. भ्रमिष्ट. १५ ऐकलेलें, लोकांत प्रसिद्ध असलेलें. १६. कृष्ण—पंत. १७. गोवर्धन—पंत. १८. कामक्रोध इत्यादि षड्रिपूंचा नाश करण्याकरिता. १९. आश्रितांचे दुःख.

राहो, त्वत्स्मरणें चि ध्वंसिति[1] कामाद्यरिप्रति ज्ञाते. ५३
सुगम[2] त्वदाश्रितांला देवेंद्राला हि अर्थ असुगम[3] जे,.
त्वत्प्रेक्षितामरांतकसेनांचे[4] लोपतात असु[5] गमजे. ५४
तूं या धनंजयाचा[6] सारथि करुणानदा ! समीरण[7] हो,
वाढेल तेज माजें प्रचुर[8] मग करीन दास मीं रण, हो! ५५.
व्हावा सारथि समरीं शौरि, मनोरथ मनीं असे चिर[9] हा;
मत्प्रग्रहप्रतोद[10] स्वीकारुनि मद्रथीं असे[11] चि रहा." ५६
स्वजनामरद्रुम[12] प्रभु हांसोनि म्हणे, 'अवश्य तुजला जो
अर्थ अपेक्षित तो हो[13], मातलिसारथि[14] महेंद्र तुज लाजो.' ५७
असि साधु साधुपतिसीं[15] गांठि पडे, ती जसी अया[16] पारिसा;
यापरि साचा हा चि प्रेमळ, यांच्या[17] चि या जयीं[18] पारिसा. ५८
भुजबळयुक्तिबळें[19] जो मधुकैटभकातरा[20] अजा[21] तारी,
त्या प्रभुला घेउनि ये तो अर्जुन उग्र स्थळीं अजातारी[22]. ५९

---

## अध्याय दुसरा.

धर्माकडे बहु कटक घेउनि मद्रेश[23] यावया लागे,
तत्पूजार्थ सुयोधन अष्टौप्रहर स्वयें सदा जागे.. १

---

१. नाश करितात. २. सुलभ ३. कठिण. ४. तू पाहिलेल्या दैत्याच्या सेनेचे. ५ प्राण आणि चेष्टा. ६. अर्जुनाचा (पक्षी) अर्थाचा. ७. वारा. ८. पुष्कळ. ९. पुष्कळ दिवस. १०. माझा लगाम आणि चाबूक. ११. जसें आहा नसें. (निःशस्त्र) १२. भक्ताचा कल्पवृक्ष. १३. [पण] होवो. १४. मातलि आहे सारथि ज्याचा तो इंद्र. १५. श्रीकृष्णासीं. १६. लोखंडाला. १७. अर्जुनाच्या. १८. आपलें सारथ्य करण्याचें कृष्णाकडून मान्य करविण्याच्या यशाला. १९. बाहुबलानें व युक्तिबलानें. २०. मधु व कैटभ या राक्षसांना भ्यालेल्या. २१ ब्रह्मदेवास. २२. उत्पन्न झाला नाहीं शत्रु ज्याला तो (धर्म). २३. शल्य.

कुरुवरकृतसाहित्यें[1] त्या शल्याचे निवास[2] जे वाटे,
ते खोद्यांनीं[4] च असे त्याला, त्याच्या भटांस ही वाटे[3]. २
जेथें उतरे तेथें सर्व अचिंतित[6] पदार्थ सिद्ध करी[7],
'शल्यासि सुरनगाधिक[8] कुरुपति' हे उक्ति कवि म्हणेल खरी.
त्यां साहित्यें शल्यक्षितिपति[9] होउनि बहु प्रसन्नमना[10],
स्वप्रेष्यांसि[11] म्हणे, 'रे! पाचारा पार्थसचिव[12] मन्नमना. ३
जपला बहु, प्रसादा माज्या तो धर्मदास भाजन हो[13],
स्वसभेहूनि शतगुणें जाल्या मज शर्मदा[14] सभा जन हो! ५
या तों सभा सभाग्या[15], जन हो! यांतें चि बहु न वाखाणा,
पाहों कूपशतांतुनि एका ऐसा बरें नवा खाणा. ६
ऐसें जळ, ऐसें स्थळ, ऐसें आलें कधीं न अन्न मना,
मीं सुप्रसन्न जालों आणा तो निपुण[16] पुरुष मन्नमना.' ७
भेटे त्यासि सुयोधन जाणुनियां समय कामलाभाचा[17],
चित्तीं शल्य म्हणे, 'बहु याहुनि भासेल कां मला भाचा[18]?' ८
आलिंगुनि त्यासि म्हणे, 'इष्टार्थ प्राणसम हि मागावा.'
आराधिल्या वश नव्हे, तरि थोराचा हि न महिमा गावा. ९
कुरुप म्हणे, 'माज्या तूं सेनांचा नाथ[19] मद्रपा! हो गा!'
अर्थी[20] जयलाभाचा हा भाचा, हें चि भद्र[21] पाहो, गा! १०
शल्य म्हणे, 'आराधुनि मागितलें काय? आणिक हि मागा:

१. दुर्योधनानें केलेल्या सामग्रीमुळें. २. वसति. (मुक्काम). ३. वाटेल. ४. आपल्या वाटेत. ५. योद्धयांस. ६. मनें इच्छिलेले सुद्धां, कल्पनातीत ७. [दुर्योधन] सिद्ध करी. ८. कल्पवृक्षाहून अधिक. ९. शल्यराजा. १०. प्रसन्न आहे मन ज्याचें असा. ११. आपल्या सेवकांस. १२. धर्माचा प्रतिनिधि. (आपला होत असलेला सत्कार धर्माकडून च होत आहे अशी शल्याची समजूत आहे). १३. प्रसादा भाजन हो=कृपेला पात्र होवो. १४. सुख देणाऱ्या. १५. वैभवशाली. १६. चतुर. १७. इच्छा पूर्ण होण्याचा. १८. नकुल अथवा सहदेव. १९. नायक. २०. याचक. २१. कल्याण.

चिंतामणि देणारा[1] मागावें काय माणिक हिमागा?' ११
भूप म्हणे, 'हें चि पुरे, माजी इष्टार्थसिद्धि या च वरें,
विजयश्री येणें चि न मजवरि ढाळील काय गा! चेवरें[2]?' १२
'पांडव पाहुनि येतों' 'या जा, पारि सं[3]भ्रमा गुंतना कीं,
आहे चि धर्म[4]संभ्रम व्हायाचा प्राप्त मागुता नाकीं[5].' १३
उक्तिप्रत्युक्ति अशा जाल्या, गेले निघोनि ते राजे[6],
बाहेर शल्य[7] देखे, होते हृदयांत अब्द[8] तेरा जे. १४
आलिंगितां प्रमोदें[9] पांडुसुतानीं नमूनि मद्रप हा
धर्मासि म्हणे, 'साधो! निजसाधुत्वें चि साधुभद्र[10] पहा. १५
तूं रामसम समर्थ प्रभु पुण्यश्लोक लोकमत[11], राया!
अज्ञातवास दुस्तर बा! त्वदितर यासि योग्य न तराया.' १६
'पूजा करितां शल्य, स्तुति करितां धर्म ही, बसे उगला[12].
पूज्यत्वें स्तुत्यत्वें ते न, पारि ग्रंथ मात्र हा फुगला. १७
शल्य म्हणे, "बा! म्यां तों ऐसा दुर्योधना दिला वर, हो!
तुज आशीर्वाद असा कीं 'धर्मा! धार्मिका! इलावर[13] हो.'" १८
प्रथम 'तथास्तु' मग म्हणे[14], "वरदान तुम्हांसि उचित मामा! ते,
त[15]प्ता गजासि गंगा तसि हे आशी[16] हि शुचि[17]तमा मातें. १९
तुजकरवीं कर्णाचें सारथिपण धार्तराष्ट्र करवील,
पसरील पदर, तेव्हां सारथ्यगुण[18] प्रतोद[19] धरवील. २०
'तेजोवध[20] कर्णाचा अर्जुन वांचावया करावा,' हें

१. जो चिंतामणि देणारा त्या हिमालयाजवळ एकादें माणिक मागावें काय? २. चवऱ्या. ३. सत्काराला. ४. धर्माचा सत्कार. (शल्यानें दुर्योधनास दिलेलें वचन पाळिलें हा धर्म). ५. स्वर्गांत. ६. शल्य आणि दुर्योधन. ७. अज्ञातवासामुळें पांडव आतापर्यंत हृदयांत होते ते आतां बाहेर दिसूं लागले. ८. वर्षे. ९. आनंदाच्या चांगलेपणानें. १०. चांगलें कल्याण. ११. लोकमान्य. १२. स्तब्ध. १३. पृथ्वी-पति. १४. [धर्म] म्हणे. १५. तापलेल्या. १६. आशीर्वाद. १७. अति पवित्र अशी. १८. सारथ्य करितां येण्याचा तुझा गुण. १९. चाबूक. २०. तेजोभंग. (पाणउतारा).

दे दान, 'करीन' असें म्हण, आण न बा! दयाकरा! वाहें." २१
अब्रूप म्हणे, "करीन, स्वस्थ रहा, दुःखसिंधु आटेल,
वाटेल स्वप्न तसें, त्वत्कीर्ति त्रिभुवनांत दाटेल. २२
बलवत्तर विधि देतो थोरांला थोरल्या चि तापातें,
इंद्रप्रमुख सुरांस हि जें भावि न लंघवे चि बापा! तें. २३
पावे सभार्य शक्र हि पूर्वीं बहु दुःख, ऐक बापा! तें,
कीं होय विश्वरूप ब्राह्मण मारूनि पात्र तापातें. २४
त्यावरि वृत्रवध करी आधीं देवूनि त्यासि विश्वास,
ब्राह्मणवधानृतानें लाजे; दावी न वदन विश्वास. २५
शक्र जळांत, मखादिक सद्व्यवहार हि अराजकांत, बुडे.
उत्सव पळे, बळावी ताप मुनित्रिदशचित्तरूप हुडे. २६
देवानीं सन्मुनिनीं देवुनि वर नहुष अमरपति केला.
स्पर्शावया शचीला पाहे, दैव जेंवि कल्पलतिकेला. २७
सुरमुनिसन्मंत्रांहीं कांहीं नाहीं च नहुख वळला हो!
भाग्यमदांत मनोभूग्रग्रह शिरतां चि बहु खवळला हो! २८
गुरुला शची म्हणे, 'हो! नहुषीं कांहीं च धर्म नय नाहीं,
कैसें तुम्हीं पहावें ऐसें हें पापकर्म नयनाहीं? २९
न परस्पर्श स्वप्नीं तुमच्या या धर्मकन्यकेला हो,

१. दुर्यचा खाण च अशा! २. अति बलवान. ३. नशीब. ४. होणारें. ५. पत्नीसमह. ६. हा त्वष्टानामक प्रजापतीचा मुलगा; याला 'त्रिशिरा' असे हि म्हणतात. ७. वृत्रासुराचा वध. ८. ब्रह्महत्या व खोटें भाषण येणेकरून. ९. जगाला, सर्व लोकास. १०. यज्ञादिक. ११. राजा नाहीं अशा स्थितींत. १२. बलात्काराने घेई. १३. मुनि व देव यांचें अंतःकरणरूप बुरूज संतापानें वश केले; त्यांच्या अंतःकरणास संताप उत्पन्न झाला, हे तात्पर्य. १४. इंद्र. १५. इंद्राची स्त्री इंद्राणी, तिला. १६. वश्यवा. १७. देव आणि ऋषि यांच्या चांगल्या उपदेशानें १८. नहुष. १९. मदनरूप उग्र ग्रह. २०. बृहस्पतीला. २१. धर्मानें मानलेल्या मुलीला.

प्राणत्याग सतीनीं केला कीं कांत अन्य केला हो!?' ३०
तीस गुरु म्हणे, 'वत्से! धैर्य असों दे, उगी, नको चि रडों,
माज्या माथां दे हा, तूं या चिताभरें[1] नको चिरडों.' ३१
सभय सुरऋषि हि म्हणती, 'शचि! हा अत्युग्र नहुष, न भलं गे!
हूं म्हण, बाई! याच्या धाकें कांपावयासि नभ लागे. ३२
अजि! आचार्य[2]! तुम्हीं तरि सांगा जरि काय नहुष पाहेल,
राहेल तेज न किमपि, याचा दृक्पात[3] कोण साहेल?' ३३
जीवं म्हणे, 'हो कांहीं, त्यागावें केंवि शरण आलीला?
मीं काय? सत्क्रिया[6] चि व्यसनीं या न त्यजील आलीलां.' ३४
नहुषासि स्वमुखें चि प्रार्थाया युक्ति सत्वरा शिकवी,
धाडी सतीस, अवना आशी देवूनि, सत्वराशि कवी. ३५
तों पाहुनि तीस म्हणे, 'ये, मज भज, सुमुखि! पावलों सुरता[10],
जालों इंद्र जगाचा, मग मजसीं इच्छिसी न कां सुरता?' ३६
प्रार्थुनि शची म्हणे, "द्या कांहीं अवकाश या नतजनातें[11],
'नाहीं च हरि[12]' असा हो निश्चय, मग मीं करीन भजनातें." ३७
नहुष म्हणे, 'जा, वेड्ये! जोडुनियां पापविसरें[13] त्या पतितें[14]
वांचावें केंवि? विस्मर तूं धर्मन्याय विसरत्या पतितें. ३८
जा शचि! नाश चि जाला, प्राप्त महाघेंकरूनि[15] पहिल्यालों[16],
असलों[17] हि काय पापी? कैसा आलिंगवेल आहे ल्याला? ३९
जा, अवकाश दिला, परि सत्वर हो पूर्ण काम, हो दारां[19],
राज्यश्री ज्या भजली; तूं न भजसि तूर्ण[20] कां महोदारां[21]?' ४०
आली पुन्हां गुरुकडे, मग तो देवांसमेत विष्णूतें

१. चिताभर. २. बृहस्पते ३. दृष्टिपात. ४. बृहस्पति. ५. आलेल्याला. ६. पुण्यकर्म. ७. मैत्रिणीला. ८ रक्षणाकरिता. ९. धैर्यशाली. १०. देवत्व. ११. नम्र असलेल्या मला. १२. इंद्र. १३. पापसंचय. १४. पाप्याने. १५. मोठ्या पापाने १६. पहिल्या भर्तालाः १७. तो पापी असून तरी काय उपयोग? १८. [जो] आहे त्याला [तो] कैसा आलिंगवेल? १९. पत्नी. २०. लवकर. २१. मोठ्या उदाराला (मला).

प्रार्थी, म्हणे, 'प्रभो! हो, अघ जावुनि, राज्यलाभ जिष्णूतें.' ४१
'हयमेध[1] जिष्णुकरवीं करवा, विजया सुखा मग न वाणी.'
निर्जर[2]कर्णचकोर[3]ज्योत्स्ना असि जाहली गगनवाणी[4]. ४२
दूर उडविला होता जो केवळ तूळसा[5] चि [6]अघवातें,
तो हुडकिला सुरानीं करिता जाला सुकर्म मघवा[7] तें. ४३
जाला शुचि[8] परि भ्याला त्या नहुषाच्या असह्य वरतेज्या[9],
पाहों न शके भगवान् भानु हि डोळे करूनि वरी ज्या. ४४
पुनरपि हरि शतयोजनविस्तृतकासार[10]पद्मनाळांत
बिसतंतु[11]माजि राहे, जो मान्य समस्त लोकपाळांत. ४५
नेली शची उपश्रुति देवीनें त्या हि नलिननालांत,
त्यांसि म्हणे सुरपति, 'या ऐशा कां संकटांत आलांत?' ४६
प्रार्थुनि शची म्हणे, 'व्हा प्रकट, धरा वज्र-तेज उत्साहा,
अज्ञातवास न भला, प्रभुजी! प्रसवेल फार कुत्सा[12], हा. ४७
त्यागावया शचीला न तुम्हीं हरि योग्य, ते हि न रमेला,
भोगुनि तुमच्या श्रीतें, टपतो स्त्रीतें हि नहुष नर मेला. ४८
तुमच्या पदच्युतिस्तव मजहुनि बहु नित्य अभ्रमु[13] रडे हो!
नाथ! वळा जी! चातकरुत[14] आइकतां चि अभ्र मुरडे, हो!' ४९
शक्र म्हणे, "'नहुषाचें दुःसह वरतेज साहवेना तें;
हें हीं न सोसवे जें आपत्पूरांत[15] वाहवे नातें[16]. ५०
मीं क्षिति तद्दृष्टिपुढें? निजतेज न रक्षिजेल मत्तातें[17];

१. अश्वमेध. २. कमतरता. ३. देवांच्या कर्णरूप चकोरांस [आल्हादकारक असा] चांदण्याप्रमाणें. ४. आकाशवाणी. ५. कापसाप्रमाणे. ६. पातकरूपी वाऱ्यानें. ७. इंद्र. ८. पवित्र. ९. श्रेष्ठ तेजाला. १०. चारशें कोस (चार कोस = योजन) विस्तीर्ण असलेल्या सरोवरांतील कमळाच्या देठाच्या आंतील भागांत. ११. कमळाच्या देठांत. १२. निंदा. १३. ऐरावतगजाची स्त्री. १४. चातकाचा शब्द. १५. विपत्तिरूप मोठ्या प्रवाहांत. १६. पतिपत्नीसंबंध. १७. माझ्या बापानें (ब्रह्मदेवानें).

श्रीमद[1] करिल पदच्युत अल्पें काळें तया प्रमत्तातें. ५१
जरि खळपरपुरुषाचें असदुक्त[2] तुज्या मनासि बहु खातें,
तरि जा चि, भेट, मतिमति! सति! अतिरतिदा[3]तसी च नहुषातें.
म्हण, 'मजकडे महर्षिस्कंधीं[4] देवूनि यां स्वशिबिका[5] या
हें मत्प्रिय बहु काय? छेदी पक्षिप्रियार्थ शिबि[6] काया. ५३
जाय शची, शक्र म्हणे, 'पावो श्रीभगवती उमा नवसा.
राहे उगा चि विधिवरि[7] भर घालुनि संकटीं सुमानवसा[8]. ५४
देवी नहुषासि म्हणे, 'कथिन प्रियवचन, जरि न फिरवाल,
बैसुनि अपूर्वयानीं[9] जरि या अमरावतींत मिरवाल. ५५
जरि अद्भुत प्रताप प्रकटूनि, कराल मन परम हर्षें[10]
होइन वशगा[11], जोडा सिबिकेसि समाधिधनपर महर्षि[12].' ५६
बहुखल नहुख लवकरि स्त्री हरिची आपणासि वशगा हो
म्हणुनि चढे ऋषियानीं, गंधर्वांला म्हणे, 'स्वयश गा हो!
मुनि म्हणाति, 'देवराया! ऐसें हें यश इहीं न कां गावें?
गोप्रोक्षणमंत्र[13] तुम्हां प्रमाण कीं अप्रमाण सांगावें.' ५८
नहुष म्हणे, 'गोमारणमंत्र सकळ अप्रमाणः गो विप्र
एक चि, अवध्य कुळ, हें पुसतां रे! काय? हूं, चला क्षिप्र[14].' ५९
करितां विवाद कोपें नहुष वदे 'सर्प सर्प[15]' हे वाणी[16],
चरणें अगस्त्यमुनिला कामात्मा[17] दुष्ट तो शिरीं हाणी. ६०
अवमानिले असे मुनि, मंत्र हि, पोषूनि गर्व ते ज्यानें,

१. मपत्ताचा. २. वाइट भाषण. ३. अत्यंत प्रेम करणारीप्रमाणे ४. महर्षीच्या खांद्यावर. ५. आपली पालखी. ६. एक राजा. (याने कपोतपक्ष्यास तृप्त करण्याकरितां आपलें मांस कादून दिलें, अशी कथा आहे). ७. दैवावर. ८. चांगल्या मनुष्याप्रमाणे. ९. अगदी नवीन तऱ्हेच्या वाहनांत. १०. आनंदी. ११. स्वाधीन. १२. समाधि हें च धन ज्यांचें असे ऋषिश्रेष्ठ. १३. गोमेधांतील गोवधविषयक मंत्र. १४. लवकर. १५. सर्पा; चला. १६. भाषण. १७. काम (मदन) आहे अंतःकरणांत ज्याच्या तो, कार्यैकदृष्टि.

चैतन्यें[1] व्यायु[2] तसा तो संत्यजिला चि सर्व तेज्यानें. ६१
घटज[3] म्हणे, "रे! मंदा! दुर्गतिदे[4] तुला त्वदीय दर्प चि हो,
हाणुनि विप्रशिरीं पद, जरि म्हणसी 'सर्प सर्प,' सर्प चि हो."
सर्वें चि नहुष पडला, अनुतापें हरि पुन्हां पदीं चढला,
हें समजे श्रद्धेनें सद्गुरुपासीं सुबुद्धि जो पढला. ६३
ऐसें दुःसहसंकट शक्रास हि लागलें चि भोगावें,
साधुजयद[6] हें म्हणउनि ऐकावें भारता! विभो! गावें. ६४
शक्र तसा प्रभु तूं हि स्वपदातें पावसील बा! पार्था!
नहुष तसा दुर्योधन, कीं, याची रीति तापपापार्था."[7] ६५
करुनि समाधान असें गेला रक्षावया स्ववचनातें,[8]
सत्य गुरुनिष्ठ मद्रप दुसरें न गणी च जेंवि कंच नातें. ६६

---

# अध्याय तिसरा.

अक्षौहिणी मिळाल्या धृतराष्ट्राच्या सुताकडे अकरा,
परि धर्मनयविहीनां[10] काय? सुहेती[11] जशा जना अकरां[12]. १
सात अजातरिपुकडे, जाल्या या त्या मिळोनि अठरा हो!
धर्म म्हणे, 'यश राहो,' खळ दुर्योधन म्हणे, 'स्वहठ[13] राहो.' २
धृतराष्ट्रप्रमुखांतें भेटोनि द्रुपदगुरु[14] म्हणे, 'परिसा
सुहृदुक्ता[15] हितकामें,[16] धनकामें जड म्हणों नये परिसा. ३
धृतराष्ट्र पांडु दोघे एकाचे पुत्र, पितृधनविभागीं,[17]

१. आत्म्याने. २. वि+आयु=गतप्राण. (मरणोन्मुख). ३. अगस्तिमुनि. ४. वाईट गति देणारा. ५. गव. ६. ~~सज्जनांस~~ जय देणारें. ७. ताप व पाप यांस कारण. ८. दुर्योधनाला दिलेले वचन पाळण्यासाठीं. ९. बृहस्पतीचा पुत्र. १०. धर्म व नीति नसलेल्याला. ११. चागली शस्त्रे. १२. हस्तरहिताला. १३. आपला दुराग्रह. १४. द्रुपदाचा पुरोहित. १५. मित्राचे भाषणाला. १६. कल्याण इच्छिणारानें. १७. वडिलांच्या धनाचे भागीदार.

हें वचन अनादरितां होइल सुरगुरुसभेसह विभा गो. ४
सांगा सुयोधनाला, पावावे पांडुपुत्र अंशाला,
भीष्मा! न स्पर्शावें धृतराष्ट्राच्या अभद्र वंशाला. ५
तिकडे सात असों द्या, इकडे अक्षौहिणी जर्‍ही अकरा.
अक्षौहिणीसहस्रासम सात्यकि भीम, साम कां न करा? ६
त्यां यां तुम्हां समस्तांहुनि अर्जुन अधिक, कृष्ण त्यापरिस,
परि सर्व सामकामुक, कां मुकसि सुखा सुयोधना! परिस.' ७
भीष्म म्हणे, 'द्रुपदगुरो! तूं ब्राह्मण म्हणुनि तीक्ष्ण वदसि परि
सदसि परिस्फुट शब्द चि कार्य कराया समर्थ सदसिपरि. ८
राज्यार्धभाग्युधिष्ठिर; म्हणतों अर्जुन समर्थ शिवसा, मीं,
कृष्ण जगत्प्रभु, कलहीं आशिव चि सर्वत्र, विपुळ शिव सामीं.'
सभ्यश्रुत्यमृत असें जों बोले सर्व भारतेश तदा,
कर्ण म्हणे, 'राहों द्या पाल्हाळ, कशास ते च ते शतदा? १०
अज्ञातवास पूर्ण न जाला चि द्रुपदनृप-पुरोहित! हो!
द्वादश वर्षें पुनरपि वनवासें स्पष्ट पण पुरो, हित हो. ११
कां मूर्खसा युधिष्ठिर अर्थकर न्यायसमय सोडून
उडतो? अनर्थकर लघु पांचाळ तसे च मत्स्य जोडून. १२
निजबाहुबळें तरला कीं मारुति अब्धिला अलाबुबळें?
होय भला इष्टार्थग्रह उपनेत्रें चि, कीं भला बुबळें? १३
देइल नयें समस्त हि, अनयें प्रभु राज्यभाग चवथा न,

१. बृहस्पतीच्या सभेसहित. २. निस्तेज. ३ वाणी. ४. विभागाला. ५. अकल्याण. ६. संधि, सलोखा. ७. सलोखा इच्छिणार. ८. कठोर. ९. सभेमध्ये. (हें संस्कृत रूप आहे). १०. स्पष्ट. ११. तीक्ष्ण तरवारीप्रमाणे. १२. अर्ध्या राज्याचा वाटेकरी. १३. अकल्याण. १४. सभ्याच्या कर्णास अमृताप्रमाणे. १५. भरतकुलांतील श्रेष्ठ. (भीष्म). १६. लाभदायक. १७. नीतीची मर्यादा. १८. क्षुद्र. १९. [आपल्या पक्षास] मिळवून. २०. भोपळ्याच्या जोरावर. २१. इष्ट वस्तूचें दर्शन. २२. चष्म्याने. २३. न्यायानें.

स्वापत्यास चि दे कीं व्याघ्रीचें भलतयासि चव थान? १४
सांगा त्यां मूर्खांला कीं रक्षा प्राणपाळका समया,
या प्रभुकडे विभाग प्रार्थाया साधुबाळकासम या. १५
त्यजितिल धर्मसमय जरि, युद्ध चि केवळ हठें चि वरितील,
तरि ती लयासि जाइल कीर्ति, चमू अश्रुमोक्ष करितील.' १६
भीष्म म्हणे, 'राधेया! उत्तरगोग्रह तुला न आठव दे,
स्मर जें विजय तुज, तुजी पाहुनि असकृद्रणांत पाठ, वदे.१७
गांडीव त्वद्धनुनें जिंकावें, रजत तरि न कां कथिलें?
खाल रणीं रज मजसह न करुनियां या महर्षिचें कथिलें.' १८
कर्णासि निवारुनियां, जोडुनि देवव्रतासि हातातें,
अंध म्हणे, 'जें संन्मत अस्मद्धित सत्य वदसि ताता! तें.' १९
'द्रुपदगुरो! बा! तूं जा, तुजमागुनि संजयासि पाठवितों,
मीं पांडुपांडवांतें घटिकेंत सहस्रवेळ आठवितों.' २०
तो पांचाळपुरोहित जातां, पळभरि उगें चि राहून,
पाहून विचार मनीं वृद्ध म्हणे संजयासि बाहून. २१
"गावल्गणे! न जाले पुरुष कुरुकुळांत सत्य पांडवसे,
यांचें विष्णुयशासम सुयश. व्यापूनि सत्यपांड, वसे. २२
भजले भजतील हि बहु, गुरुसेवेतें सुधा समजतात,
मानिति मनांतुनि प्रभु पांडव परमाबुधास मज तात. २३
हातीं हि चित्रगुप्तें यांविषयीं घेतली नसेल वही,
कैसें काय लिहावें? कीं पुण्य अगण्य, अघ नसे लव ही. २४
द्वेष अशा साधूंचा, रुचला या कुरुकुळांत मत्तनया,

१. आपल्या बच्चाला. २. गोडी. ३. सच्छील मुलाप्रमाणें. ४. अश्रु ढाळणे. ५. वारंवार, रणात. ६. रणे. ७. धूळ. ८. सांगितलेले. ९. भीष्माला हात जोडून. १०. सज्जनास पसंत. ११. आमचें कल्याण. १२. संजया! (गवल्गणाचा मुलगा.) १३. ब्रह्मांड. १४. महामूर्खास.

कीं क्षुद्रा[1] या कर्णा, लंघिति हे दुष्ट भाग्यमत्त[2] मया. २५
हा भाग पांडवांचा मंदात्मा[3] पाहतो हरायास.
ऐकुनि नुमजे निष्फळ जो पार्थपराभवीं[4] हरायास[5]. २६
कृष्णसखासीं युद्धीं होईल दृष्टांत हा कसा मान्य?
नृहरिपुढें[6] चित्र सतीहरि[7]; मग देईल हाक[8] सामान्य? २७[9]
उलतिल युधिष्ठिराच्या उष्णकटाक्षें कडे हिमाद्रीचे,
न असे भीम जनार्दन, मज भयद न पुत्र ते हि माद्रीचे. २८
यास्तव युधिष्ठिराला भेट, बुधा! कुशळ पूस, जा च कसा,
साधुविरोधें मजला परलोकीं सोसवेल जाच कसा? २९
सुज्ञा! मद्वचनें तूं कुशळ सकळवृष्णिपाळका[10] पूस,
ज्याच्या प्रतापलक्षणवन्हिपुढें[11] होय काळ कापूस. ३०
"धृतराष्ट्र सामकामुक, आपण चि युधिष्ठिरासि वळवावें,'
हें सव्यसाचिसचिवा[12] सदया श्रीकृष्णजीस कळवावें. ३१
वळवील धर्ममन तो, न म्हणेल चि साधु तुच्छ सामास,
नीतींत तसें खळमन जेंवि नळींत श्वपुच्छ[13] सा[14] मास." ३२
संजय युधिष्ठिरातें भेटुनि निधितें[15] जसा निवे[16] दीन[17],
कुशळ पुसोनि म्हणे, 'जी! आज्ञेनें तातमत निवेदीन.' ३३
धर्म म्हणे, "तात विदुर भीष्म द्रोणादि कुशळ आहेत?
रे संजया! असावे सर्व सुखी या मनांत हा हेत. ३४
कर्ण बरा आहे कीं? कुशळ असावें सदा वदान्यातें,
जो याचकासि म्हणतो, 'जें वस्तु प्रिय सुखें वदा, न्या तें." ३५

१. नीच कर्णाला. २. ऐश्वर्यानें माजलेले. ३. मूढबुद्धि. ४. अर्जुनाचा, पराभव करण्यांत. ५. [ किरातरूपी ] शंकराचे श्रम. ६. नृसिंहापुढें. ७. देवी-सिंह-पंत. ८. हाक देणें=बरोबरी करणें. ९. अत्र काकु-पंत. १०. सर्व-यादवपालकाला ( कृष्णाला ). ११. पराक्रमरूप अग्नीपुढें. १२. अर्जुनास सल्ला देणाऱ्या. १३. कुत्र्याचें शेंपूट. १४. सहा. १५. द्रव्याच्या ठेव्यास. १६. सुख पावतो. १७. गरीब मनुष्य.

तातार्क्षत सुयोधन आहे कीं? विप्रवृत्ति चालवितो?
बहुधा युयुत्सु, दुसरा तात[3] सदा साश्रु भक्त कालवितो! ३६
ताताभिप्राय कसा? वद, सांनिध्यें तुला सकळ कळतें;
काय पुसावें? पितृमन चिंतुनि दीना मुलास कळकळतें." ३७
सूत म्हणे, "प्रभुजी! ते आहेत बरे च तीरगत तरुसे,
तत्कुशळ काय पुससी? बा! ज्यांवरि धर्मनीति सतत रुसे. ३८
ताताभिप्राय मला पुसतां जरि तरि समस्त परिसा, हो!
परि साहो मन, तुमच्या महिमा गुरुसा च मान्य परिसा हो. ३९
त्वत्तातमनीं आहे स्वापत्याशिवार्थ सामकामुकता,
म्हणतो, 'सुखा दशमुख न धरिता परविषयकाम कां मुकता?'
परि तुमचा भाग तुम्हां देवुनियां शीघ्र संधि करवीना;
इच्छी कुळहित नाग[10] विभाग न अर्पूनि संधिकर[11] वीनां[12]. ४१
आतां शीघ्र करावें स्वपरहित तुम्हीं च साम साधूनीं,
धरिला न कधीं च परास्वर्थघ्न[13] स्वार्थकाम साधूनीं. ४२
स्पर्श[14] जड हि हित करि जरि अपराधांच्या रची अय[15] शतातें,
बुध हो! युष्मद्योगें जोडावें काय जी! अयश तातें? ४३
जरि आग्रहें कराल ज्ञातींसीं धरुनि राज्यकाम रण,

१. ब्राह्मणांची उपजीविका २. धृतराष्ट्राचा दासीपुत्र. (हा पांडवपक्षाचा होता). ३. विदुर. ४. भात (युयुत्सु व विदुर यांस भोजनसमयीं आमचे स्मरण होऊन बहुधा अन्न जात नसावें). ५. जवळ असल्याने. ६ नद्यादिकांच्या तीरावरील. (नदीतीरावरील वृक्ष सतेज दिसतात; पण पावसाळ्यात उन्मळून पडतात. त्याप्रमाणे धर्माचरण न करणारे बाहेरून चांगले दिसले तरी शेवटी नाश पावतात). ७. सहन करो. ८. आपल्या मुलाच्या कल्याणाकरिता. ९. दुसऱ्याच्या वस्तूची इच्छा. १०. सर्प. ११. साम करणाऱ्या. १२. पक्ष्यांचा. नायक गरुड यास. १३. परप्राणार्थघ्न–पंत. दुसऱ्याचे प्राण व धन हरण करणारा. १४. पारिस. १५. लोखंड.

धाम[1] रणन्मणिनूपुरयौवत[2] हि गमेल मसण आमरण. ४४
राज्यश्रीमंदिरेच्या[3] निर्वृति[4] कवणासि हो! दिली पानें?
त्यजिली कां भरताने? त्यजिली तैसी च कां दिलीपानें?[5] ४५
श्री अनुभविली, आतां नित्यसुखयशोर्थ शांतिस वरा, हो!
परिणामशोककर हा स्वगुरुप्रमुखाप्तशांतिसव[6] राहो." ४६
धर्म म्हणे, 'रे संजय! मीं सिद्ध न सिद्ध, जनक, सामातें;
जाणोनि सर्व, दाटुनि दूषिसि तूं साधुजन कसा मातें? ४७
निंद्य स्वधर्मविच्युत,[7] मीं तरि युद्धासि सिद्ध उत्साहें,
धर्मन्यायानुसरण[8] पावाया योग्य काय कुत्सा[9] हें? ४८
सदनुमतें क्षिति[10] अर्पुनि सत्पुत्रकरीं निवे दिलीप तिला,
शोचूं[11] नये चि सुखें, जैसी कन्या निवेदिली[12] पतिला. ४९
जरि हे न सोडवावी द्यूतजिता द्रौपदी तसी महि म्यां,
तरि भरतकुळगुरूंच्या लागेना बोल काय गा! महिम्यां? ५०
होइन निंद्य दहांत, न सोडवितां श्रीस संजया! परिस,
कुळज्या[13] यश चि, न विंधिस हि बहुमत हरिनाभिकंज[14] यापरिस.
हरि कुरुकुळहित इच्छी, तोकाचें[15] नित्य माय जेंवि हित,
करिन तसें चि, प्रभु हा सर्वज्ञ कथील काय जें विहित.[16]' ५२
श्रीकृष्ण म्हणे, 'सूता! सर्वांत गृहस्थधर्म सन्मत रे!
या आश्रमांत सर्व स्वपरांचें सफळ करुनि जन्म तरे. ५३
कर्म कसें टाकावें? जी अमृत मुखांत मायसी ओती
ती सद्विद्या, कर्मत्याग न करितां चि, फळवती होती. ५४

---

१. घर. २. शब्दायमान मणिनूपुरानीं युक्त आहे यौवत ( स्त्रीसमुदाय ) ज्यामध्यें असें. ३. राज्यलक्ष्मीरूप मद्याच्या. ४. सुख, समाधान. ५. इक्ष्वाकुकुलांतील एक राजा; रघुचा पिता. ६. आपल्या गुरुआदिकरून आप्तांच्या अशास कारण असलेला यज्ञ. ७. स्वधर्मभ्रष्ट. ८. धर्मन्यायाचरण. ९. निंदा. १०. पृथ्वी. ११. दुःख करू नये. १२. समर्पण केलेली. १३. कुलीबाला. १४. विष्णूचें नाभिकमल १५. मुलाचे. १६. योग्य.

रविशशिलोकपतिधराप्रमुख सकळ कर्मसिद्ध, हें समज;
कर्मजळ तृप्तिदायक, वाटे नैष्कर्म्य जेंवि फेंस मज. ५५
दूषील कोण वर्णाश्रमनिरता भरतसत्तमा राया!
योग्य चि हा साधु सकळ रक्षाया, सर्व मत्त माराया. ५६
दस्युदमन हा मुख्य क्षत्रियधर्म, प्रमाण थोरांस,
यास्तव मारावें या प्रभुनें दुर्योधनादि चोरांस. ५७
दस्युदमनार्थ शक्रें चापकवचशस्त्र निर्मिलें आहे,
आहेत घना चातक तैसे धर्मा करूनियां आ हे. ५८
हे अधिक काय? दुर्बळ ते रात्री घालिती दरवडा जे,
लुटिलें धन दुःख नसें, परि हृदयीं बहु कुवादरव डाजे. ५९
स्तेन भले, न स्त्रीचा नग्न करिति हरुनि सावलें काय,
नव्हतों सभेंत आम्हीं म्हणुनि लुटायासि फावलें काय? ६०
जा, सांग, त्वच्छदनें ऐकावें हें चि वाक्य अंधानें,
आहेत सिद्ध पांडव सेवाया प्राण बाणसंधानें. ६१
देतां विभाग करितिल पांडव धृतराष्ट्रदास्य दास तसे,
नाहीं तरि खळ मर्दुनि हास्य, मज असें भविष्य भासतसे.' ६२
संजय निघे, तयाला धर्म म्हणे, "आर्यका, यश तेंगावें,
द्या पांच ग्राम, न दे दासाला राय काय शत गावें? ६३
ताताला भीष्माला सांगावीं पाय धरुनि मन्नमनें,
जोडुनि हस्त म्हणावें, 'साम करावें चि सुप्रसन्नमनें.' ६४
आचार्य द्रोण कृप प्रार्थूनि, प्रथम कथुनि मन्नमना,
म्हण, 'साम भलतसें मज बहुमत, दुकळांत जेंवि अन्न मना.'
सांग कनिष्ठपित्यातें, 'बंधुविरोधासि चित्त भी माजें,

१. चद्रसूर्यादि लोकपाल आणि पृथ्वी आहे मुख्य ज्यामध्यें असे देव वगैरे. २. कर्मरूपी जल. ३. कर्माभाव. ४. वर्णाश्रमधर्माविषयीं आसक्त अशा. ५. चोरांचें शासन. ६. निंदाशब्द; अपवादशब्द. ७. डाचतो. ८. चोर. ९. वस्त्र, लुगडें. १०. टिकावें. ११. माझें नमस्कार. १२. कशा हि प्रकारचें. १३. विदुराला.

करवा; साम भलतसें देइल हरि इष्ट वित्त भीमा जें.' ६६
कर्णासि वद, 'सख्याला आवर, विजयासि आवरील हरी
समयीं प्रवृत्ति[2] आवरि थोर, जसा सिंधु आवरी लहरी.' ६७
सांग नृपास हि हें कीं, 'साम शुचि, तयांत नावं रायाचें,
सुगति[3] वरायाचें चि, न, कर्म उचित यातना वरायाचें.' ६८
गांधारीस म्हणावें, 'पंचोत्तरशत[4] असोत तनय, शतें
तृप्ति नसो चि तुज, करीं जेणें गातील साधुजन यश तें.' ६९
माज्या सुयोधनादि भ्रात्यांच्या बायकांसि कळवावें
कीं, 'स्वहितार्थ तुम्हीं तरि एकांतीं कांतचित्त वळवावें.' ७०
क्लीब-द्वारप[5]-दासीजन-वामन-कुब्ज[6]-दासे[7]-दायांतें
'पुशिलें अनामय[8]' असें सांग, पुसावें चि बा! सदा यांतें. ७१
कुरुकन्यांसि म्हणावें, 'तातें पुशिलें तुम्हांसि, ज्या तातें
श्री[9] देवुनि, न दिली[10] ही स्वःकन्याश्रीदपारिजातातें[11].'" ७२
ऐसें अजातरिपुमुख शशिमंडल अमृत तेंवि वांचिक[12] वी[13],
तें बहु असो चि, विस्तरग्रंथ[14] प्राकृतीं न वाचि कवी. ७३
गेला तेव्हां वाटे सोडुनि दुर्दैव संजया नेतें,
धरिलें होतें जें सत्पुरुषकवचहरिपादपंकज यानें तें. ७४
धृतराष्ट्रासि म्हणे, 'मी संजय आलों तया सुताकडुन,

१. दुर्योधनाला. २. मनाचा कल. ३. चांगली गति. ४. एकशेंपांच. ५. द्वारपाल. ६. खुजे. ७. कुबडे. ८. कुशल. ९. धन. १०. ल[redacted]. देव-कन्यांना संपत्ति देणाऱ्या पारिजातांला. (गरिबीमुळें मुलींना [redacted] आपणास त्यांचे हेतु पूर्ण करितां आले नाहींत असें सुचवून, धर्म [redacted]च कौरवांचा अन्याय हि ध्वनित करित आहे). १२. निरोप. १३. उत्पन्न करी. (बोले). १४. विस्तृत असा ग्रंथ. १५ अर्थ—संजय परतु हस्तिनापुरास गेला तेव्हां त्याला असें वाटलें कीं, जें सज्जनांचें [रक्षण करणारें] उत्तम कवच च असें श्रीकृष्णचरणकमल आपण धरिलें होतें, तें आपलें दुर्दैव आपल्याजवळून सोडून च नेत आहे! तात्पर्य, त्याला पांडववियोगदुःख असह्य झालें.

वैरंज्वरी[1] चि म्हणती यत्कीर्तिसुधाब्धिच्या[2] उता कडु न. ७५
श्रमलों बहु, मज आज्ञा द्यावी श्रितसुरतरो[3]! निजायास,
सांगेन सभेंत उद्यां प्रभुवाक्तरि[4], भय तरोनि जायास.' ७६
जावां सूत, अनिद्राक्षी[5] भेटे नूतना चि रायास,
कीं संतोषा बाळा ये चिंतापूतना चिरायास. ७७
स्मरतां[6] चि विदुर भेटे सद्वैराख्या प्रजा गरा माजी,
सेउनि वांचेल कसी म्हणत्या गुरुस प्रजागरामाजी. ७८
विदुर म्हणे, 'हा आलों, आहें पायासमीप, राज्याजी!
येथें चि म्यां बसावें, ती च तया योग्यता परा[7] ज्या जी. ७९
कोणा कार्याकरितां रात्रौ स्मरला तुम्हांस हा जन[8] हो!?
स्वस्थ अहां कीं? आज्ञा काय? प्रणत[9] प्रसादभाजन[10] हो.' ८०
धृतराष्ट्र म्हणे, 'वत्सा! तुजहुनि इतरास काय सांगावें?
आलें असें कपाळा कीं, निंदुनि हंस वायसां गावें. ८१
निकडुनि येउनि सूतें केलें पाण्यापरीस पातळ तें,
सांगावें काय सख्या! जें हृदया गरळसें[11] चि आंतळतें[12]. ८२
वदला सांगेन उद्यां धर्माचा धर्मधाम[13] संदेशा[14].
चिंतेंत बुडाला हा सुज्ञा! त्वद्बंधु सर्वमर्त्येश[15]. ८३
निद्रा येईल कसी? मच्चिता होय काय सामान्या?
शूर्पणखीसी हे बा! तुज हा अतिभार कायसा मान्या!? ८४

---

१. वैररूपी ज्वराने पीडित असे. २. ज्याच्या कीर्तिरूप अमृतसागराच्या. ३. आश्रिताच्या कल्पवृक्षा! ४. श्रीकृष्णाचे भाषण हीच नौका. ५. धृतराष्ट्राला झोंप आली नाही. ६. अन्वयार्थ—माजी प्रजा सद्वैराख्या (साधुवैरनामक) गरा (विषा) सेउनि कसी वांचेल [असे] म्हणत्या गुरूस प्रजागरामाजी (जागरणामध्ये) स्मरता चि विदुर भेटे. ७. श्रेष्ठ. ८. "अय जनः" या शब्दांनी संस्कृतांत आत्मनिर्देश करितात. ९. नम्रजन. १०. कृपापात्र. ११. विषाप्रमाणे. १२. लागतें, स्पर्श करितें. १३. धर्माचें केवळ घर च असा. १४. निरोप. १५. सर्व मर्त्यांचा राजा.

यद्दु धर्मार्थकुशळ तूं वद या जें श्रेय असदवस्थागा,
निववू मज बोल तुजा, जैसा पीयूषरस द्रवस्थागा.' ८५
विदुर म्हणे, 'हो! प्रभुजी! बळवंतासीं प्रसंग ज्या पडतो.
स्पष्ट प्रजागर तयां हीनबळा हीनसाधना घडतो. ८६
की जो हृतधन, कामी, तस्कर, रात्रौ न नीज ये त्याला.
देवा! ऐसा कांहीं दोष नसे कीं तुम्हांकडे आला? ८७
अथवा परवित्ताचा अभिलाष नसेल कीं मना रुचला?
हा बहु पापद, तापद, यापरि कटुकी न कटु न वा कुचला.
भूप म्हणे, 'प्राशूं दे धर्मामृतकवळबोल कानाहीं
त्वत्सम सत्समयज्ञ सुधर्मापतिजवळ बोलका नाहीं. ८९
विदुर म्हणे, "जो आस्तिक गुरुवेदोक्तीं जयास विश्वास,
मीपण ज्यासि न शिवलें, तो 'पंडित' मान्य होय विश्वासें.
दुर्लभ वस्तु न वांछी, न करी जो नष्ट वस्तुचा शोक,
आपत्तींत न मोहे त्या 'पंडित' म्हणति जाणते लोक. ९१
विद्या नसोनि उद्धत, धन नसतां जो उदारपण वाहे,
अर्थासि नीचकर्मे जो संपादावयासि जन पाहे, ९२
नसतां लाभ यशाचा दाटूनि करी परार्थ जो यत्न,
मित्रार्थी कपट करी, तो साक्षान्मूढजनशिरोरत्न. ९३
मित्रत्व दे अमित्रा, जो मित्रद्वेष दुष्टकर्म करी,
तो 'मूर्ख' असें म्हणती पुरुषपरीक्षा कळे जयांसि बरी." ९४

१. धर्म व अर्थ याविषयीं निपुण. २. कल्याणकारक. ३. वाईट अवस्थेस पोचलेल्याला. ४. अमृतरस. ५. वणव्यांतील वृक्षाला. ६. हीन आहे साधन (सामग्री) ज्याची त्याला. ७. हरण केलें आहे धन ज्याचें. ८. परवित्ताभिलाष. ९. कुटकी. १०. धर्मरूप अमृताचे ग्रास चे असे. ११. चांगला काळवेळ जाणणारा. १२. देवसभेचा स्वामी जो इंद्र त्याच्याजवळ. १३. गुरु आणि वेद यांच्या वचनावर. १४. जग्राम. १५. द्रव्यादिकांस.

इत्यादि बहु वदे तें सोडुनि आली कथा चि आर्यांत,
निजपरिवार[1] त्यागुनि जसि भगवन्मूर्ति[2] गोपभार्यांत. ९५
धर्मार्थकाममोक्षप्राप्तीचे सिद्ध मंत्र ते बोल,
मोल न करवे त्यांचें धनदास[3] हि, सिंधुहूनि जे खोल. ९६
सत्य प्रिय हित सर्वश्रुतिशास्त्ररहस्य विदुर कवि बोले,
तो लेलिहं[4] जाणों त्या प्रभुवेणुरवामृतें[5] निवे, डोले. ९७
भूप म्हणे, 'बा ! सुज्ञा ! दे सर्व तमासि भीति; परि सवित्या[6]
भी न गुहातम[7], तेंवि न तुज पुत्रप्रेम नीतिपरिसवित्या[8]. ९८
पांडव साधु यशस्कर; अयशस्कर सुत असाधु हें गमतें,
रमतें मन उपदेशीं, पुत्रस्नेहासवें[9] पुन्हां भ्रमतें. ९९
पुरुषप्रयत्न दुर्बळ, दैव बहु प्रबळ, मज असें कळतें,
असता बळवंत पुरुषकार[10], तरि कधीं च चित्त हें वळतें. १००
कथिलें नसेल तें वद, सांगावें फार काय हो ! कवितें[11]?
सेवावें सेव्य, जऱ्हीं पुत्रप्रेमाम्लपित्त[12] ओकवितें.' १०१
विदुर म्हणे, 'राजेंद्रा ! उरलें अध्यात्म[13] तें सुजातानें[14]
सांगावें, परिसावें; याकरितां श्रीसनत्सुजातानें[15] १०२
केली असे प्रतिज्ञा, मृत्यु[16] म्हणाति, परि नसे चि असि, काहीं
तद्वदनें परिसावें, तें तत्व तुम्हीं विचाररसिकाहीं.' १०३
भूप म्हणे, 'तच्छ्रवणीं माजें अत्यंत मानस त्वरतें,
सांगावें सर्वज्ञा ! मज तें आतां तुवां चि तत्त्वरतें[17].' १०४

---

१. आपली मडळी, आप्तवर्ग. २. श्रीकृष्णमूर्ति. ३. कुबेरास. ४. सर्प. ५ श्रीकृष्णमुरलीचा नाद हे च अमृत, त्याच्यायोगाने. ६. सूर्यास. ७. गुहेंतील अंधकार. ८. नीति ऐकविणाऱ्या तुला माझे पुत्रप्रेम भीत नाही. ९. पुत्रस्नेहरूप मद्यानें. १०. प्रयत्न. ११. शाहण्याला. १२. पुत्रप्रेमरूपी आम्लपित्त. (या रोगात वांति विशेष होते). १३. तत्वज्ञान. १४. कुलीन मनुष्यानें. १५. सनत्कुमारानें. (हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र). १६. जन्ममरणरूप संसार म्हणून आहे म्हणतात, पण तसें नाहीं अशी. १७. तत्व जाणणाऱ्यानें.

विदुर म्हणे, 'आर्यो! तें सांगावें ब्राह्मणें न अन्यानें,
ठावें, परि न वदावें स्वमुखें म्यां शूद्रयोनिजन्यानें.'[1] १०५
भूप म्हणे, 'या देहें त्या मुनिचा संग मज कसा घडतो?
केवळ नीच मनुज हा, अमृतफळांचा समुच्चतर[2] घड[3] तो.' १०६
चिंती विदुर, म्हणे, 'बा! तुज कथिलें तत्व जें तुज्या तातें,[4]
या दासासि कथावें त्वां करुनि कृपा सनत्सुजाता! तें.' १०७
येउनि सनत्सुजातें कथिलें अध्यात्मशास्त्र[5] अंधातें,
जें तत्काळ छेदी सुदृढतरानादिमोहबंधातें.[6] १०८

---

## अध्याय चवथा.

आले सभेंत सर्व प्रातःकाळीं च, त्यांत संदेश
सांगे संजय, परिसति भीष्मादि सुधीश[7] ते[8] हि मंदेश.[9] १
संजय म्हणे, "अजी! धृतराष्ट्रमहाराज! सानुजें धर्में,
द्रोणादिकांसह तुम्हां वंदुनि, तुमचीं विचारिलीं शर्में:[10] २
वदला जिष्णु[11] असें कीं, 'माज्या तातासमक्ष, मंदेशा
दुर्योधना, सभेंत स्पष्ट समग्रा हि सांग संदेशा. ३
सावध होउनि सत्वर आम्हां अस्मद्विभाग[12] ओपावा,[13]
कोपावा न वृकोदरअहि,[14] न तुजा आयुवायु[15] लोपावा. ४
साचें, याची काळीहूनि[16] उणी एक तिळ हि न गदा, हें[17]

---

१. शूद्रयोनीत जन्म पावलेल्यानें. २. अतिशय उच. ३. घोंस. ४. ब्रह्मदेवानें. ५. ब्रह्मविद्या. ६. अतिशय बळकट अशा प्राचीन अविद्यारूप बंधास. ७. ज्ञात्यांमध्यें श्रेष्ठ असे. ८. धृतराष्ट्रप्रमुख. ९. मूर्खशिरोमणी. १०. कुशलें. ११. अर्जुन. १२. आमचा वाटा. १३. द्यावा. १४. भीमरूपी सर्प (येथें सुधि अवश्यक असून कवीनें तो केला नाहीं). १५. आयुष्यरूप वारा. (भीमाला सर्प—वातभुक म्हटलें म्हणून येथें आयुष्यास वारा म्हटलें आहे). १६. कालिदेवीपेक्षां. १७. हें साचें, खरें.

न मरावे बहु बंधु त्वन्नाशें जेंवि नाग[1] नगदाहें[2]. ५
लोभदुरभिमानातें, रक्षाया प्राण यश कटक, टाकीं;
यमसम यम[3] समरीं हे पाहुनि म्हणसील तूं 'कटाकटा[4]!' कीं.
जाणवितो हित[5] हस्तें सुप्ता[6], तुजला हि हा[7] निरोपानें,
धर्मक्षोभें होइल, तसि न हराच्या हि, हानि रोपानें[8]. ७
हा श्रीकृष्ण प्रभु जरि काय क्रोधेंकरूनि पाहेल,
राहेल कोण कटकीं भट, कीं काळास ही न साहेल. ८
सोसेल रुद्रचक्षु प्रस्फुट[9] जरि वरिल शोणतेला[10] तें,
दीपालय[11] विझवाया दाटुनि घालील कोण तेलातें? ९
गांडीव ज्यांत तो सुरपतिस हि नेदील[12] विजयलाभ रण:
कुरुराज्य तुज न साजे, प्रभुचें चोरासि जेंवि आभरण[13]. १०
स्पष्ट बुडवितिल सिकवुनि कुमति शकुनि कर्ण हे तुम्हां, तारा,
कां शोकांत बुडवितां बालिश[14] हो! जन्महेतु[15] म्हातारा? ११
धृष्टद्युम्न शिखंडी सात्यकि अभिमन्यु हे न सामान्य,
वृद्ध द्रोण पितामह शत हि खळ तुम्हीं दहां[16] नसा मान्य. १२
द्यूत न अजातरिपुसीं, भीमासीं जीवनघ्न[17] संगर[18] हा,
रंगें[19] रक्षयी धरुनि द्रोणविदुरभीष्मबुद्धिसंग रहा. १३
दे भाग, अभय देइल धर्ममहाराज हा अवनतातें[20],
न गणुनि दोषशतातें, करिल करावें जसें अवन[21] तातें. १४
'युद्ध चि करीन' म्हणसी, परि पश्चात्ताप बहुत बाधेल,
धर्मन्यायविरोधें कोणाचें ही न इष्ट[22] साधेल. १५

१. हत्ती. २. पर्वतदहनाने. ३. आवळेजावळे नकुलसहदेव. ४. हाय हाय! हितकर्ता. ६. झोपीं गेलेल्याला. ७. मी अर्जुन. ८. बाणानें. ९. स्पष्ट. १०. आरक्ततेला. ११. पेटलेले घर. १२. न देईल. १३. भूषण. १४. मूर्खांनो! १५. [ तुमच्या ] जन्मास कारण. १६. चारचौघांना. १७. प्राणनाशक. १८. युद्ध. १९. युद्ध न होण्याला. २०. नम्राला. २१. रक्षण. २२. इच्छिलेलें.

जन्हि[१] तूं सानुज[२] साप्त प्राप्तमहोत्कर्ष[३] आजि सामरसा[४].
पामरसाम्य[५] वराया इच्छिसि कलह, त्यजूनि सामरसा[६].' १६
ऐसें धर्मानुमतें[७] कृष्णानुमतें उदंड वदला, हो!
तें बहु काय वदावें? शीघ्र अजातारि राज्यपद लहो." १७
भीष्म म्हणे, "कुरुराया! ऐक करुनि सावधान कान मन;
दोघे[८] चि देव न करिति पूर्वी श्रीसत्यनायका[९] नमन. १८
तेव्हां पुसे बृहस्पति विधिला कीं, 'सर्वसिद्धिसदन[१०] मुनी,
शक्राद्यखिलसुर[११] हि कृतकृत्य चि होती त्वदीयपद नमुनीं. १९
विश्वगुरो! कां गेले न नमुनि दोघे चि देव हे तूतें?
कुतुकीं[१२] सभा बुडतसे, याच्या स्वमुखें चि सांग हेतूतें.' २०
वदला विधि कीं, 'ते श्रीनरनारायण तपोनदीन[१३] मुनी,
होती विज्वर[१४] सद्यः[१५] प्रेमें ज्यां भवमहागदी[१६] नमुनीं. २१
मत्तेज त्यांपुढें किति? कीं ते प्रभु मुख्य विश्वपाळक हो!
महिमा अनंत त्यांचा, त्यांसम ते त्रिभुवनांत बाळक हो! २२
जाय[१७] सुरेश्वर, होते ज्यां स्थानीं तपत ते प्रभू[१८] तरणी,
मागे वर कीं, द्यावें साह्यें मजला यश प्रभूतं[१९] रणीं. २३
शरणागतशक्रा यश द्रेती होउनि सहाय बहुदा ते,
तदुदारत्वें[२०] गतमद[२१] मग म्हणतिल कां न 'हाय' बहु दाते? २४
जे प्रभु नर नारायण ते अर्जुन वासुदेव अवतरलें,
वदला असें चि नारद, ज्याच्या बोलें असंख्य भव तरले.' २५

---

१. बधूसह. २. आप्तासह. ३. प्राप्त झाला आहे महोत्कर्ष (महाभाग्य) ज्याला असा. ४. देवांसहित असा. ५. नीचाचीं बरोबरी. ६. सलोखा हा च रस, त्याला. ७. धर्मराज. ८. नर आणि नारायण. ९. महादेवाला. १०. सर्व सिद्धींचें घर च असे. ११. इंद्रादि सर्व देव. १२. कौतुकांत, आश्चर्यांत. १३. तपःसमुद्र. १४. क्लेशरहित. १५. तत्काळ. १६. संसार हा च महारोग ज्यांना असे. १७. पूर्वी एकेकाळीं जाय. १८. नरनारायण. १९. पुष्कळ. २०. त्यांच्या उदारपणानें. २१. गतगर्व.

यांसीं विरोध करिती जे ते ते वेचिती असु खलेश[1],
जे यांसि हात जोडिति त्यांसि स्वर्गी नसे असुखलेश[2]. २६
दुर्जात[3] कितव[4] खळ जे, ज्यांच्या लाविति यशास डाग मती,
आम्हांहुनि कर्ण शकुनि दुःशासन हित तुला जडा! गमती!
गांडीवसुदर्शनधर नरनारायण समर्थ अमरांत,
बसतिल एकरथीं रथिसारथिभावें[5] करूनि समरांत. २८
मेरु हि खचेल, राया! श्रीधर्माच्या उलोन कोपानें,
हो सावधान या श्रीमद[6]मद्याच्या भुलों नको पानें[7]. २९
तुज काय? शत्रुस हि मीं न स्वप्नांत हि कथीन अहितातें,
मणिहार[8] घालिजेतो शिशुकंठीं कीं महोग्र[9] अहि तातें?" ३०
कर्ण म्हणे, 'हो! पंडित! करितां सद्धर्मनिरंतकुत्सा[10], हें,
अनुचित, मीं पांडववध करुनि, करिन मित्रकार्य उत्साहें. ३१
हा क्षत्रधर्मनिष्ठ, स्तुत्य, तिळ हि अघ नसोनि, यास कसा
निंदिसि? न दोष लाविति सुजन न लावून सोनियास कसा.
अजि! पूर्वविरुद्धांसीं[11] करिती कोणी हि तरि शर्म[12] नयज्ञ[13]?
राज्य[14]स्वर्गफलार्थी सिद्धिस नेती च अरिशमनयज्ञ[15].' ३३
भीष्म म्हणे, "धृतराष्ट्रा! देईल दहांत दैन्य हें मत रे!
खळमळ[16]संसर्गास्तव न रणकसीं गुरु हि सैन्य[17]हेम तरे. ३४
दाखील सूतसुत[18] हा हित ऐसें लेखिल्या[19] विनाशपंथा[20],

१. दुष्टशिरोमणी. २. दुःखलेश. ३. नीचकुलोत्पन्न. (कर्ण). ४. जुगारी. ("शकुनी). ५. नर रथित्वानें व नारायण सारथित्वानें. ६. राज्यश्रीचा गर्व हें जें मद्य, त्याच्या. ७. प्राशनानें. ८. रत्नाचा हार. ९. अतिभयकर. १०. सत्यधर्मनिष्ठाची निंदा. ११. पूर्वीपासून उलट असलेल्याशीं. १२. संधि. १३. नीतिवेत्ते. १४. राज्यरूप स्वर्गफलाची इच्छा करणारे. १५. शत्रुसंहाररूप यज्ञ. १६. खलरूप मळाच्या संबधानें. १७. सैन्यरूप सुवर्ण. १८. कर्ण. १९. मानिलेल्या. २०. अकल्याणाच्या मार्गाला.

विधिच्या[1] हि पतंग खळ हि न वळति, फळ देखिल्याविना शपथा.
हा पावला असे निजगुरुपासुनि[2] भंगजनकशापातें,[3]
पापातें[4] वाग्दंडें ताडिति गुरु, भूपजन कशापातें.[5] ३६
अवलंबिला तव सुतें भीमाब्धि[6] तरावयासि हा प्लव,[7] गा!
मारुतिभंग[8] घडेल प्रचुरचणकचर्वणोद्धता[9] प्लवगा?[10] ३७
एकैकें पांडुसुतें केलें जें कर्म, यासि दुष्कर तें;
वाचाळनीचसख्यें[11] न फळ, जसें वंध्यदारशुष्करतें.[12] ३८
सिंहें मृगसा, पार्थें गोग्रहणीं गांठिल्या, स्वभावातें
त्यजुनि पळाला कैसा? स्मरत नसे या मळस्वभावा[13] तें. ३९
कोठें गेला तें हा? पार्थें हरितां सुकीर्तिसह वासें,[14]
बुडती च अकुळज्याच्या[15] सत्कुळज्यांची हि कीर्ति सहवासें. ४०
रे! धृतराष्ट्र! जनितसुतशतमिषविषविषमखरतराधे![16] या
गंधर्वबद्धदुर्योधनमोचनवृत्त[17] पूस राधेया. ४१
पांडव दया न करिते, तरि ते अरि तेज सर्व ही हरिते,
होता मुनिपीतजलधिकुक्षितसे[18] विगतसार[19] कां न रिते? ४२
आतां बहु गर्जतसे मत्तवृषभसा[20] सभेंत वित्रप[21] हा,

---

१. अन्वयार्थ–विधिच्या हि शपथा (ब्रह्मदेवानें शपथपूर्वक सांगितलें तरी) पतग [व] खळ हि फळ देखिल्याविना न वळति. २. भार्गवरामापासून. ३. नाशास कारणीभूत अशा शापातें. ४. पाप्याला. ५. चाबकाच्या तडाक्यानें ६. भीमरूप समुद्र किंवा भयंकर असा समुद्र. ७. नौका. ८. मारुतीचा पराभव. ९. पुष्कळ चणे खाऊन माजलेल्या. १०. माकडाला. ११. बडबडणाऱ्या नीच मनुष्याच्या सख्यानें. १२. वंध्या स्त्रीच्या व्यर्थ समागमानें. १३. दुष्ट स्वभाव ज्याचा त्या (कर्णातें). १४. वस्त्रें. १५. हीनकुलोत्पन्नाच्या सहवासानें. १६. उत्पन्न केली आहे शतपुत्ररूपी, विषाप्रमाणें भयंकर आणि अत्यंत तीक्ष्ण अशी मानसिक व्यथा ज्यानें. [अशा!] १७. गंधर्वांनीं बांधलेल्या दुर्योधनाच्या सुटकेचा वृत्तांत. १८. अगस्तीनें प्यालेल्या समुद्राच्या एका भागाप्रमाणें. १९. गेलें आहे तेज ज्यांचें. २०. माजलेल्या बैलाप्रमाणें. २१. निर्लज्ज.

याच्या चि बळें पांडवपरिभव करणार पुत्र, चित्र पहा.' ४३
द्रोण म्हणे, 'हें चि करा, भरतर्षभ सत्यसार वदला.हो!
पद लाहो धर्म उचित, शुचितम शम, यश चि घ्या, न बदला हो.
शूर रणक्रूर सकळ काळतसे, तदपि ते दयालु बरे,
पांडव सुयोधना सुख देतील अपार, खेद या तुंबरे. ४५
असति बहु धनुर्धर परि पार्थ सदा नव्यसा चि, समरा या,
हटकाया भट काया सजिल कवण सव्यसाचिसम राया!?' ४६
अंधापासुनि पावे भीष्मद्रोणोक्त ही अनादर तें,
जेंवि अनादरिजे हरिहरकीर्तन सुबधिरें अनाम्दरतें. ४७
सभ्य म्हणति, 'हा! हा ही धरितो, जसि धरिति कामना सुंदरी
हां! जनरीति असी, मग कविच्या येइल न कां मनास दरी?'
वृद्ध म्हणे, "रे! संजय! अकरा अक्षौहिणीचमूश्रवण,
करुनि अजातारि कसें वदला, नृप बोलिले कसें कवण? ४९
आम्हांकडे मिळालें बहुबळ हें परिसतां, अनीचेष्टा
धर्मा कैसें गमलें? केली तेणें कसी जनीं चेष्टा? ५०
आज्ञार्थ युधिष्ठिरमुख कवण पहाती, धरूनि समरेहा?
संम रे! हा त्यां यांच्या ओपुनि आधींस मानस मरे, हा. ५१
'रतला जरि मोहप्रदराज्यश्रीसीं बळें चि मंद रतो,'

१ आश्रय. २. भरतश्रेष्ठ (भीष्म). ३. सत्याचा मुख्यांश. ४. तोंडपुजे. ५. नवीनाप्रमाणे. ६. सव्यसाचिसम (अर्जुनाप्रमाणे) कवण भट या (पार्थास) हटकाया काया सजिल? ७. अत्यंत बहिऱ्यानें. ८. अरसिकानें. ९. धृतराष्ट्र सुद्धां. १०. सज्जनाचे शत्रु. ११. गुहा. (वनवास). १२. सज्जनप्रिय अशा. १३. उद्योग, वर्तन. १४. युद्धेच्छी. १५. संजया! हाय हाय! हा धृतराष्ट्र त्या पांडवांच्या व या कौरवांच्या चिंताना आपलें मन सारखें च वाहून काळजीनें मरत आहे रे! १६. मोह उत्पन्न करणाऱ्या राज्यलक्ष्मीसीं.

कोण्हीं असें म्हणे कीं न, शमाया शत्रुसिंधुमंदर तो?" ५२
संजय म्हणे, 'नृपाळा! सद्दात्याचें धनेच्छु संसारी
देखति जसें मुख तसें धर्माचें भीम जिष्णु कंसारी. ५३
आज्ञेची च पहाती वाट स्तविती नृपाळ भाट तसे,
क्षिप्र[2] जयार्थ निघावा प्रभु बाळांस हि असें चि वाटतसे.' ५४
भूप म्हणे, 'कलह न्व्हे कार्य[4], तन्हि तयांसि कार्य कां गमला?
आम्हांसीं कोणांच्या सामर्थ्यें भांडणार सांग मला?' ५५
ऐसें सभेंत पुसतां, तो काळग्रस्तबुद्धि जाणोनीं,
पडला मूर्छित संजय, चित्तीं भावी अनर्थ आणोनीं. ५६
विदुर म्हणे, 'राजेंद्रा! त्वच्चित्ताला असत्य न गमो हा,
संजय पडला कीं जी! जाला वश जन्हि महाजनग[6] मोहा.' ५७
भूप म्हणे, 'बहुधा हा भ्याला भीमादियोधतेज्यानें,
भ्यावा चि तो, निरखिले सहसा सक्रोधयोध ते ज्यानें.' ५८
सूत उठोनि म्हणे, "हो! करणार प्रभु तुम्हांसवें कळहा
धृष्टद्युम्नबळानें; द्रोणवधोत्पन्न कीं महाबळ हा. ५९
जो बकहिडिंबमागधकीचककिर्मीरशमन[10] भीम रणा,
चिंती बहु न विलसा[11], ज्याचें स्वप्नीं हि न मन भी मरणा.
जो गंधमादननगीं क्रीडे प्रभु[12], जेंवि एकला भवनीं,
क्रोधवश[13] वधूनि वदे, 'मज मोटा हा चि एक लाभ वनीं,' ६१
त्याच्या बळें तुम्हांसीं धर्मप्रभु भांडणार, बा! राज्या!

---

१. तो शत्रुरूप समुद्रास मंदरपर्वताप्रमाणे घुसळणारा धर्म शांत व्हावा म्हणून, हा मद दुर्योधन च तसल्या राज्यश्रीसीं रतो असें कोणी म्हणाले नाहींत काय? २ लवकर. ३. धर्म. ४. करण्यास योग्य, कर्तव्य. ५. काळानें ग्रासली आहे बुद्धि ज्याची असा. ६. मोठमोठ्या लोकांत वावरणारा. ७. सृजय. ८. धर्म. ९. कीं (कारण), हा द्रोणवधासाठीं उत्पन्न झालेला (धृष्टद्युम्न) मोठा बलवान् आहे. १०. बकादिकांचा नाश करणारा. ११. उपभोगाला. १२. भीम. १३. क्रोधवशाभिध कुबेरानुचर—पंत.

अपला विराटनगरीं बहु, बहुत वनीं हि अब्द[1] बारा ज्या. ६२
ज्या श्रीगांडीवधनुर्वल्लीतें[2] सत्यपाण्ड वानी ती,
देवी देती युद्धोत्साह, दुजी सत्य पांडवा नीती. ६३
जो भांडला शिवासीं, प्राप्त हरिहरप्रसाद[3]होरा ज्या,
त्याच्या बळें तुम्हांसीं धर्म प्रभु भांडणार हो! राज्या!. ६४
यक्षें[4] पुरुषत्व दिलें ज्याला, जो धैर्यसन्नग[5] शिखंडी,
करणार तद्बळें रण, कीं तो गांगेयपन्नगशिखंडी[6]. ६५
जो वासुदेव भगवान् सर्वाश्रितकामकल्पनग, राया!
त्याच्या बळें सुरपुरा[7] घेइल, मग कां न अल्प नगरा[8] या? ६६
करिल न्यायब्राह्मणसत्पुरुषाशीर्बळें चि कळहातें,
होतिल अजातरिपुच्या भग्न रणांत क्षणांत खळ हातें." ६७
प्रज्ञाचक्षु म्हणे, 'हे सर्व हि एकीकडे महाबाहु,
एकीकडे वृकोदर मत्पुत्रांतें रणीं न हा बाहू[10]. ६८
भीमापासुनि भीतों मीं, हरिपासूनि जेंवि काळविट,
घेइल हा न वधाचा विट, घेइल एकवेळ काळ विट. ६९
अस्त्रीं गुरुसम[11], कोपीं हरसम, वेगीं हि वातसम जो गा!
देवा! मंद सुयोधन भीमविरोधें स्वघात समजो गा!. ७०
नीज न ये रात्रिदिवस, भीमाचें लागलें चि मतिला भें;
आम्ही नि वांचलों कीं, उरले द्यूतांत, या चि अतिलाभें. ७१
म्हणतों, मरूं नका रे! भीमकरें मारवूं नका राजे,
परि न वळती; कसे तरतिल गुरुंच्या[12] लंघिती नकारा[13] जे? ७२
देवासुरां हि दुःसह भीम असो सगद[14] कीं असो अगद,

१. वर्षें. २. ज्या भीमाला. ३. ब्रह्मांड. (सर्व लोक). हरिहरांचा प्रसाद हा त्व शुभशकुन. ४. स्थूणाकर्णयक्षानें शिखंडीला पुरुषत्व दिलें. ५. धैर्याचा उत्तम पर्वत. ६. भीष्मरूप सर्पास मोराप्रमाणें असा. (मोर सर्पास खातात). ७. अमरावतीस. ८. हस्तिनापुराला. ९. बोलावो. १०. कंटाळा. ११. द्रोणाचार्या-प्रमाणें. १२. वडील माणसांच्या. १३. निषेधाला. १४. गदेसहित.

अंगदर्पाला[1] वज्री[2] अरिदर्पाला हि होय हा अंगद[3]. ७३
राजर्षिकर युधिष्ठिर त्याचा ब्रह्मास्त्रसा चि निःश्वास[4],
यांची काय कथा? तो भस्म करील क्षणांत विश्वास. ७४
भीष्मद्रोणकृपांहीं परमाप्ताहीं सदा सहायांहीं,
भुजबुद्धिबळें दिधला व्यसनांत पडों न दास हा[5] यांहीं. ७५
आतां यांहीं आर्यव्रत[6] कैसें जीवितार्थ सोडावें?
मोडावें मन कैसें? अपशय कैसें नवें चि जोडावें? ७६
कर्ण सदय प्रमादी[7], गुरु भीष्म हि वृद्ध, पार्थ तरणा रे!
आहेत काय कोठें तरि बाहुबळें समुद्र तरणारे? ७७
भीमार्जुनाच्युत रणीं मथितिल अदितितनयां[8] सकटकांतें.
अलें, येइल ही[9] जें नृपबळ वधितिल न यांसकट कां तें? ७८
तें सत्य होत आलें विदुरें जें भावि[10] घीतलें कानीं,
केला पहा, कसा हा येउनि पोटासि घात लेकानीं! ७९
जो मज ताप कुपुत्रें गिरिस हि पविच्या[11] न दाविला पातें,
न तरेंन वृद्ध मीं सुतशोकघन[12]जविषनदा विलापातें.' ८०
संजय म्हणे, 'पहावा स्वतनुजपरिणाम जो भला तातें,
नाचों दिला सुत गृहीं धरुनि द्यूताभिधा[13] अलातातें[14]. ८१
तेव्हां स्मित ये वदनीं, न मनीं ये कीं करील हा हानी,
झालें दीप्त अलातें जें गेह विझेल काय हाहांनीं[15]? ८२
आजुनि तरि टाका कीं प्रभु हो! कारालयांत[16] हा कोंडा[17],

---

१. पर्वत—**पंत.** पर्वताच्या गर्वाला. २. वज्रधारी. (इंद्र). ३. ओखद—**पंत.** ४. उच्छ्वास. ५. हा धृतराष्ट्र. ६. दासाची उपेक्षा न करणें हें आर्यव्रत. ७. असावध—**पंत.** ८. देवाना. ९. सैन्यासह अशा. १०. भविष्य. ११. वज्राच्या आघाताने. १२. पुत्रशोकरूप मेघापासून उत्पन्न झालेल्या विषसमुद्राला. १३ द्यूत-नामक. १४. कोलिताला. १५. हाहाकारानी. १६. बंदिखान्यांत. १७. अडकवा.

प्रेमकरें एखादे ते कण साराल यांत, हा[1] कोंडा. ८३

होय न तें शंखशतें, जें शिवें[2] एकें चि दक्षिणावर्तें[3];
लोकद्वयीं सुखें, श्री पात्रीं देवूनि दक्षिणा, वर्तें[4]. ८४

लंटिक्यां चि अनीशांत्वा[5] धरिसी, न बधेल या सभा सांगा,
हितकर परि परसे तुज जन्हि आम्हीं आप्त दास भासों, गा!'

तेव्हां सुयोधन म्हणे, 'अजि तात! मदुक्तिला हि परिसा हो!
तुमच्या सभेसि यद्यपि मन्मत बहुत चि असह्य, परि साहो[6].

पांडवभय न धरावें, जाले पांडव कुळांत ते ज्या, तें
आम्हांस हि प्रसवलें, जाणे जग आमुच्या हि तेज्यातें. ८७

धर्मासि भेटले जें कृष्णादि[7] श्याल[8] सर्व हे रानीं,
वदले 'राज्यहरण मद्वध,' तें कथिलें समस्त हेरांनीं[9]. ८८

तेव्हां अभय दिलें मज भीष्मद्रोणादि सर्व गुरुगुरुनीं[10].
देवीहरिश्रितांचें[11] वनहरि करितील काय गुरुगुरुनीं? ८९

स्वाधीनमृत्यु भीष्म, द्रोण हि उग्रप्रताप, हा रविला
जिंकिल, याच्या तेजें कोणाचा न प्रताप हारविला? ९०

वाखाणिलें मज बळें[12], भीम मजपुढें धरील न गदेतें,
गुरुचा प्रताप बहु दे, याहुनि अत्यल्प कल्पनग दे तें. ९१

भ्याले पांडव आम्हां कीं प्रार्थुनि पांच मागती गावें,
यश आमुचें कवीला वाटे गावूनि मागती[13] गावें. ९२

---

१. हा दुर्योधन कोंडा आहे; यात ते पांडवरूपी धान्याचे कण प्रेमरूप हस्ताने (पुत्रप्रेमानें अंध होऊन) कदाचित् मिसळाल. (पांडव हे श्रेष्ठ आहेत; त्यांची आणि कौरवाची बरोबरी आहे असे समजूं नका, हें तात्पर्य). २. कल्याण. ३. ज्यावरील भोवऱ्याचें वळण उजवीकडे आहे असा. ४. रहा. ५. परवशतेला. ६. सहन होवो. ७. कृष्ण, धृष्टद्युम्न इत्यादि. ८. मेहुणे. ९. दूतानी. १०. श्रेष्ठ गुरूनी. ११. दुर्गेच्या सिंहाच्या आश्रितांचें. १२. बलरामानें. १३. पुनःपुन्हा.

ज्याचा तात अयोनिज[1], माय हि[2], हा वीर काय सामान्य?
अश्वत्थामा, सर्वां धन्वधरां[3] रामरायसा[4] मान्य. ९३
सहजकवचकुंडलधर, रविसा तेजोनिधान कर्ण; वहा[5]
चिंता यास, यशोस्त्रामृतरत्नांचा[6] नृकाय[7] अर्णव हा. ९४
कांपत असेल शक्र हि परिसुनि माझ्या सुयोधनांमातें[8],
वाहेल कोण योद्धा समरीं राज्या! सुयोधना मातें? ९५
केशव सात्यकि दोघे, पांडुतनय पांच, सात हे तिकडे,
त्यांत हि हरिप्रतिज्ञा असि कीं पाहू नये चि हेतिकडे. ९६
भगदत्त शल्य भीष्म द्रोण कृप द्रौणि कर्ण हे तिपट
वीर मजकडे, यांचे रविस हि आच्छादितील हेतिपट[9]. ९७
झालां कां हो तात!? स्वस्थ रहा, पांडवांसि गिळितील,
खिळितील वायुस हि हे, च्यारि दिवस ते मिशांसि[10] पिळितील.
भीमातें मारिन मीं, वधितिल कर्णादि फाल्गुनासि[11] पणें,
रिपुतृणकाचें खेळों पाहुनियां समरफाल्गुना[12] सिपणें.' ९९
धृतराष्ट्र म्हणे, 'सूता! युद्धकथा कोण काय वदतात?'
वद, परिसो सुत, परिसो गुरु[13], परिसो कीर्तिनीतिपदें[14] तातें[15].'
संजय म्हणे, "शिखंडी म्हणतो, 'भीष्मासि ठोविना सत्य.'
धृष्टद्युम्न म्हणे, 'मीं द्रोणा, रोगासि जेंवि नासत्य[16].' १०१
निजभाग कल्पिलासे मद्रेशीं[17] युधिष्ठिरें अहीनकुळें[18],
शत हि सुत तुजे भीमें स्वविभागत्वें[19], जसे अही नकुळें[20]. १०२

---

१. द्रोणाचार्य द्रोणीनामक यज्ञपात्रात जन्मल्याने अयोनिज. २. कृपी ही हि एका अप्सरेच्या दर्शनाने झालेल्या ऋषीच्या रेतस्खलना पासून निर्माण झाली. ३. धनुर्धराना. ४. दाशरथी रामाप्रमाणें. ५. कर्णास—पंत. ६. यश व अस्त्रे ही च अमृत व रत्ने यांचा. ७. 'उत्तम वीर या' नांवाते. ८. शस्त्राकडे. ९. शस्त्ररूप वस्त्रें. १०. गर्व वाहतील. ११. अर्जुनास. १२. युद्धरूप फाल्गुन-मासास. १३. द्रोण. १४. कीर्ति व नीति यांचें स्थान च असा. १५. भीष्म. १६. अश्विनीकुमार. (देवांचे वैद्य). १७. शल्य. १८. मोठ्या कुळांत जन्मलेल्यानें. १९. आपला वांटा असें समजून. २०. मुंगसानें.

अर्जुन वदला, 'येतिल दुर्जयवैरीभनक्र समरा जे
कर्णजयद्रथमुख सुखकर माजा भाग, शक्रसम राजे.' १०३
अभिमन्यु बोलिला कीं, 'मोडा घालूं नये चि इतरानीं,
द्यावा मज दुर्योधनदुःशासनपुत्रभाग पितरानीं.' १०४
नकुळ असें वदला कीं, 'भाग उलूकादि आपले खावे
मद्बाणानीं, नाहीं तरि त्यांसम हे हि पाप लेखावे.' १०५
नकुळानुजप्रतिज्ञा म्यां ऐसी परिशिली मुखानें, हो!
कीं, 'शकुनि आपुल्या चि व्यसु पापी, परि शिलीमुखानें हो.'
आवश्यकक्रिया जो शीघ्र तुम्हीं घ्या च उरकुनीं तीतें,
कोणाची आचरतां लोकांत उरेल उर कुनीतीतें?" १०७
अंध म्हणे, 'दे त्यांचें त्यांला, केल्या जरि प्रतिज्ञा, ते
सज्जन करितिल करुणा, रक्षिति नम्रा अरिप्रति ज्ञातें. १०८
ज्यांच्या बळें उडसि तें चित्तें तिकडे चि, तुजकडे देहें,
साम करावें त्यांसीं बा,! मज वृद्धासि एव्हडें दे हें.' १०९
'ते हे हि एकजाती, ते हे हि क्षोणिवरि रहातात,
मग त्यांचा चि विजय कां? काय म्हणावें तुम्हां अहा! तात!?
न बळें तुज्या, न गुरुच्या, न गुरुसुताच्या, न या हि आज्याच्या,
स्वबळें कर्णबळें मीं हरणार असूंसि धर्मराज्याच्या. १११
करितिल समरीं माज्या ते, मीं त्यांच्या करीन, मथना कीं;
भोगीन भाग्य येथें, कीं हा चि धरूनि भव्यपथ नाकीं. ११२
अतिसूक्ष्में सूच्यग्रें जितुका भूभाग होतसे विद्ध,
युद्धाविना न देईन जन्हि ते तितुका हि घ्यावया सिद्ध." ११३
प्रज्ञाचक्षु म्हणे, 'रे! देईल न एकवेळ विष मरण,

१. अजिंक्य शत्रुयुजाला नक्राप्रमाणे. २. शकुनिपुत्रादि. ३. नकुलाचा धाकटा भाऊ सहदेव याची प्रतिज्ञा. ४. प्राणरहित. ५. बाणानें. ६. गर्व करितोस. ७. दुर्योधन म्हणतो. ८. एका जातीचे. ९. कल्याणाचा मार्ग. १०. स्वर्गीं. ११. सुईच्या टोंकाने. १२. तयार.

[1]अशनि हि [2]दहन हि, परि जो भीमासीं तो [3]अतीव विषम रण.
न करीं दुराग्रह, अरे! वत्सा! हो सावधान, रे! [4]शम रे!
त्यजितां जळ मीन, तसा धर्मनय त्यागितां नरेश मरे. ११५
खवळेल भीम हरिसा, मन्मतिला तों असें गमे [5]हसे
व्हाल तुम्हीं, कीं [6]विधिवरि त्याचें ऐकोनि सत्य मेरु रुसे. ११६
[7]नग जगतीवरि न. तसे न तुटतिल [8]धृतायुधा सुतारा जे,
भीमा भी माझें मन, दुःसाध्य न या पृथासुता राजे. ११७
ज्या [9]अहित पितृपितामह, सांगावें काय त्या मग दहानीं!
स्मरसिल मद्वच जेव्हां प्राणांची करिल तो [10]सगद हानी. ११८
संजय! [11]कंजयशोहरनयन कसें काय बोलिला वद, रे!
आइक, हो सुखपद, "[12]रे! [13]मदरोचितसद्यशोनिधे [14]सदरे!' ११९

---

## अध्याय पांचवा.

संजय म्हणे, "पुसाया गेलों लोकैकनायका [15]यदुज्या,
तेव्हां वदला प्रभु तें कथितों, सांगों [16]रहस्य काय दुज्या? १
एकीं शयनीं होते नरनारायण पिवूनि [17]हालों हो!
तद्दर्शनामृताचा आक्षेनें घे [18]भिवूनि हों [19]लाहो. २
जेथें अभिमन्यु नकुळ सहदेव अशांस ही न शिरवे च,
तेथें शिरतां कवणा न म्हणेल [20]स्वापराध 'शिर वेच'? ३

---

१. वज्र. २. अग्नि. ३. फार च. ४ शांत हो. ५ हरिणासारखे. ६. ब्रह्मदेवावर, दैवावर. ७. वृक्ष. ८. धारण केलं आहे शस्त्र ज्यानें अशा. ९. शत्रु. १०. गदा धारण करणारा (भीम). ११. (कमलाचें यश हरण करणारे आहेत नेत्र ज्याचे तो) कृष्ण—**पंत**. १२. पुत्र—**पंत**. १३. मदेन रिक्तीकृतः सद्यशोनिधिर्यस्य—**पंत**. गर्वानें रिक्त केला आहे चांगला यशःसमुदाय ज्याचा अशा. १४. सज्जनाच्या शत्रो! १५. कृष्णाला. १६. गुप्त गोष्ट. १७. मद्य. १८. मी (संजय). १९. लाभ. २०. तेथें शिरणें हा आपला अपराध.

ध्यावुनि ज्यासि निवाले सज्जन अमृतें जसें, न हाले तें
कृष्णाख्य तेज, निजलें होतें, राया! पिवून हालेतें, ४
कृष्णा[1] भामा[2] देवी साक्षाद्देवी च ज्या जना दिसती,
होत्या कृष्णांपाशीं[3], हरिहरनिकटीं जशा अनादिसती. ५
जेणें किरातरूपिप्रभुसीं केला प्रसिद्ध बाढ कली,
तो मजकडे स्वपादें कांचनमय पादपीठ बा! ढकली. ६
शरणागताधिगिरिचें[6] बा! केलें ज्या कृपाकरें पीठ
प्रभुयुग[7] वंदुनि महिवरि बसलों स्पर्शुनि नृपा! करें पीठ[8]. ७
वदलों, वाचिक[9] सांगा. आलासे दास हा निरोपाला,
कुरुसंततितुळसीच्या स्पर्शों द्यावी न हानि रोपाला. ८
मद्वचनातें परिसुनि, पाहूनि द्रौपदीवदन, रगडी
वदवाया स्वांकस्थ[10] श्रीभामाजानि[11]चें पद नर[12]गडी. ९
पार्थ म्हणे, 'यदुराया! वाचिक या संजयासि सांगावें.
पिकपति[13]पुढें वसंतीं पृथुकानें[14] त्यजुनि पान[15] कां गावें?' १०
श्रीकृष्ण उठोनि म्हणे. 'संजय! दुर्योधनासि सांग असें,
वारासारें[16] करुनि यमसदना जायास साप्त सिद्ध असें. ११
'गोविंद! धाव' असें व्यसनीं मारुनि सभेंत हाकेला,
या कृष्णानें तेव्हांपासुनि केवळ ऋणी च हा[17] केला. १२
फेडायास्तव करितों तेरा वर्षें हि जप तप रिणा मी,
वाहों न शकें, असतें हें[18] द्याया दुःख जपत परिणामीं. १३
'जे त्वत्सहाय आम्हीं भीमार्जुनशौरि हे तिघे, त्यांतें

१. द्रौपदी. २. सत्यभामा. ३. कृष्णार्जुनापाशीं. ४. लक्ष्मी व पार्वती. ५. मोठा. ६. शरण आलेल्याच्या चितारूप पर्वताचे. ७. कृष्णार्जुन. ८. ते काञ्चनमय पादपीठ (आसन). ९. निरोप. १०. आपल्या मांडीवरील. ११. श्रीभामा जाया (पत्नी) ज्याची त्या श्रीकृष्णाचे. १२. मित्र अर्जुन. १३. कोकिलश्रेष्ठापुढें. १४. बालकानें. १५. स्तनपान. १६. निरवानिरव, कामाची व्यवस्था. १७. हा मी कृष्ण. १८. हे ऋण.

मारूं रणांत, सोडूं तृण घेत्यांतें, न हेति[1] घेत्यांतें.'" १४
भूप[2] म्हणे, 'पुत्राचा अभिमान पिता धरील हा नियम,
धर्मप्रियार्थ, वत्सा! त्वत्कटकांची करील हानि यम. १५
मारुत[3] हि कसपटेंसीं कटकें कुतुकेंकरूनि उडवील,
विजयध्वजस्थ[4] मारुति सर्वांस हि सागरांत बुडवील. १६
शक्र त्रिदशांकरेंवीं[5] त्वद्वीरशिरोंबुजांसि[6] खुडवील,
चिंतुनियां ऐरावत वैरा, बत[7]! वादिवीर[8] तुडवील. १७
संरक्षितील नानोपायें त्यां[9] वैद्यराज नासत्यें[10];
ज्याच्या बळें उडसि तूं दैवबळ नसे चि या जना सत्य.' १८
हांसुनि म्हणे सुयोधन, 'धरितिल सुर काय जी नवि प्रकृती[11]?
ऐसें न म्हणति नारदमार्कंडेयादि जीर्ण[12] विप्र कृती[13]. १९
जरि कामकोपलोभद्वेषांतें सुर मनुष्यसे धरिते,
तरि कां न काननाप्रति जातां प्रियपुत्रसाह्य ते करिते?. २०
माझाठायीं केवळ मनुजबळ न, दैवबळ हि बहु वसतें,
नानीत्यांतें[14] शमवितों मीं हि, असे मच्चरित्र बहुवस[15] तें. २१
गडबड बडबड करिती जरि तीव्र[16], न पावतील परि भूतें[17],
परिभूतें होतील चि मन्मंत्रबळें पळांत अरिभूतें[18]. २२
जें शुभ अशुभ ध्यातीं, सिद्धिप्रति पावतें चि तात! तें,
मेघांतें दहनातें वर्तवितों[19] मीं तसें चि वातातें. २३
स्नेह तुम्हांसि भिववितो आच्छादुनि निरुपमा हि मन्महिम्या,

---

१. शस्त्रें धारण करणारास. २. धृतराष्ट्र. ३. वायु. (भीमाचा पिता). ४. अर्जुनाच्या पताकेवरील. ५. देवाच्या हातून. ६. तुझ्या वीरांच्या शिरकमलांना. ७. हाय हाय! ८. शत्रूचे योद्धे. ९. नकुलसहदेवाना. १०. अश्विनीकुमार. (यम, मारुत, शक्र व नासत्य हे पुत्राभिमानानें पांडवपक्षपाती होऊन तुमचा नाश करितील). ११. स्वभाव. १२. वृद्ध. १३. चतुर, ज्ञाते. १४. अनेक अनर्थ. १५. नानाविध. १६. मोठी. १७. पृथ्वीला. १८. शत्रुरूप भुतें. १९. [ माझ्या इच्छेप्रमाणें ] वागवितो.

उद्धरिजेल वराहें[1] जसि तसि लीलेकरूनि मन्महि[2] म्या. २४
स्वल्पें काळें पुत्रें पांडव मथिले[3] असें चि परिसाल,
'काढिन दगडाची ही मीं कोण्हा हि न निघेल परि साल. २५
स्वश्लाघा[4] न बरी, परी तुमच्या आश्वासनार्थ हे राहो,
इत्तरा पुंसों नका, हें प्रज्ञानेत्रें[5] तुम्हीं च हेरा हो!.' ,२६
कर्ण म्हणे, "त्यजिजेतो जो दुर्लभवस्तुकाम[6] तो भानें[7],
गुरुपासीं 'ब्राह्मण मीं' ऐसें वदलों महास्त्रलोभानें. २७
कळतां चि कपट वदला कीं, 'अस्त्रस्मृति नसेल तुज अंतीं[8],'
भस्म चि करिता, परि बहु कारुण्यामृत, न कोपविष, संतीं.
आयुष्य असे तोंवरि अस्त्रस्मृति मन्मनींत राहेल,
गुरुशापार्थ[9] असा, मग कोण मजकडे रणांत पाहेल? २९
गुरुचा प्रसाद नसतां मज्जीवित निमिषमात्र[10] न रहातें,.
उरलों अद्यापि म्हणुनि निश्चित माज्या मरेल नर[11] हातें. ३०
न स्वभ्यस्तास्त्राची[12] स्मृति मजला यावदायु[13] सोडील,
जोडील कीर्ति द्याया मज माजें मन कधीं न मोडील[14]. ३१
द्रोण हि भीष्म हि राहो, राजे हि तुम्हांसमीप राहोत,
पार्थासि[15] मीं च वधितों, मद्विक्रम लोकपाळ[16] पाहोत." ३२
भीष्म म्हणे, 'रे कर्णा! कां स्वाश्रित धार्तराष्ट्र बुडवाया
इच्छिसि दुष्टा! दाटुनि दृष्टिदहन[17] दंदशूक[18] तुडवाया? ३३
कृष्णांच्या[19] दृष्टिपुढें जातां चि तुजा पडेल आवें[20] रिता,

१. वराहावतार घेणाऱ्या विष्णूने. २. माझी पृथ्वी. ३. मारले. ४. आत्मस्तुति. ५. ज्ञानदृष्टीने. ६. मिळण्यास कठिण अशा पदार्थाची इच्छा करणारा. ७. सारासारविचारशक्तीने. ८. मरणसमयीं. ९. गुरु परशुरामाच्या शापाचा भावार्थ. १०. पळभर. ११. अर्जुन. १२. उत्तम प्रकारें अभ्यास केलेल्या अस्त्रांची. १३. जोपर्यंत आयुष्य आहे तोंपर्यंत. १४. याचा कर्ता पूर्वार्धातील 'स्मृति.' १५. पार्थासि=अर्जुनासि. (?). १६. अष्टदिक्पाल. १७. दृष्टीनें जाळणारा. (चक्षुर्विष). १८. सर्प. १९. कृष्णार्जुनांच्या. २०. धैर्य.

आम्हां[1] नावरसी जरि, असता आयुष्यशेष आवरिता. ३४
जन्हि खांडवदाह श्रुत तरि तुज कां चित्त नावरे? घे[2] तें
विजयाचें सद्गणनीं[3] जें ये पहिल्या चि नाव रेघेतें[4] ३५
या हरिच्या[5] शक्तिपुढें त्या हरिची काय पामरा[6] शक्ती?
तेंज अजितभक्तिपुढें[7] मिरवील क्षुद्रदेवताभक्ती? ३६
जिंकील देवसेना[8] निजतेजें सिंहवाहसासूतें[9]?
शक्तिधरावरि[10] जासी घेउनि तूं इष्टसाहसा[11]! सूतें[12]. ३७
तुजसह होइल भस्म व्याळमुख[13] शर हि धनंजयशरानीं[14],
न तुम्हीं पुरीं मिळविलें जें तेणें मिळविलें सुयश रानीं. ३८
मारिन ज्यासि म्हणसि तो शर्वप्रतिमल्ल[15] काय नर कांचा[16]?
तद्रक्षक तो, केला ज्या प्रभुनें भस्म काय नरकांचा[17]. ३९
तुजहुनि कोटिगुणाधिक वीरवर्यी जे समर्थ ते ज्यातें
प्रभुभुज रक्षिति, त्याच्या केंवि सहासी[18] समर्थ तेज्यातें?' ४०
कर्ण म्हणे, 'मज आहे विदित बहुसमर्थ यदुप[19] हा साचा,
महिमा वर्ण्य[20], परि बहु प्रेमा भीष्मासि मदुपहासाचा[21]. ४१
उपहासाचें फळ मीं दाखवितों रोकडें चि अन्यांस[22],
वृद्ध अलंघ्य, असे हा[23] तों म्यां केला चि शस्त्रसंन्यास[24] ४२

१. जरी त आम्हाला आवरला जात नाहींस तरी तुझें आयुष्य कांहीं उरलेलें असतें तर त्यानें तुला आवरलें असतें; पण तें हि नाहीं. २. लक्षांत घे. ३. चांगल्या [वीराची] गणना करितांना. ४. ओळीला. ५. इंद्राची. ६. क्षुद्रा अशी. ७. कृष्ण-भक्तीपुढें. ८. स्नुषारूपा—**पंत.** पार्वतीपुत्र कार्तिक याची पत्नी देवसेना. ९. सिंह-वाहिनी भगवती श्वश्रूरूपा—**पंत.** १०. शक्तिनामक मोठें आयुध धारण करणारावर. ११. इच्छिलेलें आहे साहस ज्यानें अशा! १२. सुईला. १३. सर्पमुख. १४. अर्जुनाच्या बाणांनीं. १५. शंकराचा प्रतिस्पर्धी वीर. १६. कच्चा, कमी योग्यतेचा. १७. नरकनामक दैत्याचा. १८. सहन करशील. १९. कृष्ण. २०. वर्णन करण्यास योग्य. २१. माझ्या निंदेचा. २२. भीष्मेतरास. २३. हा वृद्ध भीष्म. २४. शस्त्रत्याग.

त्यजिली सभा हि आजि हि, जेव्हां होशील[1] काय शांत, नवा
समरचमत्कार जना दाविन मीं वीरराय शांतनवा[2]!.' ४३
ऐसें वदोनि मानी तेजस्वी कर्ण जाय गेहाला,
बुध म्हणति मनीं, 'कुमते[3]! अधिका तुजहूनि काय गे! हाला[4]?'
स्मित करुनि सभेंत नदीतनय म्हणे, 'रे! सुयोधना! सत्य,
रिपुगदनाशार्थ[5] बरे मेळविले हे सुयोधनासत्य[6]. ४५
हा सूतात्मज[7] आधीं वदला कीं, मीं करीन अर्यंत[8],
आतां म्हणतो, संगर[9] न करीन मदंतकाळपर्यंत[10]. ४६
सत्यप्रतिज्ञ लोकीं हा चि, नसे यासमान राजन्य[11],
सांगा घडेल कैसें यासीं नारायणा नरा जन्य[12]. ४७
मज्जीवनक्षयावधि जें स्पष्ट उपेक्षिणार तव नाशा,
तें मित्र[13] काय? त्याच्या वचनें धरितोसि काय अवनाशा[14]?
करुनि श्रीगुरुवंचन[15] सर्व बुडविलें स्वपुण्यतप यानें,
ऐसें नसतें, तरि कां याला घडतीं रणांत अपयानें[16]?' ४९
गांधारि[17] म्हणे, 'तज्जय[18] कां? त्यां आहेत काय बा! सिंगें?
कीर्तिवर म्हणुनि विधिनें बांधियलीं त्यांसि काय बासिंगें[19]? ५०
न तुजा, न द्रोणाचा, न कृपनृपांचा हि भरवसा धरिला,
दुःशासनकर्णबळें स्वबळें म्या युद्धयज्ञ आदरिला. ५१
मारूनि पांडवांतें यज्ञ करीन, द्विजांसि तर्पीन,
मणि कांचन हय रथ गज गृह गो ग्राम प्रकाम अर्पीन.' ५२
विदुर म्हणे, "दम[20] तारक सुज्ञांसि गमे, खळांसि न दम हित;

१. युद्ध. २. भीष्मा! ३. हे दुष्ट बुद्धि! ४. मद्य. ५. शत्रुरूप रोगाचा नाश करण्याकरिता. ६. उत्तम योद्धे हे च अश्विनीकुमार. ७. कर्ण. ८. शत्रूचा नाश. ९. युद्ध. १०. मा मरेपर्यंत. ११. क्षत्रिय. १२. युद्ध. १३. कांही कांही स्थळीं संस्कृत शब्दाचें लिंग पंत कायम ठेवितात. १४. रक्षणाशा. १५. परशुरामाची प्रतारणा. १६. पलायन. १७. दुर्योधन. १८. त्या पांडवाचा जय. १९. पैंकळ. २०. इंद्रियनिग्रह.

दमसम अमृताचा ही होईल न सज्जनासि मह महितें.[1] ५३
जो सोडिला दमें तो पावेल ध्रुवपदा[2] न वेदांतें,
विजयसुखोत्कर्ष बरे.अनुभाविले बहु सदा नवे दांतें.[3] ५४
पाशी[4] पसरिता जाला गहनांतें[5] धरावयासि खग नीचें;[6]
कोघे पत्री[7] पाशीं गुंतुनि भरले उडोनि गगनीं च. ५५
मग गगनगखग[8] देखत धांवे जो व्याध त्यास पाहोनीं,
कोणी तापस पीवुनि आश्चर्य पुसे समीप[9] बाहोनीं.[10] ५६
व्याध म्हणे, 'मानावा मद्यत्न व्यर्थसा न हा तातें,[11]
कलहें गळतिल गगनगखग, मग येतींल कां न हातातें?'
सांपडले व्याधाला घेउनि पाशासि जे बहु पळाले,
ते कलह करुनि गुंतुनि खग गगनींहूनि भूवरि गळाले. ५८
व्याधां खगसे, काळा सांपडति करुनि कलिप्रति ज्ञाती,[12]
भूमि न द्याया केली जी काय नव्हे भैलि प्रतिज्ञा ती. ५९
मेले किरातें[13] पाहुनि मधुतें चि, न पाहुनि प्रपातातें,[14]
हें तें च, घातली त्वां स्पष्ट कुसंततिविषप्रपा[15] तातें.[16] ६०
अंकीं धर्म चि घ्यावा, न शिरीं त्वां दोष हा कुलीना ! गा!
अल्पा हि सद्मभू बहु खळा, न हरिमूर्ति धाकुली नागा."[17] ६१
वृद्ध म्हणे, 'वत्सा! त्वां गणिला अतिहित आत्मस्वनाशिपथ,

१. पूज्य. २. ब्रह्मपदाला. ३ इंद्रियनिग्रह करणाराने. ४. विदुराने येथून एका गोष्टीस सुरुवात केली आहे. ५. अरण्यांत. ६. क्षुद्र, पारधी. ७. पक्षी. ८. आकाशात गेलेले पक्षी ९. जवळ. १०. बोलावून. ११. आपण. १२. स्वजातीय, भाऊबद. १३. भिल्ल. (विदुर आपण गंधमादनपर्वतावर फिरत असता पाहिलेली दुसरी एक गोष्ट दृष्टांतादाखल सांगत आहे. त्याच्याबरोबरच्या भिल्लांनी पर्वताच्या खोल दरींत असलेले मधाचे पोळें पाहता च, ते त्याच्या लोभामुळे अविचारानें तेथपर्यंत गेले, असता तेथील सर्प चावल्यामुळे त्यांना मृत्यु आला). १४. पर्वताच्या कड्याला. १५. दुष्ट संततिरूप विषाची पाणपोई. १६. त्वा धृतराष्ट्राने. १७. कालियैसर्पाला.

हा ! यासि वारिता मी निष्फळ जेंवि प्रतिस्वनों[1] शपथ. ६२
संजय ! काय धनंजय वदला ? वैद, लागला मला आधी,[2]
होत्ये मूर्छित माजी या संतापें करूनियां आ धी.[3]' ६३
अर्जुन कृष्णमुखातें पाहत वदला अशा चि वचना कीं,
'मंदासि सांग, रडसिल आठवुनि अनादृतार्यवच[4] नाकीं[5] ६४
अन्यायें मेळविलें देतें, न[6] करूनि वाणि[6], हानि धन,
धर्मविभाग न देतां करिल चि गांडीवपाणि[7] हा निधन. ६५
प्राणघ्न परार्थांची[8] चित्तांत धरूनि काय हो ! माया
द्याना, तरि तुमचे शरदहनीं[9] आलों चि काय[10] होमाया.'" ६६
न वदे किमपि सुयोधन, बैसुनियां बहुतकाळ मग राजे
गेले उठोनि तेथुनि ते, सांपडणार कालमगरा[11] जे. ६७
एकांतीं अंध म्हणे, 'इकडे तिकडे कसें किती बळ हें
वद, संजया ! तयां हें किंवा ते जिंकितलि यां कळहें ?' ६८
संजय म्हणे, 'नृपाळा ! प्रायः प्रभु ते समर्थ करिशील,[12]
नसतां विदुर पितामह, परिसोनि मदुक्त कोप करिशील. ६९
केवळ दशमुखमतिस चि न कपिवच[13] रुचे, न सर्व लंकेला,
गांधारी हि असावी, मग बोलेन त्यजूनि शंकेला.' ७०
आणवितां एकांतीं गांधारी विदुर आणि शांतनव,
व्यास प्रकटे जैसा राकेचा[14] भव्यकायकांत[15] नव. ७१

१. प्रतिध्वनाला, तू होऊ नकोस अशी घातलेली शपथ जेंवि निष्फळ, तेंवि त्या दुर्योधनाचे निवारण करणारा जो मी तो निष्फळ झालो. प्रतिध्वनीला जसा ध्वनि कारण, तसा दुर्योधनाच्या उच्छृखलपणाला मी च कारण आहे, असे तात्पर्य. २. हृद्रोग. ३. बुद्धि. ४ अनादरिलेला श्रेष्ठांचा उपदेश. ५. स्वर्गी. ६. उणेपणा न करून, पूर्णपणे. ७. अर्जुन. ८. शत्रूच्या धनाची. ९. बाणरूपी अग्नीत. १०. देह. ११. काळरूप नक्राला. १२. हत्तीमारखा आहे स्वभाव ज्यांचा असे. १३. अगदाचे भाषण. १४. पौर्णिमेचा. १५. भव्य आहे देह ( मंडल, घेर ) ज्याचा असा पत्ति ( पूर्णचंद्र ).

व्यास म्हणे, 'रे ! संजय ! सांग सुतें[1] जें विचारिलें कांहीं.
बुडविति बळें, भुलविले हे काळें जेंवि चारिलें कांहीं.' ७२
संजय म्हणे, "नृपा ! मज तिकडिल इकडिल किती कसें[2] बळ हे
पुससी, पुनःपुन्हां यांकरवीं त्यां मारवावया कळहें. ७३
तरि परिस, पुन्हां कथितों, वीरानीं अर्जुनाच्युत नमावे,
त्यांचें ब्रह्मांडांत हि तेज ब्रह्मेश्वरस्तुत[3] न मावे. ७४
वधिले इहीं प्रतियुग प्रकटुनि दुर्जन सदानव[4] सद्वना[5],
[6]यांसि पहाया वाहति सुर करुनि शिवा सदा नवस दवना[7]. ७५
जिंकिल चक्रधराला[8] कवण? तयाचा अगाध महिमा गा !
कोण स्वालंघ्यत्वें लाजविल दुजा अगाध[9] हिमांगा[10]? ७६
प्राणांपरीस परमप्रिय पांडव पुंडरीकनयना[11] त्या,
बहु जपती तो आश्रितकल्पद्रुम विश्वगीतनयें[12] नात्या[13]. ७७
कथितों तुला समासें[14], तिकडिल बळ फार काय बोलून?
'विश्वाधिक[15] कृष्णप्रभु' कथिलें वेदें मनें चि तोलून. ७८
ह्री[16] सत्य धर्म आर्जव[17] जिकडे, तिकडे चि कृष्ण आणावा,
जिकडे प्रभु तिकडे जय जाय, न लागे स्तवूनि आणावा. ७९
मिष करुनि पांडवांतें भस्म चि करणार या तव सुतांतें,
द्यावें शील चि, द्यावें केवळ व्हाया न घात वसु[18] तातें. ८०
परमाधर्मनिरत तव सुत केवळ हे न मान्य बालिशता,
दशमुखशाता हि, यांला यांची च करील भस्म बालिशता[19]. ८१
सद्रक्षण, खळमर्दन, नारायणसा न तो नर विसरला,

१. पुत्र जो धृतराष्ट्र त्यानें. २ सैन्य. ३. ब्रह्मदेव व शंकर यांनीं स्तविलेलें. ४. दैत्यासह. ५. सज्जनाच्या रक्षणाकरितां. ६. नरनारायणास ७. दवणा व बिल्वपत्र हीं शंकराला प्रिय आहेत. ८. श्रीकृष्णाला. ९. क्षुद्र पर्वत. १०. हिमालयास. ११. कमलनयन कृष्णास. १२. जगानें वर्णिली आहे नीति ज्याची. १३. भक्त व देव यांच्या परस्पर संबंधाला. १४. संक्षेपानें. १५. जगापेक्षां श्रेष्ठ. १६. लज्जा. ( मर्यादा ). १७. सरळपणा. १८. धन. १९. मूर्खपणा.

सर्वस्व तेज लोकांमाजि विखरितां सदा न रवि सरला." ८२
भूप म्हणे, 'मीं नेणें, तुज ईश्वर कृष्ण हें कसें कळलें ?'
संजय म्हणे, 'मदीय ज्ञान अविद्यामळें नसे मळलें.' ८३
राजा म्हणे, 'अविद्या, ज्ञान हि कैसें, यथार्थ बोलावें;
त्वद्भाषणें सुरांच्या[1] गुरुनें असुरांचिया हि डोलावें.' ८४
संजय म्हणे, "अविद्या[2] 'मीं' 'माझें' म्हणासि हे चि, गा ! राया !
विद्या, असें न म्हणणें जें, हे चि समर्थ होय ताराया. ८५
ज्याचें मन सच्छ्रुतिमतपथें[3] सोडुनि दुष्पथीं कदा न रते,
पावति भगवंताच्या जाणुनि सद्भक्तिनें पदा नर ते. ८६
माजी विद्या वाढे, त्वद्विद्या नित्य गारसी विघरे,
दीप्तालयसम[4] दुर्जनसंगांतुनि झडझडोनि बा ! निघ रे !" ८७
अंध म्हणे, 'रे ! पुत्रा ! त्यजुनि दुराग्रह, यदूद्वहा[5] नम, रे !
अमरेश[6] मरे ईशा न विनत, जो विनत मर्त्य[7] ही न मरे. ८८
जा शरण ईश्वरा श्रीकृष्णा, बा ! लोभ हठ पुरे, शम रे !
करुनि असा चि दुराग्रह अमरमहित[8] कनकमयपुरेश[9] मरे. ८९
जें त्या श्रीकृष्णाचें चरित मनीं आपल्या पहा रे ! तें,
अशुचिस्पृष्टा[10] सच्छ्री[11] म्हणवि भली तापल्या पहारेतें.' ९०
भूप[12] म्हणे, 'त्या कृष्णा शरण, मरणभय तरों, न जाईन,
सुयशें तरोन जाइन, कीं स्वर्गाप्रति मरोन जाईन. ९१
त्या ईश्वरासि जावें शरण, अनेकत्र[13] सदय हित सम जो.
कृष्ण महेश, परि नवा, हें सत्य तुम्हां पित्यासहित समजो.

१. सुराच्या व असुराच्या हि गुरूनें, बृहस्पतीनें व शुक्रानें. २. अज्ञान. ३. चालल्या लोकांस वेदाप्रमाणें मान्य असलेल्या मार्गांते. ४. पेटलेल्या घरासारख्या. ५. यदुश्रेष्ठ कृष्णाला. ६. इंद्र. ७. मनुष्य, अवश्य आहे मृत्यु ज्याला तो. ८. देवपूज्य. ९. सुवर्णमय नगरी (लंका) तिचा पति रावण. १०. अपवित्रानें स्पर्शिलेली. ११. सज्जनांची संपत्ति. १२. दुर्योधन. १३. सर्वत्र.

ईश्वर तरि कां तिसऱ्या त्या पांडुसुतासि[1] मात्र काखेला
वाहे? पाहे हेमासह[2] तोलाया बळें चि लाखेला.' ९३
अंध म्हणे, 'गांधारि! त्वत्सुत जातो बळें चि नरकास,
नरकासह्यबळ[3] यदुप[4], घाली हा[5] तज्जयार्थ नर कास[6].' ९४
अंध मनिं म्हणे, 'अंधा! सुखलीला दाविल्या पहा रेतें[7],
न कुसंततितें द्यावें आलिंगन, ताविल्या पहा रेतें.' ९५
देवी[8] म्हणे, 'मजकडे कारुण्य करूनि गाढ[9] बा! हेर,
शोकांधकूपपतितां[10] आम्हां अंधांसि काढ बाहेर. ९६
जा शरण ईश्वराला, दे ज्याचें त्यासि राज्य, जोड कर;
जोड कर सुकीर्तीची, तूं चि कसा कुरुकुळांत खोडकर? ९७
तूं कांय? भीम मोडिल अमरवराची[11] हि तट्टकर[12] मान.
यों[13] अनया भरणार स्वासुधनें काळभट्टकर मान. ९८
प्रभुनमनें[14] सुखशोभा, होतां अंगोष्टकांत[15] आठ वण,
भीम वधिल तें करिसिल मद्वचनाची मनांत आठवण. ९९
व्यास म्हणे, 'धृतराष्ट्रा! ज्ञानें या संसृतीसि[16] तरशील,
वरशील[17] साधुसंगें जोडावें, त्यजुनियां इतर शील. १००
संजय हित कथिल तुला, बहुमत याहुनि न अर्थ दुसरा यों[18],
सुसरा[19] यांद[20] तसा तूं पाव ब्रह्मा[21], उपाय पुस राया[22]!' १०१
भूप म्हणे, 'संजय! वद हित, मज हें दुःख बा! पहावेना,

१. अर्जुनाला. २. सोन्याबरोबर. ३. नरकासुराला असह्य आहे बल ज्याचें. ४. कृष्ण. ५. हा दुर्योधन. ६. कास घाली=तयार होई. ७. पुत्रोत्पादक वीर्यानें. ८. गांधारी. ९. पूर्णपणे. १०. शोकरूप अंधारकूपांत पडलेल्यांला. ११. इंद्राची. १२. कटकन्, ताडकन्. १३. त्वा आपुल्या प्राणधनें काळब्राह्मणकरातें भरणार असें या अन्यायातें मानावें-पंत. १४. कृष्णास नमस्कार केल्यानें. १५. आठ अंगांत. १६. संसाराला. १७. उत्तम स्वभाव. १८. संजयाला. १९. चांगल्या सरोवराला. २०. जलचर प्राणी. २१. ब्रह्मपदाला. २२. हे धृतराष्ट्रा!

पुत्र नव्हे, दुर्योधन रिपु, जोडा होय पाप हा वेना[1]. १०२
आणोनि हृषीकेशा[2] जेणें पावेन मुक्तिसि, कवीना[3] ! .
तें सांग; कोण सज्जन पुसतां हितहेतुयुक्ति[4] सिकवीना?' १०३
संजय म्हणे, 'न जाणे अजितेंद्रिय[5] सर्वथा हृषीकेशा,
केंवि पिकेल ढका[6] जी लेश हि लागों न दे कृषी[7] केशा? १०४
भेदें न हो कुरुक्षय म्हणुनि सदय देवदेव[8] येणार,
घेणार जो खळांचें सर्वस्व प्रभु भल्यांस देणार.' १०५
अंध म्हणे, 'कृष्णप्रभु आपण येणार काय गा! इकडे?
योग्य चि त्या हें; वत्सप्रेमें लंघिति न काय गाइ कडे? १०६
ते धन्य भाग्यवंत प्रभुला अवलोकितात डोळस जे,
मीं तेंवि उशीरासह[9] घ्याया बहुमान जेंवि मोळ[10] सजे. १०७
जरि मीं केवळ अंध, न गंध नयाचा असे मदाचरणीं[11],
करिल भवबीजरंधन[12], बंधनहर गुण वसे सदा चरणीं. १०८
प्रभु लोकसंग्रहार्थ[13] द्रोणा भीष्मा मला हि वंदील,
वंदी[14] लक्षें[15] निगम[16] ज्या यत्पदरज शंभुचें हि मंदील[17]. १०९
निवविल सत्य प्रियहितवचनें स्पर्शें मला ससभ्यास[18],
त्या विश्वपाळका बहु आहे सद्रीतिचा चि अभ्यास. ११०
मीं त्या जगद्गुरुप्रति गेलों शरण स्मरोनि महिमा, गा!
म्हणतां राज्येच्छा तरि, सुत हो! त्या चि प्रभूसि महि मागा.'

---

१. या नावाच्या दुराचारी राजाला. २. कृष्णाला. ३. पंडितश्रेष्ठा! ४. कल्याणाला कारणीभूत असा उपाय. ५. जिंकलेली नाहींत इंद्रियें ज्यानें असा मनुष्य. ६. केशा ढका लागणें=इजा होणें. ७. शेती. ( जी शेती आपणाला नागराची उपाधि मुळीं च लागू देत नाहीं ती कशी पिकेल)? ८. देवांचा देव, श्रीकृष्ण. ९. वाळ्याबरोबर. १०. एक प्रकारचें निर्गंध गवत; हें वाळ्याच्या जागीं च येतें. ११. माझ्या आचरणांत. १२. संसारबीजाचा नाश. १३. लोकांस वळण लागण्याकरितां. १४. भाट, स्तुतिपाठक. १५. अगणित. १६. वेद. १७. मुकुट. १८. सभासदांसह अशा.

## अध्याय सहावा.

धर्म म्हणे, 'श्रीकृष्णा! बुडतों मीं सत्य जाण, तार मला,
भव बुडवी म्हणुनि च तव भजनीं सनकादि आणता रमला. १
बुडतें कुरुकुळ भीमार्जुनकोपें, त्वां चि वांचवावें हो!
गावें पांच बहु, नको स्थळ पांचां काय पांच वावें हो!? २
भुलला पुत्रप्रेमें, येथें नाहीं च संशय, शमाया
कथितो, बा दाखवितो, बुडवाया सर्व अंश यश, मार्या. ३
जेणें न बुडे कुरुकुळ, धर्म, यश, न्याय, त्या चि सदुपाया
सांग, सख्या! भ्रमला हा जन, केवळ तूं चि आप्त यदुपा! यां.' ४
श्रीकृष्ण म्हणे, 'देवा! जातों मीं त्याकडे हित वदाया,
काय सुयोधन? न शके पचवाया वृत्रहा हि तव दाया.' ५
धर्म म्हणे,' हितें हि तया अहित,अहि तसा चि तो परम खळ गा!,
व्यसनीं भल्यासि पाडी, दुष्ट गजा जेंवि पिहितमुख खळगा.' ६
शौरि म्हणे, "राजेंद्रा! यद्यपि बळवान् तथापि शुनकानें
हरिचें काय करावें? परिसो तो हितकथा पिशुन कानें. ७
या त्वद्दूतीं अरि जरि भलतें चि करावयासि पाहेल,
राहेल पळ न तो, हीं खळकृतनिजलंघना न साहेल.. ८
जिंकिल काय हरा तो? जिंकी कुतुकें चि मन्मथ नरा ज्या,
करिल हरिमथन शशा, तरि करिल सुयोधन हि मन्मथन राज्या!
योजीन युक्ति सामीं सांदीपनिच्या तुज्या बहु नव्या ही,

---

१. संसार. २. सनक इत्यादि देवर्षि. ३. [धृतराष्ट्र] भुलला. ४. बाप. ५. भाग, वांटा. ६. लोभ. ७. मला. ८. राजा धर्मा! ९. इंद्र. १०. याला. ११. हित करणारा. १२. झांकलें आहे मुख ज्याचें असा. १३. कुत्र्यानें. १४. दुर्योधनें. १५. दुष्ट. १६. तुझ्या दूतावर, (माझ्यावर). १७. मीं. १८. दुष्टानें केलेल्या आपल्या अवमानास. १९. अगदीं सहज. २०. मदन. २१. ससा. २२. माझा नाश. २३. माझ्या गुरूच्या.

प्राणांपरीस बहु मज जेंवि तुम्हीं तेंवि तो बहु न व्यांही[1]. १०
माय करी बाळांचें नित्य श्रमवूनि काय जेंवि हित
तेंवि करितसे मन्मति, होय निजदयेसि काय जें विहित. ११
'देइल अंश सुयोधन, तरि आम्हां पावला सदाशिव हो!,
म्हणतोसि तूं हि, मीं ही कीं, 'प्रज्ञाचक्षुचें सदा शिव[2] हों.' १२
हो सिद्ध अंश द्याया, द्याया स्वप्राण सिद्ध अथवा हो,
कथवा हो[3]! त्याकरवीं यश नाकीं, वीरलोक[4]पथ वाहो. १३
अंश न देइल जरि अरि, तरि हि महादेव पावला नवसा,
न वसावासि पराक्रम न करुनि, केवळ अशक्त मानवसा." १४
श्रीराम जसा प्रेषी सिकवुनि सामोक्ति[5] अंगदा साच्या,
धर्म तसा प्रभुला, जो कार्या देणार अंग दासाच्या. १५
भीम म्हणे, "केशवजी! मृदु बोला, उग्र तो सुयोधन हो!
वा! त्यासीं सख्य चि हो, युद्धीं हत एक ही सुयोध न हो[6]. १६
इतर असो, लाजेल चि त्या नित्य मदांध[7] सुरगर्ज[8] गदीशा[9],
दुर्योधना 'गुरु' असें म्हणतिल गरळांध[10] उरग[11] जगदीशा!"
श्रीकृष्ण म्हणे, 'हा! रे! भीमा! जरि तूं महाभुज गदीन[12].
भ्यालासि, होय जैसा चिंतुनि गरुडा महाभुजग दीन. १८
आम्हां तुझा भरवसा बहु कीं खळ मर्दिसील तूं अगदीं,
निर्वीर्यत्व[13] चिकित्सासमयीं[14] आलें चिरार्चितीं[15] अगदीं[16]. १९

१. दुयोधन. (दुयोधनाची कन्या लक्ष्मणा ही कृष्णपुत्र साब याला दिली असल्यामुळे कृष्णदुयोधन हे व्याही होत). २. कल्याण. ३. पाडव हो' त्याच्याकडून आपलें यश स्वर्गामध्ये वर्णन करवा. ४. वीराचा [रणागणी मरून स्वर्गास जाण्याचा] मार्ग चालू असो ५. सधीची भाषणे. ६. हत हो=मारला जावो. ७. उन्मत्त. ८. ऐरावत. ९. गदाधारण करणाऱ्यामध्यें श्रेष्ठ अशा (दुर्योधनाला). १०. विषाने अध (धुंद) अशा. ११. सर्प. १२. गदाधर. १३. निःसारता. १४. योजनेच्या वेळी. १५. पुष्कळ दिवस पूज्य मानिलेल्या. १६. औषधाचे ठिकाणी.

देवी गदा [1]द्रुपदजा [2]अवलंबुनिया भुजाप्रति आल्या!
लज्जेंत बुडाल्या कीं जाल्यां [3]वंध्या तुज्या प्रतिज्ञा त्या.' २०
भीम म्हणे, "[4]हां द्याया सुतशोक [5]पित्यासि यादवा! लाजे,
भस्म चि होतील सकळ ते सांपडतील या [6]दवाला जे. २१
देवा! तुज्या प्रसादें [7]विजयश्रीकंठरत्नहार [8]गडी
हा काळाचा [9]हरसखकटकें, [10]न करूनि यत्न, हा रगडी. २२
माज्या या बाहूंचें स्मरण करुनि तूं मनीं पहा शील,
अथवा [11]रथवाजिद्विपभटकोटिप्रशमनीं पहाशील. २३
वर्णूं काय स्वमुखें? स्वपराक्रम वर्णितील सुर साधू,
म्हणतिल 'सकलबलि[12]मदा' भगव[13]ज्जन 'भीमकीर्ति[14]सुरसा! धू.'"
यदुनाथ म्हणे, 'भीमा! [15]खळकाळाच्या महाभुजा भावा!
तुज निंदिलें न; तैसें वदलों जाणावया तुज्या [16]भावा.' २५
अर्जुन म्हणे, 'सख्या! जें कीर्तिकर असेल तें चि कर जा, गा!
सांगावें काय? तुजा [17]प्रणतत्राणीं असे चि कर जागा.' २६
नकुळ म्हणे, 'जगदीशा! रक्षाया हा स्वधर्म जें [18]विहित
तें चि करितां, करितसे न विनवितां वृद्ध माय जेंवि हित.' २७
सहदेव म्हणे, 'देवा! दे वात्सल्येंकरूनि युद्धवर
[19]उद्धव रणसम कैंचा [20]क्षत्रांला? हा चि धर्म शुद्ध [21]वर.' २८
कृष्णा हि म्हणे, 'कृष्णा! म्हणसि जिला प्रियसखी, पहा हे तीं

---

१. देवी गदा आणि देवी द्रौपदी. २. आश्रय करून. ३. निष्फळ. ४. मीं. ५. धृतराष्ट्राला. ६. दावानलाला ७. विजयश्रीच्या गळ्यातील रत्नांचा हार च असा. ८. मित्र. ९. कुबेर-**पंत.** (सौगंधिक कमलासाठी पूर्वी भीमाने कुबेर-सैन्याचा नाश केला होता). १०. अनायासे. ११. कोट्यवधी रथ, हत्ती, घोडे व वीर याच्या नाशाच्या वेळी. १२. सर्व बलिष्ठाच्या गर्वाला. १३. भगवद्भक्त. १४. हे भीमाच्या कीर्तिरूप उत्तम जला! १५. दुष्टशत्रूंच्याच्या वधो! १६. अभिप्रायाला. १७. नम्र भक्ताचे रक्षण करण्याच्या कामी. १८. उचित. १९. उत्सव. २०. क्षत्रियाला. २१. श्रेष्ठ.

विसरो तुजी न समयीं ईस श्रितभव्यदा[1] महा हेती[2].' २९
बहु गहिंवरोनि, दाउनि दुःशासनपाणिकृष्टकेश[3], वदे,
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकारा, तीस अभय केशव दे. ३०
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे,
दुर्योधनप्रमुखखळखद्योततदन्यपद्मभानु[4] निघे. ३१
प्रभुला पूजिति निघतां वाल्मीकिवसिष्ठवामदेवादि
नारद[5] हि, जया निजयश माथां घेऊनि वाम दे वादी. ३२
जो जाय दूर पावित[6] सानुज नृप धर्म त्या अपापरता[7]
प्रभुवर म्हणे, 'रहा, या कार्याच्या सिद्धिला जपा, परता.' ३३
धर्म म्हणे, 'शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्धि कीर्तिसह, देवा!
मातेसि नमुनि वद कीं, आहे आरोग्य साधु सहदेवा. ३४
तूं जेंवि देवकीला भेटसि, तैसें चि भेट आतेला,
आम्हांहुनि तूं चि अधिक, घृत[8] सोडुनि कोण करिल आ तेला?
स्वपदभ्रष्टसुतांचा[9] भाजितसे तीस नित्य नव्याधी[10];
व्याकुळ करी जसा हा तैसा शूलज्वरादि न व्याधी[11]. ३६
कृष्णा! कळेल तैसें वद कुंतीला न दुःख बाधावें,
पंकीं[12] धेनु श्रमती, पुण्यश्लोका! मुरारि! बा! धावें. ३७
धृतराष्ट्र भीष्म बाल्हिक विदुर कृप द्रोण सर्व शुचि तंज्ञ[13]

१. आश्रिताना कल्याण देणारी. २. शस्त्र. ३. दुःशासनाच्या हाताने ओढिलेले केश. ४. दुर्योधनादि दुष्ट हे काजवे व तदितर (पांडव) ही कमळें याना [अनुक्रमें निस्तेज व विकासित करणारा] सूर्य च असा (श्रीकृष्ण). ५. अन्वयार्थ—वादी (भांडखोर माणस) निजयश माथां घेऊनि (भांडखोरपणाच्या लौकिकाविषयीचा आपला गर्व विसरून) जया वाम दे (डावी देतो, मानतो) तो नारद हि प्रभुला पूजी. नारद हा प्रसिद्ध कलहप्रिय खरा; पण तो हि या वेळीं सामप्रिय झाला, असा भावार्थ. ६. पोंचवित. ७. पुण्यरनिरता. ८. तूप. ९. आपल्या राज्यावरून च्युत झालेल्या पुत्रांचा. १०. नवीन चिंता. ११. रोग. १२. चिखलांत. १३. जाणते.

जे त्यांसि भेट, वद हित, सांगों तुज काय? तूं चि उचितज्ञ[1]. ३८
म्यां पुसिलें कुशळ असें कर्णासि सुयोधनासि सांगावें,
येतां पंचम[2] दाटुनि कर्णकटु पिकें[3] शिकोनि कां गावें?' ३९
ऐसें अजातरिपु नृप सूचित[4] सूचवुनि शौरिला परतें,
मग विजय म्हणे, 'देवा! येवूं द्यावे न मजपुढें पर[5] ते. ४०
कर जोडिले तुज, पहा, साम घडो, राहवीन कोदंड,
आर्या! भीमापासुनि अंधसुतां आहवीं[6] नको दंड.' ४१
खळबळमथनोत्साहें[7] भीमें गर्जोनि लोक कांपविला,
खचले रवें नग[8] मग; न म्हणतिल तद्बाहु[9] तोकें[10] कां पविलो[11]?
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे पथांत नाकर्षी[12]
राजर्षि ब्रह्मर्षि[13] स्वयश[14] जयांच्या मनासि आकर्षी. ४३
उतरोनि रथाखालें साधूंचे वंदिले अनेक थवे.
प्रभुनें दिलें तयां सुख, मुखलक्षें करुनि ही न तें कथवे. ४४
इच्छा पुसतां वदले, 'बा! तुजसम अन्य बोलका नाहीं;
प्रांशू[15] धृतराष्ट्रसभेमाजि तुझे धन्य बोल कानाहीं[15]. ४५
दे या अयास[16] यांया[17] आज्ञा सदया! महोदया परिसा.'
यापरि साधुमनोरथ जाणोनि म्हणे मुकुंद, 'या, परिसा[18].' ४६
'सामार्थ प्रभु येतो' ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं,
बहुतृषितें[19] अंधचातक मेघागमें[20] जेंवि काय केकांनीं[21]. ४७

---

१. योग्य कर्तव्य जाणणारा. २. गायनातील स्वरविशेष. ३. कोकिलानें (कोकिलाप्रमाणे आपणास गोड बोलता येत असता मुद्दाम कडु भाषण कां करावें, असा भाव). ४. अत्यंत योग्य. ५. शत्रु. ६. युद्धामध्ये. ७. दुष्टाच्या सैन्याचा नाश करण्याच्या उत्साहाने. ८. पर्वत. ९. त्या भीमाचे भुज. १०. मूल. (अल्प मुलाप्रमाणे क्षुद्र). ११. वज्राला. १२. देवर्षि. १३. ब्रह्मनिष्ठ मुनि. १४. कृष्णाचे यश. १५. आदराने ऐक. १६. लोहास. १७. यावयाला. १८. ऐका. १९. फार तहान लागलेला. २०. मेघाचें येणें. २१. मोरांच्या शब्दानीं.

मार्गीं सभादि सर्व हि बहु साहित्य प्रतिस्थळीं करवी,
'कीं आपणावरि दयादृष्टि करावी' यदूत्तमें बरवी. ४८
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हे चि निष्कपट,
*मैंदांचे[1] स्वीकारिल कवण विचक्षण[2] असूल्य निष्कपट[3]?* ४९
तें सर्व डावलूनि[4] प्रभु गेला गजपुरासि परभारा,
हा चि भल्यांचा आप्त, स्वशिरीं घेईल कोण परभारा[5]? ५०

## अध्याय सातवा.

धृतराष्ट्र म्हणे, 'विदुरा! जो साधुमनें स्वसद्गुणें हरितो,
येइल वृकस्थळाहुनि[6] आम्हां भेटावया उद्यां हरि तो. १
दासी शत, दास हि शत, आठ महानाग[7], रुक्मरथ[8] सोळा
देईन तो हि सन्मणि[9] शुचितेज्यांचा चि जो गमे गोळा. २
जें मनुयोजनगामी[10] स्वस्वानें[11] व्रीडदान[12] दे वाद्या,
माझ्या आज्ञेनें तें अश्वतरीयुक्त[13] यान[14] देवा द्या. ३
सद्भूषणें सुवस्त्रें पुष्कळ येतां चि हरिस अर्पावीं,
सैन्यें[15] सदन्नपानें[16] बहु बहुमानेंकरूनि तर्पावीं[17]. ४
दुःशासनमंदिर[18] द्या उतराया माधवासि पौरव! हो!
स्वाप्तासि[19] प्राप्त तुम्हांपासुनि बहुपरमपूर्ण गौरव हो.' ५
विदुर म्हणे, 'कपट मनीं, प्रेम वारि असें करूं नको, पावें,

१. ठकाचें. २. शाहणा. ३. सोन्याचे नाणे आणि वस्त्र. ४. झिडकारून. ५. दुसऱ्याच्या ओझ्याला. ६. या नावाच्या नगरीहून. ७. मोठे हत्ती. ८. रुप्याचे रथ. ९. चांगले रत्न. १०. छप्पन कोश जाणारे. ११. आपल्या शब्दाने. १२. लज्जादान. १३. खेचरी जोडलेले. १४. वाहन. १५. कृष्णाबरोबर आलेली सैन्ये. १६. उत्कृष्ट खाद्यपेयानें. १७. तृप्त करावी. ( येथें प्रथम 'अर्पावी' असें लिहिलें आहे ). १८. दुर्योधनाच्या मंदिरापेक्षां दुःशासनाचे मंदिर चांगले असल्यामळें ते देण्यास सांगितलें आहे. १९. आपला आप्त जो कृष्ण, त्याला.

तुजवरि न ईश्वरानें करुणा परतो[1] करून कोपावें. ६
सर्वस्व प्रभुचरणीं अर्पिति, बुध होउनीं शुचि तराया,
देणार हें किति? क्षिति[2] दे; या पूजेसि तो उचित, राया! ७
पांचां पुत्रां द्यावीं पांच, न होउनि खळांसि वश, गावें,
तें तों न करिसि जेणें प्रभुनें स्वमुखेंकरूनि यश गावें. ८
गुळखोबरें विलोकुनि भलत्या हि जनासि बाळक वळावा,[3]
सत्य प्रेम चि दववुनि सुखें तो विश्वपाळ कवळावा. ९
कपटादरें[4] वळो पर[5] पर[6] परमेश्वर कसा वळेल हरी?
कृष्णकृपामृतनिधिची[7] अकपटविनताकडे[8] वळे लहरी. १०
येतो साम कराया, होय यशोर्थी[9] च, तों यशा लाहो,[10]
देणार तुम्हीं हय,[11] गज, रथ, दासी, दास हें कशाला हो!? ११
समंजाल[12] तरि करिल हरि हर्षे पावोनियां विडा[13] लास्य,[14]
नाहीं तरि खेदद[15] त्या सर्व जसें प्रस्थिता[16] विडालस्य.[17] १२
प्राण हि सोडिल परि हरि पांडवसख्य न पळार्ध सोडील,
कृष्णप्रीति[18] न मोडिल पटु कोण्ही ब्रह्मलिपि हि खोडील.' १३
तेव्हां सुयोधन म्हणे, 'सत्य न सोडील सख्य हरि त्यांचें,[20]
न पुरेल कृष्णमानसहरणीं[21] बळ मेरुच्या हि हरि त्यांचें. १४
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुम्हीं अहो! तात!
भ्याले[22] म्हणेल, मान्य न अवमानाला कुलीन होतात. १५
त्रिभुवनपूज्यतम प्रभु सत्य चि हें किंच[23] तो असे व्याही,

---

१. पाठमोरी. २. पृथ्वी. ३. वश व्हावा. ४. कपटाच्या सत्काराने. ५. इतर मनुष्य, सामान्य लोक. ६. परंतु. ७. कृष्णकृपारूप अमृतसागराची. ८. निष्कपट अशा नम्राकडे. ९. यशाची इच्छा करणारा. १०. मिळवो. ११. घोडे. १२. साम करण्यांत हित आहे असें मानाल. १३. फक्त विडा मिळाला तरी. १४. नृत्य. (आनंदप्रदर्शन). १५. दुःखजनक. १६. प्रयाण करणारास. १७. मांजराचे तोंड. १८. कृष्णावरील प्रेम. १९. शाहणा. २०. पांडवांचें. २१. कृष्णाचें मन वळविण्याविषयीं. २२. "कौरव भ्याले" असे कृष्ण म्हणेल. २३. आणि.

पारि संप्रति सेव्य नव्हे, सेवूं[१] कृष्णेतरा[२] असेव्या ही. १६
जें वैर वाढलें तें आतिथ्यें करुनि काय हो! शमतें?
अवमान नव्हे जेणें तें क्षत्रोचित[३] असें मला गमतें.' १७
भीष्म म्हणे, 'रे! पुत्रा! धृतराष्ट्रा! ईश्वरप्रभावज्ञा[४]!
जीवपतंगा[५] योग्या न प्रभुदीपार्हणाप्रभावज्ञा[६]. १८
मधुर वदा, प्रिय चि करा, प्रभु पूजा परम शुद्धभावानें,
तत्प्रिय हें कीं, भावांसह न करावें चि युद्ध भावानें.' १९
तों दुर्योधन बोले, 'ताता! मज हें चि युक्त भासतसे,
अन्नाच्छादन देवुनि पाळावे पांडुपुत्र दासतसे[७]. २०
उडतात शत्रु ज्याच्या सामर्थ्यें त्यासि[८] आकळायाचा[९]
योग उद्यां चि असे, हा मंत्र[१०] नव्हे केशवा कळायाचा. २१
बळिविवरवसति[११] जासि तसि चिर अनुभवु कृष्ण एकला खोली,
वाहो[१२] शिवा शिव्यांची, स्तुतिची मज नित्य एक लाखोली.'
धृतराष्ट्र म्हणे, 'पुत्रा! न वद असें, कृष्ण सोयरा, ज्याला
पूजावें त्या बंधन, हें कर्म अयोग्य होय राज्याला. २३
बंधोर्ह[१३] नव्हे, आला सामार्थ वरूनि दूतपण साचें,
बाहेरि गमे नीरस परि अंतर मधुर पूत[१४] पणसाचें[१५].' २४
भीष्म म्हणे, 'दुर्मंत्रित[१६] परिसावें काय यापरी तातें?
भजसी भस्म कराया शोकीं कुळ काय या परीतातें[१७]? २५
प्रभुचा किजेल येणें भंग, विपतिचा[१८] न कां नवा टोळें?

---

१. कृष्णाहून अन्यास. २ सेवन करण्यास अयोग्य अशाला ही. ३. क्षत्रियाला योग्य. ४. ईश्वराचें सामर्थ्य जाणणाऱ्या ! ५. जीवरूप पतगाला. ६. प्रभु हा च दीप, त्याच्या पूजारूप तेजाचा अवमान. ७. सेवकाप्रमाणें. ८. त्या कृष्णाला. ९. बांधण्याचा. १०. गुप्त मसलत. ११. पाताळवास. ( बळिनामक दैत्याचें विवर म्हणजे पाताळ ). १२. कृष्ण, आपल्याला बधन घडलें म्हणून ईश्वराला शिव्याची व माझ्या कारस्थानपटुत्वाबद्दल मला स्तुतीची लाखोली वाहो. १३. बधनाला योग्य. १४. शुद्ध. १५. फणसाचे. १६. वाईट मसलत. १७. प्रतिकूळ—**पंत.** १८. गरुड—**पंत.**

हा! हा! हा ऐसा खळ सुयशाचें करिल कां न वाटोळें? २६
हेरसा[1] हरि[2] प्रतापी, हा[3] होय स्पष्ट दुष्ट अंधकसा[4],
कुसुत[5] हि अमृतरस चि तरि सेवुनि तूं अंतरीं हि अंध कसा?
तुटतो यन्नामें[6] भवबंध[7] तया हा[8] करील बंध कसा?
सभ्यें सोडावा चि स्वपरविकृतिकर[9] कुसंग गंधकसा[10].' २८
'न भलें भगवदवज्ञाफळ[11]' ऐसें कळकळोनि आयकवी,
पारि न वळे, म्हणुनि निघे तेथूनि, खळासि करिल काय कवी?
वृष्णिप[12] वृकस्थळाहुनि येतां भीष्मादि सुज्ञ ते सर्व
जन सामोरे गेले, अंदुक[13] जाला सुयोधना गर्व. ३०
धरिलें असतें जरि तें कृष्णांबरकर्षणादि[14] आग[15] मनीं
आगमनिगमनुत[16] प्रभु आदर करिता कशास आगमनीं? ३१
'दिनें[17] धन्य धन्य' ऐसें प्रभुला पाहोनि सर्व पौर वदे,
सर्वांसि योगिदुर्लभ दर्शन तारावयासि पौरव[18] दे. ३२
धृतराष्ट्रगृहा नेती राजपथीं हळुहळु च हरि हरि[19]तें,
त्यां[20] पशु म्हणेल तो पशु, ज्याचें सकृपत्व अतुळ हारि! हारि! तें.
भेटे धृतराष्ट्राला, तत्कृतपूजेसि[21] बहुत भावुनि[22] घे,
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा[23] निववावयासि भावु[24] निघे. ३४

---

१. शकराप्रमाणें. २. कृष्ण. ३. दुर्योधन. ४. या नांवाच्या शंकराच्या शत्रूप्रमाणे. ५. अन्वयार्थ–[जर] कुसुत हि अमृतरस चि [म्हणसी] तरि तू [त्यातें] सेवुनि अतरीं हि अध कसा? ६. ज्या कृष्णाच्या नामानें. ७. संसारपाश. ८. दुर्योधन. ९. स्वतःला व दुसऱ्याला अपकार करणारा. १०. गधकाप्रमाणे. ११. कृष्णाच्या अमर्यादेचा परिणाम. १२. कृष्ण. १३. पायबंद, बेडी. (दुर्योधनाला त्याचा गर्व च प्रतिबंधक झाला.) १४. द्रौपदीवस्त्रहरणादि. १५. अपराध. १६. शास्त्र व वेद याही स्तुत. १७. दिवस. १८. दुर्योधनादि–पंत. १९. घोडे. २०. त्या घोड्यांस. (ते घोडे हळुहळू चालले म्हणून सर्वांस ईश्वरदर्शन घडले, अर्थात् हा त्यांचा मोठा उपकारच होय; मग त्यांस पशु कसें म्हणावें)? २१. धृतराष्ट्रकृत पूजेला. २२. मानन. २३. त्या धृतराष्ट्राचा. २४. विदुर.

'[1]हरि न म्हणतां [2]स्वधीतें ही होतीं वाणि! देवि! दुरधीतें.'
ऐसें [3]म्हणती तें सुख भेटुनि [4]अरिपाणि दे विदुरधीतें. ३५
विदुर म्हणे, '[5]अमृतकरा! निववूं आलासि या चकोराला.
[6]मुक्त्यर्पितमाळाश्री देत्ये त्वद्दास्य [7]यांचकोराला. ३६
त्वद्दर्शनें सुख विभो! जालें जें काय मीं कथूं तुज तें?
बा! [8]यावरी च [9]टेकळा घालूनि ज्ञानिचित्त ही सुजतें. ३७
[10]सुरभीच्या कासेसि न सुखें होवूनि वत्स लगावें,
तुझिया चि दास होवुनि लागावें, तुज चि वत्सला! गावें. ३८
आहेत सुखी पांडव? देवा! आलासि काय सामास?
खळ न वळेल झिजविला जरि करितो बोध [11]कायँ [12]सामासें. ३९
सर्वज्ञा! जगदीशा! देवा आलासि काय सामास?
सामास हंस मौक्तिक वर्णू, प्रिय फार वायसा मास. ४०
तव अवमान करावा ऐसें याच्या असे मनीं कांहीं,
परि होसि प्रेमानीं बद्ध, न दुष्टांचिया [13]अनीकांहीं. ४१
भीष्मद्रोणव्यासप्रभृति सकळ [14]भागले [15]महाभाग,
विश्वगुरो! करुणाब्धे! तूं हि खळा [16]कथुनि हित [16]पहा, भाग.

---

१. हे देवि वाणि! हरि न म्हणता (हरिः ॐ असा उच्चार न करिता) स्वधीते दुरधीतें होतां (चांगली अध्ययन केलेली वेदशास्त्रे निष्फल होतात), ऐसे [ज्ञाते] म्हणती; ते (अध्ययनापासून होणारे) सुख कृष्ण विदुराच्या बुद्धीस देता झाला. २. सुष्ठु अधीत-**पंत.** ३. ज्ञाते-**पंत.** ४. चक्रपाणि-**पंत.** ५. हे चद्रा! ६. सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्य या चार मुक्ति जींत ओविल्या आहेत त्या माळेची शोभा. ७. भक्तहृदयाला. (तुझी सेवा करीत असतां भक्ताला आपल्या हृदयांत चारी मुक्ति दृश्यमान होतात. [मुक्तीपेक्षा तुझे दास्यच श्रेष्ठ आहे, असे तो समजतो]. ८. तुझ्या दर्शनावर च. ९. इच्छा ठेवून. १०. कामधेनूच्या. ११. शरीर. १२. सहा महिने. १३. सैन्यानीं. १४. थकले. १५. मोठे भाग्यवान. १६. हित कथुनि पहा, असा अन्वय मळांत च अन्वयांक देऊन कवीने दर्शविला आहे.

विदुरासि भेटल्यांवरि भेटे सर्वाप्तराज[1] कुंतीतें,
जीस असुख सह्य गमे दे जें भेदूनि हृदय कुंती[2] तें. ४३
वैकुंठाच्या[3] कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या,
ब्रह्मास हि गहिवरवी महिवरवीरेंद्र[4] पांडुची भार्या. ४४
प्रभुला म्हणे, "मुकुंदा! बा! तूं चि करिसि सुखी सखदास[5],
संप्रति आहेत कसे मद्बाळक ते तुजे सखे दास? ४५
म्हणतां, 'नृपर्षि पुण्यश्लोक कवि शरण्य' वासरा[6] ज्याला
आहे कैसा? जाला ज्या प्राप्त अरण्यवास राज्याला.? ४६
खळमळजळबळ[7] विश्रुतवीर्य[8] वृकोदर कसा असे आजी?
आं जीवना पसरित्ये विकळा अभिमन्युची[9] जया आजी. ४७
ज्याचा प्रतापपावक[10] खळदितिदनुतनुजबळयवस[11] खातो,
आहे कैसा? कसा जो पुररिपुच्या[12] उतरला तव सखा तो? ४८
जे म्हणति, 'स्वर्गाला गेली कुंती च, माय हे माद्री,'
आहेत कीं सुखी ते[13] वत्स गुणामरनिकाय[14] हेमाद्री[15]? ४९
प्रियसुतांविरह सुदुःसह, देहविरह बहु बरा सुसह, देवा!
पावेन कधीं? बा! मीं म्हणतें स्वबहिश्चरासु[16] सहदेवा. ५०
वत्सा! सहदेवा! मीं मेल्यां, त्वां 'हाय!' नच वदावें हो!
तेरा पळें हि नसती मातां, हें हायन[17] चवदावें हो! ५१
श्रीकृष्णा! श्रीकृष्णा कैसी आहे, असें मज न पुसवें;

---

१. सर्व आप्तांमध्यें श्रेष्ठ. २. भाला धारण करणारा. ३. कृष्णाच्या. ४. राजात व वीरांत श्रेष्ठ अशा पांडुराजाची पत्नी. ५. दु:खितास. ६. वत्साला. (धर्मराजाला). ७. दुष्टरूप मळाला जलरूप आहे बल ज्याचें. ८. प्रसिद्ध पराक्रम ज्याचा असा. ९. अन्वयार्थ–अभिमन्युची विकळा (व्याकुळ–तृषाक्रांत) आजी (मी कुंती) जया (ज्या भीमापाशीं) जीवना (पाण्यासाठीं) आं पसरित्ये तो भीम. १०. प्रतापाग्नि. ११. (खळ जे दैत्यदानव त्यांचे बळ हें च) तृण–पंत. १२. त्रिपुरारि शंकराच्या. १३. नकुळसहदेव. १४. (गुणरूप देवांचें) मंदिर–पंत. १५. मेरु-पर्वत. १६. माझा देहाबाहेर फिरणारा प्राण. १७. वर्ष–पंत.

कीं, तीच्या कुसव्यानें[1] लाजविले स्पष्ट आमुचे कुसवे. ५२
ते कांय रक्षिती त्या व्यसनीं पांच हि न एकलीला जे?
बहु लाजल्या सुतवती[2], तीस न, हे मात्र एकली लाजे. ५३
तूं[3] नथि, राम नाथ, प्रद्युम्न हि नाथ, सत्य हें नातें
असतां पृथा रडावी, व्हावें धड एक सत्य हें ना तें. ५४
बहु येतें तेज[4] म्हणुनि तुझिया रमतात विप्र भजनांत,
खळहृतसर्वस्व[5] तुझे सेवक गमतात विप्रभ[6] जनांत. ५५
मृत्युंजयाश्रितांच्या[7] प्राणाहीं बा! कसा रमे यम रे!?
दैव तुजपुढें प्रभु[8] हें चित्र[9], हरिपुढें न सारमेय[10] मरे." ५६
प्रभु अश्रु पुसोनि म्हणे, "जें संकल्पित घडेल सत्वर तें.
आत्याबाई! कवणें ऐसे श्रम भोगिले न सत्वरतें[11]. ५७
राखित्त कौरवांचे चिंतूनि असाधुवाद[12] तळमळतें;
असतों मीं [13]तें, तरि न व्यसनमळें[14] धर्मपादतळ[15] मळतें. ५८
आहेत त्वत्पुत्रा पुण्यश्लोका बुधा सुर सहाय,
होइल कीर्ति, म्हणेल त्रिदशानादृतसुधासुरस[16] 'हाय!' ५९
आहेत सदार[17] सुखी देवि! नमस्कार हे तुला [18]सां जे,"
ऐसें सांगुनि वंदी, तें त्या श्रितशर्महेतुला[19] साजे. ६०
समजाउनि कुंतीतें, भेटे दुर्योधनां असेव्यां[20] ही,
कीं तो स्वसुता स्वसुता देवुनियां जाहला असे व्याही. ६१

---

१. कुशीनें. २. पुत्रवती. ३. तू, बलराम व प्रद्युम्न हे सर्व समर्थ अहां, तुमचे आमचें नातें ही खरें आहे, असें असता मला दुःख का? धड साम ही होत नाही व धड युद्ध ही होत नाही. ४. सामर्थ्य. ५. दुष्टानी हरण केलें आहे सर्वस्व ज्यांचें. ६. निस्तेज. ७. मृत्यूस जिंकणारा जो शंकर त्याच्या सेवकांच्या. ८. बलवत्तर. ९. आश्चर्य. १०. कुत्रा. ११. सात्विक मनुष्यानें. १२. दुष्ट भाषणे. १३. त्या द्यूतक्रीडेच्या वेळीं. १४. सकटरूप मलानें. १५. धर्माच्या पायाचे तळवे. १६. [तुझ्या कीर्तिरसापुढें] देवानीं तुच्छ केलेला अमृतरूप रस. १७. सपत्नीक १८. सहा. १९. आश्रिताच्या कल्याणास कारणीभूत असलेला. २०. सेवनानर्हास.

लघु[1] म्हणति जे सुयोधन दुःशासन शकुनि कर्ण वेनातें,
परिरंभणार्ह[3] केले; प्रभुचें सौजन्य वर्णवेना तें. ६२
पूजुनि घे प्रभु, होइल जलनिधिला तृप्तिदायक विहीर?
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय कविहीर? ६३
'भोजन करा' म्हणे शठ, देव म्हणे, "मज कशास होकरितां?
जेवा तुम्हीं च; दांवुनि आदर आग्रह कशास हो! करितां?
असतों जरि अन्नार्थी प्रथम चि म्हणतों 'अवश्य' मीं तुजला,
प्रेमार्थी पांडवसख हा अन्नाकारणें नसे सुजला." ६५
प्रभुला म्हणे सुयोधन, 'तिकडे इकडे हि सम असे नातें,
ज्या कारणें करावा अस्मदनादर तुवां असेना तें.' ६६
देव म्हणे 'केवळ ते न सोयरे, मदसु[10] सर्व वसु[11] देव,
मान्य असें अक्रूरोद्धवबळभद्रोग्रसेनवसुदेव. ६७
जे तत्सख[12] तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरें अगा! राया!
द्विषदन्न[13] न सेवावें, म्यां येवूं ही नये अगारा[14] या. ६८
हें काय बरें? खळ हो! साधु तुम्हीं सर्वकाळ जाचावे?
सदरि[15] असह्य मज, असा अहि[16] हि न जो सर्व काळजा चावे.' ६९
खोटा सुयोधन म्हणुनि विदुरगृहा जाय, देव नच खोटा,
गोपोच्छिष्टा[17] वळला, वळता कां वासुदेव न चखोटा[18]? ७०
तैसी ही तरली जी स्तन्यमिषें[19] दे बकी[20] सुताप चि ती,
ठावी कथा, परि घडे न खळाला देवकीसुतापचिती[21]. ७१
द्रोण कृप भीष्म बाल्हिक सर्वस्व [22]निवेदिती, परि न परते,

१. ल[illegible] नांवाच्या दुष्ट राजाला. ३. आलिंगनयोग्य. ४. चागलेपणा. ५. कविश्रेष्ठ. ६. बोलविता. ७. मनांत नसतां, उगीच वरवर. ८. आमचा अनादर. ९. तसें कारणें. १०. माझे प्राण. ११. धन. १२. त्यांचे मित्र. १३. शत्रूंचे अन्न. १४. घराला. १५. सज्जनांचा शत्रु. १६. सर्प. १७. गवळ्याच्या उष्ट्याला. १८. चांपला. १९. दुधाच्या निमित्तानें. २०. पूतना. २१. कृष्णाची पूजा. २२. अर्पण करिती. (द्रोणादिकांनीं कृष्णानें परतावें म्हणून शिकस्त केली).

खळसंसर्गें प्रभुच्या अंतरले पूजना[1] अरि[2] न पर ते. ७२
प्रभु त्यांसि म्हणे, 'केली मद्पचिति[2] तुम्हीं, गृहासि जा च कसे;
चित्त प्रसन्न नसतां उपचाराग्रह नव्हेत जाच कसे?' ७३
दुःसंगनक्रदत्तक्लेश[3] निवारूनि सर्व विदुरगजा
मुक्त करी हरि, लाजे गातां गुणकीर्ति सर्व विदुरग ज्या.[4] ७४
विदुर प्रेमें जेंवि ब्रह्मादि कवि प्रसन्न थन्नानें
प्रभुला तेंवि न करिति व्यासादिक विप्र सन्नयज्ञानें.[6] ७५
शतसंख्य वाजवी ज्या जेववितां माय देवकी चिटक्या,
तो नित्यतृप्त भगवान् विदुरगृहीं भोजनांत दे मिटक्या. ७६
आले ढेंकर, दिधल्या मिटक्या, बहुसाल मारिले भुरके,
उरके सर्वांमागुनि अशन, परि न ताट चाटणें उरके. ७७
ज्याच्या चरणें स्वरजाकरवीं प्रणतासि मोक्ष देवविला;
देव विलासमनुजतनु विदुरप्रेमें यथेष्ट जेवविला. ७८
मग रात्रौ एकांतीं सर्वज्ञाला हि साधुराय कवी
पाय रगडितां दुर्जनदुर्योधनदुर्मतासि आरकवी. ७९
'खळमंडळप्रवेश[10] प्रभुचा हि मला प्रशस्त भासेना,
बहुत मिळाल्या असतां शत्रूंच्या दुःसहप्रभा[11] सेना. ८०
भासति पांडव जैसे तैसा मज तूं हि वत्सला स्नेहें,
अनुकारितसे[12] सतत सकंपत्वें[13] हृदय वत्ससास्ना[14] हें.' ८१
देव म्हणे, 'वांछिसि हित, वांछावें जेंवि मायबापानीं,
जें शिवें[15] सदुक्तिपानीं[16] तें अमृताच्या हि काय या! पानीं? ८२

---

१. शत्रु. २. माझी पूजा. ३. दुर्जनसगतिरूप नक्राने [illegible] ४. विदुररूप जाला ५. सर्व वेत्ति जानाति स चासौ उरगश्चेति शेष इत्यर्थः--**पंत.** ६. चांगली नीति व ज्ञान याने. ७. पुष्कळ. ८. भोजन. ९. लीलामानुषदेही. १०. दुष्ट मंडळीत प्रवेश. ११. असह्य तेज ज्यांचें अशा. १२. अनुकरण करितसे. १३. कंप पावत असल्याने. १४. गलकबळ--**पंत.** वासराच्या गळ्यातील लोंबणारा भाग, पोळी, तिला. १५. कल्याण. १६. सज्जनांच्या उपदेशाचें सेवन करण्यांत.

सुख यश नसे विरोधीं, सुमति रमति सुखयशोजनकसामीं[1],
आलों करावया उपदेश, उपेक्षूं सुहृज्जन कसा मीं? ८३
वळतील, तरि अपयशें यां सर्वांचीं मुखें न मळतील.
चळतील नीतिमार्गीं, धर्मक्षोभानळांत[2] जळतील. ८४
म्हणतां सुहृदुत्तम[3] मज, मग स्यां समयीं कसें न राखावें?
विदुरा! वाइट वाटे, कुलजा[4] हि असद्रसें[5] नरा खावें. ८५
बहुकामकोपलोभां उग्रां असुरां समस्त सुर भीती,
हे व्याघ्र चि बा! विदुरा!’ जी कीर्ति स्पष्ट होय सुरभी[6] ती.’
पंगु हि मेरुवरुनि हि न माथां धरितां यदंघ्रिरज[7] निसरे,
त्या दीनबंधुची ती चिंता न सरे, परंतु रजनि[8] सरे. ८७
प्रातःकाळीं सशकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला,
प्रातर्विधि करुनि प्रभु जाय प्रज्ञांबका[9] पहायाला. ८८
स्वस्वीकृति[10] करितां शुचि यश फोडिल कां न हाक विदुरापें?
कीं त्यासि घे रथीं तो यच्चरणरजें महाकविदुरापें[11]. ८९
जनदृष्टिचातकी जी तूर्यरवें[12] करुनि देत ओ तीतें,
प्रभुमेघ दर्शनामृत दुर्लभ जें तन्मुखांत[13] ओती तें. ९०
ज्याच्या दयातरीनें[14] स्वमनोरथसागरांत सुरभि तरे,
केले धीट जयाच्या स्मृतिकवचें[15] वासवादि[16] सुर भितरे, ९१
जो[17] पर[18], महित[19], परम[20]-हित-पर, महितरिकर्णधार[21], यदुपकृती[22]

---

१. सुख व यश उत्पन्न करणाऱ्या सामात. २. धर्मराजाच्या क्रोधाग्नींत. ३. मित्र-श्रेष्ठ. ४. कुलीनाला. ५. वाईट रसाने, असत्यप्रीतीनें. ६. कामधेनु. ७. ज्याचे पदरज. ८. रात्र. ९. प्रज्ञाचक्षु.—**पंत.** १०. शुचि यश स्वस्वीकृति ( आपला स्वीकार ) करिता विदुरापे ( विदुराजवळ ) हाक का न फोडील? (आपण होऊन का येणार नाही )? ११. मोठ्या पंडितास ही दुर्लभ. १२. वाद्याच्या शब्दाने. १३. त्या-दृष्टिरूप चातकीच्या मुखात. १४. कृपारूप नौकेनें. १५. स्मरणरूप चिलखतानें. १६. इंद्रादि. १७. श्रीकृष्ण. १८. श्रेष्ठ. १९. पूज्य. २०. अत्यंत हित करणारा. २१. पृथ्वीरूप ( संसाररूप ) नौकेचा नावाडी. २२. ज्याचे उपकार.

बहु जीवांवरि, पावे तो त्या कौरवसभेसि यदुप कृती[1]. ९२
आतां चि सभेंत नभीं देवर्षिप्रमुख देखिले विप्र,
प्रभुनें सत्कारविले भीष्माकरवीं महामुनि क्षिप्र[2]. ९३
भीष्में धावोनि पुढें जावुनि अत्यादरें पदीं नमुनीं,
पूजुनि वरासनीं[3] बहु तोषविले ते दयानदीन[4] मुनी. ९४
मग जी जलदश्यामा[5] करुणा[6] बसली नवासनावरि[7] ती,
जीच्या उपासकजनाप्रति विषयांच्या न वासना वरिती. ९५
केवळ जवळ बसविला विदुर प्रेमेंकरूनि मापानें[8],
तद्यश न मोजवेल ब्रह्मांडायेवढ्या हि मापानें. ९६
झाले प्राप्त कुरुसभेमध्यें त्या दुर्लभा अवसरा जे,
आले शतजन्म करित ते श्रीगौरीश्वरा नवस राजे. ९७
टकमक पाहत होते प्रभुमुखचंद्राकडे चि चातकसे,
नसतील जोडिले श्रवणीं[9] हि वसाया मनासि हात कसे? ९८
सभ्य श्रुतिवदनातें[10] पसरिति सेवावया भगवदुक्ती[11],
प्राशावयासि जेंवि स्वच्छस्वात्यंबुला[12] जलधिशुक्ती[13]. ९९

---

# अध्याय आठवा.

देव म्हणे, ‘धृतराष्ट्रा! राया! मोटी जगीं तुजी पदवी,
पदें[14] विद्यांचें तूं परि परिसें[15], मज बळें चि आप्तता वदवी. १

---

१. चतुर. २. लवकर. ३. श्रेष्ठ आसनावर. ४. दयेचे केवळ सागर च असे. ५. मेघश्यामा. ६. साक्षात् कृपा. (श्रीकृष्णमूर्ति). ७. नवीन आसनावर. ८. लक्ष्मीपतीनें, (कृष्णानें). ९. चंचल मनानें स्वस्थ राहून प्रभूचें भाषण ऐकूं यावें म्हणून कान मनाची प्रार्थना केल्याशिवाय कसे राहिले असतील? १०. कर्ण व मुख यांतें. ११. कृष्णाचें भाषण. १२. स्वच्छ स्वातिनक्षत्रांतील पाण्याला. १३. समुद्रांतील शिंप. १४. स्थान. १५. ऐक.

श्रुतवृत्तादिसुगुणगणमंडितकुलसनृपांत हे महित,
जे आले, यांत, तयां गमलें वंधु यश चि हित, न हेमें हित. २
जें मेळविलें चंदनसम झिजवुनि परसुखार्थ आंगातें,
केवळ कृपाळु पूर्वजसद्यश मळविसि बळें चि कां गा! तें? ३
आल्हाद तुम्हां होतो, वढिलां परदुःखदर्शनें त्रास,
तूं दाविसि अनुकंपा न, शशिकळा जेंवि दर्श नेत्रास. ४
कौरव करीत आले बहु यत्न परासुखप्रहाणातें,
ऐसें कारुण्यकुलव्रत सोडिल कोण गा! शहाणा तें? ५
दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें, क्षमा न सोडावी,
जोडावी कीर्ति, असी कुळरीति तुम्हीं कधीं न मोडावी. ६
केले गुप्त प्रकट व्यवहार अनर्थहेतु तनयानें,
तें कां न वारिलें त्वां? कैसें होईल कुशळ अनयानें? ७
जी वेश्या बुध वरिल त्यजुनि अमर्यादरा जनीं तीतें?
भजतो अनीतितें हा त्यजुनि अमर्याद राजनीतीतें. ८
मुख्य स्वबंधु पांडव, तन्नाशातें चि हे अंकवि टपती,
विश्वस्तां मीनांतें परदारांतें जसे बक विटपती. ९
त्वन्नंदनदुर्मति हे क्षिति बुडवायासि, तापदा, आली

१. शास्त्र, ज्ञान व सदाचारादि उत्तम गुणानीं युक्त अशा कुळांतील चांगल्या राजांत. २. पूज्य. ३. सुवर्ण. ४. येथील आर्येचा सुरुवात कवीनें प्रथमतः पुढील चरणानें केली होती–**भारत करीत आले यत्न पराच्या सुखार्थ आंगातें.** ५. अमावास्या. ६. दुसऱ्याच्या दुःखनाशार्थ. ७. दुःखाला कारण. ८. बुध, जी वेश्या तीतें, अमर्यादरा त्यजुनि जनीं वरिल? हा अमर्याद राजनीतीतें त्यजुनि, अनीतितें भजतो, असा अन्वय, पदशः अन्वयांक घालून कवीनें येथें सुचविला आहे. ९. [आपल्याला वरावें या हेतूनें] अप्सरेनें केलेल्या आदराला. १०. मूर्ख. ११. विश्वास पावलेल्यां. १२. मीनांलां. १३. परस्त्रियांला. १४. बगळे. १५. जारश्रेष्ठ. १६. तुमच्या मुलांची दुर्बुद्धि.

काळाच्या क्रीडेची, तुझिया सदनांत आपदा आली. १०
या व्यसनातें चिंतुनि मन कुदंशेला भिवूनि हळहळतें;
शमवावें त्वां, प्रभुनें[1] जेंवि शमविलें पिवूनि हळहळ तें. ११
स्वसुतासि शमीव नृपा! स्वसख्यासह शमविजेल भीम हि म्या
पुत्रा[2] अजातरिपुच्या तूं साक्षाद्गुरु हि तरि हि भी महिम्या.
पांडव[3] करूत तुजला, त्यां[4] ही सिंहांसि[5] हे ससे नमनें,
देतील मत्करीं स्वप्राणांसह,जरि हि ते ससेन,[6] मनें[7]. १३
तूं प्रभु, सुयोधनादिक हे पुत्र तुझ्या करीं असावे च,
अन्यरणीं[8] प्राणांचा योग्य, परि न योग्य हा अंसा[9] वेच[10]. १४
वाढिव धर्मा प्रेमें, वाढवि मज जेंवि नंद नवनीतें[11],
सत्पुत्रांनीं भवनीं सुरतरुनीं न सुख नंदनवनीं तें. १५
त्यजिले इष्टद[12] पांडव कां उन्मूलन[13] करूनि सुरतरुसे?
बां[14]! उर्वशी च, एकीं पार्थी, न पवोनि एक सुरत, रुसे. १६
पांडव सहाय असतां, तुज होतिल सर्व लोक वश्य, पहा!
त्वद्भाग्योत्कर्षातें श्रवण करुनियां म्हणेल कश्यप[15] 'हा!' १७
म्हणतो युधिष्ठिर, 'नको पायें लोटूं मला अवनतातें[16].'
वचनकरापत्यांचें न करावें काय हो! अवन[17] तातें? १८
क्रमिले तसे चि कथिले होते त्वां त्यांसि अब्द[18] तेरा जे,

१. शकरानें. २. पुत्रवत् जो अजातरिपु त्याच्या. ३. कवीने येथील अर्धवट रचून खोडलेला चरण असा आहे—**सत्य शमातें इच्छिति साधूंचे राय ते ससे**... ४. पांडवरूप. ५. दुर्योधनादि. ६. सेनेसह असे. ७. पांडव सर्वस्वी माझ्या म्हणण्याप्रमाणे चालतील, असा भावार्थ. ८. पांडवेतररणीं. ९. आपसांत कलह करून. १०. व्यय. ११. लोण्याने. १२. इच्छिलेले देणारे. १३. उपटून. १४. बा! एकी पार्थी एक उर्वशी च सुरत न पवोनि रुसे. (अर्जुनाने केलेल्या उर्वशीमनोभंगावांचून अन्यत्र केव्हा हि व कोणाचा हि पांडवांनीं मनोभंग केला नाही, असा भाव). १५. देवाचा पिता. १६. अत्यंत नम्राते. १७. रक्षण. १८. वर्षें.

'धन्य' म्हणत होते जे लावितिल तुला चि शब्द ते राजे. १९
[1]सुखसंततिसुकृतर्धिप्रीतिश्रीपुण्यकीर्ति या [2]लाभें
साम करीं साधूंसीं, नाहीं तरि पावलें चि [3]यांला भें[4]'. २०
बहुसत्य बहुप्रिय बहुहित बहुमत [5]बहुदुराप [6]बहुरुचिर
[7]शुचि रम्य [8]क्षीराब्धिजाननचंद्रचकोर बोलिला [9]सुचिरं. २१
त्या बोधामृतपानें निवुनि म्हणति सभ्य, '[10]वर्ण हे व्यास!'
[11]सुरगुरु हि म्हणे, 'रसने! या सद्रिपुच्या हि वर्ण हेव्यास.' २२
मग भृगुराम म्हणे, "हे दुर्योधन! भूमिपाळ! सत्य जुनी
कथितों समयोचित [12]हितहेतु कथा, परिस, आळस त्यजुनीं. २३
होता अत्युद्दाम क्षितिपति [13]दंभोद्भवाख्य पर्वतसा,
त्याच्या हृदयांत जसा, नव्हता कोणाचिया हि गर्व तसा. २४
नित्य मुनींस पुसे कीं, 'मजसीं [14]संगर करी असा मान्य
कोणहीं असेल जरि तरि सांगा लोकांत जो असामान्य.' २५
ते कांटाळूनि म्हणति, 'काय उणें? बहु समर्थ आहेत;
जा [15]गंधमादनीं, नरनारायण पुरवितील हा [16]हेत.' २६
सेना घेउनि गेला दंभोद्भव गंधमादनागातें,
[17]सिद्धाश्रमासि पावे, विश्व जया [18]सिद्धिसादना गातें. २७
[19]जातां चि भेटले त्या प्रभु, बहु दुर्लभ तपोनि धीरा जे;

---

१. सुख, संतति, पुण्य, समृद्धि, प्रीति, लक्ष्मी आणि पवित्र कीर्ति. २. याच्या लाभाकारणे. ३. सुखाधिकाला. ४. भीति. ५. (इतरास) मिळण्याला फार कठिण. ६. फार सुंदर. ७. शुद्ध. ८. लक्ष्मीमुखचंद्राचा चकोर च असा श्रीकृष्ण. ९. पुष्कळ वेळ. १०. वर्णन कर. ११. बृहस्पती म्हणाला, हे वाणि! सज्जनाचा द्वेष करणाऱ्या या दुर्योधनादिकाचे हि वर्णन कर; कारण त्यानी पांडवाशी द्वेष केला, म्हणून च आज कृष्णाचें भाषण ऐकावयास मिळाले. १२. हिताला कारण अशी. १३. दंभोद्भवनामक. १४. युद्ध. १५. या नावाच्या पर्वतावर. १६. इच्छा. १७. नरनारायणाश्रमास. १८. सिद्धीच्या घरास. १९. ज्यांचें दर्शन सज्जनांस तपश्चर्या केल्याने हि मिळण्यास कठिण ते नरनारायण दंभोद्भवास जाता च भेटले.

ज्यांला चिंतुनि तरले बहु भरतादिकतपोनिधी राजे. २८
पाहुनि भृश कृश तो नृप हांसे, हृदयांत फार अवमानी.
परमार्थ न कळतां कां हांसावे न परमांसि अवमानीं? २९
पूजुनि नरनारायण म्हणति, 'मनें इच्छिलें काळिव राज्या!
द्यावें सर्व सुरनगें समभिलषित काय जें अर्थिवरा ज्या.' ३०
'ऐकुनि यश समरार्थी मी आलों हें' असें म्हणे मळधी.
खळ धीटपण प्रकटी, तें पाहुनि हांसले दयाजळधी. ३१
स्मित करुनि प्रभु वदले, 'पशु हि न या आश्रमांत उद्धत रे!
येथें असंगशस्त्रें कवि षंडरीतें चि करुनि युद्ध तरे.' ३२
हांसति मुनि त्या मंदें समर चि वरितां पुन्हां, तपोराशी
म्हणति मनांत, 'न खेळों द्यावें या या उन्हांत पोरासी.' ३३
मूढात्याग्रह पाहुनि जो नरमुनि साध्वसाधुभावज्ञ,
धरि मुष्टिभरि इषीका सकरुण सस्मित सलील सावज्ञ. ३४
दंभोद्भवाप्रति म्हणे नारायणसख, 'बुधा! न करें समर,
दाटुनि मरसि, जरि गरळरस गिळुनि, वमुनि सुधानवरस, मर.
हूं, ऊठ, तुझी युद्धश्रद्धा हरितों, बोका संहायांतें.
शस्त्र कशास? तुज बहुत मुष्टिइषीका, पहा, सहा यांतें.' ३६
भूप म्हणे, 'उठलों, परि उचित इषीकास्त्र मज नव्हे राया;
धर्मज्ञा! तूं हि नव्हसि योग्य अशाला असें अव्हेराया.' ३७
शस्त्रास्त्रांचें दावी तो नृप बहुधा तया सकटक बळ,

---

१. फार. २. क्षीण. ३. अवमानीं (हीनानीं) परमार्थ न कळता (सत्यार्थ, वस्तुस्थिति कळत नसताना) परमासि (श्रेष्ठ पुरुषास) का न हासावें! हासावें च. ४. कल्पवृक्षानें. ५. इष्टवस्तु. ६. अमरश्रेष्ठाला. ७. युद्धार्थी. ८. दुष्टबुद्धीचा. ९. वैराग्यरूप शस्त्रानें. १०. कामक्रोधादिकास. ११. साधु (चांगला) व असाधु (वाईट) अभिप्राय जाणणारा. १२. गवताच्या काड्या. १३. तिरस्कारपूर्वक. १४. स्वीकार. १५. विषरस. १६. अमृताच्या नूतन रस. १७. बोकाव. १८. सामर्थ्यांतें.

कांडाचा[1] हि न ज्याच्या तेजा बहु घातयासकट कवळ.[2] ३८
नरमुनिवरि सोडियला भूपें शस्त्रौघ जो निशात[3] रणीं,
त्यासि इषीकानीं च छेदी रिपुवाहिनीनिशातरणी.[4] ३९
करितां पुराणमुनिनें ऐषीकास्त्रप्रयोग, नाकांत[5]
सुख आणि इषीकाशत कोंदे अरिच्या सर्व[6] चि नाकांत. ४०
एका हि सैनिकाला प्रात्यानीं लोचनां न झाकों दे,
ते ऐषीक न केवळ खळबळनयनीं[7] नभांत ही कोंदे. ४१
नेत्रांत घ्राणांत[8] श्रवणांत मुखांत सर्व कटकाच्या
बहु शिरकल्या इषीका, जेंवि जगीं शक्ति विश्वघंटकाच्या.[9] ४२
ऐसा मुनिवर्यासीं करुनि हठें विजयकामनाश[10] रण,
तत्काळ विमद[11] होउनि जाय, धरुनि कुशळकामना[12]. शरण. ४३
देवुनि अभय, म्हणति नरनारायण, 'होतसे मद नरा ज्या
तो सर्व बुडे व्यसनीं, होय मलिन या मळें वदन, राज्या! ४४
जा, स्वपदीं स्वस्थ रहा, सुदृढ धरुनि कास साधुपदवीची,[13]
वद, वीचि[14] प्राशावी द्युनदीची[15] कीं नृपा! कुनदवीची[16]?" ४५
रुचि लागली तशास हि फार सदुपदिष्ट[17] साधुरीतीची,
दुर्योधना! त्यजुनि अभिमान पहा तूं हि माधुरी[18] तीची. ४६
यापरि नर प्रतापी, नारायण अधिक बहु नराहून,
ते चि धनंजय[19] माधव[20]; न कळति[21] साधूंत बहु न राहून." ४७

१. क+अड=ब्रह्मांड. ज्याच्या (ज्या नरमुनीच्या) तेजा घातयासकट (मृत्यूसह) ब्रह्मांडाचा हि ग्रास बहु न. २. कवळ, ग्रास. ३. तीक्ष्ण. ४. शत्रुसैन्य ही च रात्रि, तिला सूर्याप्रमाणें नाशक. ५. स्वर्गांत. ६. एकदम. ७. दुष्टसैन्याच्या डोळ्यांत. ८. नाकांत. ९. जगत्कर्त्याच्या. १०. विजयेच्छेचा नाश आहे ज्यांत असा. ११. निगर्व. १२. कल्याणाची इच्छा. १३. सज्जनाच्या मार्गाची. १४. लाट. १५. स्वर्नदीची. (भागीरथीची). १६. वाईट नदीची लाट. १७. साधूंनीं उपदेशिलेल्या सज्जनांच्या मार्गाची. १८. गोडी. १९. अर्जुन. २०. कृष्ण. २१ साधूंमध्यें पुष्कळ दिवस वावरल्याशिवाय ओळखत नाहींत.

कण्व हि म्हणे, "कुरुवरा! परिस तुला हा हि सांगतो काहीं,
कीं क्षाळावें[1] भरिलें जें पंकें[2]करुनि आंग तोकांहीं[3]. ४८
प्रख्यात शक्रसारथिवरमातलिदेहसंभवा[4], नावें
गुणकेशी, रूप जिचें अमृत, न पररूप[5]अंभ वानावें. ४९
तीस वर देवमानुषलोकांत न आढळे म्हणुनि साधी[6]
मातलि नारदयत्नें पाताळीं, जेंवि निधि खणुनि साधी. ५०
आला मनास आर्यकनागाचा पौत्र सुमुख जामाता,
गुणकेशीची व्हावी हृष्टा[7] अवलोकितां चि ज्या माता. ५१
आर्यक[8] म्हणे, 'सुरर्षे! कवणा न रुचेल हें असें नातें?
परि ज्या बळें करावें संतोषें मान्य म्यां असेना तें ५२
भक्षुनि माज्या पुत्रा चिकुरातें सर्पकाळ पक्षीन[9].
वदला या मत्पौत्रा सुमुखातें कीं, 'तुला हि भक्षीन.' ५३
वदला तैसें चि करिल, दुःसाध्या काय या प्रतिज्ञा त्या?
ऐसें असतां देसी गुणकेशी काय याप्रति ज्ञात्या[10]!' ५४
मातलि म्हणे, 'दिली च स्वसुता म्यां, वचन काय फिरवावें?
जिरवावें दुःख तुम्हीं, या मुनिला पौत्ररत्न निरवावें[11]. ५५
आम्ही दोघे विनवूं सुरपतिला, तो समर्थ रक्षील,
पक्षी लक्ष्मीशप्रिय[12] परि अरिभावें[13] न यासि लक्षील[14].' ५६
नाग म्हणे, 'न्या, न पडों द्यावें शोकांत आर्यका[15] मातें,
न तसे स्वपितर हि, जसे येती लोकांत आर्य कामातें.' ५७
ज्याची[16] महापुराणीं व्यास भगवदुक्तिसी[17] च मात[18] लिही,

१. धुवावें. २. चिखलानें. ३. मुलांनी. ४ इंद्राचा श्रेष्ठ सारथि मातली, त्यापासून उत्पन्न झालेली. ५. इतर स्त्रियांचें रूप हें च पाणी. ६. चिंतायुक्त. ७. आनंदित. ८. येथें प्रथम 'मातळि' असें चुकून लिहिलें होतें. ९ गरुड. १०. नारदाला. ११. अर्पण करावें. १२. विष्णुप्रिय. १३. शत्रुत्वानें. १४. पाहील. १५. मज्जन. १६. ज्या नारदाची. १७. भगवताच्या वचनासारखी. १८. गोष्ट.

तो अभय आर्यकाला दे, [1]सुरपतिसूतसचिव मातलि ही. ५८
नारद मातळि घेउनि आले [2]सुमुखाहिला सुरसभेला,
सुरदृष्टि[3]मक्षिकांचा मोहक तो [4]इक्षुचा सुरस भेलो. ५९
प्रसवोनि परम धन्या जाली लोकत्रयांत ज्या माता
तो ही तेव्हा होता [6]क्षीरधिचा सुरसभेंत जामाता. ६०
यद्यशबुजगवणें दे भक्तासि शिवो न काळकागातें,
'सदय शरण्यवर' असें [10]श्रुतिशत ज्या विश्वपाळका गातें. ६१
[11]पुरुषार्थांसि न गावुनि [12]सत्सद ज्याचे [13]सुवृत्त भुज गातें,
त्या प्रभुच्या पायांवरि घाली मुनि कथुनि वृत्त [14]भुजगातें. ६२
देवें[15] म्हणे, 'हो! [16]दादा! द्या अमृत, न द्यावया पळ उशिर हो;
न स्वशरणागताचें काळें वळें आपुलें पळउ शिर हो!' ६३
शक्र म्हणे, 'चक्र[18]धरा! [19]तन्नखर न साहवे नव [20]क्रकच,
होइल त्या खगपतिचा मद्गुत्रें एक ही न वक्र [21]कच.' ६४
[22]जिष्णुसि विष्णु सिकवि कीं, "आधीं तो अमृत आणवा, हूं, द्या,
[23]त्याजवळि मज 'न [24]भक्कृत, सत्कृत हें' असि च आण वाहूं द्या.
पात्रमुखीं न पडे जरि, तरि अमृत वृथा कशास सांचविलें?
तें सत्य वांचणें, जें शरणागत सर्व सत्व वांचविलें." ६६

१. इंद्राचा सारथि व प्रधान. २. सुमुखनामक सर्पाला. ३. देवदृष्टिरूप मध-माशाचा. ४. उसाचा. ५. रवा (ढेप). ६. क्षीरसमुद्राचा जावई, कृष्ण. ७. ज्याचे यश हा च बागुलबावा. ८. कालरूप कावळ्याला. ९. रक्षण करणारा-मध्ये श्रेष्ठ. १०. शेकडो वेदवचनें. ११. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांसि. १२. सज्जनांची सभा. १३. वर्तुलाकार. १४. सुमुखसर्पातें. १५. विष्णु. १६. हे इंद्रा! (इंद्र हा विष्णूचा वडिल भाऊ). १७. काळ बळें आपुलें शिर पळउ; [पण] शरणागताचें न. १८. चक्रपाणे, विष्णो! १९. त्या गरुडाची नखें. २०. करवत. २१. केस. २२. इंद्राला. २३. या ठिकाणीं 'त्यापासी' असा शब्द कवीनें प्रथम लिहिला होता. २४. हें कृत्य माझें नव्हे; दुसऱ्या कोणा सज्जनाचें आहे. असें मी गरुडाला सांगेन.

साधुस्वीकृत म्हणुनि प्रभुनें अहिला हि अमृत पाजविलें,
सांजविलें कारुण्य, ब्रह्मांड भरूनि सुयश गाजविलें. ६७

स्वर्गावरि, आगवुनि द्वेषिकरींचे महात पाख, वळे,
येउनि संभ्रेंत इंद्रोपेंद्रांवरि बहु महातपा खवळे.' ६८

'वद विष्णो! मजवांचुनि जरि मेळविलें असेल यश कांहीं?
मद्बळ देवानीं जरि हरिजेल, व्यंजन कां न मशकांहीं?' ६९

देव म्हणे, "कवि म्हणती, 'मीपण अयशा न बाहु लावा' हें.
मज मीं च वाहतों, तूं काय? बरें एक बाहुला वाहें." ७०

ऐसें वदोनि देतां स्कंधीं बहुभव्यभुजभर, भरे हो!
प्रभुचा प्रताप तो तन्मदकक्षीं हव्यभुज भरभरे हो! ७१

हरि गरुडाचें मीपण हरिबाहुभरप्रताप सारें च,
त्याचा गळतां मळसा मद, उतरे सर्व तापसा रेंच. ७२

भुज मोही त्यासि, जसा रव शिशुदर्वीकरा शिखंडींचा,
तो भर दुःसह रचिला वत्सावरि जेंवि राशि खंडींचा. ७३

गरुडाचा गुरुतरमद उतरुनि निजभुज हि उतरिला अजितें,
अजि! तें सदयत्व अतुळ विधिहस्तें विघडल्यास ही सजितें.

१. मज्जनानां अंगीकारिलेला. (नारद व मातली यानीं सुमुखाचा अंगीकार केला होता.) २. शोभविलें. ३. शत्रुरूप हत्तीचे महात च असे आपले पख जागवून. ४. इंद्र व विष्णु यावर. ५. मोठें तप ज्याचें तो गरुड. ६. पखा. ७. विष्णु म्हणाला, मीपणरूप अपकीर्तीला हात लावूं नका, असें शहाणे लोक म्हणतात. वास्तविक माझा भार मीं च वाहतों; तुझा पाड किती? बरें, तुझें म्हणणें खरें, तर माझा एक हात तरी सहन कर पाहूं. ८. खांद्यावर. ९. [आपल्या] अत्युन्नत बाहूचा भार. १०. गरुडाच्या गर्वरूप गवतांत. ११. अग्नि. १२. पेटे. १३. त्या गरुडाचा मद किटप्रमाणें गळून पडल्यावर सर्व तापसांना आपण गर्व वाहूं नये असा वचक बसला. १४. शब्द. १५. बालसर्पाला. १६. मोराचा. १७. फार मोठा गर्व. १८. विष्णूनें. १९. अहो!

सावध होउनि गरुड प्रभुसि म्हणे वंदुनि 'क्षमस्व'[1] असें,
'घे दास्य तसें चि पुढें, जरि हि असा मंद अक्षम, 'स्व'[2] असें.
जो[3] काय सुरसदूषक अघपरिहरिता तसा चिकुर वाळी
निर्गर्व करुनि चुकला बहु परि हरि तातसा चि कुरवाळी. ७६
तैसा तूं हि करिसि बहु गर्व, परि सुयोधना! न हें हित रे!
कर साम पांडवांसीं, सत्सख्यें संकटीं कुजन हि तरे. ७७
हा[4] नारायण, पांडव धर्मादिसुरांश[5] सबळ हे, राया!
वचके काळ हि ज्यां, त्यां शक्त तुम्हीं काळकवळ[6] हेरायाँ[7]?"
त्यातें सुयोधन म्हणे, 'तुमच्या होणार काय हाकानीं?
ईश्वरसंकल्प[8] बळी, परिसों चि नये प्रलाप[9] हा कानीं.' ७९
नारद म्हणे, "गुरुवचन न गणुनि घेतोसि करुनि किति हास?
दुर्योधना! न आग्रह हित, याविषयीं च परिस इतिहास. ८०
पूर्वी साक्षाद्धर्मे[10] क्षुत्क्षाम[11] वसिष्ठरूप घेवून,
सत्वपरीक्षार्थ[12] शिरे विश्वामित्राश्रमांत येवून. ८१
गाधिज सादर सत्वर आंगें बहु पाककष्ट[13] साहोनीं
धावुनि जाय तदर्थ[14] स्वशिरीं सिद्धान्नपात्र वाहोनीं. ८२
धर्म म्हणे, 'राहेल क्षुधित[15] द्विजमंडळीं कसा चिर हा?

१. क्षमा कर. २. स्वजन. ३. जो काय सुरसदूषक (यमुनेचें पाणी दूषित करणारा कालिया) अघासुर, चिकुरनामक सर्प आणि वाळी वानर यांस परिहरिता (शासन करणारा) हरि गरुडा निगर्व करुनि चुकला, परि [तो] तात-मा चि [प्रेमानें] बहु कुरवाळी. ४. कृष्ण. ५. यमधर्म इत्यादि देवांचे अंश. ६. काळाच्या मुखांतील ग्रास, ७. पहाया. ८. ईश्वरेच्छा. ९. बडबड. १०. प्रत्यक्ष यम. ११. भुकेनें व्याकुल झालेला. १२. सत्व पाहण्याकरितां. १३. स्वयंपाकाचे श्रम. १४. त्या यमाकरितां. १५. यम म्हणाला, भुकेला ब्राह्मण फार वेळ तिष्ठत कसा राहील? मी दुसऱ्या ब्राह्मणमंडळीत जेवलों; तथापि हें तुझें अन्न हि पुनरपि येऊन मी सेवन करीन; मात्र तोंवर हें अन्न घेऊन तूं असा च उभा रहा.

सेवीन हें हि पुनरपि येउनि, तोंवरि उभा असा चि रहा.' ८३
ऐसें वदोनि जातां गाधिज राहे उभा चि वर्षभर,
पात्रभर न बहु, गालवपरिचरणें बहुत होय हर्षभर. ८४
भेटे वसिष्ठवेषें वर्षोतीं गाधिजासि येवून,
सेवून नवोष्णान्न प्रेमें उद्गार फार देवून, ८५
तो, 'साधु ब्रह्मर्षे! साधु' असें वरद धर्म बोलोनीं
तोलोनि वसिष्ठासीं जाय, भले डोलवूनि डोलोनीं. ८६
गाधिज शिष्यासि म्हणे, 'वत्सा! झालासि धन्य, जा गेहा;
जैसा दासहितार्थ, स्वहितार्थ तसा सदा न जागे हा. ८७
रक्षी गुरुसेवा हे सच्छिष्यशिशूसि गालवा! जिवंती,
प्रिय ईश्वरासि ते बहु, वंदुनि जे काय गाल वाजिवती.' ८८
गालव म्हणे, 'वहात्री पायांवरि काय दक्षिणा सांगा?'
गाधिज म्हणे, 'दिली बहु, वत्सा! वदलासि तूं असें कां गा!?'
'कांहीं भागा चि' असें असकृत् फुगवुनि उगेच गाल वदे,
अत्याग्रहें करूनि श्रीगुरुहृदयासि ताप गालव दे. ९०
गाधिज म्हणे, 'विधुधवल अष्टशत श्यामकर्ण दे वाजी.'
शिष्य 'अवश्य' म्हणे वरि, परि निजचित्तांत, 'हाय! देवाजी!'

---

१. पात्राचे ओंझें. २. गालवनामक शिष्याच्या सेवनें. ३. ढेकर. ४. तुलना करून. ५. मी. (विश्वामित्र). ६. उत्तम शिष्यरूप मुलास. ७. गळ्यातील ताइत; (यामुळे मुलास बाधा होत नाहीं). ८. शंकराला. शंकराने दक्षप्रजापतीचा शिरश्छेद केला; परंतु, नंतर एका बोकडाचे शिर त्याच्या धडावर लावलें, तेव्हां दक्षानें बोकडाचे मुखानें (अर्थात 'बु बु बु' असा शब्द करून) शंकराची स्तुति केली व ती त्याला फार आवडली, अशी कथा आहे. शिवभक्त लोक गाल वाजवून शंकरापुढे आपली लीनता व्यक्त करितात, या गोष्टीचें या कथेशी अनुसंधान आहे. ९. गुरुदक्षिणा. १०. वरचेवर. ११. चंद्राप्रमाणे शुभ्र. १५. काळे कान ज्याचे असे घोडे. (असे घोडे अश्वमेधोचित आहेत). * ब्रह्मर्षे! वाहवा! योग्य!

झाला त्या चिंतेनें केवळ कृश हरिणकाय[1] गालव तो;
राजा! आधिहरि[2]विणें भलत्या कविहरिण[3] काय गा! लवतो?
जेव्हां म्हणे बहु मनो[4]व्यथाजगरग्रस्तकाय गालव 'हा!'
गरुडें[5] म्हणे, 'उडविन नग[6], मग मित्रा! आधि काय गा! लव[7] हा?'
वाहे पृष्ठीं, पाहे, बहु यत्न करुनि तदाधि[8] वाराया,
परि गालवासि न पुरे धीर, परमविकळ होय गा! राया! ९४
गरुड नव्हे मूर्तिमती ब्रह्मण्या[9] विष्णुची दया ती, तें
बहु कारुण्य असो, बहु भेटवि वित्तार्थ[10] मग ययातीतें. ९५
तेणें नाहीं तादृग्धनसंग्रह[11] म्हणुनि माधवी[12] दुहिता[13]
दिधली [14]कीर्त्युपदेशें भावि नृपांच्या करावया सुहिता. ९६
विकिली [15]हर्यश्वदिवोदासोशीनरनृपांसि ती कन्या
तद्दत्तषट्शतहयांसह मग गुरुला हि अर्पिली धन्या. ९७
पुत्र प्रथम वसुमनानामा संप्राप्त होय हर्यश्वा;
गमला ज्या नरसिंहापुढें रणीं शत्रु[16]भूपवर्य श्वा. ९८
मानी प्रतर्दनाख्यें पुत्रें, बहु आत्मतप, दिवोदास;

---

१. पांढरकें शरीर ज्याचें असा. २. चिंतारूप सिंहाखेरीज. ३. सुज्ञपुरुषरूपी हरिण. ४. मनोव्यथारूप अजगरानें ग्रासलें आहे शरीर ज्याचें. ५. गरुड हा विष्णुभक्त गालवाच्या गुरुभक्तीनें संतुष्ट होऊन त्याच्या साह्यार्थ आला. ६. पर्वत. ७. अगदीं लहान. ८. त्याची चिंता. ९. ब्राह्मणाविषयीं दयाळु अशी. १०. [आठशें घोडे विकत घेण्यास लागणाऱ्या] द्रव्याकरितां. ११. तशा प्रकारचा (घोडे विकत घेण्यास पुरण्यासारखा) धनसंचय. १२. या नावाची. १३. मुलगी. १४. कीर्तीनें व उपदेशानें. १५. हर्यश्व, दिवोदास व उशीनर या तीन राजांना गालवानें तीन वेळां माधवी विकली, व या प्रत्येकानें हिच्यापासून एक पुत्र झाल्यावर दोनशें श्यामकर्णांसह ती गालवाला परत दिली. अखेर, गालवानें सहाशें श्यामकर्ण व उरलेल्या दोनशेंच्या ऐवजीं ती कन्या विश्वामित्राला अर्पण करून गुरुदक्षिणेची पूर्तता केली. १६. शत्रु असलेला राजश्रेष्ठ.

ज्या उपजतां चि धावुनि गुण देती, जेंवि [1]सपदि 'वो' दास.
'शिबिनामक पुत्रातें पावे हो! करुनियां उशीनर ती,
[2]यद्गुणजित निजपतिची पाहे स्थिर कोरडी उशी न रती. १००
विश्वामित्रा चढवी सुयशाच्या पुत्र [3]अष्टकें विमानीं,
साक्षाद्गरुड चि [4]त्यातें [5]सर्वाधिव्याळदष्ट कवि मानी. १०१
गाधिज म्हणे, 'अहा! रे! गालव! बा! लव हि तूज न विचार,
देतासि माधवी मज होते ऐसे चि पुत्र कवि चार.' १०२
ऐसा हरिभक्त हि [6]मुनि [7]गुर्वर्थ हि करुनि आग्रह श्रमला,
गमला तत्सख गरुड हि दुर्बळ; कीं तो हि [8]त्यासह भ्रमला. १०३
यास्तव दुराग्रह नव्हे हित, [9]सदुदित वाक्य कर उगा, राया!
[10]सन्मतधर्मपरावरि काळ हि न शकेल कर उगाराया. १०४
[11]मानें तो हि ययाति स्वर्गापासूनि पावला पतन,
[12]दौहित्रें साधु साधुनि देती त्याचें तयासि तें [13]वतन." १०५

## अध्याय नववा.

धृतराष्ट्र म्हणे, 'कृष्णा! मज हा [14]दुर्वृत्त आकळेना गा!
होतो मदांध जो, त्या स्वहित अहित काय गा! कळे [15]नागा? १
तूं प्रभु परमाप्त म्हणुनि, करुनि कृपा या सुयोधना वळिव,
[16]बळि वळविला तुवां, [17]हा किति? याला स्वहित बा! पुन्हां कळिव.'

१. तत्काल. २. ज्याच्या गुणानीं जिंकिलेला मदन रडून रडून आपली उशी भिजवित असे तो उशीनर, असा भावार्थ. ३. विश्वामित्राला माधवीपासून झालेला पुत्र. ४. त्या गालवातें. ५. सर्व चितारूप सर्पांनीं चाविलेला. ६. गालव. ७. गुरूकरितां. ८. गालवासह. ९. साधुकथित. १०. सज्जनांस मान्य अशा धर्माचे ठिकाणीं जो तत्पर अशावर. ११. अभिमानानें. १२. मुलीचे मुलगे. १३. स्वस्थान, स्वर्ग. १४. दुराचारी दुर्योधन. १५. हत्तीला. १६. या नांवाचा दानशूर दैत्य. (याचेकरितां च वामनावतार झाला होता). १७. दुर्योधन.

ज्याच्या वचनीं ब्रह्मप्रमुख कवींना उदंड विश्वास,
निश्वासें[1] वेद ज्याचे, पाळी जो परम आप्त विश्वास, ३
तो प्रभु करी परोपरी, परिहाराया अनर्थ, उपदेश;
जेणें केला केवळ बाळ ध्रुव साधुमान्य सुपदेश[3]. ४
परि तो न घे चि लेश हि आंत जसा कलश पालथा नीच.
अहितकरत्व स्वमतें कल्पी अल्पायु बाल थानीं च[4]. ५
जैसा निर्भाग्यानीं सर्वार्थद[5] दत्त अतिथि वारावा,
खळकर्णं अनादरिती त्यापरि त्या दुर्लभा हि आरावा[6]. ६
"दुर्योधना! शिरावे न व्यसनशतावहीं[7] दुरभिमानीं,
भीष्मद्रोणविदुरकृपधृतराष्ट्रगुरूक्तिला सुरभि मानीं. ७
भ्रमवि, भ्रमवी, मळवी, पळवी सत्कीर्तिला दुराग्रह, रे!
सेव्य सदुपदेश सुधाग्रह[8]; असदुपदेश हा सुराग्रह[9], रे! ८
पांथाचा ताप नृपा! तिळ तरि पावोनि सरें[10] अपयें[11] शमला?
शम, लाभ यांत आहे, आइक, देवूं नको अपयश मला. ९
सेवूत सुरर्षिमुखें स्वर्गी सादर यशःकथा पितर,
मद्रचितसामपोतें[12] दुस्तरविपदब्धि[13] जन्हि तथापि तर. १०
काय तुम्हीं? भंगील स्वगदाघातेंकरूनि भीम नगां[14].
त्रिपुरारिसखाचें[15] ही पाहुनि निर्जयक्षकदन[16] भी मन, गा! ११
सुत बंधु जनक जननी गुरु मित्र कळत्र[17] यांसि पाव कसा;

---

१. श्वासोच्छ्वास. २. [कुलक्षयरूप] संकट. ३. उत्तम पदाचा अधिकारी. ४. मरावयास टेकलेला मुलगा आईचें दूध च अपायकारक आहे असें समजतो. ५. सर्व इष्ट वस्तु देणारा. ६. सदुपदेशशब्दातें—पंत. ७. शेंकडों संकटें उत्पन्न करणाऱ्या. ८. अमृताचा स्वीकार. ९. मद्यस्वीकार. १०. सरोवर. ११. उदकहीन. १२. मी तयार केलेल्या, सामरूप नावेनें. १३. तरून जाण्यास कठिण असा दुःखसमुद्र. १४. पर्वताला. १५. कुबेराचें. १६. आमल्या यक्षांचा नाश. (सौगंधिककमलहरणीप्रसंगीं भीमानें कुबेरसेवकांशीं युद्ध केलें होतें). १७. स्त्री.

तुझिया बळांसि केवळ दुःसह अर्जुन, तृणांसि पावकसा. १२
'वदला ईश्वर, 'पार्वति! अर्जुन मजसीं भला झगडला, गे!'
किति त्यापुढें बळ तुजें? खचवीसा मेरुला दगड लागे? १३
दिनमणिपुढें पळांत प्राप्त गति होय अंधकारा, ती
तुज त्या राजर्षिपुढें; कीं तो प्रभु जेंवि अंधकाराती. १४
सेना व्यसनीं तुजला तारिल? कोपेल जरि अजातारी,
हरि खवळतां भयांत स्वपतिप्रति काय गा! अजा तारी? १५
त्याचा प्रसाद हो बहु, कुरुदारांच्या न कोप तिळकीं हो,
नकुळ सहदेव केवळ अनळानिळसे चि कोपतिल कीं हो! १६
ते पांच त्यांत सावा हा, यावा कोप या न साव्या ही,
अभिमत तसे न माज्या जामात्यांसकट मानसा व्याही. १७
सत्य सुदुःसह आम्हीं कृष्ण त्रिदशेश्वरास ही, राज्या!
त्या काय टंकें भंगिलें घन ही भंगूं शके न हीरां ज्या? १८
हो सावध, सत्सख्यें सुरसत्तमसा सुखें कर विलास;
तूं लोभें भ्रांत शकुनिदुःशासनवृषमुखें करविलास." १९
भीष्म हि म्हणे, 'कुरुवरा! दे यश यदुनायकासि बा! शम, रे!
कोणी हि सदुपदेशामृतलव हि प्राशितां कधीं न मरे.' २०
द्रोण म्हणे, 'कृष्णाचें भीष्माचें वचन आयकावें च,
सद्वाक्चिंतारत्नें विखरिसि कां? भरतनायका! वेंचें.' २१
विदुर म्हणे, 'शम, यावें प्रेमें, शोकेंकरूनियां न रडें,

१. अग्नीसारखा. २. मेरुपर्वताला ढासळविणारा दगड कोणास तरी मारतां येईल काय? ३. सूर्यापुढें. ४. धर्मराजापुढें. ५. धर्म. ६. शंकर. ७. शेळी. ८. कौरवस्त्रियांच्या. ९. कुकवाचे ठिकाणी. १०. अग्नि व वायु यांसारखे. ११. मी कृष्ण. १२. मान्य. १३. त्या पाडवांसारखे. १४. कृष्णार्जुन. १५. इंद्राला हि. १६. टाकी. १७. हिऱ्याला. १८. सज्जनांच्या स्नेहानें. १९. देवश्रेष्ठ इंद्रासारखा. २०. सज्जनाचा उपदेश हे च अमृत त्याचा कण हि. २१. सज्जनांचें भाषण हे च चिंतामणि. २२. गोळा कर.

पितरांचें न पिळावें सुतशोकवृकें धरूनियां नरडें.' २२
धृतराष्ट्र म्हणे, "पुत्रा! निर्भय अंतःपुरीं सुखें रम, रे!
शम रे! गमो युधिष्ठिर इंद्र जगीं तूं उपेंद्रसा गम, रे! २३
व्हावा, वळला अहित हि; मग देव म्हणेल कां 'नको' ज्याही?
रक्षील तेज, यापरि नीति न गुरुला कळे, न काव्या ही." २४
भीष्म द्रोण विदुर हे कथिति पुन्हा ही असें खळास हित,
'न शिरें हठें वृकोदरकाळमुखीं बंधुनृपबळासहित. २५
कृष्णकरें भेट नृपा! स्वांकीं श्रीधर्मराज तुज वाहो,
त्याचा तूं राज्यभरप्रोद्वहनसमर्थ बाहु उजवा, हो.' २६
तो दुष्ट म्हणे, "कृष्णा! सर्व तुम्हीं दूषितां मज चखोटा,
पांडुसुतांला म्हणतां 'फार भले' सानुजा मज च 'खोटा.'
ठावा नसे मज, तुम्हीं सांगा अपराध कोण तो याचा?
बहु जनवाद, अनावर वेग निरोधील कोण तोयाचा? २८
केलें स्वयें सुखार्थ द्यूत, निपुणता नसोनि, धर्मानें,
हारविलें धन कांहीं, पडला व्यसनांत तो स्वकर्मानें. २९
तेथें दोष शकुनिला लावितसा कां मला हि अनघाला?
जाणोनि पक्षपातीं कां घालितसा? नयांत मन घाला. ३०
तें हि धन फिरोनि दिलें, तन्हि लावितसा बळें चि अघ, लावा;
साधुसमाधिस्थगळां जेंवि खळव्याळ आळ न घलावा.
घडला वनवासि, बरें, केला होता तिहीं तसा च पण;

१. पुत्रशोकरूप लांडग्यानें. २. जनानखान्यात. ३. विष्णूप्रमाणें. ४. बृहस्पतीला. ५. शुक्राला. ६. दुराग्रहानें. ७. भीमरूपी काळाच्या मुखामध्यें. ८. आपल्या मांडी-वर. ९. राज्याचा भार वाहण्यास समर्थ असा. १०. चांगल्याला. ११. बंधूंसह. १२. माझा. १३. लोकापवाद. १४. आवरण्यास कठिण असा. १५. पाण्याचा. १६. निष्पापाला. १७. दोष. १८. समाधीमध्यें मग्न झालेल्या साधूच्या गळ्यांत ज्याप्रमाणे दुष्ट सर्प त्याप्रमाणें माझ्या गळ्यांत हा आरोप घालूं नये. १९. घालावा.

अज्ञातवाससमयीं परि त्यांहीं रक्षिलें न साचपण[1]. ३२
अपराध काय? म्हणतां कां सर्व 'युधिष्ठिरा करीं नमनें?'
मीं क्षत्रिय मानातें सोडुनि, हें मान्य कां करीन मनें? ३३
सांगा, करीन शतदा या सर्वद्विजजनासि मीं नमन,
न घिटे ब्राह्मणनमना क्षत्रमन[2], जसें वनासि[3] मीनमन[4]. ३४
पांडव काय? पविधर[5] हि येइल कापावयासि जरि मान,
तरि मानवेंद्र[6] मीं न नमीन उपेक्षुनि[7] निमेषभरि[8] मान. ३५
न मज समजलें तेंव्हां जेंव्हां दिधला विभाग[9] मत्तातें[10],
जें धन धूर्तें[11] हरितसे, काय कळे तत्प्रयोग मत्तातें? ३६
जितुकें काय सुतीक्ष्णें सूच्यग्रें[12] भेद भूमितळ पावे,
तितुकें हि अदेय[13]; तयां कीं मज खायासि गृध्र तळपावे. ३७
आम्हीं त्याहीं हि महादेवापरि या धराधवा[14] गावें,
मागावें दास्य सदा, वचनीं विमदापराध[15] वागावें. ३८
कुरुगुरु भीष्म द्रोण द्विषितमोराशिचे[16] रवि धुरीण[17],
कैसे न फेडितील प्रभु[18] हे श्रितचित्तकुमुदविधु[19] रीण? ३९
मरणभयें अरिसि कसा मानाधिक गणुनि काय[20] हा लवतो?
अचळ[21] अशनिनें[22] होइल चूर्णशिखर[23], म्हणुनि काय हालवतो?

---

१. खरेपणा. २. क्षत्रियाचें मन. ३. पाण्याला. ४. माशाचें मन. ५. इंद्र. ६. मनुजनाथ. ७. सोडून. ८. पळभर. ९. वांटा. १०. धृतराष्ट्रानें. ११. दुष्ट मनुष्य जें धनहरण करितो तें धनहरण आणि त्याकरितां केलेला उद्योग याचें त्या मदांधाला स्मरण राहतें काय? धर्मानें धृतराष्ट्राला फसवून जो विभाग घेतला त्याचें त्याला आतां स्मरण कसें राहील? कारण, उन्मत्त मनुष्य आपण केलेलीं कृत्यें तत्काळ विसरतो, असा भावार्थ. १२. सुईच्या टोकानें. १३. द्यावयास अयोग्य. १४. पृथ्वीपति कृष्णाला. १५. गर्वापराधरहित. १६. शत्रुरूप अंधकारसमूहाचे. १७. श्रेष्ठ. १८. समर्थ. (भीष्मादि). १९. आश्रितांचें मन हें च चंद्रविकासी कमल, त्याला चंद्रासारखे. २०. देह. २१. पर्वत. २२. वज्रानें. २३. चूर्ण झालें आहे शिखर ज्याचें असा.

मजपासुनि पावेल न शक्र हि, मग कोण बलिनर[1] विभागा?
भा[2] गातां ज्याची तो विधु, कवि हो! होय मलिन; रविभा गा."
केशव कोपोनि म्हणे, "काय वदसि कविसभेंत अन्याया?
दुर्योधना! बहुमता तुजला चि तुज्या, न उक्ति अन्या या. ४२
अपराध नसे केला? स्मरण नसे काय? मन न आठव दे?
तरि परिस, मीं च वदतों, समयीं[3] कोण न असोनि पाठ वदे?
अपराध तुजे विश्वश्रुत[4], त्यांचा लोपला नसे लव ही;
कुशला हि चित्रगुप्ता लिहितां गुरु[5] हि पुरली नसेल वही. ४४
घूकासि जसा दिनकर[7] तुज सुजनोत्कर्ष पळ[6] पहावेना,
तन्नाम तुला, अहिला गरुडाचें नामसें, सहावेना. ४५
कितवाकरवीं[8] कपटद्यूतीं त्वां पांडुपुत्र नागविले
वागविले जे भीष्में स्वकरतळस्फोटसे[9], न भागविले[10]. ४६
ज्या साध्वीनें केली न सतींच्या तिळ हि हानि रीतीची,
सोडित होता स्वकरें दुःशासन दुष्ट हा निरी तीची. ४७
माराया भीम, तुजा धरि संकोचासि न भुज गरदानीं[11].
या त्वद्गुणांपुढें बहु मिरवावें तेज न भुजगरदानीं[12]. ४८
त्वां वारणावतीं[13] जतुसदनीं[14] कोंडुनि जाळिले होते,
परि वांचले तशा हि व्यसनीं दैवें चि पाळिले हो! ते.. ४९
ऐसे अपराध तुजे मेरुसम, न यांसमान वेनाचे,
बहुमत्त आपणाला, न गणुनि धिक्कार, मानवे[15], नाचे. ५०
या साधूंचा बहुमत बोध सदा सुरसभाजना[16], अम्मीं[17]

१. बलवान मनुष्य. २. तेजः (ज्याचे तेज वर्णन करिता तो धर्मरूप चंद्र निस्तेज झाला आहे). ३. योग्य वेळीं. ४. जगप्रसिद्ध. ५. मोठी. ६. बुबडाला. ७. सूर्य. ८. जुगारी शकुनीकडून. ९. आपल्या तळहातावरील फोडासारखे. १०. दुखविले. ११. विष देण्याचे कामीं. १२. सापाच्या दातानी. १३. इंद्रप्रस्थीं. १४. लाक्षागृहात. १५. आपला आपण च श्रेष्ठ मानितो. १६. देवसभेंतील देवास, १७. स्तन.

बाळांच्या, हा धरवे न तुज, जसा सुरस[1] भाजनां[2] आमा.[3] ५१
वेतोसि, पाजितां हितबोधामृत, जरि बळें चि ओकारे,
'ओ' कारेसि यमाच्या देसिल, शोकाग्नि या हि ओकारे!"
तों दुःशासन बोले, 'राया! व्यसनांत वांच, धर्म[6] करीं.
साम न करितां, कौरव तुज बांधुनि ओपितील धर्मकरीं. ५३
भीष्म द्रोण विदुर हे तुज मज कर्णासि बद्ध करितात,
हरितात प्राणांतें, जाला पर परमहित हि जरि तात.' ५४
ऐसें म्हणतां चि, उठे, क्षिप्र[9] निघे दुष्ट मंडळीसहित[10];
सत्सत्पतिपासुनि[11] हि प्राप्त नव्हे दुष्टमंडळीस हित. ५५
चित्तीं भीष्म म्हणे, 'रे[12]! गंतासि हरिं विलंघ्य करिप! क?'
देवासि म्हणे, 'प्रभुजी! न वळति ते, ज्यांसि काळ करि पक्व.'
भीष्मद्रोणप्रमुखां वृद्धांसि प्रभु म्हणे, 'अहो! परिसा;
चुकतां न्यायासि कसे? बांधावा दुष्ट हा तुम्हीं अरिसा. ५७
त्यां दुष्ट कंस वधिला, वधितां हि नसे चि पाप मत्तातें;
अनुभविला सर्व हा वंशें, केवळ न ताप मत्तातें[13]. ५८
देवासुरांत पूर्वीं ऐसा चि विरोध होय, बहुधा त्या
लोकलयां[14] चुकवाया लागे हृदयांत आधि[15] बहु धात्या[16]. ५९
मग धर्माला[17] सांगुनि बांधुनि दैतेय[18] निरोविले[19] वरुणा,
ऐसी केली विधिनें लोकांवरि त्या खळांवरि हि करुणा. ६०
दुर्योधन दुःशासन कर्ण शकुनि खळ तसे चि करकरुनीं
बांधुनि धर्मकरीं द्या; लोक बुडवितील हे निकर[20] करुनीं. ६१

१. उत्तम रस. २. भाड्याला. ३. कच्च्या. ४. बधनागारास. ( तुरुंगाला ). ५. [ ह्या आपल्या ] घसला. ६. धर्माचरण. ७. शत्रु. ८. धृतराष्ट्र. ९. लवकर. १०. दुःशासनादिकासह. ११. सज्जनश्रेष्ठापासून. १२. रे करिप! हरिं विलंघ्य क गंतासि =हे गजश्रेष्ठा! सिंहाला (पक्षीं) श्रीकृष्णाला उल्लंघून कोठें जाशील? १३. वसुदेवानें. १४. लोकनाशाला. १५. चिंता. १६. ब्रह्मदेवाला. १७. यमाला. १८. दैत्य. १९. स्वाधीन केले. २०. कहर.

पुरुष कुळार्थ, ग्रामाकरितां कुळ, तो हि जनपदाकरितां[1],
आत्मार्थ[2] भू[3] त्यजावी, असि नीति कळोनि कां असें करितां?
अजि धृतराष्ट्र! अजि महाराज! न हा[4] साधु, बांधवा यास.
न करावा व्यर्थ तुम्हीं हितसूचक[5] साधुबांधवायास[6].' ६३
धृतराष्ट्र म्हणे, 'विदुरा! जा, बाहुनि आण येथ गांधारी,
सोडुनि[7] कर कांतारीं करुण कवि नव्हे निजानुगांधारी!' ६४
'जी! जी!'[8] म्हणोनि जावुनि घेउनि आला सभेंत भावजये,
पतिजवळि[9] कळत्र नये कां हो!? सिद्धाश्रमांत सावज[10] ये. ६५
स्त्रीस म्हणे तो नृप, 'सति! तूं तरि दुर्योधनासि बोध करीं,
देणार अंतकाच्या[11] स्वासुसह[12] सकळ सहाय योध करीं.' ६६
देवी म्हणे, 'शिकवितां देवर्षि[13] महायशा हि उपरमला[14];
उपरमला भीष्म विदुर कृष्ण हि, कथितां अशा हि उपर[15] मला!
ऐकेल काय गुरुवच सुत? आपण ऐकिलें कितिकसें जी!?
पावेल सुयश सुसुख प्रसवुनि सुतशत हि हे दिति कसें जी!?
सांगेन यथामति, परि कोठें तो?' नृप म्हणे, 'वहा[16] भ्रात्या[17].'
आणी सभेंत पुनरपि वळुनि विदुर वातसा महात्मा[18] त्या. ६९
गांधारी त्यासि म्हणे, "वत्सा! बहु कष्टतो दुरभिमानी,
कां त्यजिसि गुरूक्ति? इला आत्माधिक बहुगुणें सुरभि मानी.
अन्यायकृष्णवर्त्मा[19] न स्पर्शो कीर्तिकापुरा, तनया!
ज्या लोभा भजसी तूं, भजले नाहींत बा! पुरातन[20] या. ७१

१. देशाकरितां. २. स्वतःसाठी. ३. पृथ्वी. ४. दुर्योधन. ५. हित सुचविणारा. ६. साधु असा बांधव जो विदुर, त्याचे श्रम. ७. हे आपल्यामागून जाणाऱ्या अंधळ्याच्या शत्रो विदुरा! अरण्यात [आंधळ्याच्या] हात सोडून मनुष्य शहाणा किंवा दयाळू होत नाही. ८. संबोधन—पंत. ९. सभेमध्यें सुद्धा पतीजवळ साध्वी स्त्री का हो! येणार नाहीं? १०. शिकारीचें श्वापद. ११. यमाच्या. १२. आपल्या प्राणासह. १३. नारद. १४. थकला. १५. इतकें असूनही. १६. बोलाव. १७. विदुराला. १८. मोठ्या ढगाला. १९. (अन्यायरूपी) अग्नि—पंत. २०. पूर्वज.

कामें कोपें लोभें नागविले अमित, यांस जे भुलले,
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीर[1] ही उेलले[2]. ७२
न उगाचि मूकसा तूं चित्तांत धरूनि दंभ[3] दर्प रहा,
बा! दुरभिमान न बरा, देइल धनपतिकरीं[4] हि खर्परें[5] हा. ७३
अहित कथील तरि कसा गुरु? बाप कसा? तसी च आइ कसी?
नाइकसी गुरुवचन, क्षुद्रवचन बहु जपोनि आइकसी. ७४
सत्यप्रेमें[6] स्वामी न म्हणविती हे दयाभ्रे[7] मामाजी,
'मीं राजा' ऐसें जें काय म्हणसि खेद या भ्रमामाजि. ७५
राज्यार्ध पांडवां दे, तूं घे राज्यार्ध, बहु तुला बा! हें,
साम करीं, यश रुसलें, मुरडुनि तुज पाहतें, मुला! बाहें[8]. ७६
निष्कंटक राज्य करिसि, हा महिमा सत्य पांडवांचा रे!
सत्सख्य[9] करूनि यशें[10] धवळें करा सत्यपांड[11], वांचा रे! ७७
भीष्मद्रोणाद्यार्य प्राणांतें सोडितील, न तयांतें;
सामर्थ्य असोनि अधिक, बहु ते आहेत साधु नत यांतें. ७८
क्षुद्र शकुनिदुःशासनकर्ण; यश क्षुद्रसंगराहितास[12];
कोणा होइल केला भूतबळें[13] रुद्रसंगर[14] हितास? ७९
सर्वसुहृत् श्रीकृष्ण प्रभु, याची कास धरुनि सर्व तरे,
तूं किति? तरले याच्या नामें बहु सागरांत पर्वत रे! ८०
तुज पांडवजय दुर्घट; नारळ हरिजेल काय खर्वतरें[15]?
कृष्णोक्तें सख्य करीं, या चि उपायें अनिष्ट सर्व तरें.' ८१
ऐसें मातृवचन हीं लंघुनि गेला उठोनि पुनरपि तो,

---

१. पुरुषरूपी हिरे. २. भग पावले. ३. ढोंग. ४. कुबेराच्या हातात. ५. खापर. ६. सत्यावर प्रेम असल्यामुळे आपण राजा म्हणवून न घेता केलेल्या प्रतिज्ञेनुसार भीष्मांनी सत्यवतीच्या मुलास राज्य दिले. ७. दयामेघ. ८. [त्या यशाला] बोलाव. ९. सज्जनांशी (पांडवांशी) मैत्री. १०. शुद्ध, शुभ्र. ११. ब्रह्मांड. १२. नीच मनुष्याची संगति न करणारास. १३. पिशाच्यांच्या मदतीनें. १४. शंकराशीं युद्ध. १५. अत्यंत वामन-पंत. अतिशय खुजा.

जो भव्य[1] पावणारा सद्गुरुसद्वाक्सुधेसि[2] सुनर पितो. ८२
जावुनि सुयोधन म्हणे दुःशासन कर्ण शकुनि यांपाशीं.
'आम्हीं हितशत्रूंच्या कळत पडावें न ठकुनियां पाशीं. ८३
जोंवरि आहों आम्हीं स्वाधीन, न बद्ध जाहलों चवघे,
कृष्णास चि बद्ध करूं, म्हणजे मेले चि शत्रु[3] ते अवघे.' ८४
कर्णादि म्हणति, 'बांधूं यदुपा, सदुपाय हा बरा सुचला,
शीघ्र उठा, लीळेनें पांडुसुतांतें करूं परासु[4], चला.' ८५
तें इंगितज्ञ[5] सात्यकि कृतवर्म्याला हळू च जाणवुनीं,
प्रथम कुरुसभाद्वारीं सिद्ध करवुनि स्वसैन्य आणवुनीं, ८६
जावुनि सभेंत आधीं श्रीकृष्णाला कुमंत्र[6] आयकवी,
राज्यासि म्हणे मग भगवदनुमत[7] समस्तसाधुराय[8] कवी. ८७
'आजि धृतराष्ट्र! प्रभुजी! मीं सात्यकि, किमपि विनवितों, परिसा;
तुमच्या सुतें करावा बद्ध श्रीवासुदेव व्हा अरिसा ? ८८
हा सांपडतो एका प्रेमा सुखकीर्तिच्या घटकबंधा[9],
प्रेमरहितां सुदुर्जय भगवंत; जसा महाभट[10] कबंधा[11]. ८९
हें काय हो! विदुरजी!? परमप्रेमास्पदांगजातातें[12]
द्यावें अनुमोदन निजपरगृहदाहास[13] जाणत्या तातें?' ९०
विदुर म्हणे, 'अद्यापि स्वस्थ चि तूं, काय हें? अहा! तात!
राया! या यदुसिंहा त्वत्पुत्र धरावया पहातात. ९१
हा यादवसिंह प्रभु, धरितिल तव मत्तसुत मतंगज[14] या?
बा! दावपावकासीं[15] समर करुनि पावतिल पतंग जया?' ९२
देव म्हणे, 'देवा! द्या आज्ञेसि, धरूत वीर हे मातें

---

१. कल्याण. २. उत्तम गुरूच्या उत्तम वाणीरूप अमृताला. ३. पाडव. ४. गतजीवित. ५. मर्मज्ञ. ६. ती वाईट मसलत. ७. कृष्णानें अनुमोदन दिलेला. ८. सर्व साधमध्ये श्रेष्ठ. ९. सुखकीर्त्युत्पादक बधनाला, (भक्तीला). १०. महावीर. ११. धडाला. १२. अतिशय प्रेमाचें स्थान अशा मुलाला. १३. आपले व दुसऱ्याचें घर जाळण्यास. १४. हत्ती. १५. वणव्याबरोबर.

कीं मीं धरीन यातें; शोधिति[1] दहनांत धीर[2] हेमातें. ९३
आतां चि धरुनि बांधुनि पांडवहस्तांत यांसि ओपीन;
जरि धर्मकृत्य[3] न घडे, भुज केले व्यर्थ काय हो! पीन[4]? ९४
हें साधुधर्मकृत्य हि राहो न तुम्हांपुढें, उचित मातें
जें प्रागल्भ्यप्रकटन वृद्धांत, नव्हे भलें शुचितमा[5] तें. ९५
निंदित कर्म कसें हो! करिन? कुलजवत्स[6] मीं, परा ज्या जी,
उचित प्रतिक्रिया, मग दावीन, भवत्समीप[7] राज्याजी! ९६
अन्याय मीं करीना, कर्तव्य करो सुखें सुयोधन हो!
व्यसु[8] हो, परंतु खोटा सभ्यजनाच्या मुखें सुयोध[9] न हो.' ९७
धृतराष्ट्र म्हणे, 'विदुरा! मजपासीं आण, जा च पुनरपि, त्या;
काय करूं? शूळाधिक दुःसहतर दुःखहेतु कुनर पित्या.' ९८
ज्यासि न साधु सहावे, जेंवि पहावे तुरंग[10] न हल्याला[11],
त्यासि कवि पुन्हां आणी जो आग्रह मित्रबंधुसह ल्याला. ९९

---

## अध्याय दहावा.

राष्ट्र सुतासि म्हणे, "रे! कुरुकुलकीर्तिनासिकाकुष्टा[12]!
इच्छिसि कृष्णप्रभुला बद्ध करायासि काय रे! दुष्टा!? १
प्रेमा चि एक यातें बांधुनि बहु कीर्ति दे यशोदेतें,
अभिमत[13] साधुनि देतें सुकृत[14], कुकृत कीं अरे! पशो! देतें? २
केवळ बाळ चि इच्छी विधुंसि[15] धरायासि कां वरा[16]इच्छी?

१. शुद्ध करितात, परीक्षा पाहतात. २. सुज्ञ लोक. ३. धर्माचरण. ४. पुष्ट. ५. अत्यंत पवित्राला. ६. कुलीनाचा मुलगा. ७. तुमच्यासमोर. ८. मृत. ९. वीरश्रेष्ठ पुरुष. १०. घोडा. ११. रेड्याला. १२. कुरुकुलाची कीर्ति हीच नासिका (नाक) त्यावरील कुष्टरोगा! १३. इष्टार्थ. १४. चांगले कृत्य. १५. चंद्राला. १६. ब्राह्मणा.

म्हणत्ये सभा तुज जसी पिकरिपु[1]काकासि आंबराइ 'छी!' ३
वाहसि शिरीं तयातें देतो जो गर्वभार ताप सदा,
सुखकर गुरुवर[2]करभर दुर्धर तुज सर्व[3]भारतापसदा!' ४
विदुर[4] म्हणे, 'द्विविद[5] कपिहि नरकेंहि ज्यासि न धरावया शकला,
त्यासि कसा धरिसिल? जें सकलां[6] जड, तें घडे कसें शकला?
या धरिति न षष्टिमितें[7] निर्मोचनवासि दानवेंर्यशतें,
मीं काय एकमुख? दशशतवदनास[9] हि न वानवे यश तें. ६
पाठविले यन्नामें अरि हि करुनि मुक्त पूत नाकाला[10],
बद्ध कसें करिसिल या खळ[11]केश्यघकंसपूतनाकाला? ७
बांधावया पहासी जरि या मधुकैटभांतकाला ही,
तरि बांधावा भेकें[12] चक्षुहर्णें[13] जागरूक[14] कालाही[15].' ८
देव म्हणे, 'रे मंदा! एकाकी[16] वासुदेव हा काय?
इच्छिसि बद्ध कराया, तरि आधीं नीट तूं पहा काय[17].' ९
ऐसें वदोनि उघडुनि दावी निजविश्वरूपता, पावे,
कीं पाहोनि निवावे साधु सकळ, दुष्ट भूप तापावे. १०
तेजोमय प्रकटले प्रभुच्या ब्रह्मांड[18]कोटिगेहांत
ब्रह्मादिदेव यादव;पांडव अंगुष्ठमात्र[19] देहांत. ११

---

१. कोकिलाचा शत्रु जो कावळा त्याला. २. वडील मनुष्याचा आशीर्वाद हा च हात त्याचा भार. ३. भरतवंशांतील सर्व पुरुषांमध्यें नीच अशा! ४. नरकासुराचा एक वानरमित्र. ५. दैत्यविशेष. ६. सर्व वस्तूला जें कठिण ते तुकड्याला कसे व्हावे? ७. साठ आहे संख्या ज्यांची अशी दानवांची शतें. ८. निर्मोचननगरीत सहा हजार राक्षस कृष्णाला बांधावयास तयार झाले होते. ९. शेषाला हि. १०. स्वर्गाला. ११. दुष्ट अशा केशी, अघ, कंस आणि पूतना यांच्या अंतकाला, कृष्णाला. १२. बेडकानें. १३. दृष्टीनें मारणारा. १४. सावध असलेला. १५. कालसर्प. १६. एकटा. १७. [ मोझें ] शरीर. १८. अनंतकोटि ब्रह्मांडे ज्यांत आहेत अशा आपल्या शरीररूप घरांत. १९. आगठ्यायेवढें.

दे हर्षे विश्वरूपप्रभुभास्कर[1] सुजननयननलिनांतें,[2]
बहु ताप दे स्वतेजें खळघूकांतें,[3] स्वभावमलिनांतें.[4] १२
भीष्म द्रोण विदुर कवि संजय निर्मळ तपःपर महर्षी
हे दिव्यदृष्टि देवुनि केले करुणाकरें[5] परम हर्षी. १३
देवानीं वाजविलीं वाद्यें तेव्हां सुखें अवधिरहितें,[6]
होय मुहूर्तभरि भुवन बधिर चि सत्कविमुखें[7] अबधिर हि तें.[8] १४
बहु पुष्पवृष्टि होय, ब्रह्मांडीं ही न माय परिमळ तो,
या प्रभुयशें नुरावा तिळ हि खळांचा, उरे चि परि, मळ तो. १५
धृतराष्ट्र म्हणे, 'प्रभुजी! संसारीं[9] हा कृतार्थ[10] हो, पाहो,
या जात्यंधासि[11] तुम्हीं डोळसपण पळभरी च ओपा[12] हो!' १६
त्या वृद्धा जात्यंधा राज्याला विश्वरूप दावाया
अद्भुतचातुर्याच्या निधिला विधिला[13] हि लाज लावाया, १७
यत्प्राप्त्यर्थ[14] श्रीमद्दस्रशिर[15] हि गुरुपदीं सदा लवतें,
रविचें हि दृगघभंजन[16] अंजन कंजनयनें[17] दिलें लव[18] तें. १८
अंधत्व[19] अंधकूप चि, त्यांतुनि होवूनि दिव्यचक्षु निघे,
प्रज्ञाचक्षु क्षणभरि बहु सुख तें विश्वरूप लक्षुनि घे. १९
'वृद्धा! अगस्त्य[20] हो, हा मन्महिमामृतसमुद्र आटो, पी;'
ऐसें मनीं म्हणोनि प्रभुवर तें विश्वरूप आटोपी. २०
न वळे गतायुजन,[21] तें उत्तम चि जसें सुवैद्य मानुनि घे,

---

१. विराटस्वरूप कृष्ण हा च सूर्य. २. सज्जननेत्ररूप कमलाना. ३. दुष्टरूप घुबडांस. ४. स्वभावाने पापी अशांस. ५. कृपेची खाण च अशा कृष्णे. ६ एकसारखी. ७. सत्कवींना केलेल्या वर्णनानीं. ८. बधिर नसलेलें हि. ९. मीं. १०. कृतकृत्य. ११. जन्मांधाला. १२. द्या. १३. साठा जो विधि त्याला. १४. ज्या अजनाच्या प्राप्तीकरितां. १५. अश्विनीकुमाराचें मस्तक. १६. दृष्टिदोष घालविणारें. १७. कमलनयन कृष्णाने. १८. क्षणभर. १९. आंधळेपणा ही अंधकारयुक्त विहीर च होय. २०. अगस्त्य ऋषि. (यानें समुद्र प्राशन केला होता). २१. ज्याचें आयुष्य सपलें आहे असा मनुष्य.

सात्यकिकर धरुनि तसें तेथुनि यदुवंशपद्मभानु[1] निघे. २१
ज्ञानें चि ज़ना हो, न प्राप्त वयें केवळ, स्थविरता[2] हो;
जरि बुद्धिवृद्ध असता, जैसा भेंडा[3] जळस्थ विरता हो! २२
जीवूनि सभाद्वारापावेतों प्रभुवरासि पावाया[4],
अंध म्हणे, 'प्रभुजी! हा स्पष्ट अनीश्वर[5] म्हणोनि पावा या. २३
दुर्मति दुराग्रही सुत.आटोपायासि अंध अक्षम हा,
जो जो यत्न करावा तो केला म्यां तुम्हांसमक्ष महा.' २४
प्रभु मुरडोनि म्हणे, "हो! जन हो! जो परमअहितकर अरिसा
त्या सुतशिक्षेविषयीं[6] म्हणती, आपण अनीश, हें परिसा. २५
अजि बाह्लिक! अजि भीष्म! द्रोण! विदुर! हें तुम्हांसि कळलें कीं?
हे धृतराष्ट्र अनीश्वर, यांचें चाले न लेश बळ लेंकीं. २६
आलों.बहु दूर, रहा, येतों धृतराष्ट्रजी! पुरे, परता,
कथितों धर्मासि असें कीं, 'यश दिधलें तुम्हीं भलें भरता[7]!'"
बोलेल कृपणवचन[8] स्वमुखें कां? काय देव कीनाश[9]?
कीं भक्तकीर्तिनाश न साहे, साहेल देवकीनाशं[10]. २८
स्वरथीं चढोनि भगवान् मग जाय पुसावयासि आतेला[11],
तें चि वदूं, कोण रसिक गोघृतें[12] सोडुनि करील आ[13] तेला? २९
सांगे सुयोधनाचें मत संक्षेपें यदूद्वह[14] सतीतें,
धर्मासि[15] निरोप पुसे सुतमार्दव[16] आठवूनि हसतीतें. ३०

---

१. यदुकुलरूपी कमलास सूर्याप्रमाणे (विकसविणारा). २. वृद्धत्व. ३. मातीचे ढेकूळ. ४. पोंचविण्याला. ५. असमर्थ. ६. त्या पुत्राच्या शासनाविषयीं. ७. आपल्या कुळांतील मूळ पुरुष जो भरत त्याला. ८. हलक्या मनुष्यासारखें भाषण. ९. यम. (यम इतका सामर्थ्यवान खरा, पण त्याची किमत कृष्णापुढें काय? स्पष्ट बोलण्यांत तो यमाची ही परवा करणार नाहीं). १०. [प्रत्यक्ष] आपल्या आईचा नाश. ११. कुंतीला. १२. गाईचें तूप. १३. तोंड पसरील. १४. यदुनायक, कृष्ण. १५. धर्माला सांगावयाचा. १६. पुत्रांचा मवाळपणा, नेभळेपणा.

कुंती म्हणे, "वद असें त्या मत्तनयासि कमळनयना! कीं,
परिसोत पूर्वज तुझा प्रेमें सुरगीत[1] अमळनय[2] नाकीं. ३१
वाटे सुभटें पुण्यें मेळविला विप्रसेवनीं नव ट.
'वर्षोष्णसह जटिल वर, तरि काय बहुत तसे वनीं न वट? ३२
वर्णिति, रिपूंत समरीं दाखवितां बाहुबळ जना, भाट,
ब्रह्मा नामीं दुसरा योग्य, क्षत्रा न, जलजनाभा[4]! ट. ३३
जें सिंधुराजविजितस्वसुतातें[5] बोलिली सती विदुला,
तें परिस, सांगत्यें तुज यदुकुलकमळाकराचिया[6] विधुला[7]. ३४
विदुला म्हणे, 'अहा! रे! क्लीबा[8]! मंदा! कसा पळालास?
कां वांचलासि? अयशस्कर ऐसा तूं न कां गळालास[9]? ३५
अरि हरिल राज्य, मग तूं वरिशिल वृत्त्यर्थ[10] काय माधुकरी?
सुखकर सुकर्म टाकुनि, असुखकर कुकर्म कोण साधु करी?
मद्यौवन[11], 'संजय[12]' हें निजनाम हि बुडविलें तुवां दगडें!
झगडें यशोर्थें, अरिरथचक्राहीं स्पष्ट लोष्टसा[13] रगडें. ३७

१. देवानीं गायलेला. २. निष्कलंक न्यायाचार. ३. कुंती म्हणते, "वीरश्रेष्ठ धर्मानें ब्राह्मणांची सेवा करून करून आपल्या 'सुभट' या पदवींत नवीन 'ट' ची भर टाकली, म्हणजे धर्म सुभटाचा (उत्तम योद्ध्याचा) सुभट्ट (उत्तम भटजी) झाला." धर्म मोठा सहनशील आहे; पण तेवढ्यावरून त्याला साधु म्हणता यावयाचें नाहीं असें दर्शविण्याकरितां कुंती म्हणते, "केवळ पर्जन्य व ऊन याचा त्रास सहन करितात म्हणून च जर जटाधाऱ्यांना श्रेष्ठ समजावयाचें तर तसे वर्षोष्णसह व जटिल (लांबलांब पारंब्या वाढलेले) बहुत वटवृक्ष हि वनांत नाहींत काय?" ४. हे पद्मनाभा कृष्णा! ब्राह्मणांना 'भट्ट' या नावांतील दुसरा 'ट' योग्य; पण क्षत्रियांना 'भट' या नावांत दुसरा 'ट' योग्य नाहीं. ५. सिंधुदेशाच्या राजानें जिंकलेल्या आपल्या मुलाला (संजयाला). ६. यदुकुलरूप कमलसमूहाच्या. ७. चंद्राला. ८. षंढा! ९. गर्भामध्यें असतांना च गळून कां पडला नाहींस? १०. उपजीविकेकरितां. ११. माझे तारुण्य. १२. जयशाली. १३. मातीच्या ढेंकळाप्रमाणें.

जेणें लज्जित व्हावें[1] स्वर्गीं सहपूर्वजें तुज्या तातें,
परमानुचित पलायन कैसें केलें तुवां कुजाता! तें? ३८
मरण विहित, न पलायन, भीती धर्मज्ञराजकन्या[2] या[3]
अन्यां याहुनि अधिका घडल्या ही न गणिती च अन्याया. ३९
साधूंसि बाहु[4]ज्याचा मत[5] विजय जसा तसा चि वध मत, रे!
निजधर्माश्रित न बुडे, निजधर्मच्युत कधीं न अधम तरे. ४०
अधमा! तुवां मरावें, क्षण हि न बुडवूनि मान[6], वांचावें.
काळा! यासम अन्य हि जे असतिल, त्यां हि मानवां चावें.' ४१
तो संजय तीस म्हणे, 'पुत्राच्या इच्छितीस कां मरणा?
वांछिति शमा अकाम[7] प्राज्ञ[8], इतर इच्छितीं सकाम रणा. ४२
रडसील सस्नुषा[9] कीं मज जरि देइल परासुता[10] समर,
न म्हणेल स्वप्नीं ही शतपुत्रा[11] ही परीं सुतास[12] 'मर.'" ४३
'जी व्यर्थ उभयलोकानुपयुक्त[13] अपत्य वाढवी, ती, तें
स्पष्ट खरीवात्सल्य[14], ज्ञाते जन म्हणति 'गाढवी' तीतें. ४४
निजलासि काय? उठ रे! जय पावतसे सदा समरशील[15],
उत्साह टाकितां तूं दैन्यें सांगन[16] सदास मरशील.' ४५
संजय म्हणे, 'नमस्ते[17] जननि! जन निशाकरें[18] जसा निवतो,
बोधें तसा निवालों, न हितकर गुरूपदेशासा[19] शिवें[20] तो.' ४६
विदुलोक्त[21] करी संजय जिंकुनि समरांत सिंधुराज्याला;
सिंहीला तो चि उचित सुत जो मारूनि सिंधुरा[22] ज्याला[23]. ४७

---

१. वाईट–व्यर्थ जन्म ज्याचें अशा! २. क्षत्रियधर्म जाणणाऱ्या राजकन्या. ३. या पलायनाला. ४. क्षत्रियाचा. ५. मान्य. ६. अभिमान. ७. निरिच्छ. ८. ज्ञाते पुरुष. ९. सुनेसह. (माझ्या स्त्रीसह). १०. मरण. ११. जिला शंभर पुत्र आहेत अशी. १२. दुसऱ्याच्या मुलाला. १३. या लोकीं व परलोकीं ही नाहीं उपयोग ज्याचा. १४. गाढवीचें वात्सल्य. १५. युद्धोत्सुक. १६. स्त्रीसह. १७. तुला नमस्कार असो. १८. चंद्रानें. १९. वडील मनुष्यांच्या उपदेशासारखा. २०. शंकर. २१. विदुलेनें सांगितलेलें. २२. हत्तीला. २३. जगला.

सांग स्वसखासि[1] असें, 'जाली त्वत्सूतकीं[2] गगनवाणी
कीं, 'कुंति ! हा अरि[3] वधुनि पद[4] साधिल तुज सुखा, मग न वाणी[5].
होतिल सकळखळवधीं हरिहरमुख[6] या बुधा सुर सहाय,
चित्तीं म्हणेल याच्या कीर्तिरसें जितसुधासुरस[7] 'हाय !'" ४९
तें[8] सत्य असो, तें ही जें युद्ध पुरांतका[9] महेशासीं,
मद्वीरसूत्व[10] हि, श्रीस्त्रीकीर्त्यपहारकाम[11] हे शासीं[12].' ५०
भीमासि म्हणे, 'द्यूतीं नेलें जिंकूनि वित्त[13] भीमा ! जें
तें न स्मरें, न तुमच्या वनवासाला हि चित्त भी माजें. ५१
सलतें मनांत दुष्टें ओढुनि नेली सभेंत कृष्णा तें,
स्मरली[14], त्वां हि उपेक्षा करितां, हरितां निरीस, कृष्णातें. ५२
त्या स्मरणें मन पडलें तापीं बहु, जेंवि तळमळत डागें[15],
हृदयें[16] मोह उघडिला[16] जैसा ग्रीष्मांत तळमळ[17] तडागें[18].' ५३
'दावावें, यश जोडुनि, कुलजानें सुप्रसन्न वदन कुळा;'
प्रथम पुसोनि कुशळ मग जगदीशा ! तूं असें चि वद नकुळा. ५४
'अयशस्कर तोकें[19] पळ हि मळवाया धाम बा ! न रांगावें,
जरि न गमे[20] चि, तरि सुखें चित्ररचितरामवानरां[21] गावें, ५५
हें क्षत्रियेसि[22] समुचित,' ऐसा चि निरोप सांग सहदेवा,

---

१. आपल्या मित्राला (अर्जुनाला) २. तुझ्या जन्मकाळी. ३. अर्जुन. ४. राज्यपद. ५. कमीपणा. ६. विष्णुशंकरादिक देव. ७. कीर्तिरसानें जिंकलेला अमृताचा उत्तम रस. ८. ते आकाशवाणीचे भविष्य. ९. त्रिपुरासुराला मारणाऱ्या. १०. माझें वीरमातृत्व. ११. लक्ष्मी, स्त्री व कीर्ति ही हरण करण्याची आहे इच्छा ज्यांची अशा कौरवांना. १२. शिक्षा कर. १३. धन. १४. [द्रौपदी] स्मरली. १५. [लोखंडी सळईने दिलेल्या] डागाने ज्याप्रमाणे तळमळतें. १६. अंतःकरणांत मोह उत्पन्न झाला. १७. तळातील चिखल. १८. तळ्यानें. १९. मूल. २०. करमेना च. २१. चित्रात काढलेल्या राम, मारुति इत्यादींस २२. मला क्षत्रियकन्येला.

जो पांचांत यशस्कर तो माजा पुत्र मूर्तमह[1] देवा! ५६
कृष्णेसि सांग कृष्णा! 'तिळभरि हि तुजें उणें नसो शील,
त्वां साहिलें असें पळमात्र हि सर्वसहा[2] न सोशील.. ५७
सति! तव सभाप्रवेशीं रामें[3] हि विलोकिलें परश्वश्रु[4],
निर्लज्जा कठिना[5] मीं, मरती च तदा भली पर श्वश्रू[6]. ५८
त्वां रक्षिलें, न जाले क्षम रक्षायासि मत्तनय, नातें;
असते क्षम, चरणनखा स्पर्शों देते न मत्तनयनातें[7]. ५९
जऱ्हि बुडविलीस माज्या पुत्रांहीं व्यसनगर्तलीनांहीं[8],
तऱ्हि न विटलीस, यांपरि सत्वें कोण्ही हि वर्तली नाहीं.' ६०
किंबहुना[9]? सांग तयां समयीं जें काय चांगलें कांहीं,
कृष्णवे! मन्मत हें कीं, 'यश रक्षावें न आंग लेंकांहीं.' ६१
बा! गा! म्हण बाहूंतें पुरवाया स्वजनकाम[10] हा 'भागा.'
मागायाचें तुज हें, नाहीं म्हणसील कां महाभागा[11]!? ६२
पाहों नको मजकडे बा! निजबिरुदावलीकडे[12] चि पहा,
काय स्तनार्थिशिशुच्या[13] शब्द उचित सांत्वनीं पडे 'चिप' हा?"
नमुनि निघे किमपि प्रभु न वदे, त्यावरुनियां असें वाटे,

१. मूर्तिमान उत्सव. २. सर्व सहन करणारी पृथ्वी. ३. भृगुराम—**पंत.** ४. परशोः अश्रः—**पंत.** परशूचे अश्रु. 'अश्रु' शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी असल्याने त्याचे पंतकृत 'अश्रः' असे द्वितीयाबहुवचन चिंत्य होय. (त्या परशुरामाने हि आपल्या खांद्यावरील परशु, आपण दुष्टमर्दनाच्या कामीं त्याचा यथोचित उपयोग करीत नाहीं म्हणून अश्रु ढाळीत असलेला पाहिला. वस्त्रहरणप्रसंगाच्या तुझ्या दुःखाचें निवारण आपणास करितां येत नाहीं, याबद्दल त्या कठोर मनाच्या परशुरामाला हि वाईट वाटलें, असा भाव). ५. कठिनहृदया. ६. सासू. ७. उन्मत्त लोकाच्या दृष्टीतें. ८. विपत्तिरूप, खळग्यात पडलेल्यानीं. ९. फार काय सांगूं? १०. भक्ताची (माझी) इच्छा. ११. भाग्यवता! १२. आपल्या कीर्तिपंक्तीकडे. १३. स्तनपानाची इच्छा करणाऱ्या मुलाच्या.

कीं, 'कृत्वा दर्शयते प्राज्ञ[1]' असा भाव कीं गहिंवर[2] दाटे. ६४
वृद्धांसि पुसे, स्वरथीं कर्णाला सबहुमान बाहुनि घे,
शार्ङ्ग[3]प्रमुखमहाभुजभुजगाधिपपूज्यमानबाहु निघे. ६५
प्रभुवर तेथुनि जातां, धरुनि मनीं फार कोप, देशाला[4],
भीष्म द्रोण पुन्हां ही करिति खळा तारकोपदेशाला[5]. ६६
दुर्योधनासि न रुचे सांगति जें सदुपदेशपटु[6] ते तें,
मधुररसीं उपदेशीं ज्वर[7] खळ आणिति बळें चि कटुतेतें. ६७
घाली, होवुनि तिर्यग्दृक्[8] नतमुख[9], भोंवयांसि तो गांठी;
केवळ हितोक्ति कृत्या[10], भासे त्या काळदृष्टि ज्या गांठी. ६८
भीष्म म्हणे, 'जों बहुमत ईश्वरसा सत्यलोकपाळाला[11]
त्या वत्सासीं[12] विग्रह[13]? हा! आलें काय हो! कपाळाला?' ६९
द्रोण म्हणे, 'पुत्राधिक कीं पोषी नित्य शिष्टता पार्थ
त्या वत्सासीं विग्रह? हा! जालों काय शिष्ट तापार्थ?' ७०
जो वळला पळ लाजुनि न श्रीदेवर्षिला[14] न पितरांला[15]
वळला न ईश्वरास[16] हि, तो दुष्ट वळेल काय इतरांला? ७१
मंत्र करुनि कर्णातें देवूनि निरोप जाय अरिपाणी[17],
ज्याचे पीती घटघट घटघट घडिघडि घरीं हि अरि पाणी. ७२

---

१. शाहणा मनुष्य करून दाखवितो. २. गहिंवर आला. ३. इंद्रादिकांचे विशाल-पराक्रमी बाहू हे च कोणी मोठे सर्प त्यास किंवा इंद्रादि वीरश्रेष्ठ व शेष यांस पूज्य आहेत बाहू ज्याचे असा श्रीकृष्ण. ४. उपप्लव्यनगराला. ५. हित-कारक अशा उपदेशाला. ६. चांगला उपदेश करण्यांत प्रवीण. ७. ज्वर व खळ क्रमानें मधुररसीं व उपदेशीं कटुतेतें (कटूपणाला) आणिती. ८. वक्रदृष्टि. ९. नम्रमुख. १०. राक्षसी. ११. ब्रह्मदेवाला. १२. धर्मराजाशी. १३. कलह, युद्ध. १४. नारदाला. १५. धृतराष्ट्र व गांधारी यांस. १६. कृष्णाला. १७. चक्रपाणी, कृष्ण. उत्तरार्ध—ज्या कृष्णाचें घरीं सुद्धां स्मरण होता च त्याचे शत्रु भीतीनें घटकोघटकीं घटाघटा पाणी पीत असत, मग प्रत्यक्ष दर्शन झाल्यावर काय विचारावें, असा श्रीकृष्ण.

अंध म्हणे, 'रे संजय ! जो या दुर्बुद्धिवायसां[1] गमला
प्रभुहंस[2] अहित, तेथें केला तो मंत्र[3] काय सांग मला. ७३
श्रीकृष्ण म्हणे, 'कर्णा ! तूं कुंतीचा कुमार कानीन[4],
त्वद्वदनोत्थ[5] न पडला अर्थिजनांच्या[6] कधीं हि कानीं नं[7]. ७४
ऐसा वदान्य[8] विद्वान् विश्रुत[9] तूं शुद्धविप्रजनदास
चाल, भजोत भ्राते तुज, चातक भजति जेंवि वनदास[10]. ७५
देईल अजातारी मद्वचनें आजि राज्य अभ्रात्या[11].
भ्रात्या न वळेल कसा ? वळवील चि धर्मवायु[12] अभ्रा त्या. ७६
सानुजसुत[13] धर्म तुला नमिल, सयादव करीन मीं नमन,
सच्चित्त[14] गुर्वनादर[15] तोयानादर[16] करी न मीनमनें[17]. ७७
राज्याभिषेक करितिल तुज मजसह विप्र भूमिप[18] दरानें[19];
किंबहुना? घेइल तव तांबोळ क्षिप्र[20] भूमि पदरानें. ७८
चाल कसा, हो राजा, मातेच्या[21] मानसासि दे सुख, गा !
यांचा[22] तुज काकांचा सहवास जसा सितच्छदां[23] सुखगा[24].' ७९
कर्ण म्हणे, 'बा ! देवा ! वदसि स्नेहें चि बा ! दयालो ! हें;
भटकरगें[25] जोडावी स्पर्शमणीची[26] कसी दया लोहें[27]? ८०

१. [दुर्योधनादि] दुर्बुद्धिरूप कावळ्याला. २. कृष्णरूप हंस. ३. कृष्णाने जाते वेळी कर्णास आपल्या रथावर घेतले होते. (मागें ६५ वी आर्या पहा.) अर्थात् तेव्हां त्याच्याशीं झालेली मसलत. ४. कौमार्यावस्थेत झालेला मुलगा. ५. तुझ्या तोंडून निघालेला. ६. याचकांच्या. ७. नकार. ८. दाता. ९. प्रसिद्ध. १०. मेघास. ११. भावावांचून इतरास हि. १२. धर्माचरणरूप वायू. १३. बंधु व पुत्र यांसह. १४. सज्जनांचें मन. १५. मोठ्या लोकांचा अवमान. १६. जलाचा अनादर. १७. माशांचें मन. १८. राजे. १९. शंख—पंत. २०. लवकर. (पृथ्वी तुझें भाषण आनंदानें मान्य करील—सर्व जग तुझी आज्ञा पाळील, असा भावार्थ). २१. कुंतीच्या. २२. दुर्योधनादिकांचा. २३. शुभ्र आहेत पंख ज्यांचे त्यां. २४. चांगल्या पक्ष्याला. (राजहंसाला). २५. योद्ध्याच्या हातातील. २६. परिसाची. २७. लोखंडानें. (शस्त्रानें).

मातृत्यक्ता[1] मजला राधाहस्तीं दिलें अधिरथानें,
मज पांजायां प्रेमें पेय[2] पळ धरित्री तिचीं न धिर थानें. ८१
निष्फळ कसें करूं गा! बा! परिहृत[3]सर्वनतनराधे! तें?
मेल्यावांचुनि द्यावें जोडुनि सुतशोकवतन[4] राधेतें? ८२
दुर्योधन नावांचा, राजा मीं, सर्व राज्यभोग मला,
मूर्त नरक नरका[5]विच्या हृदयाला, जो कृतघ्न, तो गमला. ८३
संस्कार विवाहावधि[6] केले माजे यथोक्त[7] सूतानें[8],
निर्मळपणें[9] निघावें रक्तपटांतूनि[10] केंवि सूतानें? ८४
समरमख[11] चि होवूं द्या, क्षत्रिय सेवूत तल्प[12] न गदानीं[13],
पुण्य रणमरणदानीं[14] वीरां जें, तें न कल्पनगदानीं[15]. ८५
पतितांसि[16] सांवरी मृदु शुचि[17] हा उपदेश केशवा! तूळ[18],
जैसा अंबार्पित[19] अतिरुग्णासि[20] पदार्थलेश वातूळ. ८६
श्रीकृष्णजी! करावा कैसा विश्वासघात अवसानीं[21]?
युद्ध कसें न करावें? आम्हां हा युद्धलाभ नवसानीं! ८७
तरि मग उरलें काय? प्रभुजी! त्यजिल्या जरि प्रतिज्ञा त्यां[22]
न च सोडवेल देवुनि धीर भरवसा अरिप्रति, ज्ञात्या! ८८
राज्य न करील, देइल धर्म मला उमजतां चि हें नातें,
देइन सुयोधना मीं तेव्हां होइल तुम्हांसि हें ना[23] तें. ८९

---

१. कुंतीने टाकलेल्या. २. दूध. ( मला दूध पाजण्यात तिला एका पळाचा हि विलंब सहन होत नसे, इतके मजवर तिचें प्रेम आहे). ३. दूर केली आहे सर्व नम्र जनाची चिंता ज्याने अशा कृष्णा! ४. पुत्रशोकरूप जहागीर. ५. नरपंडिताच्या. ६. लग्नापर्यंत. ७. शास्त्रविहित. ८. अधिरथीने. ९. शुभ्रपणाने. १०. तांबड्या वस्त्रातून. ११. युद्धयज्ञ. १२. शय्या. १३. रोगांनी. १४. रणातील मरण देण्यांत. १५. कल्पवृक्षाचें दान करण्यांत. १६. पातक्यांस, (पक्षी) पडणारांस. १७. शुद्ध. १८. कापूस. १९. आईने दिलेला. २०. अत्यंत अजाऱ्यास. २१. शेवटीं. २२. पूर्वी केलेल्या अर्जुनवधादि प्रतिज्ञा. २३. कर्णाचा लाभ अथवा राज्याचा लाभ ह्यांपैकीं कोणता हि होणार नाहीं.

आटोपिला न पाहिला, तो आटोपेल काय गा! ऊत?
जोडा यश; कवि, होउनि रोमांचव्याप्तकाय, गावूत. ९०
धारातीर्थीं च मिळे सद्गति सत्कीर्ति शुद्धि अधमातें,
राज्यपदभोग नलगे, द्यावा देवा! रणांत वध मातें. ९१
मज समजलें प्रभो! हें त्वद्दृष्टिपुढें उरेल न क्षत्र;
रवि काळरुद्रदृष्टिसि न पुरे, तेथें पुरेल नक्षत्र? ९२
तूं स्वांश्रितप्रतिज्ञा करिसिल, न धरूनि शस्त्र, सत्या, गा!
उरतिल कैसे करिते जाले जे, हरुनि वस्त्र, सत्यागा?' ९३
देव म्हणे, 'राज्य नको? उपदेश अयोग्य काय हे महिम्या?
क्रीबाला कन्यासी तुज कां द्यावी बळें चि, हे महि, म्या? ९४
जेथें भीम धनंजय, बहुदुःसह वासवा रणाजिर तें;
हरिलंघन असतां ही बळिगजसहवास वारणा जिरतें? ९५
धनदानें अधनाचा तुमचा तैसा चि काम रणदानें
म्यां पुरविजेल, द्यावीं स्वर्गें इतरें न कां मरणदानें? ९६
जा, सर्व सिद्ध व्हा; जरि आहे उद्युक्त मानस मराया,
सम रायास तुम्हांस हि भीमार्जुन वरद, शीघ्र समरा या. ९७

१. दुर्योधनप्रेमरूप दुधाचा ऊत. २. आनदाच्या शाहऱ्यांनीं व्यापलें आहे शरीर ज्याचे असे. ३. शस्त्रधारारूपी तीर्थांत. (रणांगणी). ४. क्षत्रिय. ५. कल्पांत-रुद्राच्या दृष्टीला. ६. क्षुद्र तारा. ७. आपल्या आश्रितांची (पांडवांची) प्रतिज्ञा. ८. सत्यपराध–**पंत.** सति द्रौपदीचा अपराध. ९. माझा उपदेश तुझ्या कीर्तीला अयोग्य आहे काय? १०. इंद्राला. ११. रणांगण. १२. बलिष्ठ हत्तीचा सहवास असला म्हणून हत्तीला सिंहाचें उल्लंघन घडणार नाहीं. १३. द्रव्यदानानें. १४. युद्धरूपी दानानें. १५. कल्पवृक्षानें इतरें मरणदानें कां न द्यावीं?=कल्पवृक्षाला सर्व इच्छा पूर्ण करतां येतात, मग त्याने मरणाची इच्छा तरी कां पूर्ण न करावी? १६. सारखे. १७. भीमार्जुन रायास हि व तुम्हांस हि समवरद= भीमार्जुन तुमची व इतर राजांची हि इच्छा सारखी च पूर्ण करतील.

देईल कुरुक्षेत्रीं धर्म प्रभुवर तुम्हां निधनदानें[1]
धनदानें[2] असि येणें न दिलीं उदकें तथाविध[3] नदीनें[4].' ९८
कर्ण म्हणे, 'बा! वचना मान्य न जालों म्हणों नको, पावें,
वध्यें[5] 'वधा चि' म्हणतां, प्रभुनें आग्रह म्हणोन कोपावें? ९९
सत्य उपदेश आम्हीं वरिचेवरि भव्यहेतु[6] झेलावे,
जाणोनि सर्व, देवा! लाविसि कां बोल? हे तुझे [7]लावे. १००
स्वप्नांत पाहिलें नृप शांतनव द्रोण हा[8] हि दाता हे,
घेऊनि उष्ट्रयानीं[9] बैसुनि दक्षिणादिशेसि जाताहे. १०१
रक्तोष्णीषधर[10] सकळ सुश्वेतोष्णीषधर[11] तिघे मात्र,
कृप कृतवर्मा अश्वत्थामा मलयजरजोधवलगात्र[12]. १०२
शुभ्रसहस्रस्तंभ[13] प्रासादीं धरुनि शुभ्र माल्याला[14]
चढला धर्म श्वेतोष्णीषा दत्तोडुपभ्रमा[15] ल्याला. १०३
सहदेव नकुळ सात्यकि भीमार्जुन धर्म तूं हि बापा! हे
सप्त तुम्हीं श्वेतगजीं, ऐसें स्वप्नांत कर्ण हा पाहे.' १०४
श्रीकृष्ण म्हणे, 'बहुधा मरणार्थ चि हे समस्त सुपदेश[16],
कीं तव हृदयें माजा हित हि स्वीकारिला न उपदेश.' १०५
कर्ण म्हणे, 'भेटि असी परलोकीं मात्र बा! दयालो! कीं
कलहीं स्नेह न राहे, हे दुर्लभ म्हणुनि पाँद[17] या लोकीं.' १०६
ऐसें म्हणोनि कर्ण प्रभुला कडकडुनि भेटला सुचिर[18],
मुग्धांस[19] हि जडितकनकमरकतनग[20] न गमला तसा रुचिर[21].

---

१. मरणदानें. २. द्रव्यदाने. ३. तशा प्रकारची. ४. मोठ्या नदीनें. ५. वध करण्यास योग्य अशा मनुष्याने. ६. कल्याणकारण. ७. खेळ. ८. मी कर्ण. ९. उटाच्या वाहनावर. १०. तावडें पागोटें घातलेले. ११. अति शुभ्र पागोटे घातलेले. १२. सुवासिक चंदनाने शुभ्र आहे शरीर ज्यांचे असे. १३. शुभ्र आहेत हजार खांब ज्याला अशा. १४. पुष्पाला. १५. उत्पन्न केला आहे चंद्रकांतीचा भ्रम ज्यानें अशा. १६. चांगल्या राज्याचे स्वामी. १७ पूज्यपाद असे आपण श्रीकृष्ण. १८. पुष्कळ वेळ. १९. भोळ्या मनुष्यांस. २०. जडविला आहे सोनें व पाच यानी असा दागिना. २१. सुंदर.

झाला मंत्र असा, मग आला नगरांत कर्ण परतोन,
पर[1] तो न प्रभु, कोपे वरि[2] परता पूर्ण, आंत परतोन[3]. १०७

---

# अध्याय अकरावा.

विदुर म्हणे, 'बाइ! पृथे! यांसम[4] विश्वांत हे महाखळ गे!
गुरु अंध अंधकूप[5] चि, याचे दुर्योधनादि सुत खळगे. १
वरकड उगेचि, सर्वानर्थांचा एक अंध हा निकर[6],
कीं राधासुत, दोघे हे कुरुकुळकुशळकीर्तिहानिकर[7].' २
कुंती त्यांसि म्हणे, 'हो! भावोजी! शिशुपणीं[8] असें घडलें,
मत्पुत्ररत्न पदरीं राधेच्या मद्दुरीहितें[9] पडलें. ३
जावूं दिलें परकरीं निजशस्त्र तसें अपत्य हा! हा! तें,
बा! निजघात अधैर्यें[10] म्यां केला आपुल्या चि हा हातें. ४
येइल मनासि तुमच्या, तरि हें नातें तयासि कळवीन,
पळवीन भ्रम[11], चित्त स्नेहगुणें[12] आकळूनि[13] वळवीन.' ५
विदुरानुमतें कुंती गंगातीरीं सुताकडे गेली,
न कळत तदुत्तरीयच्छायेंत[14] उगी च ती सती ठेली. ६
कर्णाचा नियम असा ब्रह्मजप करीत निश्चळ रहावें, ७

---

१. परंतु. २. शत्रुत्व-पंत. ३. शत्रुत्वेन ऊन-पंत. शत्रुत्वानें रहित. ४. या कौरवांसारखे महाखळ कौरव च होत. ५. अंधकारयुक्त विहीर. ६. समूह-पंत. ७. कुरुवंशाचें कल्याण व कीर्ति यांचा नाश करणारे. ८. बाल्यावस्थेंत. ९. मत्+दुर+ईहितें=माझ्या दुष्ट कृत्यानें. १०. भ्याडपणानें. ११. 'मी राधेचा मुलगा आहें' हा भ्रम. १२. प्रेमरज्जूनें. १३. बांधून. १४. त्याच्या अंगावरील वस्त्राच्या छायेंत उभी राहिली.

तापेल पृष्ठ[1] तोंवरि रविचें मंडळ निरंतर[2] पहावें. ७
नियमांतीं कुंतीतें पाहुनि म्हणे धरूनि राग मनीं,
'राधेय आधिरथि[3] मीं तुज नमितों, काय कार्य आगमनीं?' ८
कुंती कर्णासि म्हणे, "वत्सा! कौंतेय तूं, न राधेय[4];
'राधे!' यथेष्ट म्हण, परि कर्णा! कर्णासि फार बाधे 'य[5].' ९
हे[6] मात्र न ऐकवती, सुखद मला मनुदुमिलित[7] रा धे य;
कानीन पुत्र माजा, कर्णा! कौंतेय तूं, न राधेय. १०
रविचा औरस[8], पांडुक्षेत्रज[9] तूं, पाळिलें अधिरथानें,
स्रवति पय न, न परिसती[10], जाणों हीं जाहलीं बधिर थानें[11]. ११
मुग्धत्वें[12] त्यजुनि तुला चुकल्यें, आतां स्वबंधु रक्षावे,
साधो! धर्मंक्ष त्वां अनुज[13] स्वतनु[14]जसमान लक्षावे. १२

१. पाठ २. ह्या आर्या लिहून झाल्यानतर कवीने पुढील दोन आर्या लिहून लगेच त्या खोडून टाकल्या आहेत, असे पुढील आर्यांचे क्रमांक अचूक आहेत यावरून स्पष्ट होत असून, कवीने आपला वर्णनौघ हि वळविला असल्याचे कळून येते.

नियमांतीं कुंतीतें पाहुनि सत्पुत्र तो करी नमन;
प्रार्थूनि म्हणे, 'आज्ञामृतपानें तृप्त मीं करीन मन.' ८
त्यांसि तदुत्पत्तिकथा सांगोनि म्हणे, 'स्वबंधु रक्षावे;
पुत्रा! धर्मंक्ष त्वां अनुज स्वतनुजसमान लक्षावे.' ९

३. अधिरथाचा मुलगा. ४. राधेचा मुलगा. ५. 'राधे' या शब्दापुढे जोडलेला 'य' वर्ण. ('राधा' शब्दाने मला त्रास होत नाही; पण 'राधेय' या शब्दाने —मी राधेचा मुलगा आहे असे म्हटल्याने—त्रास होतो.) ६. 'रा' 'धे' 'य' हे वर्ण. ७. 'म' 'नु' 'दु' या वर्णांनी युक्त. 'रा' 'धे' 'य' ह्या अक्षरापुढे क्रमाने 'म' 'नु' 'दु' ही अक्षरें जोडिलीं असता होणारे 'राम,' 'धेनु,' 'यदु,' हे शब्द मला फार प्रिय आहेत. ८. स्ववीर्योत्पन्न. ९. पांडुपत्नीच्या (माझ्या) ठिकाणीं झालेला. १०. [पुत्राचा मधुर शब्द] ऐकती. ११. प्रेमानें पान्हा फुटावयाचा तो फुटत नाही, असा भाव. १२. मूर्खपणानें. १३. धाकटे भाऊ. (धर्मादि). १४. आपल्या मुलाप्रमाणें.

ज्येष्ठ श्रेष्ठ प्रेष्ठ[1] प्रभु तूं, देतिल तुला पद भ्राते,
'जी जी' म्हणतिल, चरणीं वाहतिल धना यशा अदभ्रा[2] ते.
सेवावें सेळीचें कीं रसिकें धेनुचें रसवैराज्य[3]?
त्वां सर्व अनुभवावें भ्रात्यांसह हें यशःप्रसव[4] राज्य. १४
सोडुनि सूतसुयोधनपक्षातें झडझडोनि बा! निघ रे!
विघरो[5] दायादांचें[6] बळ मन, ढेंकुळ जसें जळीं विघरे. १५
तूं आत्मासा[7], पंचप्राण तसे बंधु सत्य, बापा! हें,
नांदा एकत्र, नको द्वेष करूं, मजकडे[8] चि बा! पाहें. १६
बा! कर्णा! तूं अर्जुन रामजनार्दनसमान[9] साजाल,
हंस तसे साधूंच्या सोडूनि तुम्हीं न मानसा[10] जाल. १७
जेंवि महाध्वरवेदीमाजि[11] ससुर[12] सत्यनायक[13] विराजे,
तेंवि विराज[14] स्वपदीं भ्रात्यांसह, वर्णितील कवि राजे" १८
कुंतीवचोवसानीं[15] सूर्यापासुनि असी निघे वाणी,
'सत्य पृथोक्ति, गुरुवचननिरता[16] सुखकीर्तिची नसे वाणी.' १९
कर्ण म्हणे, "सन्माता तोकीं सुख व्हावया असु खरचिती,
किंवा, नेत्रें झांकुनि, व्हाया सुख आपणा, असुख[17] रचिंती[18]? २०
माजा घात पुरवला तुज, त्यांचा मात्र घात पुरवेना!
काय असें अघ[19]? विटलें कां त्वन्मन मज, जसें स्वपुर वेना[20]? २१
न म्हणेल काय माता, 'व्हावा लोकांत आत्मज न नीच'?
रक्षील, धर्म रक्षुनि, जी ती भलती हि आत्मजमनीं च. २२

---

१. अत्यत प्रिय. २. पुष्कळ. ३. सर्व रसात श्रेष्ठ असे तप. ४. कीर्तीचा उद्भव ज्यापासून असे. ५. विरून जावो. ६. भाऊबंदाचे, शत्रूचे. ७. आत्म्यासारखा. ८. माझी तरी कीव कर. ९. बलराम व कृष्ण यासारखे. १०. सरोवरविशेष (पक्षीं) अतःकरण. ११. मोठ्या यज्ञवेदिकेमध्ये. १२. देवांसह. १३. ब्रह्मदेव. १४. शोभ. १५. कुंतीच्या भाषणाच्या शेवटी. १६. वडिल मनुष्याच्या आज्ञा पाळणारास. १७. दुःख. १८. देत्ये. १९. पातक. २०. या नावाच्या जुलमी राजाला.

अरि हि न करिल असें त्वां केलें, कां नख न लाविलें जननीं[1]?
जन नीच मज न म्हणते, परि काय करील नियतिला[2] जननी?
कृष्णें जसी यशोदा त्यजिली, तसि न त्यजीन राधा मीं,
[3]ती यातना न नरकीं होय, कृतघ्ना न जी मरा धामीं. २४
[4]वसु जेंवि वासवाच्या[5], माज्या सानुज सुयोधन मनातें
रंजवितो, मज करितो सर्व तदाश्रित[6]सुयोध नमनातें. २५
अर्जुनवधप्रतिज्ञा केली ती कसि दहांत[7] सोडावी?
तोडावी कुरुपतिची प्रीति कसी भ्या? अकीर्ति जोडावी? २६
म्हणतील प्रकट सकळ लोक मज त्वन्मतानुगा[8] 'भ्याला,'
यावें कर्पूराच्या काय मषीगर्भसाम्य[9] गाभ्याला? २७
मारीन अर्जुनास चि समरीं, धर्मादिकां न चवघां मीं,
[10]करिच्या मर्दीं अलिस[11] जी बहुतीं हि मिळेल काय चवघामीं?
म्हणतों[12] मीं च, नतजननमरण हरी, परम सुख करी नवधा
यद्भक्ति, तत्सख्याच्या प्रभु कवण म्हणेल 'मीं करीन वधा?' २९
जा, भागलीस, कल्पद्रुम[13]संश्रितकाम कां न पुरतील?
स्वस्थ रहा, पांच तुझे सुत सार्जुन कीं सकर्ण उरतील." ३०

---

१. उपजतां च [ गळ्याला ] नख का लावले नाही ? २. नशीबापुढे आई काय करणार? ३. जी यातना नरकात भोगावी लागते, ती च कृतघ्न मनुष्याला घरात भोगावी लागते. कृतघ्न मनुष्याचे अंतःकरण च त्याला निरंतर टोंचत असते, असा भाव. ४. अष्टवसु. ( देवयोनिविशेष ). ५. इंद्राच्या. ६. त्या दुर्योधनाचे आश्रित योद्धे. ७. चारचौघांत. ८. तुझ्या मताप्रमाणे वागणाऱ्या मला. ९. काजळाचें सादृश्य. १०. हत्तीच्या. ११. भुंग्याला. १२. ज्या कृष्णाची नवविधाभक्ति भक्तजनांचे जन्ममरण दूर करून त्यास सुख देते, त्या कृष्णाच्या मित्राला मी मारीन असें म्हणण्याची कोणा प्रभूची छाती आहे? तथापि मी च केवळ तसे म्हणतो, यावरून माझा पराक्रम किती आहे हें तू जाण, असा अर्थ. १३. कल्पवृक्षाचा (श्रीकृष्णाचा) आश्रय करणाराचे मनोरथ.

कुंती म्हणे, 'अभयवर[1] आत्मा, आम्हीं जडें असों देहें,
बहु तुजपुढें न बदवे, यश जोडीं, स्मरण बा! असों दे हें.' ३१

आलिंगुनि कर्णातें भिजउनियां अश्रुनीं पृथा परते,
चित्तीं म्हणे, 'सखे[2] जे होती, फिरतां चि विधि, वृथा पर ते.'

सुज्ञ म्हणति, 'कोपावा विधि, परि ज्याचे[3] न पाय कोपावे,'
धर्माप्रति वात्सल्यस्वीकृतदूतत्व[4] देव तो पावे[5]. ३३

भेटुनि अजातरिपुला संक्षेपें वृत्त कथुनि आधीं, तें
रात्रौ सविस्तर कथी, त्याच्या नाशावयासि आधींतें. ३४

कृष्ण म्हणे, "खळ न वळे, कथिला धर्मार्थलाभ[6] सुगम[7] हि म्या
श्रमले नारद कण्व हि बोधुनि त्या मूर्तपापयुगमहिम्या[8]. ३५

भीष्में स्वकथा कथिली, 'सत्यवतीप्राप्तिकाम[9] जाणूनीं,
होऊनि ऊर्ध्वरेता[10] शीघ्र दिली ती पित्यशसि आणूनीं. ३६

दिधलें विचित्रवीर्या सत्यवतीच्या सुता पद[11] भ्रात्या,
त्याचे विवाह, तन्मृति[12] ऐशा कथिल्या कथा अदभ्रा[13] त्या. ३७

प्राणांस ही त्यजिति परि न त्यजिती क्षण हि जीप्रति ज्ञाते,
कथिली मातेच्या[14] ही वचनें त्यजिली न जी प्रतिज्ञा, ते. ३८

जन्म व्यासापासुनि कथिलें धृतराष्ट्रपांडुविदुरांचें,

---

१. तू दिलेला 'अर्जुनेतरास मी मारणार नाहीं' हा अभयवर आमचा आत्मा—प्राण आहे; त्यावांचून हे आमचे देह चेतनारहित होत २. दैव फिरले म्हणजे जे मित्र ते च निष्कारण शत्रु होतात. ३. ज्या कृष्णाचे. ४. प्रेमाने अंगिकारिलें आहे दूतत्व ज्यानें. ५. आला. ६. धर्म व अर्थ या पुरुषार्थांची प्राप्ति. ७. सुलभपणें. ८. मूर्तिमंत पापयुगाचा (कलियुगाचा) महिमा च अशा दुर्योधनाला. ९. सत्यवती प्राप्त व्हावी ही [पित्याची] इच्छा. १०. ब्रह्मचारी. ११. राज्य-पद. १२. त्या विचित्रवीर्याचे मरण. १३. पुष्कळ. १४. सत्यवतीच्या 'गृहस्थाश्रमी होऊन प्रजोत्पादनाने वंशरक्षण कर,' या आज्ञेवरून हि.

सर्वासुखदाराजकपीडितलोकाधिशैलभिदुरांचें.[1] ३९
क्षितिनें[2] अंध त्यजिला, वरिला जो पांडु उचित राज्याला;
चाखील तैल रसना[3] काय त्यागूनि शुचितरा[4] ज्याला? ४०
'विश्व ज्येष्ठ श्रेष्ठ प्रेष्ठ[5] असें ज्या स्वपितृनिभा[6] गातें,
तो पांडव धर्म कसा सांग नव्हे योग्य या विभागातें? ४१
गाती अजातरिपुच्या हे सर्व परा[7] सुयोधना! महिम्या,
द्यावी त्यास चि वसुधा नुरवूनि परासुयोधनाम[8] हि म्या. ४२
तात[9] चि योग्य नव्हे, मग राज्याला योग्य तूं कसा? वद, रे!
पद रेखिलें कपाळीं विधिनें त्यांच्या[10], तुज्या अयश सद्रे[11]!'
ऐसें बहु भीष्म वदे, गुरु[12] हि म्हणे, 'मिळुनियां स्वभावांसीं
भोगीं राज्यसुख; वृथा कां करिसी भेद सुस्वभावांसीं[13]? ४४
हा[14] ब्राह्मण भीष्माश्रित[15] साक्षात् त्वद्दत्तवृत्ति[16] कारा या,
सद्हितजनसंपर्कें[17] सुकृताची होय मृत्तिका, राया! ४५
मीं गुरु त्यांचा तुमचा, त्यांचें तुमचें हि सत्य जें विहित,
तें चि कथावें म्यां, या अश्वत्थाम्या सुतासि जेंवि हित. ४६
धर्माला भीष्मप्रभुवचनें राज्यार्धभाग दे, वांचें[18];
न भलें आग[19] भल्यांचें, क्षण तरि हि पचेल आग देवांचें? ४७
जिकडे नदीज तिकडे मीं, मन्मन अक्षकाळकेतुकडे[21];

१. सर्वास दुःख देणारी जी अराजक स्थिति तीमुळें त्रस्त झालेल्या लोकांच्या चिंतापर्वतास वज्राप्रमाणे फोडणाऱ्या. २. पृथ्वीने. ३. जिह्वा. ४. अति निर्मळ अशा तुपाला. ५. अत्यंत प्रिय. ६. स्वपितृतुल्य अशा. ७. श्रेष्ठ महिम्या. ८. मृतवीराचे नांव हि न उरविता, अर्थात युद्धप्रसंग न आणिता किंवा शत्रूचे प्राण आणि योद्ध्याचे नांव न उरविता, म्हणजे निष्कंटक करून. ९. धृतराष्ट्र. १०. धर्माच्या. ११. सज्जनशत्रो! १२. द्रोणाचार्य. १३. चांगला आहे स्वभाव ज्याचा अशा पांडवांशी. १४. मी द्रोण. १५. खोडलेला पाठ—**त्वदाश्रित.** १६. तूं दिलेली उपजीविका मला केवळ तुरुंग आहे. १७. सज्जनशत्रूच्या संगतीने. १८. जीव बचाव. १९. अपराध. २०. हनुमान्—**पंत.** २१. अर्जुन—**पंत.** हनुमान आहे ध्वजावर ज्याच्या तो.

सोडुनि सदन्न सेविल कोण सुधी[1] अशुचि वाळके तुकडे?[2]
विदुर हि सभेंत वदला तातातें, तें हि आयका सारें,
केविनें[3] चि तृप्ति कर्णा द्यावी, तृषितासि काय कासारें? ४९
'लीळेनें उद्धरिला स्पष्ट बुडाला चि वंश पैर[3] मागें;
कां आजि बुडों देतां या पामर[4]पापपौत्रपरमागें? ५०
बुडविल कुळ हा लोभी, हा क्रोधी, हा असाधु, हा कामी,
कां न तुम्हीं ही परिसा? मारित आलों अशा चि हाका मीं.
बापाजी! आम्हीं हीं चित्रें, तुमचा अनुग्रह चितारी,
निर्मुनि शोभवुनि पदीं स्थापुनि पूजुनि अनुग्रह चि तारी. ५२
गेली वृद्धपणीं[6] मति, जोडा सुतपोवनांत सुतपातें,
धृतिला पळउनि मूर्छा न शिरो तुमच्या मनांत सुतपातें. ५३
घ्या धृतराष्ट्रासि, चला, ही जसि तसि वृत्ति तीं न सापाया,
कीं सदनांतुनि काढा, न करूनि उपाय, तीनें[11] सापा या. ५४
राज्य कराल तरि, जना तारुनि, आपण तराल राघवसे;[12]
त्या काय राज्य, जेथें कामक्रोधादि दुस्तराघ[13] वसे? ५५
स्वपर[14]विनाशोपेक्षा कां करितां? व्हा प्रसन्न, यश रक्षा.
भोगार्थ[15] काय रामें होऊं न दिलें कळत्र[16] वश रक्षा[17]?' ५६
चिंताग्नीनें अंतःसंतप्ता सर्वकाळ, जी चुल, ती

१. शाहणा. २. तृषितास सरोवर जी तृप्ति देते, त्यापेक्षा विद्वज्जनाच्या बोधपर भाषणाने होणारी तृप्ति अधिक श्रेष्ठ होय, असा भाव. ३. परंतु. ४. क्षुद्र व पापी असा जो नातु दुर्योधन त्याच्या मोठ्या अपराधाने. ५. आपली कृपा च आम्हाला जन्म देऊन, शोभा देऊन, राज्य देऊन व मान देऊन शत्रूपासून रक्षिते. ६. म्हातारपणी बुद्धिभ्रंश झाला. ७. पुत्रपतनाने. ८. वनात जाऊ चला. ९. स्थिति. १०. सनाश-पंत. ११. कर्ण, दुर्योधन व शकुनि. १२. दाशरथी रामासारखे. १३. भयंकर पाप. १४. आपल्या व दुसऱ्याच्या नाशाच्या कारणाची उपेक्षा-हेळसांड. १५. [ केवळ ] भोगसुखासाठी. १६. स्त्री. (सीता). १७. रावण-पंत.

बहु वदली[1], वाहतसे बहु तुमची सर्व काळजी खुलती. ५७
"दुर्योधना[2]! तुजे हे जन्मप्रद[3], हे हि विदुर भावोजी,
त्यांसह म्हणत्ये होउनि बद्धांजलि ज्यांसि कुरुसभा 'बो! जी!'
देवव्रत[4] मामाजी प्रभु यांचें राज्य, भारतापसदा[5]!
गुरुचा प्रसाद नसतां हरिस हि दे राज्यभार ताप सदा. ५९
भज यांला, हे कामद[6] ईश्वर, हितबोधं पारिस, हे व्यास,
धर्मासीं सख्य करीं, स्वर्मीं हि करूं नको चि हेव्यास. ६०
हे[7] ही पांडु हि विदुर हि या यांच्या भोगमूर्ति[8], हे शिव रे!
पाण्यापरीस[9] पातळ करिते तुज, परि नव्हेत हे शिवरे[10]. ६१
धर्मन्याय पहातां, धर्मास चि सर्व राज्य ओपावें,
मामाजीनीं तुजवरि त्या द्यूतोपक्रमीं[11] च कोपावें. ६२
द्यावें[12] सर्व जिहीं जें, अर्ध, करुनि साम, देववावें तें,
'हूं' म्हण, भेटों आला तुज पसरुनि वामदेव वांवेतें[13]. ६३
शक्रांस[14] हि न मिळालें, मूर्खा! मिळतें कसें तुला यश तें?
महिषघ्नीभंग[15] रणीं करिजेल प्राकृतें[16] लुलायशतें[17]?" ६४
धृतराष्ट्र म्हणे, "पुत्रा! सोमापासुनि[18] ययाति जो सावा[19],

१. गांधारी. २. कृष्ण गांधारीच्या भाषणाचा अनुवाद करीत आहे. ३. धृतराष्ट्र–**पंत.** ४. भीष्म. ५. भरतकुलांतील नीचा! ६. इच्छित पूर्ण करणारे. ७. धृतराष्ट्र. ८. उपभोगार्थ निर्मिलेल्या मूर्ति. ( ईश्वर स्वतः उपभोग घेत नाहीं, म्हणून त्यांच्या धातुमूर्तींला नैवेद्यादि समर्पण करितात. त्याप्रमाणे भीष्म ब्रह्मचारी असल्यानें त्यांनी उपभोगार्थ या तीन मूर्ति निर्मिल्या आहेत, असा भाव). ९. [ भीष्मांनी ] तुझा तेजोभंग केला असता. १०. शिवराळ. ११. द्यूतास आरंभ केला त्या वेळीं. १२. ज्यां तुम्हीं सर्व राज्य द्यावयास हवें होतें, त्यां तुम्हां आतां अर्धें द्यावें लागत आहे. १३. तुला हात पसरून शंकर भेटों आला असें समज; ही तुजवर देवाची केवढी कृपा! १४. पोथी लिहिली गेल्यावर कवीनें ही आर्या रचून येथें सामील केली आहे. १५. दुर्गेचा पराभव. १६. क्षुल्लक. १७. रेडा–**पंत.** १८. कौरवांच्या आदिपुरुषापासून. ( चंद्रापासून ). १९. सहावा.

ज्याच्या भुजें प्रजाभर, भूभर शेषें तसा चि सोसावा. ६५
तत्पुत्र पांच, त्यांत ज्येष्ठ यदु समर्थ शुक्र[1]कन्याभू,
त्या [2]अवशा तद्गुरुचीं शापोक्ति 'प्राप्त होय [3]अन्या भू.' ६६
[4]नें करी गुरुवचन म्हणुनि ज्येष्ठा यदुवरि हि होय भू रुसती,
अनुसरली च कनिष्ठा [5]असुरसुतेच्या सुता हि पूरुस ती. ६७
[6]यत्कीर्तिपरिस अधिक न तृप्ति सुधेची सुरांसि दे [7]वापी.
[8]प्रपितामह प्रतीप प्रभु, त्याचा ज्येष्ठ पुत्र देवापी; ६८
वदल्या प्रज्या असें कीं, 'आम्हां भर्ता नको चि हा [9]कुष्ठी.'
काय करावी श्वानें केली चाखोनि जी सुधा उष्टी? ६९
रडत प्रतीप वदला, 'या हि [10]भवविषोदधीस देवा! पी.'
जेव्हां तपोवनाला गेला सदन त्यजूनि देवापी. ७०
होता पितृमृतिसमयीं दूर महाराज बाल्हिक भरतसा;
शंतनुला दे क्षिति, कीं याचा राज्यांत मात्र न भर तसा. ७१
तैसा चि अंध म्हणवुनि मीं अनुचित जाहलों [11]अवन्यवना,
अनुभविल कसा [12]मादृश गहना राज्या जसा [13]अवन्य वना? ७२
पांडु कनिष्ठ हि राजा, कीं विश्व हि तृप्त [14]यत्सुगुणपानें,
कार्य कृशें हि [15]सजीवें, तें होइल काय पुष्ट [16]कुणपानें? ७३
[17]राज्यानर्ह पिता मीं, कैसा राज्यार्ह तूं चि? वद नातें.
परधन हरुनि न लाजसि, दाखवितां या दहांत वदनातें. ७४

१. शुक्रकन्या देवयानीपासून झालेला. २. प्रतिकूल, पितृवचन न पाळणाऱ्या. (मागें आदि० अ० ११, ६५ ते ६६ गीति पहा). ३. पुरु—पंत. ४. ही आर्या पोथी लिहून झाल्यावर रचून कवीनें पोथीच्या समासात लिहिली आहे. ५. शर्मिष्ठेच्या. ६. ज्या पुरुषाच्या कीर्तीपेक्षा. ७. विहिर. ८. पणजा. येथून देवापीची कथा सुरू झाली. ९. कुष्ठ—कोड भरलेला. १०. हे शंकरा! संसाररूप विषाचा समुद्र च अशा मला हि तूं पी. (मला मरण दे). ११. पृथ्वीपालनाला. १२. माझ्यासारखा अंध. १३. वनचर नसलेला. १४. ज्या पांडूच्या सद्गुणसेवनानें. १५. जीवंत अशा. १६. प्रेतानें. १७. राज्याला अयोग्य.

'धर्मांचें राज्य दिलें सदनुमतें[1] तैंपित्यासि[2] मत्तातें[3],
मत्ता! तें तुज नुमजे, कोण करिल सावधान मत्तातें?" ७५
वदला यापरि बा, परि खापरिला परिस तैंवि त्या बोध;
तो धन्य आग्रही, बा! तैसा न मिळेल केलिया शोध. ७६
बहु मीं हि भागलों बा! बोधुनि दगडासि कां न भागावें?
खळहृदय शून्य[4] केवळ, शून्य[5] असें व्यर्थ कां नभा गावें? ७७
भेदित[6] होतों, देउनि राज्य सकळ, करुनियां सुवर्णन[7], गा!
परि न ढळे कर्ण, तशा यत्नलवें[8] ढाळितों सुवर्णनगा[9]. ७८
देतो प्राण, न हृतधन[10], दृढ निजकर्माभिमान चोरा ज्या,
युद्धार्थ कुरुक्षेत्रा गेला घेवूनि सैन्य तो राज्या[11]! ७९
ज्ञो मीं हितार्थ गेलों, कीं, दुःखीं मग्न ससुत अंध न हो,
त्या मज करीत होता दुर्योधन नृप धरूनि बंधन, हो! ८०
वदले न युक्त कुरुगुरु[12] सभ्यकवि[13] विदुर मात्र वदला हो!
एकें काय करावें? परि म्हणतो, 'धर्म राज्यपद लाहो[14].'" ८१
धृष्टद्युम्न शिखंडी द्रुपदनृप विराट चेकितान तथा,
युयुधान, भीमकर्मा भीम हि, ज्यांची परा असह्य कथा, ८२
ऐसे धर्में केले सातां अक्षौहिणींत सात पती[15],
जे तपन[16] ताप द्याया रात्रि हि अरिघूकमानसा[17] तपती. ८३
द्रोण कृप शल्य सैंधव[18] गुरुनंदन[19] शकुनि कर्ण कृतवर्मा
भूरिश्रवा सुदक्षिण, बाल्हिक विख्यात जो सुकृतवर्मा[20], ८४

---

१. सज्जनांच्या अनुमतीने. २. पाडूला. ३. भीष्माने. ४. विवेकहीन. ५. पोकळ. ६. कौरवांपासून फोडीत होतो. ७. स्तुति करून अथवा तू पाडवांकडे अल्यापासून फायदे किती आहेत याचे वर्णन करून. ८. अत्यल्प प्रयत्नाने. ९. मेरुपर्वताला. १०. हरण केलेले धन. (तुमचे राज्य). ११. दुर्योधन. १२. भीष्मादिक. १३. सभ्यक=चांगले. १४. मिळवो. १५. नायक, सेनापति. १६. सूर्य. १७. शत्रुरूप घुबडांच्या मनाला. १८. जयद्रथ. १९. अश्वत्थामा. २०. पुण्य हें च आहे चिलखत ज्याचे असा.

अक्षौहिणी हि अकरा कल्पुनि त्याचें* पती असे अकरा
भ्रात्यांसि म्हणे, 'यांच्या सत्कारीं आळस क्षण हि न करा.
मग भीष्मासि सुयोधन नमुनि म्हणे, 'व्हा तुम्हीं च सेनानी[1],
सुज्ञसमर्थपतिविना जय कैसा पाविजेल सेनानीं? ८६
ख्यात[2] यशस्वी इच्छामृत्यु[3] तुम्हीं कुरुकुलांत वासवसे[4],
स्थिर तुमच्या धन्वीं[5] यश, कीं सुरतरुच्या फुलांत वास वसे.
सेनापति मुख्य तुम्हीं व्हाल, तरि विभो! करूनि शुद्ध रण,
लीलालेशें मद्रिपुविषवृक्षांचें[6] कराल उद्धरण[7]. ८८
अरिबळ[8] तसें तुम्हां, तम[9] दावीना जेंवि वंदन दीपातें,
तुमचा प्रताप रिपुतें नुरवि, जसा घटज[10] नंदनदीपातें[11]. ८९
चालों पुढें तुम्हांला करुनि, जसे करिति लोक रात्रि दिवा,
केला त्या गांगेयें[12] विस्मय जो काय तो करा त्रिदिवा[13].' ९०
भीष्म म्हणे, 'काय करूं? समयीं शरणागता न सांडावें,
आलें असें कपाळा, कीं स्वभुजासीं स्वयें चि भांडावें. ९१
स्वहित पुसतील पांडव, तरि सांगुनि संकटांत तारीन,
प्रकट[14] प्रहार पहिला केल्यावांचुनि परा न मारीन. ९२
ज्यासीं युद्ध करावें म्यां, क्षितिवरि कोण गा! असा मान्य?
कीं मजवरि प्रसाद श्रीमद्गुरुचा[15] जगीं असामान्य. ९३
मत्सम एक धनंजय[16] योद्धा गुरुसंकटीं[17] हि अभ्रांत[18];
प्रकट न भिडेल मजसीं, इच्छील मयूर काय अभ्रांत[19]? ९४

१. सेनापति. २. प्रसिद्ध. ३. इच्छेप्रमाणे ( वाटेल तेव्हा ) आहे मृत्यु ज्यास. ४. इंद्रासारखे. ५. धनुष्यांत. ६. माझ्या शत्रुरूप विषारी वृक्षाचे. ७. उन्मूलन. ८. शत्रुसैन्य. ९. अंधकार. १०. अंगास्ति. ११. लहानमोठ्या नद्यांचा पालक जो समुद्र त्याते. १२. स्कद्-पंत. १३. स्वर्गाला. १४. स्पष्ट. ( शत्रूकडून युद्धास सुरुवात झाल्यावाचून मी शत्रूस मारणार नाहीं ). १५. भार्गवरामाचा. १६. अर्जुन. १७. मोठ्या संकटांत. १८. भ्रमरहित. १९. मेघांचा नाश. * त्यांचे (?).

सद्गुरुलब्धास्त्रबळें क्षणमात्रें करिन निर्मनुष्य जगा,
सुर असुर हि न मज पुढें टिकतिल, उरतिल कसे मनुष्यज गा!?
न घडेल पांडवक्षय, दहनांत हि शुचि सुयोधना! वांचे,
परि अनृण व्हावया मीं मारीन अयुत सुयोध नामांचे. ९६
स्पर्धा करितो मजसीं सूतात्मज, हा करो प्रथम रण हो!
कीं मज चि पांडुपुत्रांपासूनि प्राप्त सुप्रथ मरण हो.' ९७
कर्ण म्हणे, 'कुरुराया! जें समरीं पावतील हे मरण;
तें च करिन विजयासीं रक्षाया हें स्वमित्रहेम रण.' ९८
अभिषेक स्वीकारुनि जेव्हां गांगेय होय सेनानी,
तेव्हां वंदुनि केले बहु जयजयकार सर्व सेनानीं. ९९
जाले भूकंपोल्कोपाताद्युत्पात तेधवां बहुत,
कीं होणार तदस्त्रज्वलनीं बहु शस्त्रभृत्कदंब हुत. १००
जो द्रोणाचार्याचा द्रुपदें यत्नें विनिर्मिला काळ
तो धृष्टद्युम्न करुनि निजसप्ताक्षौहिणीचमूपाळ, १०१
धर्में सेनापतिपति केला सुमहायशा धवळवाजी
वदले ज्यासि सुर, 'वधुनि अस्मद्रिपु, जग यशें धवळवा जी!'
जाय कुरुक्षेत्राला आधीं धृतराष्ट्रसुत, अनंतर तो
जो साधु म्हणे, 'मन हरिचरणीं व्हायासि सुख अनंत, रतो.'

---

१. सद्गुरूपासून मिळविलेल्या अस्त्रांच्या जोरावर. २. मनुष्यापासून उत्पन्न झालेले. ३. पवित्र मनुष्य अग्नीत उडी टाकली तरी वाचतो. ४. ऋणमुक्त. ५. दहा हजार. ६. नामधारी. ७. कर्ण. ८. प्रख्यात. ९. हे भीष्म. (येथें अनेकवचन औपरोधिक योजिलेलें दिसते). १०. आपलें मित्ररूपी सुवर्ण. ११. भूकंप, तारकापतन इत्यादि अशुभ चिन्हें. १२. त्या भीष्माच्या अस्त्ररूप अग्नीमध्यें. १३. शस्त्रधारी वीरांचा समुदाय. १४. भस्म. १५. अग्न्याराधनेनें. १६. आपल्या सात अक्षौहिणी सेनेचा नायक. १७. अर्जुन. १८. शुभ्र करा. १९. नंतर. २०. धर्मराज. २१. पुष्कळ.

तेथें भेटुनि केला हर्षित शंकित[1] बळें[2] अजातारी,
तो हि, जयांचा[3] द्व्यक्षरें[4] उपदेश महाभ्रमीं अजा[5] तारी. १०४
बळ धर्मासि म्हणे, "बहु वदलों कीं योग्य केशवा! समता[6],"
परि अर्जुनप्रियास्तव जाली न मदुक्ति केशवास मता[7]. १०५
कृष्णावांचुनि कांहीं संसारीं प्रिय मला नसे लव ही,
हे मूर्ति[8] मज जसी, तसि धनिकाला बहुमता नसेल वही[9]. १०६
भुलला हा तुज जैसा भागवताच्या सुभागवत नाचां[10],
न असा प्राकृत[11] हि झटे साधाया निज सुभाग[12] वतनाचा. १०७
अभिमान यास तुमचा जैसा, ऐसा न आमचा कांहीं,
त्वत्कार्य या[13] भुजांहीं शकटाचें[14] जेंवि काम चाकाहीं. १०८
हा जिकडे तिकडे जय, येतों; संबंधिवध[15] पहावेना,
भेटालं पुन्हां, मजला तीर्थस्नानोद्यता[16] रहावेना.' १०९
जातां मागुनि भगवान् बलभद्र बळें निजानुजा[17] फिरवी[18],
मिरवि प्रभु प्रभूत[19] प्रेम, प्रेमाश्रु लोचनीं जिरवी. ११०
रुक्मी[20] सहाय व्हाया आला अक्षौहिणीबळासहित,
कीं वाटलें करावें धर्माचें, त्या तशा खळास, हित. १११
तो प्रभुसमक्ष[21] गर्वेंकरुनि म्हणे अर्जुनासि, 'साधि[22] न हो,'

---

१. अकस्मात येण्याचें कारण न समजल्यामुळें शकाग्रस्त. २. रामें–**पंत.** ३. ज्या कृष्णाचा. ( विष्णूचा ). ४. तपेति–**पंत.** (प्रलयकालानतर सृष्टि उत्पन्न कशी करावी असा ब्रह्मदेवास भ्रम झाला; तेव्हा 'तप तप' म्हणजे 'तपश्चर्या कर' असा विष्णूनीं त्यास गुप्तरूपें उपदेश केला, अशी भागवतांत कथा आहे ). ५. ब्रह्मा–**पंत.** ६. उभयपक्षीं उदासीन वृत्ति. ७. मान्य ८. कृष्णमूर्ति. ९. जमाखर्चाची वही. १०. नृत्यास–**पंत.** ११. सामान्य मनुष्य. १२. योग्य वाटा. १३. कृष्णाच्या बाहूनीं. १४. गाड्याचें. १५. आप्तांचा ( कौरवपांडवांचा ) वध. १६. तीर्थस्नानाविषयीं तयार झालेल्या मला. १७. आपल्या भावाला ( कृष्णाला ). १८. परतवी. १९. पुष्कळ. २०. रुक्मिणीचा भाऊ. २१. कृष्णासमक्ष. २२. चितातुर.

भ्यालां कां? लीळेनें तुमचें मीं सर्व कार्य साधिन, हो! ११२
भीष्मकसुत[1] मीं परि भुजवीर्यें[2] केवळ नव्हें चि भीष्मकसा[3];
वांचेल मजपुढें तो द्रोण कसा, तो हि वृद्ध भीष्म कसा? ११३
द्या भाग कर्ण, कीं कृप, कीं भीष्मद्रोण, सर्व अथवा द्या,
धर्मस्थापनमद्यश[4] गावू वाजवुनि चित्ररथ वाद्या.' ११४
जेंवि अमृतप्रदाला[5] कांजिक[6] दावूनि 'सुरस हा, यातें
प्या,' पामरें म्हणावें, तो[7] हि म्हणे तेंवि सुरसहायातें[8]. ११५
सस्मितमुख[9] नर[10] नारायणमुख पाहुनि म्हणे, "सहाय मला
श्रीगुरुपदप्रसाद चि बहु; तदितर तुच्छ सर्वथा गमला. ११६
भ्यालों कसें म्हणेन? क्षत्रिय मीं, द्रोणशिष्य, हरदास;
उखळीन ईश्वरीच्या[11] हरिच्या[12] हि महाभयावह रदांस[13]. ११७
करितां कृपा, सुरासुर मोडुनि, जाळूनि खांडवास, मयीं[14],
सांग सहाय तशा त्या होता जन कोण पांडवा समयीं? ११८
खळ कालकेय, दुर्मद गंधर्व, निवातकवच यां गमला
हा हर, तेव्हां होता समरांत सहाय कोण सांग मला? ११९
हा कौरवांस हरिहरदास, जसा, नकुळ[15] घोणसां[16] गमला
काल चि विराटनगरीं; होता सुसहाय कोण सांग मला? १२०
आराधुनि हरिहरगुरु, येतां ही तत्प्रसाद हातातें,
'भ्यालों' म्हणेल त्याच्या कां न म्हणावें दहांत 'हा!' तातें?
नाहीं भ्यालों, नाहीं किमपि सहायप्रयोजन[17] हि, राया!
जा कीं, अन्यत्र रहा, धर्मबळ असे द्विषद्यश[18] हिराया." १२२

१. भीमकाचा पुत्र. २. बाहूच्या पराक्रमाने. ३. ढेकणासारखा. ४. धर्माची राज्यावर स्थापना करण्याविषयींचे माझे यश. ५. अमृत देणारास. ६. काजी. ७. तो रुक्मी. ८. देव आहे सहाय ज्याला अशा अर्जुनाला. ९. मदहास्य आहे मुखावर ज्याच्या असा. १०. अर्जुन. ११. भवानीच्या. १२. सिंहाच्या. १३ दांतांस. १४. मयासुराचे ठिकाणी. १५. मुंगुस. १६. सर्पविशेषास. १७. मदतीची अपेक्षा. १८. शत्रूचें यश.

दुर्योधनाकडे मग जातां जालें असें[1] चि, गर्व तसा
कोणाला बुडवीना अयशीं, उदकीं शिरस्थ[2] पर्वतसा? १२३

---

# अध्याय बारावा.

अंध कुरुक्षेत्रकथा पुसतां, संजय म्हणे, 'कृतात्यनयें[3]
धर्माकडे उलूकाभिध[4] दूत प्रेषिला तुज्या तनयें.' १
धर्मासि म्हणे[5], 'धरिता जाला व्रत मूषकार्थ ओतू[6] तें
स्वीकारिलें म्हणुनियां आलें तत्साम्य देत ओ तूतें. २
आजिवरि तुजें धार्मिकपण आम्हां सत्य भासलें होतें,
म्हणति कवि स्तविलें परि लोभें साधुत्व नासलें हो! तें. ३
समरीं[7] स्वधर्म, सुगतिद; यांत तरि सुरुचि असो, न हे कुरुची[8];
कुं[9] रुचीका मासीसी न सिवे क्लीबासि कीर्ति हो! कुरुची.' ४
कृष्णासि म्हणे, 'दावूं ऐशा आम्हीं हि इंद्रजालातें[10]
हें [11]किति? धीरांसि न दे भय, पूजी नित्य इंद्र ज्याला [12]तें. ५
स्मर वचन[13], वधुनि कौरव दे हें धर्मासि राज्य साधूनीं,
[14]कीं अर्क देखिजेतो देखोनि असत्यसंध[15] साधूनीं. ६

---

१. रुक्मी याचप्रमाणे फजीती पावला. २. डोक्यावरील. ३. केला आहे अत्यंत दुराचार ज्यानें अशा पुत्रानें–दुर्योधनाने ४. उलूक नावाचा. (उलूक हा शकुनिपुत्र). ५. दुर्योधन उलूकाचे मुखाने म्हणतो. ६. मार्जार उंदराकरितां जे ढोंगीपणाचे, व्रत स्वीकारतें, तें तू स्वीकारलें, म्हणून त्याची बरोबरी सहज च तुझ्याकडे आली आहे. ७. युद्ध. ८. आवड नसणें, वीट येणें. ९. हो! कुरुची (कौरववंशाची) कु (पृथ्वी–राज्य) [आणि] कीर्ति, रुचीका (रुईच्या चिकाला), मासीसी, क्लीबासि न शिवे. १०. कपटजालातें. ११. हे त्वत्कृत इंद्रजाल किति? १२. वज्र. १३. धर्माला राज्य देईन ही प्रतिज्ञा. १४. कारण. १५. मिथ्याप्रतिज्ञ. (खोटी प्रतिज्ञा करणाराचें मुख पाहिलें असतां पापाच्या निवारणासाठी सूर्यदर्शन घ्यावें लागतें).

आहेत भृत्य[1] बहु, मीं स्पर्श करिन न तुज कंसभृत्यातें,[2]
जो अयशोवायसभृत्[3] स्पर्शेना कीर्तिहंसभृत्[4] त्यातें.' ७
भीमासि म्हणे, 'रण तुज काय? तुवां विविध अन्न रांधावें,[5]
सुजलों अससिल,[6] आधीं मागाया अन्न मन्नरां[7] धावें. ८
तूवरका![8] न रणीं तूं स्पष्ट पुरस्कार्य,[9] पुष्कळीं[10] अशनीं,'
तूं किति बोळा![11] अक्षम दुःशासनरक्त प्यावया अशनी.[12]' ९
माद्रीपुत्रासि म्हणे, "म्हणसि 'करुनि युद्ध' कां 'मरेन'? कुळा
रक्ष, रहा सानुज,[13] दे जळ, हा ही शुद्ध काम,[14] रे! नकुळा!" १०
सहदेवासि म्हणे, 'त्वां कां रे! जीव न दिला? परवशी[15] स्त्री
कसि देखिली? सहाता दासीचा हि न विलापरव[16] शस्त्री.[17]' ११
विजयासि म्हणे, 'आम्हां आहे दिव्यप्रभाव धनु ठावें,
त्वां खद्योतें[18] इच्छुनि कुरुगुरुभानुप्रभावध[19] नुठावें.[20] १२
कंसारि[21] सहाय तुजा, ठावा न असेल कां मला खोटा?
वरि बरवा, आंत न जो, तो काय करील काम लांखोटा?[22] १३
कर्ण नदीसुत कुरुगुरु कोणें[23] रणीं पळविना शतमखातें?
यां जिंकितासि तरि, जरि रविसि, करुनि बळविनाश,[24] तम खातें.
क्रिति दोघे कृष्ण तुम्हीं? असतां शत, जिंकिते तथापि केवी,[25]

१. चाकर. २. कसाच्या दासाला. (तुला). ३. अपयशरूपी कावळ्यास धारण करणारा. ४. कीर्तिरूप राजहंसास धारण करणारा. ५. शिजवावें. ६. हाव सुटला असेल तर. ७. माझ्या लोकांकडे, नोकरांकडे. ८. तूवरक=मिशा नसलेला, खाडू. ९. पुढें करावयाजोगा. १०. पुष्कळ जेवण्याच्या कामी. ११. पोरा, अर्भका! १२. वज्र. १३. धाकट्या भावांसह. (सहदेवासह). १४. [ पितरास जलांजली देणें ] हा हि काम (हेतु) पवित्र च आहे. १५. शत्रूच्या अधीन झालेली. १६. रोदनशब्द. १७. शस्त्रधारी. १८. काजव्यानें. १९. द्रोणरूप सूर्याचा तेजोवध. २०. न उठावें. २१. कृष्ण. २२. भांड्यांस लाविलेला लाखेचा लेप, लाखलोटा. २३. कर्ण, भीष्म व द्रोण त्यांतन कोण. २४. प्रकाशसामर्थ्याचा नाश. २५. कर्णादि वीर.

हे[1] तों असोत यांची समरक्षेत्रांत जय कथा पिकवी. १५
रे[2] कूपदर्दुरा! किति टुरटुर करिसी? वृथा न भाग,[3] रहा;[4]
काय तुझें भाग्य? अरे! मंदा! त्वां पाहिला न सागर हा.[5]' १६
यापरि उलूकवदनें ऐकविल्या विषकटूग्र[6] संदेशें[7]
केले वृद्ध विराट द्रुपद हि बहु तप्त त्या सुमंदेशें.[8] १७
खलवाक्[9] कोप परांच्या[10] उठवी, होता चि भीमयोधमनीं;[11]
काय म्हणे कल्पांतीं रुद्रालिकनयनदहन,[12] 'यो धमनी'? १८
आला कोप जन्हि तन्हि न सोडिति सहज क्षमेसि सुरासिक ते,
[13]येते, तरि यांपासीं यांच्या सुगुणांसि कां न सुर सिकते? १९
तेव्हां भीम हरिकडे पाहे नेत्रेंकरूनि शोणाभें,[14]
बहुधा देव हि भ्याला, त्याचें वाटेल मग न कोणा भें? २०
देव म्हणे, "शकुनिसुता![15] जा, म्हण त्याला हि, 'ऐक फटकाळा![16]
जागविला पुच्छीं त्वां देवुनि पद बहु सपूर्वफट[17] काळा.[18] २१
वांचाया ब्रह्मांडाबाहिर जावूनि जरि रहासील,
मत्प्रापित[19] अर्जुनरथ निजकर्मविपाकसा[20] पहासील.'" २२

---

१. ह्या कर्णादि वीराची गोष्ट तर राहू द्या च. कारण, याच्या नुसत्या पराक्रमाच्या गोष्टीने च रणभूमीवर जयप्राप्ति होते. वीराना याच्या पराक्रमकथा ऐकून च स्फुरण चढते. २. विहिरीतील बेडका! ३. श्रम घेऊ नकोस. ४. स्वस्थ रहा. ५. हा दुर्योधनरूप सागर. ६. विषाप्रमाणे कडू व तीक्ष्ण अशा. ७. निरोपानें. ८. महामूर्खशिरोमणीने, ९. तो दुष्ट दुर्योधनाचा निरोप. १०. भीमेतरांच्या [मनीं]. ११. भीमवीराच्या मनांत पूर्वीपासून च राग होता. १२. (अलिक=) भाल—**पंत.** शंकराच्या मस्तकावरील डोळ्यांतील अग्नि. (ज्याप्रमाणें प्रलयकाळीं हरनेत्रानलास पेटविण्याला फुकणीची जरूर नसते, त्याप्रमाणे भीमाला संतापविण्याला दुर्योधनाच्या निरोपाचीच गरज नव्हती). १३. गुण हे शिकून येत असते तर. १४. आरक्त आहे कांति ज्यांची अशा. १५. उलूका! १६. हे नीचा! १७. बहुफटः, बहुफणः **पंत.** १८. कालसर्प. १९. [मीं रणांगणांत] आणिलेला. २०. आपल्या कर्माचा परिणाम.

मारुति[1] म्हणे, 'उलूका! हें कुरुकुळ बुडविलें तुज्या तातें,
यास्तव चि बुध न घेती संबंधीं सर्वथा कुजातातें[2]. २३

म्हण त्यांसि, मत्प्रतापज्वलनासि बळें चि लाव कच[3], पेट;
साहेल काय हरिचा गज, गरुडाचा हि लावक[4], चपेट[5]? २४

आतां चि पडोनि गळां रड, मग समरक्रतूत्तमीं[6] न रडें,
दुःशासनरुरुचें[7] क्षतज[8] प्राशिन, पिळुनि, सिंह मीं, नरडें. २५

आधीं वधीन अधमा! अनुज तुजे, मग तुला गदाघातें;
होइल मद्यश लोकीं तुझिया, कुरुकुळमहागदा[9]! घातें. २६

धर्मासमक्ष ठेविन, तुज पाडुनि, तव शिरीं स्वपद डावें,
न चुकेल हें, परि तुवां मात्र रणमख[10] त्यजूनि, न दडावें.' २७

जिष्णु म्हणे, "आर्या! हर म्हणातिल साक्षात् तुजप्रति ज्ञाती,
जी दुष्करा महेंद्रा केवळ सुकरा तुज प्रतिज्ञा ती. २८

शकुनिसुता! सांगाया त्याला माज्या हि या निरोपा[11] पी,
उदकें भेंडा[12] तैसा याच्या श्रवणें चि तो विरो पापी. २९

केवळ मूर्ख अधम तूं ऐसें कळलें तुज्या चि संदेशें,
कीं योजिला परबळें[13] अस्मत्परिभव तुवां सुमंदेशें[14]. ३०

यावरुनि गमे अशन[15] हि निजजठर[16] भरावयासि, मंदेशें
त्वां करिजेल परमुखें, [17]कीं करिजेताति जेंवि धंदे शें. ३१

---

१. भीम. २. हीनकुलोत्पन्नातें. ३. केस. ( केस लवकर जळतात म्हणून येथें 'कच' शब्द योजिला आहे; वस्तुतः 'शरीर' शब्द अपेक्षित आहे). ४. लावा-पक्षी. ५. चपराक. ६. युद्धरूप उत्तम यज्ञांत. ७. दुःशासनरूप हरिणाचें. ८. रक्त. ९. कुरुकुळाला मोठ्या रोगासारख्या अशा ( दुर्योधना )! १०. युद्धरूपी यज्ञ. ११. प्राशन कर. ( लक्षांत ठेव ). १२. मातीचे ढेकूळ. १३. दुसऱ्याच्या जोरावर. १४. त्वां मूर्खांच्या राजानें. १५. भोजन. १६. आपलें पोट. १७. ज्याप्रमाणें शेंकडों व्यापार दुसऱ्याच्या हातून करवून घेतोस, त्याप्रमाणें जेवण हि दुसऱ्याच्या तोंडानें जेवतोस असें वाटते.

कैवार तुजा घेउनि आम्हांवरि शस्त्र धरुनि यो जीनें,
सोडुनि घृणा, तृणावरि दंवसे, शर, नमन करुनि, योजीन. ३२
भीष्मासूतें म्हणतिल मच्छर, 'दुष्टाकडे नका राहूं;'
गुरुस हि सुखें म्हणावें, करितां विहितीं हितीं नकारा, हूं. ३३
होउत सहाय तुज जे रामा शक्रा सहाय कपि नाकी,
कुरुगुरु भीष्म द्रोण हि, किंबहुना लोकनायक पिनाकी. ३४
होतिल भग्न मजपुढें जेंवि रविपुढें बळी हि मंदेह,
धर्माश्रित जय पावे, न अधर्माश्रित न यांत संदेह. ३५
जो दुखविला जिहीं त्या विकरांघ्रि हि साप मानवां चावे,
मग कैसे भीमाचे रिपु कृतहासापमान वांचावे? ३६
पापडशा भीमगदाघातें चुरतील तव चमूढाला,
रक्षिल पळ हि न तुज जरि धरिलें पविचें हि कवच मूढाला."
धर्म म्हणे, "शकुनिसुता! माजा हि निरोप सांग त्यातें, गा!
शुचिकवितें निंदिसि, तरि कळत अमेध्यांत रांगत्यातें गा. ३८
मज सर्व सुज्ञ म्हणती, 'जरि हि तुजें शील साधु, वत्सा! हें,
दंडीं खळांसि, न छळ दत्तात्रेयादि साधुवत् साहें.' ३९
मज सांगुनि धाडावी ऐसी हे ओतुची कथा नीच्या!?,
हें वाटलें रुईचा वदनीं बहु ओतु चीक थांनींच्या. ४०
सोडूनि हरिजनाची स्तुति, निंदा करिसि का मरायास?

---

१. यवो. २. वृद्ध-पंत. भीष्म. ३. दया. ४. दावानलाप्रमाणे. ५. भीष्माच्या प्राणाला. ६. योग्य कल्याणाविषयीं. ७. वानर. ८. देव. ९. तिन्ही लोकांचा स्वामी. १०. शंकर. ११. या नांवाचे दैत्य, सूर्यशत्रु. १२. सद्धर्माचा आश्रय केलेला. १३. हस्तपादरहित असलेला हि सर्प आपल्याला दुखवणाऱ्यांना चावतो, मग मनुष्य प्रतिकार करील यांत काय नवल? १४. केला आहे उपहास व अपमान ज्यांचा असे. १५. सैन्यरूपी ढाला. १६. वज्राचें. १७. पवित्र झाल्याला. १८. घाणीत. १९. मांजराची गोष्ट. (मागे २ री आर्या पहा). २०. थांनीच्या (स्तनंधय शिशूच्या, अंगावरील मुलाच्या) मुखांत पष्कळसा रुईचा चीक ओतावा, तसें हें (दुर्योधनाचें कृत्य) वाटलें.

आयु हरी सन्निदा[1], हा योग्य नव्हे चि काम रायास. ४१
लंघिसि नरसिंहाला[2] मरणार्थ अरे! सुयोधना! कीशा[3]!
जिंकूं जातां उरतिल, पुरतिल मानव सुयोध नाकीशा[4]? ४२
चुकलास रे! सुयोधनराज्या! भिववुनि हरीस[5] चुकलास,
भुकलास कसा मंदा! श्वा[6]! कीं तूं जीवनास मुकलास. ४३
येणें[7] हातीं धरिलें[8] प्रणता कोणा न दे वरा यवस[9]?
स्तोत्या[10] कोणा न म्हणे, 'स्वर्गी होऊनि देवराय वस'? ४४
जी नहुषगति[11], तुजी ही गति ती च, धरूं नको चि संदेहा,
धिक्! धिक्! कुसंगते[12]! त्वां केला श्रितसर्वघात[13] मंदें[14] हा!"
नकुळसहदेवसात्यकिपांचाळविराटराजसंदेश,
नेउनि उलूक सांगे, ऐके सावज्ञ[15] तो हि मंदेश. ४६
'इकडे तिकडे किति रथ अतिरथ सांगा' असा धुनीज्याला[16],
प्रश्न करी तो राजा[17], कुमति सिकविली असाधुनीं ज्याला. ४७
भीष्म म्हणे, "कुरुराजा! सानुज[18] हि रथांत[19] तूं उदार सदा;
इच्छितसा युद्धाला, तृषित जसे इच्छिती उदा[20] रसदा[21]. ४८
ठावें असे चि तुजला, माजें मज न स्वरूप कथवे गा!
गरुड स्ववेग न कथिल, कथिल समस्तान्यपत्ररथवेगा[22]. ४९
अतिरथ कृप कृतवर्मा बाल्हिक मद्रेश शल्य जाणावें,
द्विगुणरथ[23] जयद्रथ, रथ शकुनि, तुज्या हें मनांत बाणावें. ५०

---

१. हा (सन्निदेचा) मनोरथ. २. मूळ पाठ–**मज सिंहाला.** ३. माकडा! ४. इंद्राला . ५. कृष्णाला ( पक्षी ) सिंहाला. ६. कुत्र्या! ७. ह्या कृष्णाने. ८. धरिलेलें. ९. गवत. १०. स्तुति करणाऱ्याला. ११. नहुषराजाची स्थिति. ( हा उन्मत्त राजा पदच्युत होऊन अगस्त्यमुनीच्या शापानें सर्प झाला होता ). १२. वाईट आहे संगति ज्याला अशा ( दुर्योधना )! १३. आश्रितांचा पूर्ण नाश. १४. मूर्खानें. १५. तिरस्कारपूर्वक. १६. भीष्म–**पंत.** गंगापुत्र भीष्माला. १७. दुर्योधन. १८. भावांसह. १९. रथी योद्ध्यांत. २०. उदक–**पंत.** २१. गोडी देणाऱ्या. २२. इतर सर्व पक्ष्यांच्या वेगाला. २३. द्विरथ.

द्रौणी[1] द्रोण चि; देव हि म्हणतिल, याचें करूनि अप्रिय, 'हा!'
परि न महारथ, न रथ हि, कीं, आयुष्काम जीवितप्रियं हा. ५१
[2]रथयूथपयूथांचा यूथपति द्रोण हा महातेजा;
करिल असें कर्म रणीं, भ्रमतिल लोकेश[3] ही पहाते ज्या. ५२
मारिल सुरासुरांस हि, न धरील चि हा समर्थ विप्र भया;
होतील द्वादश ही [4]आदित्य प्रेक्षितां चि वि[5]प्रभ या. ५३
समरीं ऐरावत ही शोणित[6]पूरीं [7]न्हात वाहेल,
परि परमप्रिय अर्जुन, त्यावरि याचा न हात वाहेल. ५४
[8]भिडले [9]भगदत्तविजय [10]शस्त्रक्षतशुद्धकाय हे [11]मागें,
गमलें तें, करिजेतें विंध्यासीं युद्ध काय हेमागें? ५५
शक्रें या [12]स्वसख्याला पूर्वी प्रार्थूनि पार्थ भेटविला,
याचा प्रताप जैसा [13]लयवातानें लयाग्नि पेटविला. ५६
[14]ज्याच्या बळें तुवां त्या [15]सत्पुरुषांसीं विरोध हा केला,
न वळसि, बरें नव्हे हें, या भेशा आमुच्या हि हाकेला. ५७
[16]सहजकवचकुंडलबळहीन [17]गुरुब्रह्मशापपविदग्ध,
अतिरथ नव्हे, रथ नव्हे, हा केवळ अर्धरथ चि [18]अविदग्ध. ५८

---

१. अश्वत्थामा. २. रथीच्या नायकाचा समुदाय, अशा अनेक समुदायाचा मुख्य. ३. इंद्रादि लोकपाल. ४. सूर्य ५. निस्तेज. ६. रक्तप्रवाहात. ७. स्नान करित वाहत जाईल. ८. लढले. ९. भगदत्तराजा व अर्जुन. (भगदत्त इंद्राचा मित्र होता). १०. शस्त्राच्या व्रणांनी पवित्र झालें आहे शरीर ज्यांचे. ११. राजसूययज्ञाच्या वेळी अर्जुन उत्तरेकडे दिग्विजयार्थ गेला असतां भगदत्ताचे व अर्जुनाचे युद्ध झाले होतें. १२. भगदत्ताला. १३. प्रलयकालीन वायूनें. १४. ज्या कर्णाच्या जोरावर. १५. पांडवासीं. १६. जन्मतः च असलेल्या कवचकुंडलाच्या शक्तीने रहित. (हीं शरीरावर असता कर्ण दुर्जय होता, म्हणून इंद्रानें याचकरूपानें येऊन तीं त्याजपासून हरण केलीं). १७. गुरु असा जो ब्राह्मण (परशुराम) त्याच्या शापरूपी वज्रानें दग्ध. १८. अपंडित, मूर्ख.

वधिल विजयशर[1] अमरा वज्रमय[2] प्रोच्चगगनयानींच्या,[3]
रक्षूं शकेल येउनि आड कनकमय[4] हि नगें न यां[5] नीच्या." ५९
स्मित करुनि 'एवमेतत्[6]' द्रोण म्हणे; त्या दहांत कुरुगुरुनीं
अपमान असा करितां, पाहे तो[7] वीरसिंह गुरुगुरुनीं. ६०
कर्ण म्हणे भीष्माला, "रक्षुनि घ्यावी निजप्रभा[8] वडिला[9]!
होतो ईर्ष्यासूयाहंकृतिनीं[10] प्रबळ हि प्रभाव ढिला. ६१
कां या कुगुणें बुडविसि जें म्हणाति तुला भले कुरूपमें[11] तें ?
काय[12] उपाय सुरूप न व्हावा चि जगत्त्रयीं कुरूपमतें? ६२
जेव्हां तेव्हां करिसी मत्तेजोवध दहांत शांतनवा !
शब्दें चि कळे सुज्ञा स्वाभाविक कीं उगा चि शांत नवा.[13] ६३
शब्दशरीं[14] विंधुनि त्वां केलें काळिज पितामहा ! धिरडें,
शिकविसिल तूं, शिकेल चि या कुरुपतिचा[15] पिता महाधि[16] रडें.
मीं साहतों तुज्या या मित्रसुयोधननृपार्थ अपराधा,
'वृद्धांचें सोशीसा हो सुत' म्हणउनि करी सुतप राधा.[17] ६५
राया ! 'अधिरथ' असें मज म्हणतो हा दहांत आजोबा,
साजो बाहुबळें यश जोडुनि याचें चि नाव गाजो, बा ! ६६
भूषार्थ[18] वृद्धतरुवाक्कुसुमांतें[19] मर्त्यनायका[20] ! वेंच[21],

१. अर्जुनाचा बाण. २. वज्राप्रमाणे कठिण अशा. ३. अत्यत उच्च विमानांत दसणाऱ्या. ४. मेरुपर्वत हि. ५. कर्णास. ६. [ माझ्या मतें हि ] अगदी असे च, अगदी बरोबर. ७. कर्ण. ८. आपले तेज आपण च राखावे. ९. अहो वडिल ! १०. ईर्षा, मत्सर व अहकार यांहीं. ११. कुरूची आहे उपमा ज्यास असा. १२. कुरूप मनुष्याच्या मतें जगत्त्रयीं सुरूप मनुष्य असू नये असें असते; पण ती त्याची इच्छा पूर्ण होत नाहीं, तेथें काय उपाय ? १३. नवीन, मुद्दाम शांतपणाचा आव आणिलेला. १४. दुःशब्दरूप बाणांनीं. १५. दुर्योधनाचा. १६. अति चिंताग्रस्त. १७. [ माझी माता ] राधा. १८. शोभेसाठीं. १९. वृद्धरूप वृक्षाच्या दुर्भाषणरूप पुष्पांतें. २०. मनुजाधिपा, दुर्योधना ! २१. गोळा कर.

अति[1]वृद्ध पुनर्बाळ चि, निःसार तदुक्त नायकावें च. ६७
मारीन पांडवां मीं, आप्तांआंतुनि अना[2]प्त हा[3] निवडा,
[4]मत्तगजकुठारधरांपासूनि प्राप्त होय हानि वडा. ६८
[5]हा सेनापति घेइल जें जें अर्जुनवधादि मद्यश तें,
कैंचा विचार? भुलतें थोरपणें मन, तसें न मद्यशातें. ६९
आधीं मरेल हा, मग मारीन धनंजयास मीं, [6]पर हा
वृद्ध व्याकुळ होतां मांडी द्यायासि यासमीप रहा." ७०
भीष्म म्हणे, 'रे! नीच्या! भेद[7]भयातें मनीं जरि न धरितों,
आतां चि वारि[8]जापरि लीळेनें त्वच्छि[9]रासि मीं हरितों. ७१
दुर्योधनप्रिय म्हणुनि वांचसि तूं, नीच[10]कुलभवा! नीच्या!
वांचे [11]गजमुखमूषक लंघुनि पं[12]चानना भवानीच्या. ७२
[13]गुरुसं हि नाहीं भ्यालों बहुदिन करितां त[14]शा हि समरा मीं,
सामर्थ्य जरि पहावें तरि साक्षात् कामका[15]ळसम रामीं. ७३
केला अपू[16]र्णकाम प्रभु मन्नि[17]धनैककाम राम हि म्यां,
हरिल्या काशिपतिसुता, सांगों तुज काय पामरा! महिम्या? ७४
लाजविली जिंकुनि महि[18]पति षंढस्त्री जसी तसी महि म्या,
राहो तें; वाखाणिल स[19]द्रसना आपुल्या कसी महिम्या?' ७५
[20]भूप म्हणे, 'भेद नसो, म्या हा केला तुम्हांसि अं[21]जलि हो!

---

१. अतिवृद्ध हे जणूं काय पुन्हा झालेले अज्ञ पोर च होत. २. शत्रु. ३. भीष्म. ४. उन्मत्त हत्ती व कुऱ्हाड हातीं असलेला मनुष्य, यापासून. ५. हा भीष्म सेनेचा पुढारी असल्यानें अर्जुनवधादि माझे यश आपण च मिळविलें असें म्हणेल. ६. परतु. ७. आपसांत फूट होईल या भयाला. ८. कमलाप्रमाणे. ९. तुझ्या मस्तकास. १०. नीचकुलोत्पन्ना! ११. गणपतीचा उंदीर. १२. सिंहास. १३. परशुरामाला हि. १४. सुप्रसिद्ध. ( पुढे अ० १३ पहा ). १५. मदनांतक शंकरासारखें. १६. पूर्ण झाली नाहीं इच्छा ज्याची असा. १७. माझा वध हीच मुख्य इच्छा ज्याची असा. १८. राजे. १९. साधूंची जिह्वा ( वाणी ). २०. दुर्योधन. २१. हात जोडणें.

तुमच्या प्रसादविधिचें मद्भाळीं विजय पाणिकंज लिहो. ७६
प्राप्त महत्कर्म तुम्हीं दोघे हि मदाप्ततम कराल पणें,
आसाल शत्रुसेनानयनांला रुद्रसम करालपणें. ७७
प्या स्वजनार्थ क्रोधा, जेंवि विषा विश्वनायक पियाला,
नर चि विवेकें कोपा वारी, वारील काय कपि याला? " ७८
इकडिल जसी तसी मज तिकडिल हि रथातिरथकथा सांगा.
न भल्या दुरुक्ति, देती यापरि हृदयांत न व्यथा सांगा.' ७९
भीष्म म्हणे, "सकळरथांमाजि महोदार धर्मसुतपा हो!
तद्धामरबळ हि म्हणे, 'इकडे क्रोधें न धर्मसुत पाहो.' ८०
सर्वां रथांहुनि अधिक बाहुबळेंकरुनि भीम आठपट,
तत्तनुसि त्वद्भट जरि, गगनाची झांकितील पाठ पट. ८१
माद्रेय रथी, परि त्यां तृणसम रथ पंक्ति नाग राऊत,
येईल तत्प्रतापज्वलेद्दह्यतितप्तसागरा ऊत. ८२
अर्जुनसम वीर नसे मागें, आतां, पुढें न व्हायाचा;
हा वीररसौघ, नग हि न उरेल, उरेल जो लव्हा याचा. ८३
होवूनि वज्रपंजर रक्षितसे वासुदेव कीरा या,
तत्संगतिहुनि त्याला बहु न यशोदा न देवकी, राया! ८४

---

१. कृपारूप ब्रह्मदेवाचे हस्तकमल. २. मोठे काम. ३. माझे पूर्ण हितकर्ते. ४. शंकरासारखे. ५. उग्रपणाने. ६. रथी व अतिरथी यांची हकीकत. ७. 'सांग' नावाचे एक भाल्यासारखे शस्त्र आहे. ८. मोठा उदार. ९. त्या धर्माचे तेज जाणणाऱ्या देवांचें सैन्य. १०. आमच्याकडे. ११. यमधर्मपुत्र धर्मराज. १२. जर त्या भीमाच्या शरीराला तुझे वीर आच्छादितील तर वस्त्रे हि आकाशाला आच्छादूं शकतील, असे म्हटलें पाहिजे. १३. नकुल, सहदेव. १४. पायदळ. १५. हत्ती. १६. घोडेस्वार. १७. त्याच्या प्रतापरूप प्रदीप्त अग्नीने अतिशय तापलेल्या समुद्राला. १८. साक्षात् वीररसाचा प्रवाह च. १९. नम्र होणारा. २०. वज्राप्रमाणें कठिण (बळकट) असा पिंजरा. २१. पोपटाला. २२. त्या अर्जुनाच्या संगतीहून.

दिव्यरथ[1] दिव्यशस्त्रें दिव्यकवच दिव्यसूत[2] कंसारी,
ज्याचें साहित्य असें, त्यावरि जाईल कोण संसारी[3]? ८५
जाइन मीं, कीं जाइल गुरु, जाइल कोण जिष्णुवरि तिसरा?
प्रतिभटहृदया[4] तच्छर[5] तेंवि सुतृषित हि न पांथ[6] वरिति सरा.
परि आम्हीं म्हातारे, राया! तो श्वेतवाह[7] तरणा रे!
काय इतर? तरतिल जलनिधिसि कसे जे नदांसि तरणारे?
दाविल किति स्थविर[8] गुण? पिकतो तरु तरुण कीं जरठ पिकतो?
पटु[9], त्यांपुढें[10] वदेसा कवण? रणवसंतआम्रहरिपिक[11] तो. ८८
सर्व महारथ पंचभ्रातें जे द्रौपदेय[12] ते, ज्यांतें
आदर्श[13] म्हणति पांडव दाखवित्यां स्वगुणरूपतेजांतें. ८९
रथयूथपयूथप अभिमन्यु सुरासुरशता[14] हि असुगम[15] तो,
जो समगुण[16], पितृमातुळहृदयासि[17] बहिश्चर स्वअसु गमतो. ९०
सात्यकि ही रथयूथपयूथप, वृष्णींत तो असामान्य,
आप्तांत अर्जुनास श्रीकृष्णास हि नसे असा मान्य. ९१
द्रुपद विराट महारथ, आणूनि मनांत धर्म नय नातें,
वृद्ध[18] हि करुनि पराक्रम, निववितिल रणांत धर्मनयमांतें. ९२
द्रुपदसुत शिखंडी तो रथसत्तम[19]; होय पुत्र दुसरा ज्या
धृष्टद्युम्न म्हणति तो अतिरथ, हें सत्य गुरुसि पुस, राज्या!"
कथुनि रथातिरथ म्हणे, 'सर्वांसीं मीं करीन युद्धातें,
परि न शिखंडीसीं कीं बा! योग्य नव्हे मला विशुद्धा तें.' ९४
कुरुपति म्हणे, 'निराळा कां एक चि वीर हा निवडिला हो!?

१. अलौकिक रथ. २. अलौकिक सारथी. ३. मनुष्य. ( मर्त्य ). ४. शत्रूच्या हृदयाला. ५. त्या अर्जुनाचे बाण. ६. वाटसरू. ७. अर्जुन. ८. वृद्ध. ९. चतुर, प्रवीण. १०. अर्जुनापुढे. ११. रण हा च वसंतकाल, त्यातील हरि हा च आम्रवृक्ष, त्यावरील कोकिल. ( अर्जुन ). १२. द्रौपदीचे मुलगे. १३. आरसा. १४. शेंकडों देवदैत्याना. १५. दुर्लभ. १६. सारख्या गुणांचा. १७. कृष्णार्जुनांच्या अंतःकरणाला. १८. वृद्ध आहेत तरी हि. १९. रथांमध्यें श्रेष्ठ.

हरिला हरिणापासुनि तसि [१]त्यापासुनि न हानि [२]वडिलां हो.'
भीष्म म्हणे, "म्यां कन्या हरिल्या [३]भ्रात्रर्थ काशिराज्याच्या,
[४]मुनिजन हि ज्यांसि भुलला वरि दिसती सकळिका शिरा ज्याच्या.
बहुसंख्य आडवे मज जाले दुर्योधना! नरवरा! जे
[५]क्षमले सहावया या [६]चापगुणाचा हि ते न रव राजे. ९७
बहुसंख्य भूप जिंकुनि म्यां स्वपुरा आणिल्या तिघी कन्या,
ज्येष्ठा अंबा वदली, 'वरिला शाल्व, न वरीन मीं अन्या.' ९८
शाल्वाकडे चि ती म्यां पाठविली अंबिका, [८]स्वभावातें
अंबालिका हि दिधली विचित्रवीर्या [७]शुचिस्वभावातें. ९९
अंबेला शाल्व म्हणे, 'जा, गंगासूनुची च नवरी हो.'
'[९]परविजिता [१०]परपूर्वा' ऐसा ठेवूनि दोष न वरी, हो! १००
'[११]भीष्मपरिग्रह कीं तूं करितीस स्वपरघात कां? [१२]पावें;
मीं काय? तुजकडे मन जातां [१३]जगदंतकें हि कांपावें.' १०१
ऐसें शाल्व वदे, हो! बहुत विनवितां हि तो न मूढ वळे,
आठवुनि [१४]जिंकित्यां मज [१५]ती कोपें जेंवि रिपुचमू [१६]ढवळे. १०२
वरिला चि मनें, व्हावा, परि त्या ती बायको नको पतिला,
आला [१७]तद्वदनें बहु '[१८]यां हि' असें आयकोन कोप तिला. १०३
रडत चि तपोवनाला गेली पावोनि उग्र ताप सती,
मजवरि दोष स्थापुनि, वृत्त कथुनि, करि सखेद [१९]तापसें ती.
त्यांसि म्हणे, 'पावेना दीन भल्यांच्या पदासमीप [२०]दरा,

---

१. शिखंडीपासून. २. आपल्याला. (भीष्माला). ३. भावाकरितां. ४. ज्यांच्या शिरा अंगावर स्पष्ट उमटल्या आहेत, असे वृद्ध मुनि हि ज्यांस भुलत. ५. समर्थ झाले. ६. धनुष्याच्या दोरीचा. ७. पवित्र आहे स्वभाव ज्याचा अशा. ८. भीष्माची. ९. दुसऱ्यानें जिंकिलेली. १०. परोच्छिष्टा. ११. भीष्माची स्त्री. १२. प्रसन्न हो. १३. यमानें. १४. जिंकणाऱ्या मला. १५. अंबा. १६. खवळे. १७. त्या शाल्वाच्या तोंडून. १८. जा, (मी तुला वरित नाहीं). १९. तपस्वी मनि. २०. भीतीला.

माहेर हें च, द्या वर हा च, पसरिलें पदास मीं पदरा. १०५
सांगा तो धर्म मला, ज्या धर्मे वर्ततात संन्यासी,
अन्यासि प्रेक्षीना[1], वर्तेन सुखें वनांत वन्यासी[2].' १०६
ज्या आश्रमांत जातां अतितप्तांचा हि सर्व ताप सरे,
त्यां आश्रमांत जाले तत्तापें तप्त सर्व तापस रे! १०७

---

## अध्याय तेरावा.

राजर्षि होत्रवाहन भृगुरामाचा सखा तिचा आजा,
तो पातला अकस्मात् तीर्थतपः[3]पर जसा भरत राजा. १
तो तें[4] परिसोनि, तिला अंकीं घेऊनियां, मुनिजनातें
सांगे 'दौहित्री[5] हे' ऐसें, होऊनि साश्रु[6], निज नातें. २
अंबेसि म्हणे, 'वत्से! राम[7] अधिष्ठुनि[8] असे महेंद्रागा[9],
जा, सांग नाम माजें, त्या प्रभुस चि गा, न तूं महेंद्रां[10] गा.' ३
तों चि अकस्मात् तेथें अकृतव्रण[11] पातला रहायास,
तो सांगे, 'राम सखा येणार उद्यां तुला पहायास.' ४
अकृतव्रणासि अंबा वंदुनि निजदुःख सर्व ही कळवी,
तैसी[12] च लोभ दावुनि सुकृताचा तद्दया तया वळवी. ५
राम हि दुसरे दिवसीं भेटे, निववूनि घे स्वकार्य कवी,
नायक वीरांचा जो त्या तो[13] राजर्षि[14] सर्व आयकवी. ६

---

१. पाहणार नाहीं. २. वनचरीप्रमाणें. ३. तीर्थयात्रा आणि तपःश्चर्या करण्यांत निमग्न असा. ४. अंबेचें वृत्त. ५. मुलीची मुलगी. ६. डोळ्यांत पाणी आणून. ७. परशुराम. ८. वास्तव्य करून. ९. महेंद्रपर्वतावर. १०. इंद्राला. ११. परशुरामाच्या सेवकाचें नांव. १२. तैसी च सुकृताचा (पुण्याचा-अंबेचें दुःखनिवारण केल्यानें होणाऱ्या पुण्यप्राप्तीचा-) लोभ दावुनि तद्दया (त्या अंबेविषयींची करुणा) तया (अकृतव्रणाला) वळवी. १३. होत्रवाहन. १४. घडलेली सर्व हकीकत.

'येती शरण तुला जे ते जन सर्वत्र सत्पदा[1] वरिती,'
ऐसें प्रार्थुनि, जोडी अंजलि[2], घालूनि तत्पदावरि ती. ७
राम म्हणे, 'वत्से! तूं आजवळा पात्रलीस, न वनातें;
जें राजर्षिकडे, या ब्रह्मर्षिकडे हि तें चि तव नातें. ८
अश्रु पुसों दे, वांछित सांग मज, अनाथसी नको चि रडूं,
आम्हांसि आपणासह या दुःखमहाभरें नको चिरडूं.' ९
अंबा म्हणे, 'असें हें जालें, किति कथिल दुःख हे[3] तूतें?
मारावें भीष्मातें या माज्या परमदुःखहेतूतें[4]. १०
भीष्मापुढें करावें बळ शाल्वें काय? काय मत्तातें?
आजोबा! साजो[5] बा! यश, मारीं त्या अतिप्रमत्तातें.' ११
राम म्हणे, 'न धरिन धनु, जरि न विनवितिल मजप्रति ज्ञाते,
ब्राह्मणकार्यावांचुनि सोडावी कसि निजप्रतिज्ञा ते?' १२
अंबा वदे, 'प्रतिज्ञा शरणागतरक्षणार्थ सोडावी,
तुज ईश्वरासि दुष्कर काय प्रभुजी!? सुकीर्ति जोडावी.' १३
राम म्हणे, 'वत्से! तुज भीष्म नमिल, बहुमता[6] मदाज्ञा त्या;
लंघ्या नव्हे प्रतिज्ञा, प्रतिपाल्या[7] होय हे सदा ज्ञात्या.' १४
काश्या[8] म्हणे, "वधा कीं भीष्म म्हणो 'निर्जितोस्मि[9]' आजोबा!
माजो[10] बाहुबळें न छात्रें[11], बहु गुरुप्रताप[12] साजो बा!" १५
अकृतव्रण हि म्हणे, "जी! वर्णुत भृगुकुळगुरुप्रति ज्ञाती;
स्मरली मज, स्मरावी स्वामींनीं ही गुरु[13] प्रतिज्ञा ती. १६
वदलां, 'म्यां शरणागत दंडुनि[14] विप्रादि सर्व तारावा,

---

१. सद्गतीला. २. [ होत्रवाहन ] ती अंबालिका परशुरामाच्या चरणावर घालून (तिचें बरेंवाईट करण्यानें सर्वस्वी त्याच्यावर सोंपवून) हात जोडी. ३. मी अंबा. ४. मोठ्या दुःखाला कारणीभूत असलेल्या. ५. शोभो. ६. बहुमान्य. ७. पालन करण्यास योग्य. ८. अंबा. ९. मीं पराभूत झालों. १०. उन्मत्त होवो. ११. शिष्य. १२. गुरूचा ( परशुरामाचा ) पराक्रम. १३. मोठी, महत्वाची. १४. [ दुष्टांचें ] शासन करून.

जो सर्व क्षत्र रणीं जिंकील प्रबळ तो हि मारावा.'" १७
भार्गव म्हणे, 'विसरलों होतों कीं मीं हि या प्रतिज्ञातें[1],
वत्सा! तुज धन्य म्हणों आधीं, मग सर्व[2] याप्रति ज्ञाता. १८
सामें चि कार्य होइल जरि, तरि युद्धासि काय कारण हो!?
न करील वचन जरि, तरि माराया भरतनायकां[3] रण हो.' १९
ऐसें योजुनि घेउनि त्या मुनिमित्रांसमेत[4] मुलगीतें,
प्रस्थान शीघ्र केलें त्या राजामरमहर्षिकुलगीतें[5]. २०
येवूनि कुरुक्षेत्रीं राहे, सांगोनि पाठवी, राज्या[6]!
धावोनि भेटलों मीं वेद धनुर्वेद पाठ वीरा ज्या. २१
मत्कृतपूजन घेउनि राम म्हणे, 'रे! सुरापगांगभवा[7]!
भक्त्यर्पित[8] बहु, नाहीं तरि काय असे दुराप[9] गांग[10] भवा[11]? २२
गरुडें सुधा, तसी त्वां हे अंबा रण करूनि जरि हरिली,
तरि हरिलीनमतिजनें[13] संसृतिरुचि[14] तेंवि कवि परिहरिली[15]?'
वदलों, "सत्य, भ्रात्याकरितां हरिली बळें, पर[16] स्वामी
'वरिला शाल्व' म्हणे हे[17], घेऊं जाणुनि कसें परस्वा[18] मीं?" २४
राम म्हणे, 'शाल्व न घे, मानी[19] हरि गज परें दिला न वरी,
त्वां जिंकिली यदर्थ त्वद्भ्राता तो करू इला नवरी.' २५
मीं वदलों, 'जें दुष्कर सुयशस्कर[20] सांग काज रामा! तें,
होइल अकीर्ति, देतां कां हा उपदेशकाजरा[21] मातें?' २६

---

१. प्रतिज्ञेला. २. मला. ३. भरतश्रेष्ठ भीष्माला. ४. ब्रह्मवेत्त्या तापसांसह. ५. राजे देव आणि महर्षि यांच्या समुदायानें स्तुत अशा परशुरामानें. ६. दुर्योधना! ७. देवनदीच्या पुत्रा, भीष्मा! ८. भक्तीनें दिलेलें. ९. दुर्मिळ. १०. गंगोदक. ११. शंकराला. १२. कथासदर्भ आर्या० आदि० अ० ४ मध्ये पहा. १३. हरीच्या ठायीं लीन झाली आहे बुद्धि ज्याची अशा मनुष्यानें. १४. संसाराची आवड. १५. टाकली. १६. परंतु. १७. अबा. १८. परधनाला. १९. मानी सिंह दुसऱ्यानें दिलेल्या हत्तीचा अंगीकार करित नाही. २०. करावयास कठिण पण उत्तम यश देणारें. २१. उपदेशरूप विष.

राम म्हणे, 'त्वद्गुरु मीं, माजें सुखपुण्यकीर्तिजनक वच;
गुरुवचनास चि म्हणती सर्व भले पुण्यकीर्ति[1] जन कवच.' २७
मीं बोलिलों, 'असें तों न घडेल कधीं; दयानदा ! पावें[2];
गुरुनें, ज्यासि अधर्माचरण न माने, तया न दापावें[3].' २८
राम म्हणे, "होय सुखी निजगुरुचें वचन शिष्यजन करिता[4],
नातरि[5] गुरुकुंभभवक्षोभें[6] छात्रामृतांशुजनक[7] रिता. २९
हे सर्वमता[8] साक्षाद्दुर्गासी सर्वकामदा, आज्ञा त्या !
लंघील खळ महिषसा जो, न करिल भस्म कां मदाज्ञा त्या ? ३०
जाले[9] पशु चि न वाहुनि शृंगा पुच्छा वळी मुठा राजे
तैसे ते[10] न क्षितिवरि आढळले न वळले[11] कुठारा[12] जे. ३१
भज गुरुपुढें 'असें[13] तों न घडेल कधीं' असें कसें वदासि ?
असतां समर्थ अघटितघटनापटु[14] मत्कुठार हा सदसी[15]. ३२
खचसील कौरवा[16] ! तूं, कीं बहु चढला तुजा मद मिगेला[17];
लंघावया[18] पहासी ? गांवाला कांय रे ! मदसि गेला ? ३३
वधिले क्षितितळवर्ती[19] क्षत्रिय म्यां एकवीसदा सारे.
माजा प्रताप गातां रुद्रभ्रम[20] दे कवीस दासा ! रे !" ३४

---

१. पुण्य ही च आहे कीर्ति ज्यांची असे. २. प्रसन्न हो. ३. दटावावे. ४. करणारा. ( पाळणारा ). ५. नाहीं तर. ६. गुरुरूप अगस्तीच्या कोपानें. ७. शिष्य हा च अमृतांशु ( चंद्र ) त्याचा पिता समुद्र. ८. सर्वमान्य. ९. शिंगे, शेपूट व ओझ्यामुळे पाठीला इजा न व्हावी म्हणून गादीसारखें जें वळी, मूठ या नांवाचे साधन बैलाच्या पाठीवर घालतात ते, वगैरे बैल असल्याची कांहीं चिन्हें नसतां हि सर्व राजे माझ्यापुढें बैल झाले. 'साक्षात् पशुः पुच्छ-विषाणहीनः', झाले. १०. राजे. ११. वठणीस आले. १२. परशूला. १३. अंबास्वीकार. १४. अशक्य तें शक्य करून दाखविण्यामध्ये पटाईत. १५. उत्तम तरवार. १६. भाऊमा! १७. शिखराला, पूर्णत्वास. १८. माझें उल्लंघन करूं पाहतोस. १९. भूतलावर असणारे. २०. शंकर असल्याची भ्रांति.

ऐसें भलतें चि वदे वर्णावा मुख्य जो गुरु गुरूनीं.[1]
पाहे राम मजकडे, जेंवि हरिकडे हरी गुरुगुरूनीं. ३५
वदलों, "धर्मन्यायें हा[2] देह तपोवनांत राबावा,
त्यजुनि दुरभिमान, धरुनि शांतिसि, तारुनि जनां तरा, बावा!
ठाव्या आहेत मला, सांगा गोष्टी यथेष्ट अन्या या,
तरि भय भलत्यापासुनि होइल, जरि मीं करीन अन्याया. ३७
वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शांतनव[3] समज,
देवांसि[4] मागते ते जाले मरणीं करूनि नवस, मज. ३८
गेलें गुरुत्व तुमचें, कां हो! म्हणतां वधीन अनघातें[5]?
येइल पदरांत कसें यश धर्मन्यायनिष्ठजनघातें? ३९
सच्छिष्याला विद्या गुरु झांकायासि काय हो! सिकवी?
पांडित्य पहा माजें, पाहोनि मला म्हणाल 'होसि[6] कवी.'" ४०
हांसुनि राम म्हणे, 'रे! हितकर गुरुवचन कां न आइकसी?
साहेल तुजी तुजिया दुःसहशोकानळासि आइ कसी? ४१
भीष्मा! मज सिंह गणीं, वेड्या! तूं आपणासि कलभ[7] गणीं.
न रविपुढें मिरवेसें चंद्रीं हि, कसें असेल बल भगणीं[8]? ४२
देसिल सत्यवतीतें शोक बहुत, रडविशील गंगेतें,
समज बरें मददूषित[9] जें जें तेज क्षणांत भंगे तें. ४३
हो सिद्ध, '[10]ये; हरीनें व्यसु[11] आला तो करेणु[12] केला, हो!
'[13]हूं! गंगेला शोकद, तोखद[14] हें तोक[15] रेणुकेला[16] हो.' ४४

१. जो गुरु (परशुराम) गुरूनी (मोठ्या लोकानी) मुख्य [म्हणून] वर्णावा. २. तुमचा देह. ३. हा शंतनूचा मुलगा भीष्म. ४. ते तुम्ही मारलेले क्षत्रिय, मरतेवेळी, 'आम्हांला परशुरामाला जिकणारा असा वीर दे' असा देवांस नवस करून मला मागते झाले. ५. निष्पापातें. ६. आहेस. ७. गजशिशु; हत्तीचा छावा. ८. नक्षत्रसमुदायांत. ९. गर्वानें फुगलेलें. १०. युद्धास ये. ११. गतजीवित. १२. हत्ती. १३. हूं, ऊठ, लढाईला तयार हो. १४. आनंददायक. १५. मल. १६. माझ्या आईला.

सिंधूंत नगं[1] जसा कपि[2] तैसा पाहोनि गर्वनग रामीं,
वंदुनि 'येतों' ऐसें बोलुनि आलों फिरोनि नगरा मीं. ४५
सत्यवतीतें सांगुनि नमुनि[3] तदाशीःप्रसाद घेऊन,
हा गुरुचें दर्शन घे, हेमंतीं[4] जेंवि अधन[5] घे ऊन. ४६
आम्हां गुरुशिष्यांचा अत्यंताद्भुत पहावया समर,
आले बहु सुर[6]राजब्रह्मर्षिसमेत सर्व ही अमर. ४७
पुत्रस्नेहें मातें ये वाराया भिवूनि देवधुनी[7],
हनु[8] धरुनि म्हणे, 'बा! हा काळकरीं बहु भटांसि दे वधुनीं. ४८
अनुभावें[9] न, जितावे भावें गुरु देव सर्वथा पटुनीं[10],
उठविति अनर्थ खिजतां[11], रिझतां[12] पुरुषार्थ सर्व थापटुनीं[13].' ४९
सांगोनि कलहकारण वदलों, 'गंगे! वृथा न कोपावें,
रामापरि मज तूं ही निजधर्मच्युत करूं नको, पावें.' ५०
सुतजीवदान मागे पसरुनि रामा नदी नता[14] पदर,
नमुनि म्हणे, 'शरण तुला येतां, पावे न दीन ताप दर[15]. ५१
आग्रह कां करितां? हो! प्रभुजी! द्या अभय बाळका, पावा.
न गिळी कटुकरस[16] म्हणुनि कोप करुनि काय बाळ कापावा?'
राम म्हणे, 'गंगे! जें विद्यादिगुणेंकरूनि मातें[17] तें,
दावी वंध्येहुनि बहु कदपत्य[18] उणें करूनि मातेतें. ५३
या ऐशा ही गुरुचें जो वेदवचन[19]सखें वच न मानी,
तो हा मानील कसें, तुज गुरु मानुनि, तुझें वचन मानी? ५४

---

१. [मैनाक] पर्वत. २. मारुति. (याने मैनाकपर्वताचा गर्व हरण केला होता). ३. [मातेला] वंदुनि. ४. थंडीच्या दिवसांत. ५. दरिद्री. ६. देवर्षि, राजर्षि व ब्रह्मर्षि यांसहित. ७. भागीरथी. ८. हनुवटी. ९. सामर्थ्यानें. १०. चतुरानी. ११. खिन्न होतां. १२. खूष होतां. १३. पाठ थापटून. १४. नम्र अशी गंगा. १५. भीति. १६. कडू रस, औषध. १७. माजतें. १८. वाईट अपत्य. १९. वेदवचनाचें मित्र च असें.

करितां[1] आज्ञा, त्यांच्या स्पर्शेन शिरा, सुरापगे[2]! हातें,
त्यजिल भवाशीसाध्वी[3] नाहीं तरि त्या सुरापगेहातें[4]. ५५

रक्षावा चि सुत असें त्वन्मिषीं जरि असे महाभागे[5]!
गंगे! जा, वाटेवरि[6] आण, अभय द्यावया न हीं[7] भागे[8].' ५६

पुनरपि माय मज म्हणे, 'न विलंघावें धरूनि हठ नातें[9],
गुरु[10] हरिहर; बहु तरले गुरुचरिताच्या करूनि पठनातें.' ५७

'शतदा उपदेशौषध हा संरक्षावया स्वसुत पाजी,
ती कां विटेल? वेची नित्य पतितशतहिता[11] स्वसुतपा[12] जी? ५८

अत्याज्य सुप्रतिज्ञाग्रह[13] निजकुलधर्म सन्नय[14] नरा हे,
तैसें कसें करावें जेणें एक हि न सन्नयन[15] राहे?' ५९

सिंधु[16] म्हणे, 'कोण असी माता जोडील हात पोरासी?
शिष्य असा[17], मग आग्रह कैसा सोडील हा[18] तपोराशी?' ६०

जों माय म्हणे, 'देइल हा हरि तुज मुग्धसिंधुरा[19] मरणा,'
मजवरि येता जाला, तों चि यशोदुग्धसिंधु[20] राम रणा. ६१

'बैसा रथीं कवच घ्या' ऐसें म्हणतां म्हणे, 'उणें काय?
पूर्ण असे हा माजा चिंतामणिकोटिगुरु[21] गुणें काय. ६२

रथ भूमि, वेद वाजी[22], गायत्री[23] कवच, सारथी वात[24],
या साहित्यें आम्हां काळाधिक कोण जोडिना हात?' ६३

---

१. माझी आज्ञा मान्य केली असतां. २. गगे! मी त्याच्या शिरावर वरदहस्त ठेवीन. ३. माझी आशी (आशीर्वाद) ही च साध्वी. ४. मद्यप्याचें घर च अशा भीष्मातें. ५. दैवशालिनि! ६. ताळ्यावर आण. ७. मी. ८. थकत नाहीं. ९. गुरु-शिष्याचें नातें. १०. गुरु हा च हरिहर होय. ११. पाप्यांच्या हितास्तव. २२. गंगा. १३. अढळप्रतिज्ञेचा आग्रह. १४. चांगली नीति. १५. उत्तम डोळा. १६. गंगा. १७. दुराग्रही, १८. राम. १९. वेड्या हत्तीला. २०. यशाचा क्षीरसमुद्र. २१. चिंतित पुरविणाऱ्या कोट्यवधि देहांमध्यें श्रेष्ठ असा हा माझा देह गुणानीं पूर्ण आहे. २२. घोडे. २३. गायत्र्यादि वेदमाता. २४. वायु.

ऐसें वदतां चि, दिसे दिव्यरथीं दिव्यकवच तो हरसा,
मोहे देवांची ही मति, केवळ पावली न मोह [1]रसा. ६४
ठेउनि चाप करींचें, उतरूनि रथावरूनि पद नमुनीं,
'[2]मम जयमाशास्व' असें प्रार्थियला [3]कीर्तिकेलिसदन मुनी. ६५
मज राम म्हणे, "नमन न करितां, [4]करिता चि हानि शापानें,
वंदावा गुरु हर्षद [5]अमळद्विजराज हा [6]निर्शापानें. ६६
भीष्मा! मजला म्हणसी जरि '[7]जयमाशास्व मे विभो! राम!'
तरि संप्रति जैसा तूं [8]जयकाम तसा चि हा हि जयकाम. ६७
जालों प्रसन्न मीं या त्वच्चरितें, तूं त्ति शुद्ध [9]समयज्ञ,
हूं, वैस रथीं घे धनु, सत्फळद न अन्य युद्धसम यज्ञ." ६८
नमुनि रथीं बैसुनि, मीं वदलों, 'गुरुजी! न हार [10]नंत पाहो,
तुमच्या न ब्राह्मण्या, न श्रुतिवृंदा, प्रहार न तपा हो. ६९
स्वीकारिला तुम्हीं जो [11]असमुचित क्षत्रधर्म साधूनीं,
खंडीन त्यासि, होइन [12]सन्मत, हें साधुकर्म साधूनीं.' ७०
करिता जाला मजसीं माजा गुरु राम [13]संगरारंभा,
पाहों ये [14]योगिचमू जसि सोडुनि [15]कामसंगरा रंभा. ७१
प्रथम चि सोडी मजवरि मद्गुरु शरवर्ष [16]कायहानिकर,
तैसें चि हा हि शिष्य, प्रेक्षक जन म्हणति 'काय हा [17]निकर?'
झांकिति समरीं शतदा आम्हां देवर्षि [18]सत्प्रसूनगणीं,
[19]निजवीरसूत्व निरुपम सुकृतफळ, परंतु [20]मत्प्रसू न गणी. ७३

---

१. पृथ्वी. २. 'माझ्या जयाची आशा कर. ३. 'कीर्तीचें क्रीडास्थान च असा. ४. हा राम शापाने तुझी हानि करिता च. ५. निष्कलंक ब्राह्मणश्रेष्ठ राम. ६. [सकलंक] चंद्रानें. ७. हे प्रभो रामा! माझ्या जयाची आशा कर. (मला जय दे). ८. विजयेच्छु. ९. स्वधर्मज्ञ. १०. नम्र (भीष्म) माघार न घेवो. ११. अयोग्य. १२. सज्जनांस मान्य. १३. युद्धारंभा. १४. योगिसमूह. १५. मदनयुद्धा. १६. शरीराची हानि करणारा. १७. कहर. १८. उत्तम पुष्पवृष्टीनीं. १९. आपले वीरमातृत्व. २०. माझी आई.

बाणाहीं मीं गुरुच्या, गुरु माज्या ही, करी रथा पिहित[1],
शस्त्रप्रहार यद्यपि अहित चि; गमले मना तथापि हित. ७४
प्रथमदिनीं म्यां गुरुच्या धनुची, पण[2] करुनि, तोडिली कोटी[3].
मजवरि तीक्ष्णशरांची गुरुनें कोपोनि सोडिली कोटी. ७५
पळंमात्र पावली शर मर्मीं शिरतां मदीय तनु कंपा,
नाहीं गडबडलों, कीं मंजवरि गुरुची च पूर्ण अनुकंपा. ७६
मग मीं जालों गुरुच्या मर्मीं शतसंख्य[4] बाण शिरकविता,
संधानशक्ति[5] माजी कांपवि तत्धृदय, जेंवि शिर कविता[6]. ७७
क्षण मूढसा चि झाला क्षतजें[7] प्रभु न्हाणिला चि भल्लानीं[8],
मल्ला निष्क्रिय[9] केलें, जाणों कवळुनि अनेक मल्लानीं. ७८
'हां[10] रें! भीष्मा! मंदा! जपला गुरुवत्सल[11] व्रता कुरु[12] ज्या,
तें बुडविलें तुवां कीं! हा! न कुसंतति भूली, भली कुरूज्या[13].
गुरु हरिहर कीं! धिक्[14] त्वां[14]! करिसि न करवेल लांडग्याला जें;
दे जीव, जा, भल्यांला दावाया तोंड दांडग्या! लाजें.' ८०
असि आपली च आपण केली निंदा बहु प्रथम दिवसीं,
कीं[15] विप्र पुरोडाश, क्षत्रकुळें त्यापुढें जसीं दिवसीं[16]. ८१
दुसरें दिवसीं मजवरि शस्त्रें अस्त्रें हितें गुंजें[17] योजी[18],
तेव्हां वदलों, 'स्वामी! हें केलें भग्न म्या, दुजें[19] यो[20] जी!' ८२
मज डावलूनि[21] मद्गुरु भेदी भल्लेंकरून हें उर, तें

---

१. आच्छादित. २. प्रतिज्ञा. ३. धनुष्याचें टोक. ४. शेकडों. ५. बाण जोडण्याची शक्ति. ६. काव्य. ७. रक्तानें. ८. बाणानी. ९. [चलनवलनादि] व्यापारशून्य. १०. येथून पुढे दोन गीतीत भीष्मानी आत्मनिंदा केली आहे. ११. गुरुभक्तिपरायण. १२. भीष्माचा पूर्वज. १३. रोग—पंत. १४. तुला धिक्कार असो. १५. कारण, ब्राह्मण हे यज्ञशेषासारखे पवित्र अन्न होय. १६. एक क्षुद्र प्रकान्न, फळे. १७. समजुतीच्या गोष्टी. १८. उपयोगात आणी. १९. दुसरें. २०. येवो. २१. डावा घालून.

सांगों काय तुज [1]नृपा!? नसतां श्रीगुरुकृपा न [2]हें उरतें. ८३
मत्सूत मला मागें मूर्छा येतां चि तत्क्षणीं काढी,
हा! [3]ढोंग वेदना अनुभविल्या समरीं, परंतु ती [4]गाढी. ८४
मागें हळूच मद्रथ सारथि ने, जन्हि [5]हरींस न पिटाळी,
मेला खळ म्हणुनि पिटिति [6]मुनि, [7]रामजयीं जसे चि कपि, टाळी.
अंबेचा तर्क किती? पिटिती अकृतव्रणादि कवि टाळी,
'हा! हा!' देव हि म्हणती, गुरु चि [9]निजगंभीरतेसि न विटाळी.
रामाश्रितसाधूंची दूर करी गर्जना चि मन्मोहा,
[10]माय म्हणे, 'रडवाया न परसतीच्या कुशींत जन्मो हा.' ८७
म्या सावधान होउनि, रथ फिरवुनि, बाण सोडिले बहुत,
रामप्रतापदहनीं जाले चि, न लागतां विलंब, [11]हुत. ८८
मग भ्यां मूर्छित केला [12]कालोग्रशरव्रणें [13]उरोनिहितें,
गमलें यावरि न करिल [14]गुरु शिष्यांचीं, जगीं उरोनि, हितें. ८९
मागूनि घेतलें गुरुदेवा म्यां, आंग कांपत नमुनि, तें;
बसला [15]अशनिसम उरीं शर, मग व्हावें न कां पतन [16]मुनितें?
कल्पांतीं भानु तसा राम पडे भूवरी रथावरुनीं.
घालूनि उडी अकृतव्रण [17]सूत धरी शरीर [18]थांवरुनीं. ९१
जळ वायु घालिती किति, किति जपती [19]शांतिसूक्त तापस रे!
यत्नशतें चिरकाळें हळुहळु भृगुराममोहलाप सरे. ९२
उघडुनि दृष्टि, गुरु म्हणे, 'भीष्मा! माझ्यासमोर चि रहा रे!

---

१. हे दुर्योधना! २. हें उर. ३. पुष्कळ. ४. प्रबल. ५. घोड्यांला. ६. परशुरामपक्षीय मुनि. ७. दाशरथी रामाच्या जयाच्या वेळी. ८. अंबेला मी मेलो असें सहज चि वाटलें. ९. आपल्या गंभीरपणाला. १०. गंगा—पंत. ११. दग्ध. १२. काळाप्रमाणें भयंकर अशा बाणाच्या जखमेंने. १३. छातीवर मारिलेल्या. १४. परशुराम. १५. वज्रासारखा. १६. रामाला. १७. सारथी. १८. सांवरून. १९. शांतिपाठ.

उग्रा[1] ही भुजगासीं[2] करितां संगर न मोर चिर हारे[3].'. ९३
मत्पार्श्वी[4] मज हाणी, 'मेलासि' असें म्हणोनि रोपानें[5],
कोपानें क्षत्रक्षतज्यांचीं[6] आला करीत जो पानें. ९४
चुकलें[7] दैवें, देह न त्या आघातीं[8] रणीं रहावा, तें;
जालों सकंप पळभरि, होय महातरु जसा महावातें. ९५
कांपविले शर मर्मी हांणुनि माजे भृगूद्वहें[9] घोडे.
मोडे धैर्य न त्यांचें[10], तेजस्वी शोधितां तसे थोडे. ९६
गुरु खवळला चि होता, मीं हि बहु तसा कधीं च न खवळलों;
एकामेकांवरि मग साक्षात् कल्पांतमेघसख[11] वळलों. ९७
वातास कीं शिराया न दिली पदवी[12] रविप्रकाशाला.
इतरां[13] मीं च न, होइल मग तापद वीर विप्र काशाला? ९८
शर कोंदले नभीं, बळ त्यांचें अन्योन्यखंडनीं[14] न चले,
न च लेश उरे, स्वोत्थज्वलनें[15] होवूनि दग्ध ते खचले. ९९
उतरी संध्याकाळीं नित्य स्वधनुर्गुणासि[16] कवि राम,
मूर्छेविना न आम्हांमध्यें, प्रेक्षकजना हि न, विराम[17]. १००
म्यां त्या समरमखाच्या[18], प्रारंभीं, स्वगुरुचे सदा चरण.
अवसानीं[19] हि नमावे; कीं, मज हें बहु रुचे सदाचरण. १०१
तिसरे दिवसीं केला जो दिव्यास्त्रप्रयोग तच्छमना[20],
करिता जालों, राया! कीं मीं गुरुदेवभक्त अच्छमना[21]. १०२

---

१. भयकर. २. सर्पाशी. ३. पराभव पावे. ४. माझ्या बरगडींत. ५. बाणानें. ६. क्षत्रियरक्तांची. ७. सुदैवानें मरण चुकलें. ८. प्रहारांत. ९. रामाने. १०. त्या घोड्यांचें. ११. प्रलयकालच्या मेघाचे मित्र च असे (आम्ही). १२. अवकाश. १३. आपल्या बाजूने लढण्याचा इतर वीरांना मी च ताप दिला नाहीं, मग तो वीर विप्र कशाला देईल? आम्हीं उभयतां च काय ते लढलों, असा अर्थ. १४. परस्परांचें खंडण करण्यांत. १५. स्वतःपासून उत्पन्न झालेल्या अग्नीनें. १६. आपल्या धनुष्याच्या दोरीला. १७. विश्रांति. १८. युद्धयज्ञाच्या. १९. शेवटीं. २०. त्याच्या शांतीकरितां. २१. शुद्धमनस्क.

गुरुनें जी पाठविली मम [1]कृत्यासी च शक्ति बा! राज्या!
ती, त्या हि खंडिल्या म्या आल्या अत्युग्रशक्ति बारा ज्या.
पुनरपि सोडुनि शक्ति प्रकटी दिव्यास्त्र तें न कथवे गा!
मद्रथवेग गुरुपुढें किति? करिता रुद्ध [2]भानुरथवेगा. १०४
खरतर शर प्रकटले जिकडे तिकडे अनंत राज्या! रे!
खंडाव्या किति तरि त्या [3]शक्तिशरततीं [4]अनंतरा ज्या रे! १०५
सतुरगसारथिरथ मीं झालों [5]शुकें, [6]गुरुशरौघ [7]पंजरसा,
शर शिरकले शरीरीं [8]कंजीं अळि शिरति जेंवि [9]कंजरसा. १०६
[10]मद्रथरत्नीं शिरले बहुत [11]शिलीमुख जसे [12]कुशलभ वनीं,
कीं सर्वस्व हराया तस्कर, बहु ज्या वसे [13]कुशल [14]भवनीं. १०७
[15]सुर हि मुरडिता 'चुकलों' म्हणउनि, मग कां न कान नर हातें?
रे! काय दवाग्निपुढें [16]पसरूनि [18]दुकान [17]कानन रहातें? १०८
त्वेव्हां जें केलें तें कथितों, सादर कथेंत मन घाला,
विव्हळ करिता जालों मीं मर्जहुनि फार त्या हि [18]अनघाला.
[19]उरलों [20]विकळ हि होउनि; [21]तिसरा तों वेचला चि अस्ता, गा!
राहे [21]रण; प्रकाशा आटोपुनि [22]मित्र जाय [23]अस्तागा. ११०
चवथे दिवसीं संगर [24]संगरहितबुद्धि तो करी, राया!

१. आसुरी देवतेसारखी. २. सूर्यरथाच्या वेगाला. ३. शक्ति व बाण याचे समूह. ४. अतररहित, एकामागून एक आलेल्या. ५. पोपट. ६. रामाचा बाण-समुदाय. ७. पिंजऱ्यासारखा. ८. कमलात. ९. मधाकरितां. १०. माझ्या उत्तम रथांत. ११. बाण. १२. दुष्ट टोळ. १३. कल्याण (संपत्ति). १४. घरात. १५. देव हि 'चुकलों' असें म्हणून परतता; मग मनुष्य 'चुकलों' म्हणून आपले कान का पिळणार नाही? युद्ध पाहण्यास आलेल्या लोकाना हि बाण लागू लागले, असा ध्वन्यर्थ. १६. पसारा मांडून. १७. अरण्य. १८. पुण्यवान् रामाला. १९. जीवंत राहिलों. २०. घायाळ. २१. तिसरा दिवस अस्तास गेला तेव्हा युद्ध थांबलें. २२. सूर्य. २३. अस्ताचलास. २४. निःसंग बुद्धि ज्यांची असा विरक्त (परशुराम).

मारुनि मत्सूतातें डसवी [1]शरसर्प शत शरीरा या. १११
[2]अतितेजस्वीषुवरें मद्धृदया होय तो विदारविता
तत्काळ मला आली [3]शशिता, त्या [4]युद्धकोविदा रविता. ११२
स्वरथावरूनि बाणाघातें उसळोनि पावतां पतन,
वरिचेवरि [5]भव्यपुरुष आठ करिति सांवरूनि मज जतन. ११३
ते एकदा चि वदले '[6]मा भैः स्वस्त्यस्तु [6]ते' असें हित रे!
झालों स्वस्थ, सदुक्तें सर्व हि, संकट असो कसें हि, तरे. ११४
त्या विप्रांसि नमुनि म्यां पुशिलें कीं, 'रण पुन्हा करूं निकरें?'
बसतों तों [7]माय रथीं आहे [8]मत्तुरंगगुण धरूनि करें. ११५
गंगेसि नमुनि वदलों, "मत्सारथि तवकृपाकटाक्ष महा,
[9]या चि बळें [10]दिग्गिभांच्या आहे भेदावया [11]कटा [12]क्षम हा. ११६
[13]आशी तुजी समर्था, स्वन्यूना त्वां इलाऽन लेखावें,
देखावें कुतुक, [14]'परें देवीसिंहासि काय गे! खावें? ११७
[15]देवसतींत विमानीं बैसोनि सुखें दुरूनि समर पहा,
[16]गुरुवर सारथि ज्याचा त्यासीं भांडुनि म्हणेल [17]अमरप.'हा!'
वरितील मज चि सुयशें लोकीं [18]हरिपादनखसुते! जितकीं,
बहु [19]मच्छिरीं [20]"निषंगीं [21]गुर्वाशीर्वादशर [22]सुतेजित कीं." ११९
'तरसील द्विभुज कसा? यासि न समरीं [23]सहस्रबाहु तरे;

---

१. बाणरूपी सर्प. २. अतितेजस्वी अशा बाणश्रेष्ठानें. ३. चंद्रत्व. ४. युद्धनिपुण रामाला. ५. दिव्य पुरुष. (भीष्म हा अष्टवसूंतील द्युनामक वसूचा अवतार असल्यामुळें अष्टवसु त्याचें रक्षण करित होते). ६. भिऊं नको, तुझें कल्याण असो. ७. गंगा. ८. माझ्या घोड्याचे लगाम. ९. तुझ्या कृपेच्या बळावर. १०. दिग्गजाच्या. ११. गंडस्थळाला. १२. समर्थ. १३. आशीर्वाद. १४. इतर सिंहानें. १५. देवांच्या स्त्रियांत. १६. गुर्वाशीर्वाद. १७. इंद्र. १८. विष्णुचरणनखकन्ये गंगे! १९. माझ्या मस्तकीं. २०. भात्यांत. २१. गुरूचे आशीर्वादरूप बाण. २२. अत्यंत तेजस्वी. २३. सहस्रार्जुन.

बहु जाले या मूर्तप्रलयज्वलनीं[1] पडोनि बा ! हुत[2] रे !' १२०
ऐसें वदे, रडे, तनुजप्रेमाचा[3] न आवरे उत, रे !
मज आलिंगुनि, हुंगुनि[4] माथां, माता रथावरुनि उतरे. १२१
सारथ्ययुद्धतांडव[5] शस्त्रास्त्रपयोधरा[6] गुरुसमोर
करितां झालों मीं च न, केलें म्यां स्वर्गगा कुरुस मोरें.[7] ११२
जोडुनि कर, सोडुनि परसर्पप्राणांतका[8] शरा मोरा,
झालों विदारिता मीं केवळ यमसन्निकाश[9] रामोरीं[10]. १२३
क्षितिसह गुरुतनु कांपे, पावे उल्कांसमेत[11] पतनातें,
रक्षिति सर्वस्वें मुनि सर्व, जसे वृत्तिमंत[12] वतनातें. १२४
जलधींत[13] बुडे कीं त्या शकला न सख्यासि अर्क राखाया,
मित्रत्व हें चि, धांया[14] कीं लागे अन्य शर्करा खाया. १२५
ऐसें तेवीस दिवस जाले युद्ध त्रिलोकमोहन[15] हो !
म्हणत चि होतों," देवा ! समयीं समरक्रतूंत[16] मोह न हो.'
चिंताकुळ मीं निजलों प्रार्थुनि पितृविप्रदेवता, राया !
ते पूर्वदृष्ट[17] आले स्वप्नीं मज विप्रदेव ताराया. १२७
वदले, ' भिवों नको गा ! भीष्मा ! भ्यालासि कां महाबाहो !
स्मरसील प्रस्वापन[18], त्या अस्त्रें सिद्ध काम[19] हा बा ! हो. १२८
निजला तो मेला चि, प्रस्वापास्त्रें गुरुसि मार कसा,

---

१. मूर्तिमंत प्रलयाग्नीत. २. भस्म. ३. पुत्रप्रेमाचा. ४. मस्तकाचें अवघ्राण करून. ५. सारथ्यरूप व युद्धरूप नृत्य. ६. शस्त्रास्त्रांचा मेघ च अशा रामासमोर. ७. मी आपला स्वर्गस्थ पूर्वज जो कुरु त्याला हि मोर केलें, म्हणजे आनंदाने नाचावयास लाविलें. ८. शत्रुरूप सर्पाच्या प्राणनाशक मोराला. (रामाला). ९. यमाप्रमाणे दिसणाऱ्या. १०. रामाच्या छातीला. ११. ज्वाला व विद्युत्पात या अशुभ चिन्हांसह. १२. वतनदार. १३. समुद्रांत. १४. खरें मित्रत्व तें हें च; वरकड मित्रत्व हे गोड खाण्याच्या किंवा देण्याच्या च कामाचें. १५. तिन्ही लोकांस मोह उत्पन्न करणारें. १६. युद्धयज्ञांत. १७. पूर्वी पाहिलेलें. १८. मोहिन्यस्त्र. १९. रामपराभवरूप इच्छा.

तारक साचा गमसिल अस्त्रें संबोधनें[1], न मारकसा.' १२९
वर्णावा सदनुग्रह[2] किति? झाला फार तो विसावा हो!
जागा झालों, आला युद्धाचा दिवस चोविसावा, हों! १३०
मग तुमुल लोमहर्षण[3] अद्भुत युद्ध प्रवर्तलें बा! गा!
झाला असेल कंप क्षितिकंपें क्षितिधरा महानागा[4]. १३१
पूर्वदिवसप्रहारक्रोधें तो क्षत्रकुळमहाशत्रु[5]
बहुशक्तिशक्ति[6] सोडुनि फोडुनि टाकी मदीय हें जत्रु[7]. १३२
विमळातुळबळसागर[8] घागरभर रक्त ओकवी, राया!
तेव्हां मेला चि असें मानिति जन सर्व लोक वीरा या. १३३
म्या[9] रोंविला ललाटीं शृंगापरि[10] शर धरूनि आवांका[11],
कोपें मनांत वदलों, 'गुरुजी! आतां करूनि आ वांका.' १३४
हाणी गुरु शर कठिन हि, माजे त्या सुकठिना न वक्ष तरे[12],
पडलों क्षितिवरि, जाणों झालें बाळासि तें नव क्षत[13] रे! १३५
आली संज्ञा[14], बसलों स्वरथीं, झाल्या विभीति[15] शक्तिमती,
मग शक्ति हाणिली म्यां श्रीरामभुजांतरांत शक्तिमती[16]. १३६
स्वरथावरूनि मूर्छित होउनि मुनिवीरमुकुटमणि[17] खचला,
उठवुनि सूत म्हणे, 'यश गेलें, कीं खळवधार्थ आणिख[18] चला.'
मोह हरुनि, देउनि कर[19], अकृतव्रण सारथी रथीं चढवी,
कढवी क्रोध मनीं बहु, 'योजावें ब्राह्मअस्त्र' हें पढवी. १३८

---

१. संबोधनास्त्रें. (जागृत करणाऱ्या अस्त्रानें). २. सज्जनाची कृपा. ३. रोमांचोत्पादक. ४. पृथ्वीचा भार वाहणाऱ्या शेषाला. ५. क्षत्रिय जातींचा मोठा शत्रु. ६. मोठी आहे शक्ति जिची अशी शक्ति. (अस्त्रविशेष). ७. कंठ व बाहू यांमधील भाग. ८. शुद्ध व निरुपम बलाचा समुद्र. (राम). ९. मला. १०. मस्तकावर असलेल्या शिंगाप्रमाणें. ११. धैर्य. १२. त्या अतिकठिण बाणापुढें माझ्या छातीचा निभाव लागला नाहीं. १३. जखम. १४. शुद्धि. १५. भीतिरहित. १६. बलवती. १७. मुनि व वीर यांत श्रेष्ठ असा राम. १८. आणखी. १९. हात देऊन, सांवरून.

ब्रह्मास्त्र योजिलें मग मज भस्म करावया शुचिकथानें[1]
जन म्हणति, 'बळें शिशुला पाजावा काय हो! रुचिक[2] थानें[3]?
अनघा[4] बरवा न असा अत्युग्राचार; अननघा बरवा;
त्यजिलें[5] अकृपपण[6] पुन्हां स्वीकारुनि, साधुमन न घाबरवा.'
गुरुकर्म[7] गुरुप्रिय मीं करिता जालों तसा न होत्सा हें,
ब्रह्मास्त्रावरि म्यां हि ब्रह्मास्त्र चि योजिलें महोत्साहें. १४१
ब्रह्मास्त्रद्वयतेज व्योमीं[8] व्योमगजना[9] न फटकों[10] दे,
सर्वत्र तें तृणीकृतकल्पांतरुषितसहस्रफट[11] कोंदे. १४२
देवर्षि ब्रह्मर्षि क्षत्रर्षि[12] व्योमभूमिचर[13] सारे
जाले सुतप्त, गमला हा गुरु हि क्रुद्ध शुद्ध हरसा, रे! १४३
म्हणति नभश्चर[14], 'आम्हीं सोडुनि कोणीकडे नभा जावें?
बापा! ब्रह्मास्त्राग्ने[15]! आम्हां शरणागतां न भाजावें.' १४४
मज पतनीं रक्षाया करिती जे विप्र आठ वेगातें,
त्यांहीं कथिलें होतें जें प्रस्वापास्त्र आठवे गा! तें. १४५
'अस्त्र स्मरसील' असा देती ते विप्र आठ वर हा यां[16],
तो हेतु होय समयीं याच्या चित्तास आठव[17] रहाया. १४६
प्रस्वापनप्रयोगीं[18] रामाचें बाण तेज न पहाते;
जे व्योमगत[19] महीगत[20] म्हणति सकळ जाणते जनप[21] 'हा!' ते.
प्रस्वापनप्रयोगोपक्रम करितां चि साधु सुर सारे

---

१. पुण्यचरिते राम. २. रुईचा चीक. ३. स्तनद्वारा. ४. पुण्यवानाला. ५. त्यजिलेलें. ६. निष्कृपत्व. ७. तसा (त्या रामाप्रमाणे) [निष्ठुर] न होत्साता गुरुप्रिय [असा] मी गुरुकर्म (मोठें कर्म) करिता जालो. ८. आकाशांत. ९. देवाना. १०. फिरू दे. ११. तुच्छ केला आहे प्रलयकाली रागावलेला शेष ज्याने. १२. राजर्षि. १३. देव, मानव. १४. देव. १५. ब्रह्मास्त्ररूप अग्ने! १६. मला. १७. आठवण. १८. प्रस्वापनास्त्र योजिलें तेव्हा [माझे] बाण रामाचें तेज न पहाते (सहन न करिते.) १९. आकाशांत प्राप्त झालेले (देवादि). २०. भूतलस्थ. २१. लोकपाळ—पंत.

मज म्हणति, 'पारिजातें हि न लंघावी कदापि सुरसा[1] रे!'
नारद म्हणे, 'करावा न प्रस्वापप्रयोग, शांतनवा!
कां क्षोभलासि बहु तूं? जन्माचा शांत कीं न शांत मवा. १४९
कैसा हि असो गुरु, बहुमान्य चि चित्तें हि लंघ्य न भल्याला,
पूज्य चि दक्षमखांतक[2] ज्न्हि अस्थि[3] भुजंग भस्म नभें[4] ल्याला.
अवमान स्वगुरूचा त्वां न करावा चि, हा असामान्य
ब्रह्मण्य[5] ब्राह्मण हा, लोकीं तापस नसे असा मान्य. १५१
गुरुचरणावरुनि सदा ओवाळुनि सांडिती असु[6] ज्ञाते,
सुज्ञा हरिहरसे जे गुरुचरण, न मानती[7] असुज्ञा ते.' १५२
ते गगनग[8] अष्ट पुरुष वदले, 'देवर्षिवच न मोडावें,
जोडावें यश, भीष्मा! त्वां न प्रस्वापनास्त्र सोडावें.' १५३
तें ऐकुनि म्यां केलें ब्रह्मास्त्राचें पुनःप्रदीपन[9], गा!
रामास भासलों मीं कल्पांतींचा जसा नदीप[10] नगा[11]. १५४
राम दिसे विप्रभ[12], तें अद्भुत चि, जसा रवि प्रभा वमला,
निंदूनि म्हणे, 'कळला आतां चि असार विप्रभावें[13] मला,' १५५
जमदग्निप्रमुखपितर रामातें म्हणति, "काय हा निकर?
वत्सा! तुज अनुचित हा परधर्म[14] स्वपरकायहानिकर. १५६
दिसतोसि शीतकरसा[15], हा समरग्रीष्म, भीष्म हा तपन,
हात[16] पनसा तसा तूं, परि म्हणवी सेवित्यासि हा 'तप न.'
हा देव कीं सुरनदीनंदन[17] आठां वसूंत अन्यतम[18],
तुज जिंकुनि भीष्म जसा, वांचुनि झालासि तूं हि धन्यतम!

---

१. तुलसी–पंत. २. दक्षाच्या यज्ञाचा नाश करणारा शंकर. ३. हाडे. ४. आकाश. (शंकर दिगंबर–नग्न आहे). ५. ब्राह्मणभक्त. ६. प्राण. ७. मान्य होती. ८. आकाशस्थ अष्टवसु. ९. पुनरुज्वलन, पुनरुत्थापन. १०. समुद्र. ११. पर्वतास. १२. निस्तेज. १३. ब्राह्मणत्व. १४. क्षात्रधर्म. १५. चंद्रासारखा. १६. परिशिष्ट पहा. १७. भीष्म. १८. अष्टवसूंतील कोणी एक.

याचा मृत्यु विधिविहितें, शक्रसुत नरावतार जो भावी,
परशक्ति यापुढें, असि न रविपुढें दीपदीप्ति शोभावी. १५
सिंधूसि जेंवि मानव बाहुबळें तेंवि यासि न पर तरे,
येथुनि परत, मग करुनि हठ, मठ सोडुनि, कदापि न परत, रे!'
राम निवृत्त न होतां, तत्पितर म्हणति मला, 'अगा साधो!
तुज निजधर्मौदार्यें यश, हें न स्वर्गगा अंगा साधो. १६
राम तुजा गुरु, याचा रक्षावा मान, मानदा! मानीं;
बांधी बाहुगुणानीं दक्षा वामा न मान दामानीं.' १६
वदलों, 'क्षत्रिय मीं कां परतेन प्रथम, धर्म सोडूनीं?'
राम म्हणे, 'घ्यावी म्यां कीं शिष्यें हार हात जोडूनीं?' १६
न मना ये जें असकृत् कथिति पितर इतर नारदादि हि तें;
क्रोधिहृदय गुर्वक्षर मोडी कीं मूल लाडिकें लिहितें. १६
जालों रणविमुख न मीं, विनविति जन्हि मुनि धरूनि मद्धनुतें
गुरुकरवीं विज्य बळें करविति अनिवर्तिकीर्तिमद्धनु तें. १६
म्हणति, 'प्रणति गुरुप्रति कर' मज ते मूर्त आठ वेदेशं,
रामें प्रथम स्वधनु त्यजिलें तो नित्य आठवे देश. १६
मन्माता हि म्हणे, 'रे! हो न यशोहानि वासरा! मन मीं
किति तरि समजावूं? निजभव्याचा हा निवास राम नमीं.'

---

१. ब्रह्मदेवाने केलेला. २. इंद्रपुत्र. ३. नरनारायणांपैकी नराचा अवतार (अर्जुन). ४. होणारा. ५. दिव्याचे तेज. ६. या भीष्माला. ७. युद्धपराङ्मुख. ८. रामाचे पितर. ९. स्वर्गस्थ. १०. वृक्षाला. (कल्पवृक्षाला). ११ मिळो. १२. गुरूस मान देणाऱ्या भीष्मा! १३. मान्य कर. १४. स्त्री–पंत (चतुर स्त्री आपल्या पतीची मान बाहुपाशानी बद्ध करिते, दोरानीं नाहीं १५. गुरूचे वचन, आज्ञा (पक्षीं) गुरूनें शिकण्याकरितां घालून दिलेली अक्षरे धडा. १६. लिहिणारें. (लिहावयास शिकणारें). १७. माझ्या हनुवटीतें. १८ गुणरहित. १९. स्थिर कीर्ति ज्याची असें धनुष्य. २०. वेदपुरुष, पूर्वो अष्टवसु. २१. वत्सा! २२. आपल्या कल्याणाचा. २३. वसतिस्थान.

पहिल्यापासुनि [1]गुरुवाग्ग्रहणीं सादर मदीय कान मन,
मग धर्मयशस्कर गुरुचरणांसि करीन मीं न कां नमन? १६८
धावूनि पाय धरितां, [2]आशीःसूक्तें सुखें वदे, हातें
स्पर्शे माथां, मद्गुरु निववाया दे [3]सुखेंव देहातें. १६९
प्रेमें असें म्हणे, 'या लोकीं या भार्गवीं [4]रविप्रतिमीं
त्वां तेज मिरविलें बहु; तेजस्वी न वदलों रविप्रति मीं. १७०
जाली व्हावी प्रीति [5]श्रीदाच्या ही न जी [6]वितरणांत,
करिती उदारजीवित ऐसें चि, न हीनजीवित, रणांत. १७१
मृत्युपरीस परिभवापासुनि बहुत चि भिती, परि [7]भवातें
प्रार्थुनि मागति पुत्रच्छात्रांपासुनि भले परिभवातें. १७२
घे माझ्या आशी या [8]सर्वाहितहरिणवागुरा, बाजा
[9]स्वर्वल्लिमंडपींच्या, भवसिंधूंतील बा! [10]गुराबा, जा. १७३
नमन पुरे, संकोचासह अंजलि [11]वसवसा हि सोडावा;
ऐसा चि विजय समरीं [12]अमरींला गावयासि जोडावा.' १७४
ऐसा प्रसाद मजवरि करुनि म्हणे राम, "[13]काशिपतितनये!
हळुहळुनि जसें म्हणतो शिव, '[14]कां गे! देवि काशि! पतित न ये?'
तैसें चि म्हणत होतों, [15]शरणार्थी कां न येति [16]चापलते!,
तारूं चि निश्चयें जे जे कळवितिल [17]स्वशत्रुचापलते. १७६
परि परम प्रबळ [18]प्रतिबंधक [19]विधिसा चि [20]आपगेय महा,

१. गुरुवचनपालनांत. २. आशीर्वादयुक्त उत्तम वचनें. ३. चांगलें आलिंगन. ४. सूर्यासारख्या. ५. कुबेराच्या. ६. देणगींत. ७. शंकरातें. ८. सर्व शत्रुरूप हरिणांचा नाश करणारें जाळें. ९. कल्पलतेच्या मंडपांतील. १०. झाज, नौका—पंत. ११. [ गुरुपराभवाची ] रुखरुख, खवखव. १२. देवांगनांना. १३. अगे! १४. [ मी पतितांचा उद्धार करण्यास सिद्ध असतां ] देवि काशि! [ मला भेटायला ] पतित कां गे! येत नाहीं? १५. रक्षणेच्छु. १६. हे धनुर्लते! १७. आपल्या शत्रूचें औद्धत्य. १८. माझ्या पराक्रमास अडथळा करणारा. १९. दैवासारखा अलंघ्य. २० भीष्म.

नयवर्तित्वें[1] बाई! दंडुनि गुरुस हि विपाप[2] गे! यम हा. १७७
मज जिंकिलें नदीजें, न चले बळ यापुढें तिळ हि माजें;
हिमजितें[3] होय रविमह हि, वरवि तमापरि भयें बिळ हिमा जें.
भीष्मपराभव न घडे, शाल्व तुला शरण आणु? सांग मला.
कीं काळा जिंकूं, जो हरिणां हरिसा चि माणुसां गमला? १७९
अन्या धन्या गति तुज नाहीं; जा जान्हवीसुता[4] शरण,
अक्षम करावया या वीरासीं सूर्य शशि हुताश[5] रण." १८०
अंबा म्हणे, 'शरण मीं जाईन वनां[6], न या भरतपातें[7],
करिन सहाय वधाया याला, घालूनियां भर तपातें[8].' १८१
यापरि वदोनि गेली मन्मथनार्थ[9] स्वयें तप कराया,
उपशम[10] परम मधुर, परि लागे केवळ तिला सफक[11], राया!
रामहि मला पुसोनि, प्रेमें मजवरुनि हात फिरवूनीं,
जाय महेंद्रगिरिप्रति, विश्वांत गुरुप्रसाद मिरवूनीं. १८३
येतां स्वपुरा करिती बहु बंदी[12] पौर[13] कवि[14] मम स्तवन,
गाजविति मयूर जसे गर्जुनि मेघोदयीं समस्त वन. १८४
क्षतशत[15] पाहुनि, पावे सत्यवतीची हि फार तनु कंपा,
किंबहुना? गंगेची मजवरि तितुकी नसेल अनुकंपा. १८५
मद्वधकामें[16] अंबा करिती झाली वनीं बहु तपाला,
जी स्वल्प पवन सेवी, सेविल ती काय हो! बहुत पालीं[17]? १८६

१. न्यायाच्या वागणुकीने. २. निष्पाप. ३. जें तमापरि हिमा ( थंडी, दव, धुके याना ) भयें बिळ वरवि ( गुहा पहावयास लावी, दूर घालवून देई ) ते रविमह हि ( सूर्याचें तेज हि ) हिमजित होय ( धुक्यानें आच्छादित झाले ). ४. भीष्माला. ५. अग्नि. ६. वनाचा आश्रय करीन. ७. भीष्मातें. ८. तपश्चर्येच्या बळावर. ९. माझ्या नाशाकरितां. १०. इंद्रियनिग्रह., ११. नीरस. १२. भाट, स्तुतिपाठक. १३. नागरिक. १४. शाहणे. १५. [माझ्या शरीरावरील] शेंकडों व्रण. १६. माझ्या वधाच्या इच्छेनें. १७. झाडपाला.

‘वर माग, मागलिस बहु, देतों मीं वर नतासि[1] अंबे! शें,[2]’
यापरि वदोनि केली धन्या संन्यासियांत[3] अंबेशें[4] १८७
असती विवेकमति[5] तरि, मिळती परमा गती,[6] परि भंवातें
माज्या अंबा[7] झाली जोडुनि कर मागती परिभवातें. १८८
ईश्वरें म्हणे, ‘दिलें, जा,’ ऐक नृपा! ती प्रभूसि जें वदली,
‘काय शुका मदिराक्षी, खदिरा[8] क्षीणत्व दे रैणी कंदली[9]?’ १८९
देव म्हणे, ‘द्रुपदसुता[10] आधीं होसील, पुरुष[11] मग, जा, गे!’
निजबिरुद्वरक्षणीं हा प्रभु जेंवि न तेंवि अमरनग जागे. १९०
हा वरदवरसमर्पित[12] मज हितकर चैरमुखें[13] कळे वर हो!
देव विनविला म्यां कीं, ‘पात्र अपयशा न हें कळेवर[14] हो.’ १९१
होतां अंतर्हित[15] तो वरदेश्वर सर्वभक्तहितरचिता,
स्वचिता रचि स्वयें ती उग्रमति, रचील कोण इतर चिता?
यमुनातटीं चितेला पावक[16] ती आपुल्या चिं दे हातें,
मद्वधसंकल्प करुनि ‘होमी[17] हो! मीनदृष्टि[18] देहातें. १९३
[19]मद्वधकाम द्रुपद हि उग्रतपें ईश्वरासि आराधी.
[20]त्याला हि भक्तवत्सल भेटे, नसतां हि शांतिसारा धी. १९४
‘स्त्रीपूर्व पुत्र द्विधला’ ऐसें वर मागतां वदे वरद;
न करी विचार द्याया, विचकूं दे याचकां न देव रैद[21]. १९५
द्रुपदपुरीं पुत्रोत्सव परिपूर्ण घरोघरीं भला माजे,

१. नम्रासि. २. शेंकडों. ३. तापसी जनांत. ४. शंकरें. ५. सारासारविचार-शक्ति. ६. मोक्ष. ७. रंभा. ८. खदिरवृक्षाला. ९. केळ. (भीष्माचा पराभव माझ्या अबलेच्या हातून कसा व्हावा, असा भावार्थ). १०. शिखंडिनी. ११. शिखंडी. १२. वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ जो शंकर त्यानें दिलेला वर. १३. हेराच्या तोंडून. १४. [माझें] शरीर. १५. गुप्त. १६. अग्नि. १७. दहन करी. १८. मत्स्याप्रमाणें चंचल आहे दृष्टि जिची. १९. माझ्या वधाची इच्छा करणारा. २०. त्या द्रुपदाची बुद्धि शांतिसंपन्न अशी नसतां हि. २१. दांत. * रण करणारी (?).

'पुत्री' म्हणोनि नारद मुनि कळविति, तें चि वर मला माजे.
ठेवी नाम 'शिखंडी,' हें वर्णूं काय बा! रेंसें गा! तें?
अद्यापि बंदिमागधसूतांचें वृंद बारसें गातें. १९७
लेववित्या बहु भूषा उचिता पुत्राचिया शरीरा ज्या,
किंबहुना? द्रुपदमतें राजसुतेला हि ती वरी, राज्या! १९८
वरिली या द्रोणाची चापश्रुति, मग दशार्णपतिकन्या,
ती शयनीं समजे कीं, प्रकृतिस्वसमा असे, नसे अन्या. १९९
धात्रीस ती म्हणे, "हित होतें, जरि तात कापिता मान;
मानस म्हणतें मज कीं, 'न अशा या घातका पिता मान.'"
कळतां हिरण्यबाहु क्षितिपाळ म्हणे, 'सुता असाव्या ही
इच्छा अरिस हि न शिवो; न मिळाला मदितरा असा व्याही.'
द्रुपदाच्या मथनार्थ स्वचमूची शीघ्र सिद्धता करवी,
ती सज्य होय, दधिचें जेंवि करायासि सिद्ध ताक रवी. २०२
भ्याला पांचाळ म्हणे, 'देवा! पसरिति सुरद्रु पदरा ज्या
त्या तव वरें करावें यापरि चिंतातुर द्रुपदराज्या?' २०३
स्त्रीस म्हणे, "वदलीस प्राप्तवराचा धरूनि विश्वास,
'लग्न करा चि, प्रभुवरयश विदित असे अतर्क्य विश्वास.'
ठावें असोनि सर्व हि, 'पतिच्या खोलींत कोंडवा सून,'
ऐसें स्वसख्यांपासीं कां गे! वदलीस तोंड वासून? २०५
सेंधः स्वदुर्दशा हे, जरि नाइकतों त्वदुक्ति, कां होती?
यापरि विटंबिली जी न करील महत्वहानि कां हो! ती?" २०६
'स्वस्थ रहा मुलि! देवूं प्राण, परि न तुज दशार्णवसुधापा,

---

१. हेर. २. प्रेमानें. ३. भाट व स्तुतिपाठक यांचें. ४. समुदाय. ५. अलकार. ६. धनुर्वेद. ७. दशार्णदेशाच्या राजाची मुलगी. ८. प्रकृतीनें—जातीनें आपल्यासारखी.' (स्त्रीत्वसंपन्न), ९. दाईला, उपमातेला. १०. दशार्णाधिप. ११. माझ्याहून इतरास. १२. 'द्रुपदासारखा. १३. ईश्वरापासून मिळालेल्या वराचा. १४. आतां च. १५. दशार्णराजसुता. १६. दशार्णदेशाच्या राजाला.

तारिल देशाब्धिविषपा ईश्वर, मारिल देशार्णवसुधापा.' २०७
स्वनिमित्त प्राप्त असा होतां सर्वस्वनाश जनकास,
घाली शिखंडिनी तनु ठाकाया, दृढ करूनि मन, कास. २०८
ती जाउनि विर्जनवनीं निजनवनीतातिमृदुलवपु सुकवी,
कीं, 'तप संकट चुकवी' ऐसें सर्वत्र सांगती सु-कवी. २०९
पाहे स्थूणाकर्ण त्र्यक्षसखानुचरवर तिला स्ववनीं,
आग्रह करुनि पुसे, 'कां दिससी विटलीससी निजौस्ववनीं?'
ऐकुनि दुःख म्हणे, 'तुज उचित नव्हे या स्वजीवितीं रुसणें,
स्वस्त्रीत्व हें मला दे, मार्जे पुरुषत्व सर्व घे, उसणें.' २११
अति दुर्लभ जें मिळतां कां हो! न करील मान्य सांगा तें?
आंगातें त्याच्या ये योषात्व, तिच्या हि पुंस्त्व सांगातें. २१२
जायांचें भूषणसें घेउनियां पुरुषचिन्ह, मिरवाया
परतोन ये पित्याचा आधिगिरि सुखार्णवांत विरवाया. २१३
द्रुपदनृपतिहृदयींच्या दुःसहचितास्वरूप सांगेतें
होय अयश्चुंबक जें यक्षवराप्त स्वपुंस्त्व सांगे तें. २१४
दूतमुखें द्रुपद म्हणे, 'बालिश हो! नीट पारखा याला;
अंगारभुक्चकोरें पण न करावा चि पार खायाला.' २१५
कुपितें त्या हेमभुजें पुरुषपरीक्षास्मृती न आठविल्या,
पोरी नव्या नव्या नरपतिसुतवेषें सजूनि पाठविल्या. २१६

---

१. दहा समुद्रांइतकें विष पिणारास. २. दहा समुद्रांइतकें अमृत पिणारास. ३. कास घाली=तयार होई. ४. निर्जनारण्यांत. ५. आपल्लें लोण्यापेक्षा हि अति कोमल शरीर. ६. शिवमित्र कुबेराचा सेवक. ७. आपल्या प्राणरक्षणाविषयीं. ८. स्त्रीत्व. ९. पुरुषत्व. १०. कांहीं दिवस उपभोग घेतल्यावर ज्याचें त्यांकडे जाणारें. ११. चितारूप पर्वत. १२. सुखसमुद्रात. १३. विरघळण्यास. १४. शंकाविशेषातें. २५. लोहचुंबक. १६. यक्षश्रेष्ठापासून मिळविलेलें. १७. निखारे खाणाऱ्या चकोरानें. १८. पहार-पंत. १९. हिरण्यबाहूनें. २०. पुरुषाची परीक्षा करणारीं शास्त्रें.

पडल्या एका शिंग्यावरि बहु शिंग्या करूनि हातेणें,
जो मंदुरेंत होतो गोंधळ, केला प्रकार हा तेणें. २१७
भेटे दशार्णभूपति, परि न द्रुपदात्मजाकडे पाहे;
वाहे कन्यासी श्री, व्याहि क्षमिकोटिकीर्तिला वाहे. २१८
सासूसि सासऱ्यास हि सुतशतसत्कार्य होय ज्यामाता,
विहिणीव्याह्यांकरवीं धुववितिं निजपाद्मतोयज्या माता. २१९
ऐसा अवगत आहे वरदा मज ईश्वरा समाचार,
सर्व हि कळवित होते मज वरदा ईश्वरासमा चार. २२०
त्या यक्षाच्या आला, प्रिय सेवक म्हणुनि, धनद सदनातें,
स्त्रीभावास्तव लज्जित होउनि तो दाखवी न वदनातें. २२१
धनद म्हणे, 'हर्षप्रद दासाला जोवि हो, तसा मोरा.
घन हि नसे, स्थूण न कां आला जोडुनि हात सामोरा?' २२२
'देउनि पुरुषत्व, स्त्री झाला, दावावया मुखा लाजे,'
ऐसें यक्ष कथिति, बहु पाहुनि यां पावले सुखाला जे. २२३
धनद म्हणे, 'हा! मंदा! केलें भलतें चि हें कसें स्वमतें?
गमतें, पुरुषत्वीं न, स्त्रीत्वीं च स्वांत बहु तुजें रमतें. २२४
स्त्रीत्व चि असो, अशा या मूढाला अन्य काय शासन हो!?
न्यूनत्व लेशमात्र द्रुपदाच्या कन्यकायशास न हो.' २२५
विनवुनि शापांतार्थ स्वामीचें वळविलें मन दहांनीं,

१. [घोडी किंवा गाढवी यांचा] माज. २. घोड्याच्या पागेंत. ३. दशार्णभूपति कन्येप्रमाणें च संपत्ति अर्पण करिता झाला व व्याही (द्रुपद) हा [आपल्या मुलाची विटंबना केल्याबद्दलचा सर्व राग विसरून] कोट्यवधि क्षमाशील जनांच्या कीर्तीला वाहता झाला. ४. शभर पुत्रांपेक्षां हि आदराई. ५. आपल्या चरणकमलांस. ६. वर देणाऱ्या मला. ('तुझ्या शत्रूंचा मी पराभव करीन' असा वर भीष्मानें दुर्योधनास दिला होता). ७. हर. ८. स्थूणाकर्णाच्या. ९. कुबेर. १०. स्त्रीत्वास्तव. ११. स्थूणाकर्ण. १२. मी (कुबेर). १३. [कुबेराला] पाहुनियां (?). १४. अंतःकरण. १५. शाप परतविण्याकरितां. १६. कुबेराचें. १७. चारचौघा बधांनीं.

वसु खवळला हि न करी, सत्प्रभुचा कोप अमृतनद, हावी.
शिवसख[1] म्हणे, 'शिखंडी समरीं पावेल मरण जेव्हां हो!
गेलें स्वरूप त्याची प्राप्ति. पुन्हां या कुधीस[2] तेव्हां हो.'. २२७
होउनि कृतकार्य तुम्हां पुंस्त्व जयाचें तयासि ओपावें
म्हणउनि ती[3] गेली, कीं, अभिलाषें ईश्वरें न कोपावें. २२८
यक्ष[4] म्हणे, 'राजसुते! जा, यावज्जीव[5] तूं असी च रहा,
मत्स्वामीनें[6] अथवा त्वद्दैवानें चि तुज दिला वर हा.' २२९
कवडी दुर्लभ ज्या त्या मोत्यांच्या जेंवि राशि खंडीची,
पुंस्त्वप्राप्तिकथा हे कथिली तुज नरवरा[7]! शिखंडीची. २३०
यास्तव म्हणतों आम्हीं हाणूं ना बायकोस हातेरें[8],
करिती सर्वस्वाचें परि न यशाचें सुबुद्धि मातेरें. २३१
स्त्रीतुल्य, स्त्रीनामा स्त्रीपूर्व स्त्रीस्वरूप हे तीन,
यां चौघांवरि आम्हां दृढसंधांची[9] उठेल [10]हेती न." २३२
ऐसे शांतनवाचे साचे परिसोनि बोल कानाहीं,
सभ्य म्हणति, 'गंगासुतसम[11] गौरीसुत[12] हि बोलका नाहीं.'

---

## अध्याय चवदावा.

राजा[13], 'वधाल पांडवबळ किति दिवसां' असें पुसे भीष्मा,
द्रोणा, कृपा, गुरुसुता[14], कर्णास हि रिपुचमूनदीग्रीष्मा[15]. १
भीष्म म्हणे, 'राजा! मीं मारिन पांडवबळास मासानें,'
द्रोण हि असें चि सांगे वृद्ध म्हणुनि निजबळा समासानें[16]. २

---

१. कुबेर. २. दुर्मति स्थूणाकर्णास. ३. शिखंडिनी. ४. स्थूणाकर्ण. ५. मरेतों. ६. कुबेरानें. ७. दुर्योधना! ८. शस्त्र. ९. दृढप्रतिज्ञा करणाऱ्यांची. १०. शस्त्र. ११. भीष्मासारखा. १२. गणपती. १३. दुर्योधन. १४. अश्वत्थाम्यास. १५. शत्रूंच्या सेनारूप नदीस उन्हाळ्याप्रमाणें आटविणाऱ्या (कर्णाला). १६. संक्षेपानें

आचार्य कृप म्हणे, 'हो! व्हावे मज दोन मास या काजा[1].'
गुरुसुत म्हणे, 'दश दिवस बहुत, म्हणाया पैरांसि नाकौं[2] जा.'
कर्ण म्हणे, "या कामा पांच दिवस बहु, कशास दिवस दहा?
शिवशिष्य[3]च्छात्रें म्यां उक्त[4] न करितां म्हणेल शिवसद[5] 'हा!'"
भीष्म म्हणे, 'रे! उडणें विसरे हरिदृष्ट[6] कृष्णसार[7] थितें[8],
तोंवरि उड राधेया! जोंवरि न पहासि कृष्णसारथितें[9].' ५
हें चारकथित[10] वृत्त प्रातःकाळीं च साधुराय कवी
धर्मनृप अर्जुनास स्वमुखें कृष्णासमक्ष आयकवी. ६
आपण हि म्हणे, 'वीरा! रिपुवधकाळप्रमाण सांग मला,
कुरुबळसिंधु[11] सुरांस हि, दुस्तर केवळ न माणसां गमला.' ७
अर्जुन म्हणे, 'प्रभो! बहु थोर चि ज्यांच्या अशा प्रतिज्ञा ते;
परि पावति धर्मबळें न तदितरबळें यशाप्रति ज्ञाते.' ८
इतुकें वदोनि पाहुनि मेघश्यामानना[12]कडे डोले,
'पुसतां प्रमाण तरि अरि वधिन निमेषांतें[13] मीं' असें बोले. ९
'किति कुरुबळ? भस्म करिल जग पाशुपतज्ञ[14] हीं[15] निमेषांत,
हरि कोपतां, गजांत हि शिरती, मग कां न हानि मेषांतें[16]? १०
जें स्वप्रभुसीं[17] धरितें मजसीं ही तें चि पाशुपत नातें;
पावेल ब्रह्मांड हि या मत्तेजें चि आशु[18] पतनातें. ११
जळतिल खळ देवा! जरि करिशील कटाक्षपात ही रागें,
किति खळबळ? जोडावे भंगभयें यांसि[19] हात हीरागें[20]. १२
म्हणतो सर्वां कार्यांहूनि अति अवश्य कार्य भीम रणा,

---

१. कामाला. २. स्वर्गाला. ३. परशुरामशिष्याने. ४. बोलल्याप्रमाणें न करितां. ५. शंकराची सभा. ६. सिंहानें पाहिलेला. ७. हरिण. ८. थोडें सुद्धां. ९. कृष्ण आहे सारथि ज्याचा त्या अर्जुनातें. १०. हेरानी कळविलेलें. ११. कौरवसेनासमुद्र. १२. कृष्णमुखाकडे. १३. क्षणार्धांत, अत्यल्पावकाशांत. १४. पाशुपतास्त्र जाणणारा. १५. मी अर्जुन. १६. मेंढ्यांत. १७. शंकराशीं. १८. त्वरित. १९. ह्यां कृष्णकटाक्षपातातें. २०. हिंऱ्याच्या पर्वतानें.

भीतो अयशा, न तसा हा मानिबळींद्र[1] आर्य भी मरणा. १३
नुरतिल या भवदाज्ञा[2]देवीसिंहापुढें अराति[3]करी,
भीमाकडे परचमूमुख[4] जैसें रविकडे न राति[5] करी. १४
नकुळसहदेवसात्यकिधृष्टद्युम्नादि वीर हे, राया!
तेजस्वी रवि, यांसि न धरितिल खळघूक[6] धीर हेराया. १५
केला शुष्क समुद्र क्षण हि न भरतां अगस्त्यपाणितळें,
रक्षील स्वबळानें त्यापासुनि[7] काय जी! स्व-पाणि तळें[8]?' १६
या कृष्णसखोक्तीतें[9] धर्मात्मा धर्म होय मानवता[10],
कीं[11] तें पुराणमुनिता वदवी, वदवील काय मानवता? १७
सिद्ध कुरुक्षेत्रीं ते सर्व हि जाले करावया समरा,
राजे अन्योन्य म्हणति, 'सफळ रणमखें[12] करा वयास[13], मरा.'
जनमेजयासि ऐसी वैशंपायन कथी कथा, तीतें
गाय मयूर रसिककविकिंकर[14] चित्तें असत्पथातीतें[15]. १९
स्ववर[16]विरचित गुरुवरें हें 'भारत' लिहविलें मयूरकरें,
मुनिरचित[17] मयूरेश्वरदेवकरें द्वापरांत जेंवि हरें. २०

इति श्रीमदार्याभिरचितभारते पर्वप्रवरमुद्योगाख्यमिदमार्यवर्याभिवादिते श्रीरामचंद्रचरणकमलयुगले समर्पितमस्तु ॥

---

१. अभिमानी व बलवान यामध्ये श्रेष्ठ. २. तुझ्या आज्ञारूप दुर्गेच्या सिंहापुढें. ३. शत्रुरूप गज. ४. शत्रूच्या सेनेचें मुख. ५. रात्रि. ६. दुष्टरूप घुबड. ७. त्या अगस्तीपासून. ८. सरोवर—पंत. ९. अर्जुनाच्या भाषणाला. १०. मान्य करिता झाला. ११. अर्जुनानें तें भाषण, तो ज्याचा अवतार त्या नरमुनीच्या नात्यानें केलें; नाहीं तर, सामान्य मनुष्याच्या नात्यानें तो असें भाषण कसें करू शकेल, असा अर्थ. १२. रणयज्ञानें. १३. आयुष्याला, जीविताला. १४. रसिक कवींचा दास. १५. वाईट मार्गापासून दूर झालेल्या. १६. गरूनें आपल्या करसामर्थ्यानें रचिलेलें. १७. व्यासमनिरचित.

# भीष्मपर्व.

---

## अध्याय पहिला.

[1]हालाहलगलसा प्रभु [2]उग्रतपा परि [3]अनुग्र, [4]हव्यास
ज्यास परहितीं बहु, तो करि धृतराष्ट्रीं [5]अनुग्रह व्यास. १
'युद्ध पहावें ऐसें जरि [6]तुज वाटत असेल बा! पाहें,
घे [7]दिव्यदृष्टि देतों, मज किमपि कठिन नसे चि बापा! हें.' २
अंध म्हणे, 'दृष्टि नको, [8]स्वज्ञातिक्षय मला पहावेना,
[9]रणवृत्त [10]वरें कळवा, हें आयकिल्याविना रहावेना.' ३
व्यास म्हणे, 'संजय तुज सांगेल, विचारशील समरा [11]ज्या,
तुजकरितां, मजसीं हो, पावोनि विचारशील, सम, [12]राज्या!
[13]प्रथितों करीन वर्णुनि कीर्ति तुज्या, पांडुच्या हि, [14]तनयांची;
[15]सनयांची चिंता बुध न करिति जैसी तसी च अनयांची. ५
पाहुनि [16]उत्पातातें बहु [17]तज्ञ [18]सकंपकाय होतात.'
हें ऐकुनि भूप वदे, 'होणार चुकेल काय हो तात!?' ६

---

१. हालाहल नांवाचें विष गळ्याचे ठायीं असणाऱ्या शंकरासारखा. २. भयंकर आहे तप ज्याचें असा. ३. शांत, सौम्य. ४. उत्साह, उत्कट इच्छा. ५. कृपा. ६. तुला अंधाला, (धृतराष्ट्राला). ७. ज्ञानदृष्टि. ८. आपल्या कुलाचा नाश. ९. (कौरवपांडवांच्या) युद्धाचीं हकीकत. १०. वरानें, वर देऊन. ११. ज्या युद्धाची हकीकत विचारशील ती. १२. अन्वयार्थ—राज्या (धृतराष्ट्रा)! विचारशील (विचारसंपन्न असें शील) पावोनि (मिळवून) [ हा संजय ] मजसीं सम (माझ्यासारखा) तुजकरितां हो (संजयाला माझ्यासारखी च लोकोत्तर दिव्यदृष्टि प्राप्त होवो). १३. प्रसिद्ध, प्रख्यात. १४. पुत्रांची. १५. न्यायनिष्ठाची. १६. अशुभसूचक निमित्तांस. १७. तज्ज्ञ=उत्पातज्ञ. १८. कंपयुक्त देह ज्यांचे असे.

भगवान् मुनिवर[1] गेला पुत्राला[2] सूचवूनि भाव्यर्था[3],
कीं न तयाची व्हावी चिंताशोकें करूनि भा[4] व्यर्था. ७
जावूनि कुरुक्षेत्रीं दुर्योधननृपतिनिकट[5] राहूनीं,
संजय नृपाकडे[6] ये, भीष्मनिपतनांत[7] युद्ध पाहूनीं. ८
धृतराष्ट्रासि म्हणे, 'जी! संजय मीं वंदितों तुम्हा, परिसा[8],
अद्भुत जालें, वधिला त्वत्तात[9] शिखंडिनें, गजें[10] हरिसा[11].' ९
नृपति म्हणे, "अनृत[12] कसें जालें स्वाधीनमृत्यु[13] होता तें?
फिरलें अदृष्ट[14]? अथवा त्यजिलें कोदंड[15] काय हो! तातें? १०
शिवलीं शिखंडिशास्त्रें कैसीं? गुरु देव विप्र मत्तातीं[16]
नित्य प्रसन्न, कीं, हो! स्पर्शावीं स्पष्ट विप्रमत्ता[17] तीं. ११
रामास[18] हि न मिळालें हें यश भुवनांत जो असामान्य,
हा पांचाळ शिखंडी आहे द्रुपदास सुत असा मान्य[19]! १२
बा! तूं महानिरंकुश[20] लिहिलें ऐसें कसें अगा! धात्या[21]!?
हा! गोष्पदीं[22] बुडावा लंघुनि[23] रामार्णवा[24] अगाधा[25] त्या? १३
हा! भृगुपतिवरविद्यासर्वस्वनिधानधनप[26]! हा! तात!
अनुभविलें क्षणभंगुर सर्व हि जें सुज्ञ जन पहातात. १४

---

१. मुनिश्रेष्ठ व्यास. २. धृतराष्ट्रास. ३. भविष्यास. ४. तेज. ५. दुर्योधनराजाजवळ. ६. धृतराष्ट्राकडे. ७. भीष्माचे पतन होईपर्यंत. ८. ऐका. ९. तुझा पिता. (भीष्म हा धृतराष्ट्राचा चुलता असता हि तो पित्याप्रमाणे पूज्य असल्यामुळे त्यास 'तात' असें म्हटलें आहे). १०. हत्तीने. ११. सिंहासारखा. १२. खोटे. १३. स्वाधीन आहे मृत्यु ज्याच्या असा, इच्छामरणी. १४. दैव. १५. धनुष्य. १६. भीष्मावर. १७. उन्मत्ताला. १८. परशुरामास. १९. वंदनीय, सर्वमान्य. २०. ज्याला प्रतिबंध करणारा अंकुश नाहीं असा. २१. ब्रह्मदेवा! २२. गाईचे खूर उमटलेल्या जागेंतील पाण्यात. २३. उतरून; पार पडून. २४. परशुरामरूप समुद्रास. २५. खोल. २६. परशुरामाच्या श्रेष्ठ विद्येच्या सर्वस्वाच्या कोशाचा स्वामी (कुबेर) अशा भीष्मा!

पितृशोकवज्रपातें[1] हि नव्हे कां सांग गा! पतन यांचें[2]?
होय अकस्मात् तारक तातक्षयहेतु[3] पाप तनयाचें. १५
मथिला कसा उतरिता रिपुचा काकुत्स्थवीरसा[4] रेंचें[5]?
कैसें उलेल[6]? विधिनें रचिलें हें हृदय हीरेंसारें[7] च. १६
त्वद्दोषें चि बुडाला हा देवव्रत महातपा[8], पोरा!
दुर्योधना! भिजवितें अश्रु, सुजवितात हात पांपोरा[9]. १७
करितां न धर्मलंघन, तरि तुमचा भीष्मसेतु[10] उरता, तें
काय वदावें आतां? घ्यावें बडवुनि ललाट[11] उर तातें[12]. १८
दुःशासना! खळा! त्वां साध्वीची[13] सोडिली निरी हातें,
त्या कर्माचें फळ हें जालें ऐसा हि या निरीहातें[14]. १९
प्रभुता[15] असोनि शासन केलें न तुज प्रकाममत्तातें[16],
हें चि पतनकारण[17], अघ[18] इतर लव हि जोडिलें न मत्तातें[19]. २०
रे! सौबळ[20]! दुर्योधन! दुःशासन! अंगदेश[21]! हा! खल हो!
चूर्ण करील तुम्हांला धर्म बता[22], भंगदेश[23] हा खल हो! २१
जाला कृतकृत्य[24] जगीं, जाइल भेदूनि तात[25] हा रविला[26],
मारविला धर्में कुळगुरु, राज्यार्थ स्वधर्म हारविला. २२
हा! धर्मा! स्वल्पार्थें[27] कां वधिला ओपिता[28] महालाभा?
स्वप्नांत म्हणत होती दिक्पांची[29] ओ पितामहाला भा[30]. २३

---

१. पितृशोकरूप वज्राच्या प्रहाराने. २. या धृतराष्ट्राचें. ३. भीष्माच्या नाशास कारण. ४. ककुत्स्थ कुळांत उत्पन्न झालेल्या वीराप्रमाणें; (श्रीरामचंद्राप्रमाणें). ५. रेंच उतरिता=गर्वाचा परिहार करणारा. ६. फुटेल. ७. हिऱ्याच्या बळकटीनें. ८. महातपस्वी. ९. पांप्याच्या उरास. १०. भीष्मरूप पूल. ११. कपाळ. १२. म्यां धृतराष्ट्रानें. १३. पतिव्रतेची. (द्रौपदीची). १४. निरिच्छास, निस्पृहास. १५. सामर्थ्य. १६. फार उन्मत्त झालेल्यास. १७. पडण्याचे–नाशाचें कारण. १८. पाप. १९. माझ्या पित्यानें. (भीष्मानें). २०. शकुने! २१. कर्णा! २२. बत्ता. २३. रणांगण. २४. धन्य. २५. भीष्म. २६. सूर्यमंडळास. २७. थोड्या लाभासाठीं. २८. देणारा. २९. दिक्पालांची. ३०. प्रभा, तेज.

रे ! धर्मा ! व्यर्थ तुझें आलें सद्धार्मिकत्व[1]; आ ज्याला
कैवळांर्थ[2] पसरिला, त्या वधिलें कैसें धनार्थ आज्याला ? २४
आलें काय, करावा ज्या तेजें विश्वक्षेम शकतां[3], तें ?
न गणावा[4] गरुड हि, मग लेखाला काय हो ! मशक[5] तातें ? २५
वा ! संजया ! सविस्तर वद, अस्तला[6] केंवि तो पिता तरणी[7] ?
आहे कीं द्रोण ? यदिषु[8] लाज[9] रविकरांसि[10] ओपितात रणीं. २६
जो हेंचि[11] म्हणत होता अनुदिन[12] 'सुहृदंबुजव्रजा[13] ! विकसें[14],'
त्या अद्भुत[15] भीष्मदिवाकरपतनीं[16] वाटलें तुम्हांसि कसें ?' २७
संजय म्हणेः—नरेशा[17] ! तेव्हां ऐसें चि वाटलें कांहीं :
कीं भीष्में धरिली ती धरिली च तुज्या हि वाट लेकांहीं. २८
अनयें[18] तुमच्या चि पिता साधु शमविला[19], न याविना[20] शमला;
लोभी म्हणतो, 'ज्याला न त्यजितां ही नया[21] विनाश मला.' २९
लोभी धर्मनयनयनहीन[22] म्हणे 'हा !' तसा न अनयन[23] 'हा !'
करितां अजातरिपुचा[24] विद्वेष, कसा अधर्म अनय न हा ? ३०
करितां साधूच्छेद[25] स्वोच्छेद[26] चि होय, हो ! यश न राहे,
खळ काम कोप लोभ छळिति, बळें करुनियां वश, नरा हे.
युद्ध सविस्तर कथितों, ज्ञान मला जें दिलें गुरुवरानें[27]

---

१. सद्धर्मपरायणत्व. २. घांसासाठी. ( घांस मिळावा म्हणून ज्यापुढें बालपणीं त्वां आ पसरिला ). ३. समर्थ झाला असता. ४. पर्वा करावी. ५. घुगुरडें. ६. बुडाला, अस्तास गेला. ७. सूर्य. ८. ज्याचे बाण. ९. लाज ओपितात=लाज देतात, लाजवितात. १०. सूर्यकिरणांस. ११. भीष्मसूर्य. १२. प्रत्यहीं, दररोज. १३. मित्ररूपी कमलसमूहास. १४. विकसित हो, प्रफुल्लित हो. १५. आश्चर्यकारक. १६. भीष्मरूप सूर्याचें पतन झालें असतां. १७. धृतराष्ट्रा ! १८. अन्यायानें. १९. मारला. २०. अन्यायाशिवाय. २१. न्यायमार्ग न सोडतां हि. २२. धर्म व नीति हे च नेत्र, त्यांनीं रहित. २३. आंधळा. २४. धर्माचा. २५. सज्जनांचा नाश. २६. स्वतःचा नाश. २७. व्यासानें.

श्रीमुनिनें तुजकरितां तें हें, काय न तुवां कुरुवरानें[1]? ३२
कुरुगुरु भीष्मद्रोण प्रातःकाळीं उठोनि देवास
प्रार्थुनि वदले, 'धर्मा जय, आम्हां निजपदीं[2] च दे वास.' ३३
त्वत्तनयें भीष्म पुढें केला, बळसिद्ध करुनियां कलहा,
धर्में धनंजयमतें भीम महाबाहु कीं महाखलहा[4]. ३४
स्वल्प[5] स्वबळ, सुयोधनबळ विपुळ, म्हणोनि धर्म जो भ्याला
त्यास म्हणे विजय[6], 'विजयलवलाभ[7] नसे परस्वलोभ्याला[8].'
बा! सत्य धर्म जिकडे, तिकडे श्रीकृष्णनाथ जाणावा,
हा तेथें जय, रविसा प्रार्थुनि नलगे प्रकाश आणावा. ३६
जिकडे हरि, हर विधि[9] मुनिवर वेद दिगीश[10] शक्र हे तिकडे,
फोडील मेरुचे ही एतद्दक्प्रहितचक्रहेति[11] कडे. ३७
वर्णूं कैसे कौरवपांडवसेनासमूह? अर्णव[12] ते;
गुरुवर[13] मला कथंचित्[14] करिता जरि दशशतास्य[15] वर्णवते. ३८
येतां धर्मयशाच्या अकरा अक्षौहिणी चमू हरणा[16],
जाला सिद्ध युधिष्ठिरभीमनराज्ञप्तभटसमूह[17] रणा. ३९
तर्कित होते निजपरभट विधु[18] कीं रवि असें पहाते ज्या,
त्वन्नंदनसेनाग्रीं होता त्वत्तात तो महातेजा[19]. ४०
केल्या कपिध्वजानें[20] तुमच्या सकळा हि विप्रभा[21] सेना,

१. तुवां कुरुवरानें न दिलें काय? (हें ज्ञान मला तूं च–धृतराष्ट्रानें च–दिलें नाहीं काय?). २. आपल्या (परमेश्वराच्या) चरणीं. ३. भांडणास. ४. मोठमोठ्या दुष्टांचा वध करणारा. ५. फार थोडें. ६. अर्जुन. ७. जयाच्या लेशाचा ही लाभ. ८. दुसऱ्याचे द्रव्याचा लोभ करणाऱ्याला. ९. ब्रह्मदेव. १०. दिक्पाळ. ११. याचें (कृष्णाचें) दृष्टिक्षेपरूप चक्रशस्त्र. १२. समुद्र. १३. व्यास. १४. कसें तरी. १५. सहस्र मुखें असलेला. १६. हरण करण्यास. १७. धर्म, भीम व अर्जुन यानीं आज्ञा केलेला वीरांचा समुदाय. १८. चंद्र. १९. महातेजस्वी. २०. अर्जुनानें. २१. निस्तेज.

तदधिक न पर, वसिष्ठाधिक कोण्ही जेंवि विप्र भासेना. ४१
युद्धारंभीं यदुपति वदला, 'विजया! रथातळीं उतर,
दुर्गेसि हात जोडीं, होइल खळबळसमुद्र[2] हा सुतर[3]. ४२
त्रिभुवन इच्या प्रसादें, जेंवि वसंतर्तुनें समस्त वन
शोभे, म्हणुनि करावें त्वां केवळ दुर्बळासम स्तवन.' ४३
स्वरथाखालें उतरुनि नमुनि म्हणे विजय, "विजय दे दुर्गे!
त्वत्पदभजनीं[4] बहु सुख म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला 'दुर्गे[5]!' ४४
आम्हां दासां रक्षीं भगवति! जगदंबिके! अनादि सती!
येती शरण तुला, जे केउलवाणे न ते जना दिसती. ४५
[6]वासरमणिकोटिरुचे! हासरसवशीकृतस्मराराते[7]!
कासरनगाशने[8]! हा दास रणीं विजयपात्र[9] हो, माते!" ४६
ऐसें स्तवितां चि शिवा[10] दर्शन देवुनि म्हणे, "अगा! साधो!
[11]त्वदुदारता जसी तासि न सुरांच्या[12] बहुमता अंगा साधो[13]. ४७
धाया मज यश, लोकां सुख, गृध्रां तो लुलाय[14] मांसें[15] मरे;
मरतिल तसे चि तव रिपु, मानुनि समरीं तुला यमासम रे!
विजयी महेश्वरासम तूं नारायणसखा नरा! हो रे!
वदल्यें काळाला कीं, 'खळबळ निःशेष[16] खा, न राहो रे!'" ४९
देवुनि विजयवर असा जाली अंतर्हिता[17] भवानी ती,
सदवनें[18] असदर्दनवन[19] या नित्य जिच्या बहुमता भवा[20] नीती. ५०

---

१. श्रेष्ठ किंवा शत्रु. २. दुष्टसैन्यरूपी समुद्र. ३. तरण्यास सुलभ. ४. तुझ्या चरणाच्या भजनात (सेवेंत). ५. गे! दूर [हो]. ६. कोटिसूर्यांप्रमाणें कांति आहे जिची अशी. ७. आपल्या हास्यरसानें स्वाधीन केला आहे शंकर जिनें अशा दुर्गे! ८. महिषासुररूप पर्वतास वज्राप्रमाणें असणारी. ९. यशस्वी. १०. भवानी; देवी. ११. तुझें औदार्य. १२. कल्पतरूस. १३. साध्य होवो. १४. महिषः—पंत. १५. मांस. १६. सर्व. १७. गुप्त. १८. सज्जनांचें रक्षण. १९. दुष्टांचा नाश. २०. शंकरास.

स्वरथीं चढला पांवुनि वर, ईश्वरदत्तहस्त वासवि, त्या
पाहुनि म्हणाति मुनिमनें, 'धासि अव्हेरूनि न स्तवा सविस्त्या.'
युद्धारंभीं भीष्मद्रोणप्रमुखाखिलाप्तवधभीता,
शक्रसुता त्रिजगद्गुरुकृष्णें उपदेशिली स्वयें गीता. ५२
गतमोहँ तमोहरसा सजला हृतगोपमुग्धसारथि जो,
तत्तेजें न गळे परबळ तरि अनळें हि दुग्धसार थिजो. ५३
बहुविधवाद्यरव अमरनाथादि विमान दाटले खांतें,
वर्णिति नरनारायण, कोण तयांचे न भाट लेखांत? ५४
इतुक्यांत धनु कवच रथ, कवणास हि न पुसतां चि, सोडूनीं
धर्म निघे कुरुसेनाग्रगभीष्माभिमुख हात जोडूनीं. ५५
त्यजुनि रथातें मारुति धांवे तैसा चि जिष्णुसह देव,
टाकूनि उडी धांवत गेले मागूनि नकुळसहदेव. ५६
ते धर्मातें म्हणती, 'करुनि श्रीशंकरा नवस, राज्या!
चिंतित होतों चित्तीं तेरा वर्षें सदा अवसरा ज्या, ५७
तो हा प्राप्त बहुदिसां जाला जों, तों चि काय हें सुचलें?
कार्मुक टाकुनि जावें खळकटकाप्रति असें कसें रुचलें?' ५८
देव म्हणे, 'पांडव हो! अद्भुत नाहीं च युद्धसम यज्ञ,

१. ईश्वरानें दिला आहे हात ज्याला. २. अर्जुन. ३. टाकून. ४. सूर्यास. ५. भीष्मद्रोणादि सर्व आप्तवर्गाचा वध होईल म्हणून भ्यालेल्यास. ६. अर्जुनास. ७. गेला आहे मोह (अंधकार—पक्षी—अज्ञान, भ्रम) ज्याचा. ८. अंधकार नाहीसा करणाऱ्या सूर्यासारखा. ९. हरण (वश) केल्या आहेत गोपस्त्रिया ज्यानें असा श्रीकृष्ण आहे सारथि ज्याचा तो अर्जुन. १०. घाबरून जाणार नाहीं; पराभूत होणार नाहीं. ११. अग्नीनें. १२. लोणी. १३. नानाप्रकारच्या वाद्यांचे नाद. १४. इंद्रादि. १५. आकाशात. १६. अर्जुन व कृष्ण. १७. देवात. १८. कुरुसेनेच्या अग्रभागी गमन करणाऱ्या भीष्मासमोर. १९. भीम. २०. अर्जुनासह. २१. समयास. (युद्धप्रसंगास). २२. धनुष्य. २३. दुष्टांच्या सैन्याकडे.

म्हणवुनि बहुधा जातो हा गुरुनमनार्थ[1] शुद्धसमयज्ञ.[2]' ५९
भीम श्वेताश्व नकुळ सहदेव श्रीमुकुंद हे मागें,
चाले पुढें युधिष्ठिर, जोडावे ज्यासि.हात हेमागें.[3] ६०
जें संपादी होउनि मत्त[4] बळें[4] नीचें[5] मूढ वाळी तें
कर्म जयाचें, त्याची करिती जाली चमू ढवाळीतें. ६१
'अभयार्थ शरण येतां ? सोडुनि भूलाभयत्न,[6] सानुज, या;
पुष्कळ वाढेना कां विंध्य,[7] नव्हे पात्र रत्नसानुजया.[8] ६२
अजि! धर्मराज! ठावें पांडित्य तुम्हांसि लव हि न भटांचें,[9]
यांचें हृदय पहातां, विपुळ म्हणति कवि तथापि नभ टांचें.[10]
सार्जुन भीम हि अयशीं, सेवुनि या दुर्गुणासें[11] चि, बुडाला,
न भजति सुयशस्काम[12] क्लीबा, आरोग्यकाम[13] चिबुडाला.[14] ६४
धन्य सुयोधन लोकीं, अन्य नसे यासमान राजन्य;[15]

---

१. भीष्मद्रोणादि गुरुजनास नमस्कार करण्यासाठी. २. योग्य काळ जाणणारा. ३. मेरुपर्वतानें. ( स्थैर्य, श्रेष्ठत्व इत्यादि गुण मेरुपर्वतापेक्षा हि.धर्मराजाच्या ठिकाणी आधिक्याने वसत होते ). ४. खोडलेला पाठ—**बाहुबळें**. ५. अन्वयार्थ— नीच [ व ] मूढ वाळी बळें मत्त होउनि जें ( रामचंद्राशीं वैर ) संपादी, तें जयाचें कर्म ( ते ज्या दुर्योधनाचे कर्म ) त्याची चमू ( सेना ) ढवाळीतें ( धर्मराज्याच्या टवाळीस, निंदेस ) करिती जाली. ६. पृथ्वी मिळविण्याचा यत्न. ७. मेरुपर्वताप्रमाणें विंध्याभोंवतीं फिरण्याचें सूर्यानें नाकारल्यामुळें विंध्य रागावला व तो इतका वाढला कीं, त्यामुळे सूर्याची गति कुंठित झाली. तेव्हा देवांच्या विनतीवरून विंध्याचे गुरु अगस्त्यऋषि त्याकडे येतां च विंध्याने त्यास नमस्कार घातला. 'दक्षिण हिंदुस्थानांतून परत येईपर्यंत तू असा च वाकलेला रहा' अशी आज्ञा करून अगस्त्यऋषि गेले ते पुन्हा परत आले नाहींत. अर्थात् विंध्यास तसें च रहावें लागलें. सूर्यचंद्रांची गति विंधल्यामुळें—अडविल्यामुळें त्यास 'विंध्य' असें नाव पडलें, अशी कथा आहे. ८. मेरुपर्वतास जिंकण्यास. ९. कौरवपक्षीय वीरांचें. १०. लहान. ११. युद्ध सोडून शत्रूस शरण जाण्याच्या दुर्गुणास. १२. उत्तम कीर्ति इच्छिणारे. १३. आरोग्य इच्छिणारे. १४. शेंदाड्यास—**पंत**. १५ क्षत्रिय.

वन्यगुणें[1] काय घडे मारुतिसीं इतर वानरा जन्य[2]?' ६५
प्राकृत[3] कौरव सैनिक करिती उपहास बहु असा, राज्या!
त्या वर्णू काय? रसिक बहु विटती सेवितां असारा[4] ज्या. ६६
भीष्माचे पाय धरुनि, धर्म म्हणे, 'हो! पितामह! त्वरतें[5]
मन समरमखारंभा[6]; हें चि करावें हिता महत्वरतें[7]. ६७
द्या आज्ञा, सानुज मीं पौत्र[8] तुम्हांसीं करीन शुद्ध[9] रण,
गुर्वनुमतें[10] स्वधर्माचरणें कवि करिति कुळसमुद्धरण[11]. ६८
आशीर्वाद मजकडे द्या, देइल भव्यकोटि[12] केशवसा,
गुर्वाशीर्बळवार्जित[13] जो क्षण हि उभा न तो टिके शवसा[14].' ६९
भीष्म म्हणे, 'जालों मीं या कर्मेंकरुनि सुप्रसन्नमना,
देतों शाप, पराभव व्हाया, येतासि जरि न मन्नमना. ७०
भंगेल गुर्वपूजक[15], साधुनि देईल गर्ग[16] होरा[17] ज्या,
या कर्मे तूं साक्षात् सर्वखळाहितकामभर्ग[18] हो, राज्या! ७१
बा! पुरुष अर्थदास[19], न अर्थ पुरुषदास, जाणत्या! समज;
की, बद्ध कौरवानीं केलें अर्थें चि जाणत्यास मज. ७२
युद्धेतर[20] वर मागें, द्यावें म्यां काय सज्जना! तूतें?
जें आज्याचें घ्याया योग्य चि तद्भजनसज्य[21] नातू तें.' ७३
धर्म म्हणे, 'आजोबा! उत्साहें[22] कौरवार्थ भांडावें,
साह्य करावें माजें, हा द्या वर मज मनें न सांडावें.' ७४

---

१ अरण्यात राहतात त्या गुणाने. २. युद्ध. ३. क्षुद्र, हलकट. ४. नीरस अशा ५. त्वरा करते. ६. युद्धयज्ञाचा आरंभ करण्यास. ७. महत्वाकांक्षी पुरुषाने. ८. नातू. ९. युद्धनीतीस अनुसरून. १०. वडिलांच्या संमतीने. ११. कुळाचा उद्धार. १२. अनंत कल्याण. १३. गुरूच्या आशीर्वादरूप बळानें रहित. १४. प्रेतासारखा. १५. गुरूस न पुजणारा. १६. प्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ गर्गमुनि. १७ मुहूर्त. १८. सर्व शत्रुरूप मदनास शिवासारखा. १९. अर्थाचा—पैशाचा—दास २०. युद्धाशिवाय दुसरा. २१. त्याचे भजनीं तत्पर. २२. नेटानें.

शांतनव म्हणे, ‘वत्सा ! काय करूं साह्य सांग वरदा[1] या?
बापा ! अजातशत्रो ! माज्या तूं मात्र पात्र वरदाया[2].’ ७५
धर्म म्हणे, ‘अपराजित[3] आपण जालां चि रामसम[4] रामीं[5],
करिन म्हणतों कराया तुमचा तेजोविराम[6] समरा मीं. ७६
होइल कसा स्वपरिभव सांगा, साहित्य होय हें माजें,
उत्कर्षकर चि शस्त्रज्वलनपतन[7] वीरदेहहेमा[8] जें.’ ७७
भीष्म म्हणे, ‘मज लोकीं जिंकीसा वीर आढळेना, गा !
वृद्ध हि सिंह महामदमत्ता ही काय गा ! ढळे नागा? ७८
न टिकेल शक्र हि धरुनि चित्तीं यत्ना[9], करांत शतकोटी[10];
बुडतिल बाहुबळमदें भट यां[11] रत्नाकरांत[12] शतकोटी.’ ७९
धर्म म्हणे, “ म्हणुन चि मज जोडुनि[13] द्यावा तुम्हीं उपाय[14] सखा
सुबुभुक्षित[15] ही सुपितर म्हणति क्षुधिता मुला ‘सुपायस[16] खा.’ ”
भीष्म म्हणे, ‘बा ! बहुमत साधु चि, न तसे सदा असु[17] ज्ञात्या:
जा, ये पुन्हां, प्रतिज्ञा न जडा[18] सुज्ञा, जडा असुज्ञा त्या.’ ८१
द्रोण हि असें चि, नमितां होउनि परम प्रसन्न, ‘पद[19] लाहो
पुण्यश्लोक युधिष्ठिर’ इत्याद्याशीःसहस्र[20] वदला, हो ! ८२
‘धर्मा ! भला भला गा ! शाप चुकविला, सुधर्मसमयज्ञा !
करिशील खळक्षत्रियपशु मारुनि परशुरामसम यज्ञा. ८३
जो तुज रुचेल तो मज युद्धाहुनि इतर सर्व वर माग,

१. वर देणाऱ्या (भीष्मास). २. वररूप पितृधनास. ३. अजिक्य. ४ रामचंद्रासारखे. ५. परशुरामीं. ६. तेजोभग, पराजय. ७. शस्त्ररूप अग्नीत पडणे. ८. वीरदेहरूप सुवर्णास. ९. हत्तीला. १०. शंभर कोटि (धारा) असणारें वज्र. ११. आत्मान दर्शयनवदति–पंत. १२. समुद्रांत. १३. मिळवून. १४. [तुमच्या वधाचा] उपाय हा च मित्र. १५. फार भुकेलेले. १६. उत्तम खीर. १७. [स्वतःचे] प्राण. १८. अवघड, तडीस नेण्यास कठिण. १९. राज्यपद. २०. इत्यादि हजारों आशीर्वाद.

लाजोत अभीष्टप्रद[1] जे मंदारादि[2] पांच परभाग.'
धर्म म्हणे, 'नमुनि तुम्हां पुसतों तुमचा चि मीं वधोपाय, ८४
द्याया कुठार[3] कल्पद्रुमसा हा वर मला बधो पाय.'[4] ८५
द्रोण म्हणे, 'होइल जरि साधुमुखें सुमहदप्रियश्रवण,[5]
योगबळें देहातें त्यजिन करुनि चित्त उपशमप्रवण.[6] ८६
तेव्हां करील कोण्हीं भलता त्वद्वीर मन्मथन,[7] राज्या!
सुगुरु सुशिष्यसुवश कीं सुस्त्रीवश सुबहु मन्मथ[8] नरा ज्या.'
यापरि इतरासुलभ[9] स्वगुरुद्रोणप्रसाद साधुनि घे,
ऐसें चि कृपाचार्याप्रति ही वंदावयासि साधु[10] निघे. ८८
नमनें प्रसन्न होउनि कृप हि म्हणे, 'या[11] विधीस चुकतास,
तरि देतों शाप तुला, विजय न घडता, हितासि मुकतास. ८९
अर्थाचा दास पुरुष, अर्थ नव्हे पुरुषदास, बापा! हें
सत्य, मज कौरवानीं केलें अर्थें चि बद्ध बा! पाहें. ९०
यास्तव मीं क्लीबापरि[12] वदतों, युद्धान्य सर्व वर मागें;
राया! त्वत्सम साधु ज्ञाता झाला न भूमिवर मागें.[13]' ९१
'स्ववधोपाय वदा, हा वर द्या,' न वदों शके असें नृपती,[14]
परि कामना मनींची गूढा[15] ही समजला सुधी[16] कृप ती. ९२
बोले, जरि संकोचें न मनोरथ कळविसी परि समजला,
गुरुवत्सळा! असे तव हितचिंता बहु तुज्यापरिस मजला.
असतें मरण कपाळीं, कथितों तदुपाय, फार यश होतें,
परि नाहीं, काय करूं? त्यां दों वृद्धांसि[17] मात्र वश हो! तें. ९४

---

१. इच्छिलेलें देणारे. २. कल्पवृक्ष. ३. कुऱ्हाड दिली असता तिनें हा याचक मजवर घाव घालील असा विचार न करिता, कल्पवृक्ष इच्छिलेली कुऱ्हाड सुद्धा देतो त्याप्रमाणें. ४. हा वर मला द्याया [तुमचा] पाय (चरण) बधो (अनुकूल होवो). ५. अत्यंत अनिष्ट गोष्ट ऐकणें. ६. शांतितत्पर. ७. माझा वध. ८. मदन, कामेच्छा. ९. दुसऱ्यास कठिण. १०. धर्मराज. ११. नमस्काररूप क्रियेस. १२. दुर्बलाप्रमाणें. १३. पूर्वी. १४. धर्मराज. १५. गुप्त. १६. बुद्धिमान्. १७. भीष्मद्रोणास.

चिंतीन त्वद्विजय ब्राह्ममुहूर्तीं[1] उठोनि संतत मीं,
जे जे गुरुभक्तिरसिक[2] ते न भ्रमले पडोनि संत तमीं[3].' ९५

एवं[4] नृप कृपगुरुवर साधुनि, शल्यास ही करी नमनः
तो हि म्हणे, 'माग वर, प्रिय करुनि तुजें सुखी करीन मन.' ९६

धर्म म्हणे, 'उद्योगीं जो दिधला तो चि मद्रमहिवर[6]! हो!
सूतात्मजतेजोवधवर बहु, तेणें चि भद्र महिवर हो.' ९७

शल्य म्हणे, 'बा! धर्मा! हें तों आम्हांस काम सामान्य;
जा, हो खळबळ मर्दुनि विजयें विश्वांत रामसा[10] मान्य.' ९८

ऐसे भीष्मद्रोणप्रमुखगुरुवरप्रसाद साधूनीं,
परते धर्म महात्मा[11] स्तविला बहु नारदादि साधूनीं. ९९

ब्रह्मयाचे ही करिती ज्याच्या बोधामृतासि आ कर्ण,
तो[12] भगवान् कर्णातें भेटोनि म्हणे, "मदुक्त आकर्ण[13]. १००

'धर्मा सहाय हो, ये, धरिति परार्थे[14] हि असिप्रति[15] ज्ञाते,
पाळीं, 'भीष्मामागें युद्ध करावें' असि प्रतिज्ञा ते. १०१

भीष्म पतन पावे तों आम्हांला हो सहाय, चाल कसा;
सुभट प्रार्थावा परदमनीं, गमनीं तुरंगचालकसा[16]." १०२

कर्ण म्हणे, 'विप्रियें[17] तिळमात्र घडो या सुयोधनाचें न,
कृष्णा! दारोदारी नटसा[18] कां मीं सुयोध नाचेंन? १०३

त्यजिलें सुयोधनार्थ स्त्रीप्राणधनांसह स्वधाम[19] हि म्यां,

---

१. दोन घटिका रात्र राहिली आहे अशा वेळीं. २. गुरुभक्तिरूप रसात तल्लीन झालेले. ३. अज्ञानात, अंधकारात. ४ याप्रमाणें. ५. उद्योगपर्वांत. ६. हे मद्राधिपा शल्या! ७. कर्णाचा तेजोभंग (पाणउतारा) करण्याचा वर. ८. कल्याण. ९. दुष्टांचें सैन्य. १०. रामचंद्रासारखा. ११. उदारधी. १२. कृष्ण. १३. ऐक. १४. दुसऱ्यासाठीं. १५. तलवारीस. १६. घोड्यास चालविणारा, सारथि. १७. अनिष्ट. १८. बहुरूप्याप्रमाणें. १९. आपलें घर.

या[1] कर्माच्या पावे न स्वाहा[2], तसि च न स्वधा, महिम्या.' १०५
कर्ण न मिळतां, परते ज्याच्या नामें तरे अजामिळ तो;
साधुमुखें 'साधु' म्हणुनि घेणारा तो चि या अजा[3]·मिळतो.
त्या दो कटकांत उभा धर्मात्मा धर्मराज राहोनीं,
उजवा बाहु उभारुनि उंच्च[4] वदे कौरवांसि पाहोनीं. १०६
'न वरा असाधु[5] नृप, कां पडतां राहुनि तयासमीप दरीं[6]?
खळसंग त्यागुनि जो येइल, घेइन तयास मीं पदरीं.' १०७
भेटे युयुत्सु[7] धर्मा, त्यजुनि ज्येष्ठा कृतानया[8] भ्रात्या[9],
जैसा साधु बिभीषण रघुकुलतिलका महादयाभ्रा[10] त्या. १०८
धर्म म्हणे, "बा! तूं तों बंधु, करूं नेणसी च अन्याया;
परि म्हणतों या समयीं येतां आगस्करा[11] हि अन्या 'या.' १०९
उरसील तूं चि साधो!, इतर सकळ दुष्ट भस्म होतील,
हस्त तुजा चि तिळोदक त्या तातांच्या[12] मुखांत ओतील.". ११०
वैश्यात्मजागमन[13] हें जेंवि अवसरार्हयुक्त[14] तोकवचें[15]
स्वीकारूनि गुणज्ञ प्रभु घे स्वरथीं चढोनि तो कवच. १११
ज्याला[16] न्याय म्हणे, 'हूं,' कारुण्य म्हणे, 'धरूं नको दंड,'
तो श्रीमदजातारी स्वरथीं बसतां धरून कोदंड, ११२
चढले रथीं भुजांतें भ्राते भीमादि सर्व थापटुनीं[17],

---

१. अन्वयार्थ—स्वाहा तसि च स्वधा [मित्रासाठीं स्त्री, प्राण, धन इत्यादि सर्वस्वाचा त्याग करणे] या कर्माच्या महिम्या (मोठेपणास) न पावे. २. वेदोक्त विधिविशेष. ३. जन्मरहित अशा श्रीकृष्णास. ४. मोठ्या स्वरानें. ५. दुष्ट. ६. भयात, संकटात. ७. धृतराष्ट्रास वैश्यकन्येपासून झालेला पुत्र. ८. अन्याय केलेल्या. ९. भावास. (दुर्योधनास). १०. दयारूप मोठ्या मेघास. ११. अपराध्यास. १२. धृतराष्ट्राच्या. १३. वैश्यापुत्र युयुत्सूचें येणें. १४. प्राप्तप्रसंगास योग्य असें. १५. बालकाचें वचन. १६. अन्वयार्थ—ज्या अजातारीला न्याय म्हणे, 'हूं' (दंड धर व दुष्टाचा नाश कर; पण) कारुण्य म्हणे, 'दंड धरूं नको,' [तो] श्रीमदजातारी (धर्मराज) कोदंड (धनुष्य) धरून स्वरथीं बसतां. १७. दंड ठोकून.

धरिला चि रणोत्साह[1], त्यजुनि मरणभीति, सर्वथा पटुनीं[2].
पाहुनि अजातरिपुची तादृग्[3] गुरुचरणभक्ति, महिवरले[4]
अहिवरलेखवरांहुनि[5] बहु कठिन हि यवनवीर गहिवरले. ११४

---

# अध्याय दुसरा.

(प्रथमद्वितीयदिनयुद्ध.)

भीष्म पुढें करुनि, उठे प्रथम सुयोधन करावया कदन[6],
भीम पुढें करुनि, उठे धर्म प्रभु जो सुकीर्तिचें सदन. १
लीलेनें द्विडिभांचा[7] न मद अवस्थापिता[8] महात रणीं,
न दिसों दे चि जना तव लेश अवस्था[9] पिता महार्तरणी[10]. २
भीमाचा सिंहध्वनि करि बळधैर्या[11] अपाय, देवा[12]! जी!
लक्षांत एक हि पुढें यत्नशतें ही न पाय दे वाजी. ३
भीमाच्या सिंहरवें[13] हगले मुतले समस्त गज वाजी,
म्हणति, 'न अस्मदसूंहीं[14] याकरवीं[15] अंतकास यजवा[16] जी!' ४
भीमाचा सिंहध्वनि कोणास हि आयकों न दे वाद्यें,
सोडुनि समाधि, मस्तक डोलविले आयकोन देवाद्यें[17]. ५
शल्ययुधिष्ठिरभीष्मार्जुनभीमसुयोधनादि हे तुमुलें[18]
युद्धें करिते जाले; स्वपरविनाशीं तुजीं च हेतु[19] मुलें. ६
सहदेव दुर्मुखासीं[20], गुरुपुत्रासीं[21] करी रण शिखंडी,

१. युद्धाचा उत्साह. २. युद्धकुशल, अशा वीरांनी. ३. तशा प्रकारची. ४. पृथ्वीवरील. ५. सर्पश्रेष्ठ (शेषादिक) व देवश्रेष्ठ (शक्रादिक) याहून. ६. युद्ध. ७. शत्रुरूप हत्तींचा. ८. राह देणारा. ९. वृद्धत्व—**पंत.** १०. महादुःखी. ११. कौरवसैन्याच्या धैर्यास. १२. धृतराष्ट्रा! १३. सिंहनादाने. १४. आमच्या प्राणांनी. १५. या भीमसेनाकडून. १६. यज्ञ करवा, बळी द्या. १७. महादेवादिकांनी. १८. भयंकर, घनघोर. १९. कारण. २०. दुर्योधनाच्या धाकट्या भावांशी. २१. अश्वत्थाम्याशी.

राक्षस अलंबुष[1] घटोत्कच भिडले बहु, असे अहि[2] शिखंडी[3]. ७
दुःशासन नकुळासीं, धृष्टद्युम्नासवें भिडे द्रोण,
सात्यकिसीं कृतवर्मा; द्वंद्वें वर्णील तीं किती कोण? ८
युद्धें जिकडे तिकडे शोणितगंधें[4] समस्त भट भुलले,
स्वपरक्षतजोक्षित[5] ते, जेंवि वसंतीं पलाशतरु[6] फुलले. ९
येउनि वराप्सरा[7] अवलोकी राजन्यसंगरा[8] ज्या जी,
ती तदितर वांछीना, जेंवि सती अन्यसंग, राज्याजी[9]! १०
वर्णित होत्या आधीं वीरांच्या शुद्ध सुरवधू[10] लीला,
निंदाव्या परि निंदित नव्हत्या त्या रुद्धसुरवधूलीला[11]. ११
बहु साधु हि साधूंतें वधिते जाले, जसे खळ खळांतें,
जें तद्रक्त वहात चि होतें वर्षांबुसें[12] खळखळां तें. १२
भांडोनि भग्गला बहु भगवान् भार्गव[13] हि करुनि पण[14] ज्यासीं,
संगर करिता जाला अभिमन्यु कुमार फार पणज्यासीं. १३
भीष्मशरहतविराटक्षितिपसुत[15] श्वेत करुनि समर मरे,
वदले सुरर्षि[16] त्यातें, 'वा! चिर[17] नाकीं महेंद्रसम रम[18] रे!' १४
सिंहें गजसा, भीष्में वधितां चि श्वेत धर्मसेनानीं[19],
निजशिबिराचा[20] आश्रय केला बहुभीतभग्नसेनानी[21]. १५
परिभवखिन्न[22] युधिष्ठिर रात्रौ प्रभुला म्हणे, 'अगा! अजिता[23]!

१. बकासुराचा भाऊ. २. साप. ३. मोर. ४. रक्ताच्या वासानें. ५. आपल्या व शत्रूच्या क्षतापासून उत्पन्न झालेल्या रक्तानें भिजलेले. ६. पळसाचे वृक्ष. ७. देवांगना. ८. क्षत्रियाच्या युद्धाला. ९. धृतराष्ट्रा! १०. देवांगना. ११. रोधिला आहे उत्तम ध्वनि जिनें अशा धुळीला. १२. पावसाळ्यातील पाण्याप्रमाणें. १३. परशुराम. १४. प्रतिज्ञा. १५. भीष्माच्या बाणानें ताडिलेला विराटराजाचा मुलगा श्वेत. १६. देव व ऋषि. १७. चिरकाल. १८. सुखोपभोग घे. १९. धर्माचा सेनापति. २०. आपल्या छावणीचा. २१. पुष्कळ भयभीत झालेल्या व पराभूत झालेल्या सैन्यानीं. २२. पराभवानें खेद पावलेला. २३. अजिंक्य अशा श्रीकृष्णा!

ऐसें कळतें तरि हा जपता, तपता, तपोवनीं यजिता[1]. १६
अतिदुःसह[2] उग्राचें[3] तेज सकळदुःसहीं[4] हि मदनीं कीं
रामीं भीष्माचें, या जिकाया शक्ति काय मर्दनीकीं? १७
झटता तुजा सखा[5] तरि होतें हित[6], परि न हा मनावरि घे,
पतिसें[7] हि अकर्णधार[8]प्रहिता उतरूं[9] नदीं नें नाव[10] रिघे. १८
वत्सें भीमें एकें काय करावें? न अंग राखावें;
भगवति! गदे! नमस्ते[11]! त्वां किति कां करुनि संगरा खावें?
शक्रादि देव असते तरि त्यांस हि दावितों चि हात रणीं;
मत्तेज यापुढें किति? कीं मीं खद्योत[12], भीष्म हा तरणी. २०
कळलें राज्यसुख पुरे, दे आज्ञा दानें, हा[13] तपो[14] रानीं;
थोरानीं जोडावे तप[15]आज्ञादा, न हात पोरानीं. २१
मजकरितां भ्रात्यानीं वरिली, जोडूनि हात, पामरता[16];
श्रमते[17] न हे, जरि वनामाजि न सोडूनि हा[18] तपा मरता. २२
शकुनीसीं द्यूतांत प्रागल्भ्य[19] तसें तशा फळीं फळलें.
संप्रति पितामहासीं[20] करितां रण काय फळ[21] नसे कळलें? २३
जाले सुयोधनाला भीष्मद्रोण प्रसन्न सुरतरुसे,
व्यर्थ असुभगा, पतिसीं सुभगेचें[22] आठवूनि सुरत, रुसे. २४
वांचो हें बळ, भीष्माकरवीं कवि कोण मारविल याला?

१. यज्ञ करता. २. फार असह्य. ३. महादेवाचे. ४. अन्वयार्थ—सकळदुःसहा हि ( सर्वजनाम् असह्य–अजिक्य–अशा ) मदना अतिदुःसह [ असे ] उग्राचे ( शंकराचें ) की रामी ('परशुरामी ) भीष्माचे अतिदुःसह तेज [ सफळ झाले, अशा ] या ( भीष्मास ) जिकाया मदर्नीकां ('माझ्या सेनेत ) शक्ति काय ? ५. अर्जुन. ६. शत्रुपराभवरूप कल्याण. ७. धन्यास. ८. सुकाण्याशिवाय सोडलेली. ९. परतीरास नेण्यास. १०. शिरत नाही. ११. तुला नमस्कार असो. १२. काजवा. १३. हा धर्म. १४. तप करो. १५. तप करण्याविषयी आज्ञा देणारास. १६. हलकेपणा. १७. श्रम न पावते. १८. (मी) धर्म. १९. प्रौढपणा, नैपुण्य. २०. भीष्मासी. २१. परिणाम. २२. भाग्यशालिनी स्त्रीचे.

नेला गुरुमद येणें, भगवंतें[1] जेंवि मार[2] विलयाला.' २५
गोविंद म्हणे, "प्रभुजी! कां जी! भ्रमतां शिरोनि शोकांत?
हो कां तसा पराक्रमविख्यात द्रोण भीष्म लोकांत. २६
बुडती व्यसनीं[3] थोर हि होतां[4] दुष्टां जनां पळ सहाय,
केवळ न बंधु म्हणती, पाहुनि समरीं खळां[5] पळस 'हाय!'
लोकत्रयांत निरुपम तुमचे भीमादि बंधु हे चवघे,
इच्छिति भवत्प्रसाद[6], द्रुपदविराटादि भूप ही अवघे. २८
जाणतसा द्रोणाला धृष्टद्युम्नाख्य[7] दिव्य ओखद[8] हो!
भीष्मा हि शिखंडी, हें द्रुत[9] अगदद्वय[10] तुम्हांसि तोखद[11] हो. २९
वेचुनि[12] सर्वस्वातें, युष्मत्प्रियहित[13] करीन बहुधा मीं,
समयीं कसें चुकावें तुमच्या भोगूनि भोग बहु धामीं? ३०
तुमच्या पुण्यगुणाचा न शतांश हि त्या सुयोधनवराकीं[14],
कां भ्यालां जी! विजयश्रीचा सुकृती[15] सुयोध[16] नवरा कीं! ३१
भीम विराट सपुत्रद्रुपद सिताश्वाभिमन्यु सहदेव,
यांसि रणीं पृष्ठप्रद[17] होतिल शतपूर्वमन्युसह[18] देव. ३२
आज्ञापावे आपण भीष्मद्रोणांतक[19] स्वयें देवां[20]!
हे वासवा[21] हि जिंकुनि करितिल तुमची रणांगणीं सेवा." ३३
धर्म म्हणे, 'श्यालक[22] हो! प्रसवावे सद्यशोर्थ[23] सुत तातें,

---

१. शकरानें. २. मदन. ३. सकटात. ४. मदत करणारे झाले असता. ५. दुष्टाना रक्तबबाळ झालेलें पाहून आपल्यापेक्षा या दुष्टास रक्तवर्णानें अधिक शोभा आली म्हणून पळसास दुःख होते, अशी कवीची कल्पना आहे. ६. तुमची कृपा. ७. धृष्टद्युम्न आहे नाव ज्याचे असें. ८. औषध. ९. लौकर. १०. दोन औषधे. ११. संतोष देणारे. १२. खर्चून. १३. तुमचें प्रिय व हित. १४. नीच दुर्योधनाच्या ठिकाणीं. १५. पुण्यशील. १६. उत्तम वीर. १७. पाठ दाखविणारे. (भिऊन पळणारे). १८. शत आहे पूर्वी असा मन्यु तो शतमन्यु=इंद्र. त्यासह. १९. भीष्मद्रोणांस मारणारे शिखंडी व धृष्टद्युम्न. २०. धर्मा! २१. इंद्रास. २२. मेहुणे (शिखंडी व धृष्टद्युम्न) हो! २३. सत्कीर्तीसाठीं.

सत्पुत्रें हि करावें जेणें होईल कीर्ति सुतता[1] तें. ३४
धृष्टद्युम्ना ! माजा तूं कीं तो स्कंद[2] देवसेनानी[3].
पावावा जय अस्मत्सेनानीं जेंवि देवसेनानीं. ३५
बा ! तूं द्रोणांतक हो, भीष्मांतक हो त्वदग्रज[4] शिखंडी;
मधुनाशक जेंवि हरि, स्मरनाशक जेंवि देव शशिखंडी[5].' ३६
ते बोलिले, 'जसें तूं इच्छिसि होइल तसें चि राया ! तें;
बहु हर्षसील विजयें, वृद्ध जसा औरसें चिरायातें[6].' ३७
रचिला दुसरे दिवसीं व्यूह क्रौंचारुणाख्य[7] धर्मानें,
गरुडव्यूह श्रीमद्भीष्मानें परमशुद्धकर्मानें[8]. ३८
ते भीष्मार्जुनयुक्त स्तविले सुरसिद्धवरसमूहानीं[9],
केल्या असकृद्रविरुचिहानि[10] न केवळ तिहीं[11] चमूहांनी[12]. ३९
तच्छरपटलें[13] बहुदा लोपे प्रकटे सहस्रभानु[14] घडी,
उघडी पहावयास्तव, जाणों लज्जेस्तव स्वभा[15] नुघडी. ४०
वृद्धतरुण भीष्मार्जुन, परि न रणीं न्यून अधिक ते गमले;
सम लेखर्षि[16] तयांतें जाणुनि, तद्भुजपराक्रमीं रमले[17]. ४१
भीष्म स्तनांतरीं[18] श्रीशौरि[19]शरीरीं शिताग्र[20] शर हाणी,
न्हाणी क्षतजें[21] कोपें, आणी तें पार्थलोचनीं पाणी. ४२
नारायण अजित[22] जसा, अजित तसा चि त्रिविष्टपीं[23] नर तो;

१. अत्यत पसरलेला. २. कार्तिकस्वामी. ३. देवाच्या सेनेचा नायक. ४. तुझा वडील भाऊ. ५. चद्राचा भाग (अर्धचद्र) आहे मस्तकी ज्याच्या असा शकर. ६. फार दिवसानीं आलेल्या (झालेल्या) औरसपुत्रानें. ७. क्रौंचारुण नावाचा. ८. अत्यत शुद्धाचरणी भीष्मानें. ९. देवाच्या व सिद्धाच्या श्रेष्ठ समुदायानीं. १०. वारवार सूर्यप्रकाशाचा लोप [केला]. ११. भीष्मार्जुनांनीं. १२. सैन्यनाशी. १३. त्याच्या बाणरूप वस्त्राने (पडद्याने). १४. हजार किरण असलेला; सूर्य. १५. आपले तेज. १६. देव व ऋषि. १७. आनदित झाले. १८. हृदयांत. १९. श्रीकृष्णाच्या शरीरावर. २०. तीक्ष्ण टोंक असलेले बाण. २१. जखमेंतन निघणाऱ्या रक्तानें. २२. अजिंक्य. २३. त्रिभुवनात.

रसनेसि[1] म्हणेल कवण सुकवि 'तदुत्कर्षवर्णनीं[2] न रतो?' ४३
तात तुझा तेजस्वी मृत्युंजयसा[3] चि होय अजित रणीं;
संबोधनप्रसंगीं यासि म्हणेल चि सभेत 'अजि!', तरणी. ४४
जें सोडिति शस्त्र म्हणे प्रेक्षकसुरनरमदांसि[4] 'संपो[5]' तें,
कंपातें भीष्मार्जुन देती अचळेसि[6] शस्त्रसंपातें[7]. ४५
प्रेक्षकजनांत एक हि एकाचें ही लवे चि ना पातें;
प्राणहर हि सुमनोहर कोणा वदवेल युद्ध बापा! तें? ४६
धृष्टद्युम्न द्रोणप्राण हराया प्रयत्न मात्र करी,
परि तो परिभव पावे, होय कसा सिंहविजयपात्र करी? ४७
झाला विरथ विशस्त्र हि परि न भियाला तशा हि उर्वरितें[8],
गुरुशरवृष्टि[9] निवारित होता चर्में[10] चि मात्र उर्वरितें[11]. ४८
वारी नियति[12] च, वारिल कुरुगुरुच्या[13] काय सायका ढाल?
हे चि तुम्हीं साधु रसिक या दुग्धांतील सांय[14] काढाल. ४९
तों भीमसेन सोडुनि गुरुवरि[15] शर सात सोडवी राया!
जाणों ते सप्तर्षी[16] म्हणती, 'यश रक्ष, सोड वीरा यां[17].' ५०
इतुक्यांत वृद्ध आले द्रुपद विराट हि करावया समरां,
त्यांप्रति जाय म्हणाया, जाणों 'सार्थक करा वयास, मरां.' ५१
दुर्मद[18] काळासि जसा लंघाया विश्वनायका लिंगा,
प्रेरी भीमासि तसा लंघाया भरतराय[19] कालिंगा. ५२

---

१. जिव्हेस. २. त्याच्या ( अर्जुनाच्या ) उत्कर्षाचें वर्णन करण्यात. ३. महादेवासारखा. ४. पाहणारे देव व मनुष्यें याच्या गर्वास. ५. नाहींसे व्हा; सरा. ६. पृथ्वीस. ७. आयुधप्रहारानें. ८. मोठ्या श्रमानें. ९. मोठी बाणवृष्टि. १०. ढालीनें. ११. राहिलेल्या. १२. दैव. १३. भीष्माच्या. १४. मलई. १५. भीष्मावर. १६. सात बाणरूपी सप्तर्षी. १७. धृष्टद्युम्नास. १८. दुष्ट गर्व. अन्वयार्थ—जसा दुर्मद ( यमाचा दुष्ट गर्व ) विश्वनायका लिंगा ( शिवलिंगास ) लंघाया ( उल्लंघन करण्यास ) काळासि ( यमास ) प्रेरी ( पाठविता झाला ). १९. दुर्योधन.

कालिंगमथन[1] करितां सकळांस हि भीम रुद्रसा गमला,
श्रमला न लेक्षमथनीं[2], कथवे बहु युद्ध विस्तरें न मला. ५३
शिरतां कलिंगकटकीं धरुनि करीं तो महाभुज गदेतें
देता जाला भय जें भेककुळाला[3] महाभुजग दे तें. ५४
धृष्टद्युम्न तयाला धावुनि झाला सहाय सहसेन[4],
चित्तांत म्हणे, 'रुद्र चि हा, या प्रभुला कधीं हि न हसेन.' ५५
स्वरथीं बाहुनि म्हणे, 'मेले कालिंग सर्व बा! हेरें[5],
या मांसकर्दमाच्या[6] जावें आम्हीं निघोनि बाहेर.' ५६
सात्यकि भेटुनि शतदा 'जय जय' ऐसें सुखें वदे त्यातें[7],
आपण निवोनि निववी पुष्कळ त्या हीं सुखेंव[8] देत्यातें. ५७
मग मथिले द्रौणीचे द्रुपदसुतें, करुनि आहवा[9], वाजी;
त्यासि स्वरथीं घेउनि, शल्य म्हणे, 'हां[10] न राहवावा, जी!'
मारामार करिति मग कृप शल्य द्रौणि हे तिघे त्यातें,
विपिनीं[11] वृकें[12] एकातें जेंवि स्ववधार्थ हेति[13] घेत्यातें. ५९
करितो भवितापत्रय[14] वारुनि जन जेंवि कंजनाभीचा,
करि तेंवि पार्षतरिपुत्रय[16] वारुनि लोकरंजना भाचा[15]. ६०
त्या अभिमन्युवरि उठे लक्ष्मण नंदन सुयोधनाचा हो!
सुर अप्सरांसि वदले, 'दोघे ही हे सुयोध, नाचा, हो!' ६१
घे 'साधु साधु![17]' म्हणवुनि, खंडुनि[18] त्या जिष्णुसूनुचापातें[19],
वदले कौरव, 'आतां होतो हत जिष्णु सूनुच्या[20] पातें[21].' ६२

१. कालिंगाचा पराभव. २. लक्ष सैन्याचा पराभव करण्याच्या कामीं. ३. बेडकाच्या समुदायाला. ४. सेनेसह असा. ५. पहा. ६. मांसाच्या चिखलाच्या. ७. भीमास. ८. चांगलें आलिंगन. ९. युद्धा. १०. हा धृष्टद्युम्न शिल्लक ठेवू नये. ११. अरण्यात. १२. लांडगे. १३. शस्त्र, तलवार. १४. संसारी लोकांचे त्रिविध ताप. १५. कमलनाभ विष्णूचा—कृष्णाचा भाचा अभिमन्यु. १६. धृष्टद्युम्नाचें शत्रुत्रय. १७. शाबास शाबास! १८. तोडून. १९. अर्जुनपुत्र अभिमन्यूच्या धनुष्यास. २०. मुलाच्या. २१. पतनानें, नाशानें.

सज्य करुनि इतर धनु भ्राता[1] ही कोपला परावासा[2],
शोकीं बुडवूं पाहे स्वावासा[3], पर जसा परावासा[4]. ६३
जेणें कुरवाळावें, लागे भ्रात्यासि तो विदाराया,
सांगों काय तुज तुज्या पौत्रांचें[5] युद्ध कोविदा[6]! राया! ६४
बंधूसि बंधु पाहे माराया लावकासि[7] लावकसा,
लाविसि परा, सकृत्तरि[8] बोल नृपा! आपणासि लाव कसा.
अन्योन्यासि विदारिति[9] ते खरतरनखरसिंहशावकसे[10],
लावकसे न म्हणावे, तेजःसंपन्न मूर्तपावकसे[11]. ६६
होय[12] सहाय सुयोधनराय स्वबळासमेत तनयाला,
स्वयुगीं कलिकाळ जसा पुत्रस्नेहेंकरूनि अनयाला. ६७
होय सहाय हरि जसा स्वसमसमर्था[13] स्वनाममंत्रास[13],
पार्थसुतासि[14] तसा, ज्या कोणहांपासुनि नसे चि संत्रास. ६८
दैत्यांत प्रह्लाद चि गावा[15], इतर न सुराप[16] गावे, गा!
भीष्म कुरूंत तसा हर होय परचमूसुरापगावेगा[17]. ६९
मानवली[18] न सुरलता दुर्गा हि विजय धनुष्यवल्लीला.
दिसतो मनुष्यसा जरि, तरि हि न याची मनुष्यवल्लीला[19]. ७०

---

१. बधु अभिमन्यु. २. परकायासारखा. ३. आपल्या घरास–घरातील मनुष्यास. ४. शत्रूच्या घरास. ५. नातवाचे. ६. ज्ञात्या! ७. लावापक्ष्यास. ८. एकदा तरी. ९. फाडून टाकिती. १०. तीक्ष्ण नखें असलेल्या सिंहाच्या पेठ्यासारखे. ११. मूर्तिमंत अग्नीसारखे. १२. अन्वय–जसा कलिकाळ स्वयुगीं अनयाला [तसा] सुयोधनराव पुत्रस्नेहेंकरूनि स्वबळासमेत (स्वसैन्यासह) तनयाला सहाय होय. १३. आपल्याप्रमाणे च समर्थ असलेल्या आपल्या नाममंत्रास. १४. अभिमन्यूस. १५. वाखाणावा. १६, दारू पिणारे. १७. शत्रुसेनारूप गंगेच्या वेगास. १८. अन्वयार्थ–सुरलता (कल्पलता) विजयधनुष्यवल्लीला (अर्जुनाच्या धनुष्यवल्लीला) मानवली (मान डोलवती झाली) न (इतकें च नाही तर) दुर्गा हि (देवी भवानी हि) मानवली. १९. मनुष्यासारखी कृति.

शतकोटि[1]प्रति योजी [2]जो मेरु[3]प्रभृतिशिखरितापार्थ,
[4]शतकोटिगुणें [5]तदधिक गमला [6]शरनिकरविखरिता पार्थ. ७१
अभि[7]मुख जाले होते जे जे ते पावले चि [8]पर मरण;
श्रीरामराक्षसांचा [9]तो कीं [10]हा एक होय परम रण. ७२
सूं सणणण सणणणणण वाजति शरनिकर कायहानिकर,
वदले सुरमुनि, 'करितो [11]नररूपें रुद्र काय हा [12]निकर?' ७३
शरधि[13]शरजलधि फुटले कीं दैवें पाश एकदा तुटले,
ते [14]काळव्याळ करटिघोट[15]कभटभेक खावया सुटले. ७४
कवि योजुनि उपमा [16]गजहरनरशरततिस वाहुटळ लाजो,
[17]अतुळबळ न कीं [18]गरगलकलहीं हि न विजयिबाहु टळला जो.
[19]देवासुराहव न बहु त्या कौरवपांडवाहवाहून,
शोणित[20]नदींत गेले [21]सभट रथ[22]-द्विरद-वाह वाहून: ७६
[23]त्वत्तात स्मित करुनि द्रोणासि म्हणे, 'धनुष्य उतरा हो!
शिबिरासि चला, फिरवा दुर्योधनवत्स, पांडुसुतें[24] राहो. ७७
मेल्या फार, पळाल्या, उरल्या दिसतात [25]विप्रभा सेना,
तिकडे पुरे म्हणेसा नर, जेंवि [26]कळींत विप्र, भासेना. ७८
केला [27]अरिजनें विजयें जैसा तो कांम [28]अच्छवि [29]भवानें,

---

१. वज्रास. २. इंद्र. ३ मेरुप्रमुख पर्वताचा नाश करण्यासाठी. ४. शभरकोट पटीनें, लाखों पटीनें. ५. त्यापेक्षा ज्यास्त ६. हजारो बाणाचा समुदाय [एकदा च] पसरणारा, फेंकणारा. ७. तोंडासमोर ८. शत्रु. ९. भूतकालीन. १०. चालू, वर्तमानकालीन. ११. अर्जुनाच्या रूपानें. १२. प्रलय. १३. भात्यातील बाणरूपी समुद्र. १४. काळरूपी सर्प. १५. हत्ती, घोडे व योद्धे हे च कोणी बेडूक, त्यास. १६. हत्तींचा नाश करणाऱ्या अर्जुनाच्या बाणसमुदायास. १७. अनुपम सामर्थ्य असलेला. १८. विषकंठ शंकराशी युद्ध करण्याच्या प्रसगीं. १९. देवदैत्याचें युद्ध. २०. रक्तनदींत. २१. योद्ध्यासह. २२. रथ, हत्ती व घोडे. २३. तुझा पिता (भीष्म). २४. अर्जुन. २५. तेजोहीन. २६. कलियुगांत, कलहात. २७. शत्रु-समुदाय. २८. निस्तेज २९. शंकरानें.

बहुधा समर्चिला बहुजन्म श्रीराम अच्छविभवानें. ७९
अस्तासि भानु गेला, जावें आपण हि, काय राहुन गा!?
रिक्त चि गिळितां हि सकळनिर्जरनिलया विकाय राहु नगा.',
करिता जाला दुसरे दिवसीं ऐसें वदोनि अवहार,
जो सर्वज्ञसभेच्या कंठींचा अतुळ विमळ नवहार. ८१

---

# अध्याय तिसरा.

## ( तृतीयदिनयुद्ध. )

तिसरे दिवसीं राया! भीमानें अतितरोग्रकोपानें
दुर्योधननृप मूर्छित केला, भेदुनि उरांत रोपानें. १
सूत म्हणे, 'भीमाच्या, हरिच्या गजसा, न हा निमो स्रातें.'
पळवूनि करी त्याच्या यत्नशतें शीघ्र हानि मोहातें. २
सावध होउनि राजा भीष्मासि म्हणे, 'अहो! पितामहजी!
जाली भवत्प्रतिज्ञा काय जनां दे सुधा पिता महजी? ३
असतां तुम्हीं पति, पृथापुत्र मथिति या मदीयपृतनेतें.
नवल ज्वलदनलाचें सर्वस्व बळें हरूनि घृत नेतें! ४
जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें;
पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य थानातें?' ५

---

१. उत्तम प्रकारें पूजिला. २. निर्मल आहे ऐश्वर्य ज्याचें अशा अर्जुनानें. ३. रिकामे बसून. ४. सर्व देवांचें वसतिस्थान असलेल्या मेरुपर्वतास. ५. शरीररहित. ६. मेरु—पंत. ७. युद्धसमाप्ति. ८. स्वच्छ. ९. नवीन रत्नहार. १०. भयंकर रागानें. ११. बाणानें. १२. [दुर्योधनाचा] सारथि. १३. मरो. १४. मूर्छेस. १५. आपली (तुमची) प्रतिज्ञा. १६. अमृत. १७. उत्सव, आनंद. १८. सेनापति. १९. माझ्या सेनेस. २०. जळणाऱ्या अग्नीचें. २१. स्वकीय [मूळ].

हांसुनि पृथुलजलजदलनिभशुभनयनें[1] सलील[2] फिरवून,
पाहुनि सुयोधनानन, शांतनव वदे स्वकोप जिरवून. ६
"राया! भलतें चि वदसि, पथ्य[3] हित स्वगुरुवच[4] न आइकसी;
अन्य असोत, वदेल स्वसुताप्रति अहितवचन आइ कसी? ७
'युद्धीं अजेय[5] पांडव वज्रधरा सामरा[6] हि,' असि वाणी
आम्हीं शतदा कथिली, परि तुज ती लागली च असिवाणी[7]. ८
कैसा जिंकावा हो! करुनि बळें आहवा[8] युवा[9] जीर्णें[10]?
बा! जिंकिला कधीं तरि जवनें[11] तरुणें हि वायु वाजीनें[11]? ९
मीं आजि साग्रजानुज[12] शक्रसुताचें करीन वारण गा!
बहु हें हि, पदभारें हि जरि सारील अनवकरी[13] नवा[14] रणगा[14]."
असि करुनियां प्रतिज्ञा विष्णुपदीनंदनें[15] अति त्वरितें
पांडवचमूपतींचें[16] मथुनि चमू पाडिलें पतित्व रितें. ११
वीरां न ओढवे गुणा[17], तूणींच्या[18] सायकां[19] न कर पावे,
भीष्म ग्रीष्मरवि[20] च, मग तत्तेजें काय कां न करपावे? १२
दिसतें तेजोमंडळ, जेंवि जवें[21] फिरवितां अलातातें[22],
तेंवि रथातें फिरवुनि केलें, जव दाविला भला तातें. १३
जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महाजवन[23] तो बा!
बहु 'हाय! हाय!' म्हणाते प्राकृत, बुध 'हंत! हा!,' यवन 'तोबा.'
सर्वग[24] सहस्ररूपी देव जसा देखिला गुरुपदरतें[25],

१. मोठ्या ० कमलपत्रासारखे सुंदर नेत्र. २. लीलेने. ३. हितकर. ४. आपल्या वडिलाचें वचन. ५. अजिक्य. ६. देवासह. ७. खडगासारखी. ८. युद्धास. ९. तरुण. १०. म्हाताऱ्याने. ११. वेगवान घोड्याने. १२. वडील व धाकट्या भावांसह. १३. म्हातारा हत्ती. १४. रणात आलेल्या तरुण हत्तीस. १५. गंगापुत्र भीष्मानें. १६. पांडवाच्या सेनापतींचें. १७. धनुष्याची दोरी. १८. भात्यातील. १९. बाणास. २०. ग्रीष्मऋतूतील सूर्य. २१. वेगाने. २२. कोलितास; जळत्या लाकडास. २३. मोठा वेगवान. २४. सर्वव्यापी. २५. गुरुचरणरत अशा भक्तानें.

भीष्म तसा चि परजनें[1], जें भंगवद्दर[2] करी कुरुपदर[3] तें. १५
गरुड हि अहींसि न तसा, न करिकुळाला[4] हि तेंवि हरि खपवी[5],
दुर्योधनासि जैसा दे भीष्म, हरिसँ[6] न तेंवि हरिखँ[7] पवी[8]. १६
धर्मकटक खांडववन, भीष्म विजय, विजय तो हरी[9] गमला,
शर दँव[10], रक्त ज्वाळा, रूपक याहूनि होय बहु न मैला[11]. १७
पार्थ म्हणे, 'श्रीकृष्णा!' वारावें काय यांस[12] कटकांही[13]?
हूं, हाक हाक धाक स्वजनांत उरो न यासकट कांहीं.' १८
देव म्हणे, 'बैस बरा, दृढ धर बळकट धनुष्यवल्लीला,
रथ भिडवितों रथासीं, आजि न बरवी मनुष्यवल्लीला[14].' १९
ऐसें वदोनि हाकी अजित प्रेमळकलाजित[15] रथातें;
नसता दासाजित[16] प्रभु करिता सारथ्य कां इतरथा[17] तें? २०
पडतां चि गांठि झाले समरचमत्कार फार, न वदवती,
लिहितां सरस्वतीच्या सरातिल शत कलशींसदृश नव दवती.
छिन्न प्रथम. त्यागुनि जें सज्य करी नदीज तो धनु तें
दुसरें हि खंडिलें हो! श्रीकृष्णसखें[19] समस्तयोधनुतें[20]. २२
भीष्म प्रसन्न होउनि करि बहु बीभत्सुवर्णना[21] तुंडें,
'बा! केलें तुच्छ तुवां सद्रत्नांबरसुवर्ण[22], नातुंडें[23]. २३
वत्सा! भला भला जयपद नारायणसखा नरा! हो रे!
कीर्तिफळीं[24] किमपि उणें करितां या रणमखा[25] न राहो रे! २४

---

१. शत्रुजनाने. २. कृष्णाचा शंख ३. भीष्म-पंत. भीष्माचा शंख. ४. गजसमुदाय. ५. मारी. ६. इंद्राने. ७. आनंद. ८. वज्र. ९. इंद्र. १०. वणवा. ११. मोरोपंताला. १२. भीष्मास. १३. सैन्यांनीं. १४. मनुष्यासारखी कृति. १५. भक्तिमान जनाच्या कलांनीं जिंकिलेला. १६. भक्तांनीं जिंकिलेला. १७. नाहीं तर, अन्यथा. १८. घागरीसारख्या. १९. अर्जुनाने. २०. सर्व वीरांनीं स्तविलेल्या. २१. अर्जुनाच्या प्रशंसेस. २२. उत्तम रत्न, उत्तम वस्त्र व सोनें. २३. नातवानें. २४. कीर्तिरूप फळांविषयीं. २५. युद्धयज्ञ.

आणूं नको चि चित्तीं वत्सा ! होइल दहांत कुत्सा[1] हें,
जेंवि त्रिजगद्गुरुसीं[2] तेंवि करीं शुद्ध युद्ध उत्साहें.' २५
ऐसें वदोनि हांसुनि सुनिपुण गुणं तिसरियासि तो चढवी,
स्वमुखें सरहस्य जया रामें[3] धनुर्वेद आदरें पढवी. २६
पार्थरथीं तो खरतरशर, निजधर्मी च दृष्टि दे, वर्षे;
मुनि पुसति, 'त्या नगींची[4] ती कीं बहु ही च वृष्टि, देवर्षे[5] !'
वाटे तुमचा उरविल कृष्णांचे[6] जीव न स्थविर[7] तात,
दिसले शरांत ते नग[8] कल्पांबुधिजीवनस्थ[9] विरतात. २८
शांतनव सिंह'गमला, पळतां नररथ[10] हि तो पळ ससा च,
ससख[11] प्रभु हि वसंतीं बहु फुलला होय हा पळस साच. २९
जों जों हाणी खरशर तो रिपुयवसदव[12] तारकोपाया[13],
तों तों लागे हलु हलु कमळाधव[14] सदवतार[15] कोपाया. ३०
मृदु पार्थ, उग्र केवळ भीष्म विजयवीर्यमस्त, पाहून
देव म्हणे, 'शैनेया[16] ! याचें तप फार मत्तपाहून.
क्षिति हा? करीं सुदर्शन[17] धरितों, भीतील सर्व कां मग यां[18] ?
साक्षाद्विष्णुपदाहुनि पूर्ण करिल काय सर्व काम गया ? ३२
आह्मकिला दुर्योधनसम खळ रे ! यादवा[19] ! नळाला जो
नापद, तो कालि तुच्छ, क्षणभानळ[20] या दवानळा लाजो. ३३

१ निंदा. २. महादेवाशीं. ३. परशुराम. ४ सुप्रसिद्ध गोवर्धनपर्वतावर इंद्राने केलेली वृष्टि. ५. नारदा ! ६. कृष्णार्जुनाचे. ७. वृद्ध. ८. पर्वत. ९. प्रलयकालीन समुद्रात राहणारे. १०. अर्जुनाचा रथ. ११. अर्जुनासह. १२. शत्रुरूप तृणास वणव्यासारखा. (भीष्म). १३ तारणारे उपाय ज्याचे तो कृष्ण, त्यास. १४. लक्ष्मीपति १५. साधुजनांमाठी अवतार आहे ज्याचा असा कृष्ण. १६. सात्यके! १७. विष्णूच्या हातातील चक्र. १८. भीष्मास. १९. सात्यके ! २०. क्षणभानळ ( विजेचा अग्नि ) या दवानळा ( वणव्याला ) लाजो. [ दुर्योधन हा वणवा व कालि हा च विजेचा अग्नि ].

सकुळा गजा बहु बरें म्हणवितसे हा सुरोपम[1] दवस्था;
करितो कसी पहा हे हाणुनि मर्मी सुरोप[2] मद्वस्था[3]. ३४
मारिन भीष्म द्रोण प्रथम, मग वधीन मीं खळशेंत रणीं,
मूढें धरिले माज्या हे जैसे सिंधुच्या कलश तरणीं. ३५
गुरुपूरीं जेंवि गजी[6] सात्मापत्य[7], न तसी अजा[8] तारी,
मर्दुनि ससहाय खळ, स्वपदीं बसवीन मीं अजातारी[9].' ३६
जो मातृस्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली
तो भीष्मावरि कोपे, स्वमधुहराउपरि[10] जेंवि सरघाली[11]. ३७
ऐसें वदोनि केलीं नयनें जैसीं नवीन कोकनदें[12],
देवें कांपविले बहु गर्जोनि जसे तटस्थ[13] लोक नदें. ३८
चक्र करीं धरुनि रथाखालीं टाकुनि उडी सजव धावे,
वाटे त्या सिंहानें सर्व हि भीष्मादि ते गज वधावे. ३९
भारें लवे प्रतिपदीं[14] भू[15], शेष धरूं शके न लवलीला[16],
भीष्माच्या मात्र मनीं ती प्रभुची दे न भीतिलव[17] लीला. ४०
प्रभुची परमखळांस हि देत नसे ताप शोक लव लीला;
हें ठावें ज्यास, तशा धाकेल[18] कशास तो कळवलीला[19]? ४१
कोपे जें विश्वंभर[20] शंभर उत्पात[21] भूमिकंपादी,

---

१. हा सुरोपम (देवाची उपमा असलेला भीष्म) दवस्था सकुळागजा (वणव्यात सापडलेल्या गजसमुदायासह श्रेष्ठ हत्तीस) बहु बरें म्हणवितसे. २. उत्तम-तीक्ष्ण बाण. ३. माझी अवस्था. ४. शंभर दुष्ट कौरव. ५. महापुरांत. ६. हत्तीण. ७. पाठांतर–**सात्म अपत्य.** (बालकासह स्वतःस). ८. शेळी. ९. धर्मराज १०. आपला मध हरण करणाऱ्यावर. ११. मधुमक्षिका–**पंत.** मधमाशांचा समुदाय. १२. रक्तकमळें. १३. किनाऱ्यावरील, काठावरील. १४. पदोपदीं. १५. पृथ्वी. १६. वाकलेलीस. १७. लेशमात्र भीति. १८. भय पावेल. १९. श्रीकृष्णाच्या पदाच्या भारानें वांकवून टाकलेल्या पृथ्वीस. २०. देव. २१. दुश्चिन्हें

गडबडले सुर मुनि, तें अर्जुनसन्मित्रकार्य[1] संपादी. ४२
धावुनि यत्नें धरि, परि ओढुनि ने त्यासि देव ओढकसा[2],
जाणों म्हणे, 'भुजबळें पाहों जरि ओढितोसि, ओढ कसा.'
कर जोडुनि भीष्म म्हणे, 'येतां मारावयासि या हो! या,
हा सत्यसंध[3] केला, मुक्ति हि, साधूंसि गावया, होया.' ४४
केला उभा सिताश्वें[4] चरणीं घालुनि मिठी पदीं दशमीं[5],
प्रभु तत्व असें कळवी कीं, 'प्रेमबळें चि पदनता वश मीं.' ४५
पाय धरुनि पार्थ म्हणे, 'त्यागुनि धनकाय[6] जीप्रति ज्ञाते
बहु जपले, तज्ज्ञगुरूनीं[7] त्यागावी काय जी! प्रतिज्ञा ते? ४६
या दासाकरवीं च क्षिप्र तुम्हीं या यशास करवाल;
नख हि नको ज्या कार्या त्या काढावा कशास करवाल[8]? ४७
सारथ्य काय थोडें? हें या करवीं च कार्य करवा हो!
न नदीजवधीं[9], मीज्या मूर्धस्पर्शी[10] च आर्यकर[11] वाहो. ४८
चक्र क्रोध त्यागुनि, रश्मि[12] धरा, नीट चालवा वाजी,
बहु हें चि, बोल माजा हा, न धरुनि वीट चालवावा, जी!'
यापरि हित प्रिय पृथापुत्रोक्त अमान्य कां करील हरी?
सन्मित्रोक्ति करी जें अमृतरसाची न तें करी लहरी[13]. ५०
परते परमपुरुष[14] मग मित्ररथीं वाजवी दरा[15], राहो
कौरवभटभीतिकथन, होय सुरांत हि महा दरारा हो! ५१
कोपोनि कौरवांवरि सर्वांचा मद रणांत उतराया
त्वरित महेंद्रास्त्रातें योजी हो! जी! महेंद्रसुत[16], राया! ५२
बहु काय वदों राया! तिसऱ्या दिवसाचिया चरमयामीं[17]

---

१. आपल्या सन्मित्राचें–अर्जनाचें कार्य. २. ओढणाऱ्यासारखा. ३. सत्य-प्रतिज्ञ. ४. अर्जुनानें. ५. दहाव्या. ६. द्रव्य व शरीर. ७. ज्ञात्याच्या गुरूनीं. ८. तलवार. ९. भीष्माच्या वधीं. १०. मस्तकास स्पर्श करण्यास. ११. आपला (तुमचा) हात. १२. लगाम. १३. लाट. १४. श्रीकृष्ण. १५. शंखास. १६. इंद्रपुत्र अर्जुन. १७. अखेरच्या प्रहरात.

भूमितळा मांसमया देखत होतों नभा शरमया मीं. ५३
त्या अस्त्रें सप्तशत द्विप वधिले, दशसहस्र रथ मथिले.
ऐसे या युद्धींचे फार चमत्कार संजयें कथिले. ५४

---

## अध्याय चवथा.

(चतुर्थदिनयुद्ध.)

चवथे दिनीं नदीचा सुत पार्थरथस्थ विश्वघटकातें
गांठी आराधाया रणयज्ञें, करुनि सिद्ध कटकातें. १
तों अभिमन्यु ज्येष्ठश्रेष्ठां ही विद्ध करि, लहान पण,
सुर म्हणति 'कां जगत्रय जिंकुनियां सिद्ध करिल हा न पेण!'
वारी सर्वांत पुढें होउनि तुमचा पिता चि पणतूतें,
जाणों म्हणे, 'करिसि बहु कौतुक, लागेल दृष्टि पण तूतें.' ३
भीष्म म्हणे, 'नर दावा,' तेंवि म्हणे पार्थ, 'शांतनव दावा,'
अन्यत्र शांत ते, परि कोण्ही हि रणांत शांत न वदावा. ४
घाली तो पार्थासीं गांठि रणीं सर्व शस्त्रविद्धरसा,
किति तत्सेना? कंपें कंपित करि सर्व शस्त्रविद्ध रसा. ५
विजयाधिक भीष्माचा परिहरितां सायकां कडाखा तो
सूक्ष्मा हि रविकराहुनि बहुत तमा काय कांकडा खातो? ६
कितिक म्हणति, 'दावावी प्रलयनटाच्यापुढें किति नटें भा?
न नदीज हरिसखासम, मेरूच्च हि भास्करासम न टेंभा.' ७
गंगेसि पृथेसि किति स्तविती, जे जाणती बुध न्याया,

१. हर्ता. २. भीष्म. ३ विश्वाची घटना करणाऱ्या कृष्णाला. ४. परतु. ५. प्रतिज्ञा. ६ सर्व शस्त्रे जाणणाऱ्या शंकरामारखा ७. त्याची (अर्जुनाची) सेना. ८. शस्त्रानीं भेदलेली. ९. पृथ्वी. १०. निवारिता. ११. वेग; आवेश. १२. प्रलयकाळीं नाचणाऱ्या शंकराच्या १३. तेज. १४. मेरूइतका हि उंच. १५. मशाल.

किति संत बोलिले कीं, 'दोघी हि त्रिभुवनीं सुधन्या या.' ८
हें युद्ध होत असतां दितिदनुतनुजांसवें[1] जसा बळहा[2]
खळहानिकर सुभद्रासुत करि शल्यादिकांसवें कळहा. ९
द्रोणात्मजादिकांस[3] हि सौभद्र रणांगणांत आटेना,
वाटे नागांमध्यें[4] हरिशिशु[5], ज्या तिळ हि धाक वाटेना. १०
सरहस्य[6] अर्जुनासम सर्व धनुर्वेद पाठ वीरा ज्या
त्यावरि दुर्योधन बळ पंचविस सहस्र पाठवी, राज्या! ११
ठावें बहु हि न देती पितृमातुळसमबळा[7] रिपु त्रास,
तदपि स्नेहें धावे रक्षाया तो खळारि[8] पुत्रास. १२
ते वेढिले चमूनीं जेंवि मदें केसरी[9] गजघटानीं[10],
कीं पूर्वपश्चिमांबुधि शोषाया वेष्टिले बहु घटानीं[11]. १३
धृष्टद्युम्न प्रेक्षुनि ते धांवे घेउनि स्वसेनेतें,
निस्तेज करी अरिबळ जें केलें शापुनि स्वसेनें[12] तें. १४
केलीं कृपकृतवर्मप्रमुखबळें[13] पार्षतें[14] पराभूतें,
तीं त्या पाहों न शकति, जेंवि नृहरिमंत्रजपपरा[15] भूतें. १५
शल्यसुत महारथ मग वधिला द्रुपदात्मजें महातेजा
स्मरले सुर देवीहत[16]महिषास गदाहता[17] पहाते ज्या. १६
वृद्ध म्हणे, "रे! संजय! मज न परोत्कर्ष परिसवे, चावे
कर्णा अहिसा, हा! हा! मद्भट बहु त्यां हि परिस वेंचावे[18]? १७
जो सुत जयवांछेला सुमत जसा कांतसंग रामेला[19].

१. दैत्यदानवांशी. २. इंद्र. ३. अश्वत्थामाप्रभृति वीरांस. ४. हत्ती मध्यें. ५. सिंहबाल. ६. गुह्य गोष्टींसह, बिंगासह. ७. पिता ( अर्जुन ) व मामा ( कृष्ण ) यासारखें आहे बळ ज्याचें अशा ( अभिमन्यूस ) ८. दुष्टाचा शत्रु ( अर्जुन ). ९. सिंह. १०. गजसमूहांनीं. ११. घागरींनीं. १२. [ आपल्या ] बहिणीनें ( द्रौपदीनें ). १३. कृपाचार्य व कृतवर्मा इत्यादि प्रमुख वीरांचीं सैन्यें. १४. धृष्टद्युम्नानें. १५. नृसिंहमंत्राचा जप करणारांस. १६. देवीनें मारलेल्या महिषासुरास. १७. गदेनें मारलेल्या. १८. खर्ची पडावे; मरावें. १९. लीस.

आम्हांकडील जो भट म्हणसी तो करुनि संगरा मेला. १८
न सुचे उपाय, जो जो मज्जन[1] रणयज्ञदक्ष[2] तो खचला,
अन्योन्य मदसु[3] म्हणती; 'जावें, जाण्यांत लक्ष तोख[4], चला.'
सहज स्वहित बहु घडे कृष्णा, लव हि न मला उपायशतें,
जें अमृतरसा येतें, येइल बा! काय गा! तुपा यश तें? २०
मत्प्रत्ययासि आलें विदुर कवि भविष्य कथित होता तें,
पुत्रहितार्थ करावा जो केला म्यां न यत्न तो तातें." २१
संजय म्हणे:–खळांच्या परिणामीं उक्ति बहु असारा[5], ज्या
त्यांसि न भुलतासि, तुझा कां होता घात हा असा राज्या!?
शोकाब्धि दूर आहे, निर्गता[6] आलासि बा! परिसरा[7] या,
येव्हां चि व्याकुळ कां? स्वपरजनक्षयकथा[8] परिस, राया! २३
पार्षत समरीं वदला शल्या धृतपुत्रनाशकोपा[9], 'यां[10],'
मग ते करिते जाले अन्योन्यप्राणनाशकोपाया[11]. २४
होते बहु, परि रक्षी सत्वर अभिमन्यु पार्षता, राया!
रामयशोग्रंथशतीं[12] क्षम[13] जीवा जेंवि आर्ष[14] ताराया. २५
मद्रपतीसीं[15] भिडतां अद्भुतसामर्थ्य कंजनाभाचा
करिता जाला राज्या! प्रेक्षकजनचित्तरंजना भाचा[16]. २६
शल्याचे कैवारी भ्राते दुर्योधनादि दश होते,
त्यावरि उठतां गमला सुबुभुक्षू व्याघ्र भीम, शश हो! ते. २७
भीमापुढें गजायुत[17] केलें टाळावया स्वघातातें,

१. माझा वीर. २. युद्धकर्मात निपुण. ३. माझे प्राण. ४. तोष, आनद. ५. निःसत्व, व्यर्थ. ६. नुकता च. ७. पर्यंतभू.–**पंत.** शोकसागराच्या समीप असणाऱ्या प्रदेशात. ८. आपल्या व शत्रूच्या वीरांच्या नाशाची हकीकत. ९. पुत्र-वधामुळे धरिला आहे राग ज्याने अशा शल्यास. १०. युद्धास चला. ११. एकमे-काच्या प्राणनाशाच्या उपायास. १२. रामयशाच्या शेकडों ग्रंथात. १३. समर्थ. १४. ऋषिप्रणीत; वाल्मीकिकृत. १५. शल्याशीं. १६. कृष्णाचा भाचा. १७. दहा हजार हत्तो.

गमलें यूथ[1] हरिपुढें पाठविलें यूथपें चि ताता! तें. २८
जाय लयासि गजायुत तें ज्याचें तो हि मागध रणीं हो!
जो भीम गदाभरधर सिद्ध सुखें तो हि[2]मागधरणीं हो. २९
सर्वगजघ्न[3]वृकोदरवीरगदाभीरु अभ्रमु[4] रडेल,
भीमावरि दिगिभ[5]शत हि न श्वसना[6]वरि हि अभ्र मुरडेल. ३०
गजदशसहस्र वधितां भीमभुजाला नसे लवायास,
आग्रह[7] करिति अशाच्या चरणीं त्वत्सुत कसे लवायास? ३१
सर्वा हि चमू प्रेषी राजा[8] भीमक्षयार्थ कृत्यासी[9],
तीतें मर्दूनि करी हर्षें तो रुद्रसा चि नृत्यासी. ३२
घेती पार्षत सात्यकि अभिमन्यु द्रौपदेय हे यश तें,
भीमार्थ प्राण हि, ज्यां हेय, कथावीं कशास हेय[10]शतें? ३३
तों सोमदत्तिसात्यकि वारिति अन्योन्य सैन्यशैवाला[11],
दे शैव वैष्णवाला की वैष्णव जेंवि दैन्य शैवाला. ३४
धांवे कुरुपति, कीं, तो[12] कौरव त्या यादवें[13] न मारावा,
त्यावरि भीम उठे हो! करुनि शिवा[14]सिंहसत्तमारावा. ३५
वेधी बहु बाणांहीं भीमास तसें चि त्या विशोका[15]स,
धनुस[16] हि, तों पवन म्हणे, 'हूं; घालि खळांतका! शिशो! कास[17].'
भीम धनु छेदी, तों दुर्योधन अन्य चाप सिद्ध करी,
वेधी मर्मीं च, पडे मूर्छित तो[18], जेंवि सिंहविद्ध करी. ३७
तों झांकुनि बाणांहीं त्वत्तनया विजयसुतपुरोगम[19] जे

१. हत्तीचा समुदाय. २. हिमालयपर्वत धरण्यात. ३. सर्व हत्तींचा नाश करणाऱ्या भीमवीराच्या गदेस भ्यालेली ४. ऐरावताची स्त्री. ५. शभर दिग्गज. ६. वायूवर. ७. दुराग्रह; हट्ट. ८. दुर्योधन. ९. राक्षसी देवतेसारखी. १० टाकण्यास योग्य असे शेंकडो पदार्थ. ११. सैन्यरूप शेवाळास. १२. सोमदत्त. १३. सात्यकीने. १४ दुर्गा-पंत. दुर्गेच्या सिंहश्रेष्ठासारख्या गर्जनेस. १५. भीमाच्या सारथ्यास. १६ [भीमाच्या] धनुष्यास. १७. तयार हो. १८. भीमसेन. १९. अभिमन्युप्रमुख.

ते म्हणती, 'साधुपुढें दाविसि मरणार्थ खळगुरो[1]! गमजे.' ३८

इतुक्यांत भीम उठला क्षुधित गुहासुप्त[2] सिंहसा, राया!
त्वत्सुतगजमद, होतां साह्य सकळ[3] दिगिभमद हि, साराया.

धाराधर[4] जेंवि नगा, झांकी सोडूनि भीम शर भावा.
त्यां तो[5] भी, जैसा गज भीतो सिंहास, सिंह शरभा[6] वा. ४०

शल्य हि पळे सुयोधनसा चि समर्पूनि सर्व शर भाच्या[7],
त्याच्या दृष्टिपुढें अरि न टिकेल, टिकेल हरि हि शरभाच्या. ४१

सांपडले भीमाला त्वत्सुत, मृग जेंवि आठ वाघाला,
देवासि आठवा कीं स्वाघाला[8], हा न आठवा घाला. ४२

भीष्म म्हणे, 'भीम धरा, द्या चि तुम्हीं सर्व वीर तरमुंडी[9],
दुर्धर योग धराया जैसी देतात धीरतर मुंडी[10]. ४३

भीमावरि भगदत्त स्वगजा परिभूतहिमनगा[11] ढकली,
मोही[12] तन्मन[13] जैसें साधूंचें पूत हि मन गाढ कली. ४४

तो झांकी भीमातें असमयपार्थोद[14] जेंवि तरणीतें[15],
आढ्य[16] कुलीनजनाचें दावी औदार्य जें वितरणीं[17] तें. ४५

भगदत्तवाहना[18] त्या ऐरावतकरिकुळीं च जनन गजा,
सौभद्रप्रमुखांतें घन वदले पाहणार जन नग ज्या. ४६

---

१. खलश्रेष्ठा! २. गुहेत निजलेला. ३. अन्वय–सकळ दिगिभमद हि (दिग्गजमद हि) साह्य होता त्वत्सुतगजमद साराया गुहासुप्त सिंहसा क्षुधित भीम 'राया' इतुक्यात उठला ४. मेघ ५ दुर्योधन. ६. सिंहाहून बलवान असा आठ पायाचा प्राणी. ७. बहिणीच्या मुलास (भीमास). ८. आपल्या पातकास. ९. तुटून पडणे १०. यती–पंत. ११. जिंकिला आहे हिमालयपर्वत ज्याने अशा. १२. मोहात घाली. १३ भीमाचे मन. १४. मेघ. १५. सूर्यास. १६. श्रीमान. १७ दानाचे ठायीं. १८. अन्वयार्थ–पाहणार जन सौभद्रप्रमुखातें घन (मेघ) [आणि] ज्या नग (पर्वत) वदले त्या भगदत्तवाहना गजा ऐरावतकरिकुळीं च जनन.

पावे कुसुमितकिंशुकघनवनपिहिताद्रिपाळसादृश्य,[1]
भीमाश्रितांस[2] जाला मार्कंडेयास काळसा दृश्य. ४७
जेंवि सुकवि गुण झांकुनि दृष्टि कराया सकंप[3] शिर कविला
शिकवी मारुतिला[4] भगदत्तें हृदयांत बाण शिरकविला[*]. ४८
सिंधुजळा कुंभजसा[5] जो शत्रुबळासि दक्ष साराया,
तो धावला घटोत्कच दिव्य[6] निधानस्थयक्षसा[7], राया! ४९
मायारचितैरावतदिङ्नागारूढ[8] तो पलाश[9] मन
बहु कांपविता जाला, तैसें न कधीं हि कोपला शमनें[10]. ५०
तैसे चि वामनमहापद्मांजननामदिक्करितिलकसे[11]
त्यावरि हि खेचर[12], ते मग भगदत्तातें न धिक्करितिल कसे?
आपण चि आपणास व्यसनीं गोवी सदंतकरतेज्या[13],
"पावेल जय कसा [14]तो, पीडिति हो! [15]वीस दंतकर ते ज्या?
स्वराजांस हि भी तो गज मारित येतां चहूंकडुन चवघे.
अहिदंष्टभ्रांत[16] पुरुष जैसा मानी गहूं कडु, न चव घे. ५३
भ्रमला, पळावयास हि नच तो भगदत्तसिंधुर[17] क्षमला[18],
आणों हा[19] हि म्हणे, 'हरि! तूं चि दयाशक्तिसिंधु, रक्ष मला.'
जाणुनि भगदत्तगजव्यसनासि तयाचिया चि हाकांनीं
भीष्म द्रोणासि म्हणे, 'आला कीं आर्तशब्द[20] हा कानीं. ५५

१. फुललेल्या पळसाच्या निबिड अरण्यानें आच्छादिलेल्या हिमालयाचें सादृश्य. २. भीमसेनाच्या अनुयायास. ३. कंपायमान. ४. भीमास. ५. अगस्त्यऋषीसारखा. ६. अलौकिक. ७. द्रव्यावर बसलेल्या यक्षासारखा. ८. कपटानें निर्माण केलेल्या ऐरावत नांवाच्या दिग्गजावर बसलेला. ९. राक्षस. १०. यम. ११. वामन, महापद्म, अंजन या नांवाचे दिग्गजश्रेष्ठासारखे. १२. गगनचर. १३. साधूचा अंत करणारें तेज ज्याचें तो. १४. भगदत्त. १५. ऐरावतादि मायावी चार दिग्गजाचे सोळा दांत व चार सोंडा मिळून वीस. १६. सर्पदंशानें भ्रम पावलेला. १७. भगदत्ताचा हत्ती. १८. समर्थ झाला. १९. हा गजेंद्र. २०. दुःखिताचा शब्द. * शिरकविलेला.

बहुधा भिडतो ऐरावतगत[1] हत*विश्वरूपगल[2] बलहा[3]
भगदत्ताचा करितो होवुनि गजराज आर्त[4] गलबल हा.' ५६
'रक्षावा प्राग्ज्योतिष,[5]' ऐसें बोलोनि वृद्ध[6] तवैकानें[7]
ते कांहीं गेले जों ओळखिला यातुशब्द[8] तंव कानें. ५७
वृद्ध म्हणे, "गा! द्रोणा! अनृत[9] न जालों करूनि पण तुंडें,
शक्य नव्हे, युद्ध तुमुळ करिजेतें आमुच्या चि पैणतुंडें[10]. ५८
भीमतनूज घटोत्कच राक्षस न धरील आमुची भीडें,
कीं, तात धर्म म्हणतो, 'वत्सा! किति नित्य पुससि? हूं; भीड[11].'
सरले तीन प्रहर, उरला अवकाश अल्प चरमा[12] या,
होइल घटोत्कच्याची माया, जसि शेषतल्पचरमाया[13]. ६०
जालों सर्व हि सक्षत[14] समरशतीं श्रांतवाहन[15] भ्रमलों,
परतों चला, स्वशिबिरा जावूं, पाहूं उद्यां, बहु श्रमलों.'' ६१
ऐसा करुनि विचार, द्रोणासह शीघ्र तव पिता[16] परते,
कुरुकटकाला बहु भय देती गर्जोनि सिंहसे पर[17] ते. ६२

## अध्याय पांचवा.



(पंचमदिनयुद्ध.)

भूप म्हणे, 'हितमंत्र न कानांत क्ष्वेडरसें[18] न ओता हे,
ऐसें विदुर मज जसें सांगत होता तसें च होताहे. १

१. ऐरावतावर बसलेला. २. इंद्रपुरोहित–**पंत.** ३. इंद्र–**पंत.** ४. पीडिलेला. ५. देशविशेष; त्या देशाचा राजा भगदत्त. ६. भीष्म. ७. आवेशानें; रागानें. ८. राक्षसाचा शब्द. ९. खोटें. १०. घटोत्कचानें. ११. युद्ध कर. १२. अखेरच्या (चौथ्या) प्रहरास. १३. शेषरूप शय्येवर शयन करणाऱ्या विष्णूची माया. १४. घायाळ. १५. थकलेलीं आहेत वाहनें ज्यांचीं. १६. भीष्म. १७. शत्रु. १८. विषरस. * तोडला आहे विश्वरूपाचा गळा ज्यानें असा (कथासंदर्भ परिशिष्टांत पहा).

हतशेषें[1] मदपत्यें[2] पळतील चि, जेंवि पाडसें, दूर,
पावेल श्रीच्या[3] ज्येष्ठेचा[4] केंवि पाड[5] सेंदूर? २
असतां द्रोण हि भीष्म हि, कटकें होतात कां पराभूतें?
केला असेल भीमें व्यूह, जसा बाळ कांपरा[6] भूतें. ३
मज सांग संजया! ते ज्या सामर्थ्यें रणीं न भंगति तें,
करिते जाले काय सुमणिमंत्रौषधिरसज्ञसंगतितें[7].' ४
संजय म्हणे:–कृतैकाश्रितसर्वस्वद्रुशौरिसंगतिहीं[8]
कां जी! करिजेल इतर मणिमंत्रौषधिरसज्ञसंग तिहीं? ५
धर्में चि तरति पांडव; बुडति अधर्में चि सर्व कौरव, हो!
पौरव हो! सुकृतें जय, कुकृतें क्षय, हा प्रसिद्ध कौ[9] रव हो. ६
ऐसें चि पुसे त्वत्सुत, त्यासि, वृथा श्रम, तथापि ताराया
सज्जनशिरोमणि तुज़ा सांगे ऐसी कथा पितां[10], राया! ७
"मंदरशिखरीं[11] सामर चतुरानन देव एकदा राहे,
वाहे स्वानिळ[12], अकस्माद्दिव्यविमानासि तों नभीं पाहे. ८
सर्वांच्या हि ललाटीं ज्याचें सर्वज्ञ पाणिकंज[13] लिही,
'जय जय' म्हणे, उठे तो प्रभु, जोडी क्षिप्र च्यार अंजलि ही. ९
देव हि तसें चि करिती, परि पाहों न शकती च ते ज्यातें,
बहु विनयें विधि विनवी, होतां चि अदृश्य, पुसति तेज्यातें.
विधि वदला, "सुर हो! तें पुसतां, तरि सांगतों चि, या परिसा;
परि सावध व्हा, लागो, शुचि[14] व्हाया, हृदयलोह[15] या परिसा.

१. मरून राहिलेली. २. माझी मुलें. ३. लक्ष्मीचा. ४. लक्ष्मीच्या वडील बहिणीचा. (आक्काबाईचा) ५. योग्यता. ६. कापणारा ७. उत्तम मणी, मंत्र, औषधि व रसज्ञ याच्या संगमास. ८. आश्रिताचा सर्वकल्पतरु जो कृष्ण त्या एकाची च केली आहे संगति ज्यांनी अशा पांडवांनीं. ९. कलौ करीतो इतिवत–
–**पंत.** ह्या टीपेचा अर्थ लागला नाही. १०. भीष्म. ११. गंधमादनपर्वतावर. १२. सुखकारक वाय. १३. करकमल. १४. पवित्र. १५. हृदयरूप लोखंड.

तें ब्रह्म, पावलों, त्या सद्गुरु[1]नाभ्यंबुजांत जनना मीं;
त्या चि प्रभुच्या, पावति, पुरुषार्थ समस्त सुज्ञजन, नामीं. १२
वदलों प्रभुप्रति असें, 'दिधला विश्वंभरा! भरोसा[2] जो
तो सत्य असो, असुरक्षतजें[3] विश्वंभरा[4] भरो, साजो. १३
भूभरनाशास्तव अवतार जगन्नायका! मनावरि घे,
सिंधूंत परहिताधिक धरुनि मनीं काय काम नाव रिघे?' १४
वदला प्रसन्नवदन प्रभु कीं, 'प्रकटेन सोमसंतानीं[5]
बहु मानिजेल माजा सुयशोनिधि जेंवि सोम[6] संतानीं. १५
होइन वसुदेवतनुज मीं, नारायण वरीन नरतेतें[7]
स्वयशःश्रोत्यांचें मन अन्यत्र पळ हि करीन न रते तें. १६
होतिल शीघ्र चि सर्व हि सदहित[8] दितिसुत[9] सदानव असून[10],
आर्तावन[11] न करिन कां प्रभु मीं भुजबळ सदा नव असून? १७
सत्वाश्रित[12] न म्हणेल चि कोणही कोणहा हि देवता नाना,
विपदुत्तारक[13] भक्तें हा एक चि वासुदेव वानावा.'" १८
यापरि सुरांसि सांगे विधि जे गुरु आपणासि दे वर हो!
देवरहोवृत्त[14] असें, तो चि प्रभु रेवतीष्टदेवर[15] हो. १९
हें देवरहस्य मला प्रिय म्हणवुनि जामदग्न्य[16] आयकवी,
नारद मार्कंडेय व्यास हि वदतील अनृत काय कवी? २०
कंसांतक नारायण, नर अर्जुन, हे अजेय[17] विश्वास,
हें तुज कथिलें शतदा परि मद्वचनीं तुजा न विश्वास. २१
हा श्रीकृष्ण प्रभु ज्या पक्षीं तेथें समस्त कल्याण,
याचा प्रसाद होतां सिंहीं घालील शश हि पल्याण[18]. २२

---

१. मद्गुरूच्या नाभिकमलांत. २. भरवसा. ३. दैत्यांच्या रक्तानें. ४. पृथ्वी. ५. चंद्रवंशांत. ६. शिव–**पंत.** ७. नरपणास. ८. सज्जनांचे शत्रु. ९. दैत्य. १०. असुभिरूनाः–**पंत.** प्राणहीन. ११. आर्तांचे रक्षण. १२. सत्वाचा आश्रय केलेला. १३. विपत्तींतून तारणारा. १४. एकांत–**पंत.** देवाचें गुह्य, (एकांतांतील वृत्तांत). १५. दीर–**पंत.** १६. परशुराम. १७. अजिंक्य. १८. खोगीर.

नरनारायणशस्त्रज्वलनीं कुळ इच्छितोसि वैराया,
दुर्योधना! खरा तूं राक्षस, न करील अन्य वैरा या. २३
सुजनासि बिभीषणता रुचते कुजनासि तुज दशाननता,
अनंता[1] जना शिवे रे! संसारीं ओखटी[2] दशा, न नता." २४
समसत्यप्रियहित हें गुरुवच[3] गणिलें खळें[4] विषम, राया!
केलें हिमेंट मुख, जणों पाजित होता बळें विष मराया. २५
प्रावृट्प्रियभेकाच्या[5] कां न गमे सुरभि[6] मानसा गर[7] गा!
क्षुद्र नदी जसि धरिती तसि न धरी दुरभिमान सागरंगा[8]. २६
काळापुढें त्वदनयें[9] ओगरिलें[10] स्वकुळताट, कळलें कीं?
कां बसलासि उगा? जा, नृपमंडळ सर्व ताटकळलें[11] कीं." २७
असि शयनाज्ञा[12] होतां जाय निजाया तुजा तनय नमुनीं,
भीष्म हि शयनीं पहुडे[13], जैसा मीलितसुजातनयन[14] मुनी. २८
राया! भीष्माला जें सुख, इतरा तें दुरापें[15], गा! स्वापें[16],
आत्मस्थिति[17] निववी जसि, तसि तप्तासि न सुरापगा[18] स्वापें[19].
पंचमदिवसीं रचिला मकरव्यूह त्रिमार्गगातनयें[20],
श्येनव्यूह सितांश्वें[21] लोकमतें, मन्मतें तुज्या अनयें. ३०
देवव्रतें[20] महास्त्रें योजुनियां मोहितां स्वकटकातें[22].
'हूं, हय पितामहावरि हाक,' म्हणे पार्थ विश्वघटकातें[23]. ३१
कुरुपति म्हणे गुरूप्रति, 'भीष्म! तुम्हीं घ्याल जरि मनावर हो!
जिंकाल कालबल ही, नाहीं काहीं तुम्हां अनावर, हो! ३२

१. गर्विष्ठास, नम्र नसलेल्यास. २. वाईट. ३. भीष्माचे वचन. ४. वाईट. ५. पावसाळा प्रिय असलेल्या बेडकाच्या. ६. वसंत–पंत. ७. विष. ८. समुद्रास मिळणारी. ९. तुझ्या अपराधानें. १०. वाढलें. ११. खोळंबून राहिले. १२. निजण्याची आज्ञा. १३. निजे. १४. उत्तम नेत्र मिटलेला. १५. मिळण्यास कठिण. १६. निद्रेनें. १७. आत्मज्ञान. १८. गंगा. १९. आपल्या किंवा चांगल्या उदकानें. २०. भीष्मानें. २१. अर्जुनानें. २२. आपल्या (पांडवांच्या) सैन्यास. २३. विश्वकर्त्या कृष्णास.

जाणति सर्व हि तुमची छात्रीं[1] पुत्रीं समान सुदया तें;
पावो प्रतापरवि[2] परमदेहांतें[3] मथूनि उदयातें.' ३३
सात्यकिसमक्ष पांडवकटक द्रोणें शरव्रजें[4] मथिलें,
द्रवलें, जसें द्रवावें तत्काळ हुताशतापितें[5] कथिलें. ३४
शैनेय[6] हि दृष्टिपुढें येतां केला पळांत जिगजिग[7] जी!
राहेल कसी कौस्तुभमणिपाशीं माणिकांत झिगझिग[8] जी? ३५
तें भीम म्हणे, 'भीतें अन्यें, विसरुनि नया, न राखावें,
या ब्रह्मराक्षसें परि मजदेखत तों न या नरा खावें.' ३६
गुरुशिष्य 'खरे' कोण्ही म्हणती, कोण्ही हि तें सुजन 'लटिके,'
त्या गुरुकलहकलिपुढें[9] श्रीभीमाचा चि तो भुजनळ[10] टिके. ३७
तों भीष्म थांवला, कीं, हरित चि आला समस्त विप्रभया,
अभिमन्यु म्हणे कृष्णातनुज्यांतें,[11] 'तांत हो न विप्रभ,[13] या.' ३८
इतुक्यांत शिखंडी ये, कीं, पावावे परिश्रम न भाचे,[14]
उल्काश्रुपात[15] कथिती, कवि शून्य म्हणति, परि श्रम नभाचे. ३९
तो भीष्मातें गांठी, जैसा पाथोद[16] पर्वतातें, हो!
तुमच्या मानियलें तें स्त्रीचेष्टांचें चि पर्व तातें हो! ४०
स्त्रीपूर्व म्हणुनि भीष्म चिं न, तयापरि सर्व मानवे शस्त्री,
त्यजिली जाणों यतिनें धृतमोहनगर्वमानवेशस्त्री.[17] ४१
केली शुकाप्तबोधें[18] हृतदर्पा[19]रुचिरविग्रहा[20] रंभा,

१. शिष्याचे ठायीं. २. प्रतापरूप सूर्य. ३. शत्रुरूप मदेहांस. (हे सूर्याचे शत्रु). ४. बाणसमूहानें. ५. अग्नीनें तापविलेल्या. ६. सात्यकि. ७. जर्जर. ८. लुकलुकी, मंदप्रभा. ९. गुरुकलहरूप कलीपुढें. १०. बाहुरूप नळराजा. ११. द्रौपदीपुत्रास. १२. भीम-पंत. १३. निस्तेज. १४. बहिणीचे मुलगे. १५. पतनशील तारे हे च अश्रुपात. १६. मेघ. १७. धरिला आहे मोहन आणि गर्वसबंधी अभिमान जिनें अशी वेश्या. १८. शुकाच्या हितकारक उपदेशानें. १९. हरण झाला गर्व जिचा अशी. २०. मनोहर आहे शरीर जिचें अशी.

तसि भीष्मांसद्रोणें[1] अंबा[2] कृतसुचिरविग्रहारंभा.[3] ४२
भीष्माकडे सुयोधन सकटक ये पार्षतास[4] पळवाया,
धावुनि पार्थ म्हणे, 'व्हा माझ्या शरातपांत[5] पळवा,[6] या.' ४३
कौरवसमूह,येतां चालुनियां कृष्णसारथि,[7] गळाला,
हरिभयदीर्णनभ[8] करिल धड लावुनि कृष्णसार[9] थिगळाला? ४४
हे भासले, करिति रण इच्छुनि सुरदैत्यदानव सुधेतें,
कीं प्रलयजलद देती वृष्टि करुनि शैत्यदान वसुधेतें. ४५
भीष्मश्वेताश्वांचा निरुपम मज वाटला तडाखा तो,
कीं ब्रह्मगोळ वाटे विशिखाहीं[10] दाटला तडा[11] खातो. ४६
कुरुबळनलिनीवनातें[12] भीमगज निकार[13] आठवी रगडी,
पाठविला काळानें जाणों, थापटुनि पाठ, वीर गडी. ४७
मर्मीं शर हाणुनि, धनु तोडुनि भीष्म चि तया दटावी, हो!
श्वश्रूपुढें[14] स्नुषा,[15] गुरुशक्तिपुढें शक्ति[16] नच नटावी हो! ४८
सात्यकिच्या सूतातें बसवी छेदूनि मस्तक, विमानीं,
वांचविला भगवत्प्रिय शैनेय असें समस्त कवि मानी. ४९
घेवूनि रथ पळाले भीष्मशरत्रस्त वातसे वाजी
घडलीं तयांसि पतिची चुकवुनि तो प्राणघात सेवा, जी! ५०
गुरुपुत्र अर्जुनावरि धावुनि हाणी उरांत सायक सा,
नायक साधूंचा तो न म्हणेल तशा रणांत 'हाय!' कसा? ५१
गुरुसुत गुरुसम, परि निजधर्म[17] म्हणुनि करुनि कठिन मन कांहीं
कनकांहीं पूजावा तो पूजियला व्रणार्तिजनकांहीं.[18] ५२

---

१. भीष्म व हितेच्छु द्रोण यानीं. २. शिखंडीरूप अंबा. ३. केला आहे फार वेळ युद्धारंभ जिनें. ४. शिखंडीस. ५. बाणरूप उन्हात. ६. पातेरा; पाचोळा. ७. अर्जुन. ८. सिंहाच्या भयानें फाटलेलें आकाश. ९ काळवीट. १०. बाणानीं. ११. चीर; भेग. १२. कौरवसैन्यरूप कमलवनास. १३. अपकार. १४. सासूपुढें. १५. सून. १६. [पुत्राची किंवा शिष्याची] शक्ति. १७. क्षात्रियधर्म. १८. जखमांचें दुःख उत्पन्न करणाऱ्या (बाणानीं).

खंडी चापातें कीं न तया अयश:प्रदासि[1] विप्र भजो,
मित्रें पदार्थ मित्रा न धरूं द्यावा करील विप्रभ जो. ५३
पुच्छरुच्छेदें अहिसा चापच्छेदेंकरूनि बहु खवळे,
तो गुरुपदाभिमानें ऋषिवरतेजोघ्न[2] जेंवि नहुख वळे. ५४
सज्जुनि धनु दुजें, सोडी विशिखांची विप्र समहिमा[3] नवती[4],
गमली करील पार्थासह भस्म क्षिप्र समहि[5] मानव ती. ५५
जगदीश्वरास हि म्हणे, 'न रुसें हे तूं हि विशिख सप्तति[6] घे.'
त्रिजगद्ग्रसनोत्थानळसम[7] गमले ते प्रकोपतप्त[8] तिघे. ५६
तो निजगुरुसुत म्हणुनि न दे परिभव, दे तयास कवि टाळा;
सांगे जना असें, 'यश रक्षा, बहु कोप करुनि न विटाळा.'
प्रार्थुनि देवासि म्हणे तो पार्थ, 'अहो ! दयानद ! पिटाळा.
यद्यपि नये चि देवूं द्यावा या गुरुसुता तदपि[9] टाळा.' ५८
द्रौणिप्रति सोडुनि, तो कोंडी कौरवबळासि शरभवनीं[10]
भिडले रणांगणीं मग दुर्योधनभीम जेंवि शरभ वनीं. ५९
अभिमन्यु सुयोधनसुतलक्ष्मणमुख विरथ करुनि बहु मळवी,
नळ[11]वीरभीत कळिला तद्विधिसा[12] प्रबळ कृप तया[13] पळवी. ६०
भट दशसहस्र उठले जे आज्ञाकर सुयोधनाचे, हो !
त्यां हरिणांसि हरि तसा मर्दुनि सात्यकि सुयोध नाचे, हो !
भूरिश्रवा तयाचे[14] लीलालेशें वधी दश सुत रणीं,
तच्छक्ति तारुनि श्रितें[15] घे जैसी सागरीं यश सुतरणी[16]. ६२

१. अपयश देणाऱ्या (धनुष्यास). २. ऋषिश्रेष्ठाच्या तेजाचा नाश करणारा. ३. अति उष्ण; अति तीव्र. ४. नव्वद. ५. पृथ्वीसह; जमिनीबरोबर. ६. सत्तर. ७. त्रैलोक्यास ग्रासणाऱ्या शंकरापासून उठलेल्या अग्नीसारखे. ८. अत्यंत रागानें तापलेले. ९. तथापि. १०. बाणरूप,घरांत. ११. नलराजास भ्यालेल्या. १२. त्याचे (नळाचे) दैवासारखा. १३. लक्ष्मणास. १४. सात्यकीचे. १५. आश्रित. १६. चांगली नाव.

[1]पुत्रघ्नरथासीं रथ भिडवी सात्यकि पळांत आवेशें,
भट त्यासि निवाराया शकले न जसे रवीस [2]ओंवे शें. ६३
हय सूत मथुनि जाले ते यदुकुरुवंशनलिनरवि [3]पत्ती
राया! असी च समरीं इच्छिति शुचि नर न [4]मलि नर विपत्ती.
देतील मानधन ते पद मागें [5]खड्गचर्मपाणि कसें?
व्यसनीं तेज न सोडी कुलजहृदय, [6]पावकांत माणिकसें. ६५
घे भीम सात्यकीस स्वरथीं कीं शत्रुवश सुयोध न हो,
तैसें चि [7]सौमदत्तिस जोडाया शुद्ध यश सुयोधन हो! ६६
[8]सूतें कथिलें पंचम दिवसींचें अतुळ युद्ध रायास.
कविनें हि आपणास [9]व्यसनानिधिभवांत उद्धरायास. ६७

---

## अध्याय सहावा.

(षष्ठदिनयुद्ध.)

षष्ठदिनीं धर्म रची जो व्यूह, [10]परांसि तो खरा [11]मकर,
होय श्रितांसि जैसा देणारा अभय [12]तोखें रामकर. १
बा! अनुसरोनि [13]धर्मद्वेषदुरभिमानवशकुजातातें,
रचिला 'क्रौंचव्यूह' व्यर्थ महापंडितें तुज्या [14]तातें. २
द्रोणास, भीम गांठी प्रथम रणीं, भीष्म जेंवि रामास,
पावे जन [15]प्रतापें त्या [16]तदिषुग्रीष्मजें [17]विरामास. ३

१. पुत्रास मारणाऱ्या भूरिश्रव्याच्या रथाशीं. २. मडक्याच्या भट्या. ३. पादचारी. ४. मलिन. ५. ज्यांच्या हातात तरवार व ढाल आहे असे. ६. अग्नीत. ७. भूरिश्रव्यास. ८. सजयानें. ९. सकटसागररूप ससारात. १०. शत्रूस. ११. मगर. १२. सतोष. १३. धर्मद्वेषाच्या दुरभिमानास वश झालेल्या नीचास (दुर्योधनास). १४. भीष्मानें. १५. अत्यत तापानें. १६. त्याच्या (भीष्माच्या) बाणरूप ग्रीष्मापासून उत्पन्न झालेल्या (प्रतापें). १७. अतास.

गुरुसूत[1]मथन करितां बहु भीमशरांसि मानवे[2] शमन[3],
होतां स्वयें स्वसारथि गुरुस हि लोकेशमानवेशमन[4]. ४
मर्दी शत्रुचमूला शौर्यमदें बहुत मातलीला[5] जो,
तो शक्र हि लाजे, मग कुरुगुरुला कां न मातली[6] लाजो? ५
कां जी! रडतां? स्मरतें कीं विदुरहितोक्त[7] आयकाना तें?
येणार पुढें पुष्कळ, आलें आतां चि काय कानां तें? ६
गुरुसि त्यजुनि, व्यूहीं भीम, त्रिपुरीं[8] जसा हरशर[9], भरे[10],
भट वदले, 'आला धृतराष्ट्रसुतहरिप्रभाहर[11] शरभ[12], रे!' ७
त्वत्सुत म्हणति, 'धरावा, न जगे चि पिपीलिकांत[13] अहि[14] तरणा;
जाळीं मृगसा आला, व्यूहीं हा आयता चि अहित[15] रणा.' ८
कौरवभटलक्ष तया, जैसें सिंहासि न करिलक्ष[16], तरे,
भीम म्हणे त्यांसि, 'गदा हे, गगनाला चि न करिल क्षत रे!'
त्यजुनि स्वरथ, गदाधर वीर, वृकोदर करी कदन, राज्या!
होय प्राप्त विमदपण[17] त्या होता शक्तिचा मद नरा ज्या. १०
कोणाचें हि न चाले कांहीं त्या प्रलयकालरुद्रसमीं[18],
गणिता जालों पाहुनि तें युद्ध, तदन्य सर्व उद्रस[19] मीं. ११
धृष्टद्युम्न व्यूहीं साह्यार्थ शिरे, म्हणे, 'अहा! यास,
काय म्हणावें? करितो, त्यजुनि सहायास, दुःसहायास[20].' १२
दूर ध्वजासि पाहुनि ओळखुनि स्यंदनासि[21] आटोपी[22];
तों न दिसे, जो म्हणता स्वगदेला, 'शत्रुसिंधु आटो, पी.' १३

---

१. द्रोणाच्या सारथ्याचा वध. २. मान डोलवी. ३. यम. ४. लोकपालांचे व राजाचे मन [ मानवे ]. ५. माजलेल्या. ६. इंद्राचा सारथि. ७. विदुरानें केलेला हितकारक उपदेश. ८. त्रिपुरासुरावर. ९. शंकराचा बाण. १०. शिरे. ११. कौरवसिंहास निस्तेज करणारा. १२. भीमरूप शरभ. १३. मुंग्यात. १४. साप. १५. शत्रु. १६. लक्ष हत्ती. १७. गर्वरहितता. १८. प्रलयकालीन शंकरासारख्या भीमाचे ठायीं. १९. नीरस. २०. दुःसह श्रम. २१. [ भीमाच्या ] रथास. २२. गाठी.

पाहुनि सूतासि रथीं गहिंवरुनि म्हणे, 'अहो! विशोक[1]! मला
[2]कमलाकरप्रियरहित अरुण तसा चि प्रकार हा गमला. १४
कोठें तो? ज्या शक्रा कांपति होवुनि सुयोधनग[3] दीन,
ज्यासि म्हणे न मुखें, परि चित्तें मानी सुयोधन गदीन[4].' १५
वदला विशोक, 'येथें स्थापुनि मजला गदेसि धरुनि करीं,
शिरला कौरवकटकीं, जैसा झंझासमीर[5] तरुनिकरीं[6].' १६
धृष्टद्युम्न म्हणे, 'तरि जातों स्वसख्याकडे चि, कां परतूं?
विषयीं कैसा, देहीं शिरतां अयशोभयोत्थ कांप[7], रतूं?' १७
यापरि वदोनि धावे, देखत देखत गदाहतगज्यांतें,
गमले ते नग[8], न निघे सोसुनि कुलिशोत्थ[9] दाह तग[10] ज्यांतें. १८
अवलोकिला वृकोदर कुरुकटकीं सागरांत मंदरसा[11],
सुज्ञ अधिक वीराख्यीं[12] अमृताख्या मानितात मंद रसा. १९
क्षिप्र रथावरि घाहुनि बाहु निववीले सख्यास भेटोन,
गमला शमला न मला सर्वांस हि दव[13] दवांत[14] पेटोन. २०
भ्रात्यांसि म्हणे कुरुपति, "बद्ध करुनि म्हणावितों अरिस 'हाय!'
झाला खळा खळ, गदा[15] नित्यादिवास्वापसा[16], परि सहाय. २१
दुष्टा धृष्टद्युम्ना मारा चि, वहुंकडुनि कोंडा हो!
कण हा चि शस्त्रशूर्पा[17]; उरला पांचाळसंघ कोंडा हो." २२
वर्षति धृष्टद्युम्नीं त्वत्सुत, म्हणवे न त्यां अघन[18] राज्या!
परि कंपद न च झाले, जैसे यमभट, नसे अघ[19] नरा ज्या. २३

१. हे भीमसारथ्याचें नाव. २. कमलसमूहास प्रिय अशा सूर्याशिवाय. ३. उत्तम वीररूप पर्वत. ४. गदाधरश्रेष्ठ. ५. झंझावात. ६. वृक्षसमुदायात, झाडींत. ७. अपकीर्तीच्या भीतीपासून उत्पन्न झालेला (कंप). ८. पर्वत. ९. वज्रापासून उत्पन्न झालेला. १०. टिकाव. ११. मंदरपर्वतासारखा. १२. वीर नांवाच्या रसास. १३. वणवा. १४. अरण्यात. १५. रोगास. १६. नेहमी दिवसा झोंपेप्रमाणे. (दिवसा झोंप घेतल्यानें रोग वाढतो). १७. शस्त्ररूप सुपास. १८. मेघ नाहीत असे. १९. पाप.

मोही प्रमोहनास्त्रें[1] पांचाळ न लावितां हि घटिकेतें,
पहिलें व्यसनिधन तसें त्वच्छंदनदेहभान न टिके तें. २४
स्वभ्रात्यांसह केवळ तो पांडुकुमारनगनद[2] भ्रमला,
तद्धृदयाहुनि गमलें साभ्रामारात्रिगगन[3] दभ्र[4] मला. २५
हाहाकार परिसुनि द्रोण, द्रुपदासि शीघ्र भंगूनीं
धावे, जेंवि विनविला कांतारीं[5] करुण अंधपंगूनीं. २६
विनिवारी[6] प्रज्ञास्त्रें[7] गुरु शिष्यज्ञानबळविनाशास्त्र[8],
धन काय? काय तें ही जें स्वजनव्यसन पळविना शास्त्र? २७
त्वत्सुत सावध होउनि धावति पार्षत-वृकोदर दमाया,
प्रकटिति शरवृष्टि तसी असुर सुरांवरि जसी दरद[9] माया. २८
तों धर्म म्हणे ज्यां, 'घ्या भीमाचा, मथुनि अरि, समाचार.'
ते त्यांसि म्हणति, 'दावा शशसम हो! यां न हरिसमां[10] चार[11].'
सौभद्रप्रमुखानीं कुरुसेना, जेंवि वायुनीं तरणी[12],
कीं कामविकारानीं कांपविली कामिनी[13] नवीतरणी. ३०
कैकेयरथीं भीमा स्थापुनि, तुमच्या सुतांसि सोडून,
धावे धृष्टद्युम्न द्रोणावरि, शर गुणासि जोडून. ३१
गांठी प्राण हराया, पात्यातें[14] स्पर्श जों न करि पातें,
त्वत्सुत सांडुनि, गुरुतें, त्यजुनि मृग जसा मृगेंद्र करिपातें[15]. ३२
करितां विरथ विशस्त्र, त्रिदश[16] म्हणति, 'कां न नागविल[17] याला?
न्यावा चि गुरुक्षोभें शिष्य, खगेंद्रें हि नाग[18], विलयाला.' ३३
त्या संकटांत त्यातें दे अभिमन्यू च एक थारा[19], हो!

---

१. मोहनास्त्रानें. २. दुर्योधन–पंत. पांडवरूप पर्वतावरील नद. ३. मेघानीं आच्छादिलेलें अमावास्येच्या रात्रीचें आकाश. ४. लहान ५. अरण्यांत. ६. निवारण करी; ७. ज्ञान देणाऱ्या अस्त्रानें. ८. शिष्यांच्या ज्ञानबलाचा नाश करणारें अस्त्र. ९. भीतिदायक. १०. सिंहासारख्यांस. ११. चेष्टा. १२. नौका. १३. स्त्री. १४. [डोळ्याचे] पात्यास. १५. गजपतीस. १६. देव. १७. सर्वस्वीं बुडवील. १८. साप. १९. आश्रय.

परिसा भीमसुयोधनकृतकलहकथा चि, हे कथा राहो. ३४
गमले भ्राते खातो वाघ चि, वासून वदन, वाघाला;
सर्वस्वनाश जेणें तो याहुनि कोण वद नवा घाला? ३५
अन्योन्य देत होते सुरसे कीं मोह कंप दानवसे,
त्यांत प्रीति, ब्रह्मघ्नांत[1] जसी तिळ हि संपदा न वसे. ३६
सौभद्रादिरथांच्या न सहाति त्वत्तनूज पळ वेगा,
पळतां मागें लागे भीम, मग पद हि तयां न पळवे, गा! ३७
देते जाले वीर सुभद्राकृष्णाकुमार मारा ज्या
त्या पाहुनि 'असावे ऐसे[2]' म्हणत्या उमा-रमा राज्या! ३८
वातें घनसा, अर्जुनशरनिकरें विसकटे कटकबंध[3],
जाणों सन्मरणमहालाभें बहु नाचले भटकबंध[4]. ३९
अर्जुन तुमच्या खपवी, असुरांच्या जेंवि शक्र, सैन्यातें:
त्यांच्या भीष्म बळा दे, देवांच्या जेंवि वृत्र[6], दैन्यातें. ४०
धावे दिनावसानीं धरुनि मनीं भीममथनकामातें[7],
जो मानी[8] म्हणतो, 'यमपुरपथ हित, सामपथ नका मातें*.' ४१
भीम म्हणे, "ये मंदा! तुज मीं मारीन भारतापसदा[9]!
खळजनकें पावावा वाहुनि गुरुशोकभारताप सदा. ४२
जरि न पळसील मारिन आतां तुज, शत्रु तूं, न भाउ, खळा!
'उखळा धर्मासि' म्हणसि, तरि म्हणसिल बालिशा! 'नभा उखळा[10].'
तुज वांचवील विधि[11] हि न, वर द्याया जरि हि तप नव रचील,
किति लोकप[12] शनि कवि गुरु बुध मंगळ चंद्र तपन[13] वरचील[14]?
वपु[15] न बहुत पोषावें, यश चि, सदा, खाय ज्या न कीनाश[16],

१. ब्राह्मणवध करणारात. २. असे पुत्र असावे. ३. सैन्यरचना. ४. वीराची धडें. ५. सैन्यास. ६. वृत्रासुर. ७. भीमवधाच्या, इच्छेस. ८. दुराग्रही, हट्टी. ९. भरतवंशजांतील नीचा! १०. उपटून टाका. ११. ब्रह्मदेव. १२. लोकपाल. १३. सूर्य. १४. वरकड. १५. शरीर. १६. यम. * नं कामातें (?).

बुध होउं दे प्रतिज्ञानाश न, अज[1] जेंवि जानकीनाश." ४५
ऐसें आधीं मर्मीं ताडी अतितापजनकवचनाहीं,
मग इषुहीं, ज्यां न फुटे.ऐसें कोठें हि घन[2] कवच नाहीं. ४६
चाप[3] छत्र ध्वज रथ खंडी, मारी तुरंग[4] सूत[5] रणीं,
पाहों हि न दे, पसरुनि शरकिरणसहस्र[6], भीम भूतरणी[7]. ४७
सुशर शिरोनि शरीरीं.न वसति, जैसे सुविप्र कुग्रामीं,
उग्रा[8] मीं त्या तेजा स्मरलों जें बाणकोटिमुग्रामीं[9]. ४८
पळवी कृप नृपतीतें[10], होय जयद्रथ हि आडवा, राया!
असतां आयु, न हो कां क्षम[11] पळ जलधीस आड[12] वाराया? ४९
म्हणतों बकशत्रुपुढें जाला जयलाभ सिंधुराज्याला[13]
जरि कवि म्हणते मत्ता सिंहपुरस्था[14] हि सिंधुरा[15] 'ज्याला[*].' ५०
परते सुरासुररणादर[16] करुनि दरिद्र[17] शांतनव सांजे,
ते[18] हीं, पावत आले न्हाया षडराति[19] शांत नवसां जे., ५१

---

# अध्याय सातवा.

## (सप्तमदिनयुद्ध.)

भीष्मासि म्हणे राजा, 'व्हावी ऐसी रणांत मंदवस्था[20]?
आला मला सुदुःसह हा ऐसा होय ताप न दैवस्था[21]. १

१. जन्मरहित असा रामचंद्र. २. दाट, अभेद्य. ३. धनुष्य. ४. घोडे. ५. सारथि. ६. बाणरूप किरणाचे सहस्र. ७. पृथ्वीवरील सूर्य. ८. दारुणा; भयकरा. ९. कोटिशः बाण सोडणाऱ्या रामचंद्राच्या ठायीं. १०. दुर्योधनास. ११. समर्थ. १२. विहीर, कूप. १३. जयद्रथास. १४. सिंहापुढें असलेल्या. १५. हत्तीस. १६. देवदैत्याचा युद्धाविषयीं उत्साह. १७. भिकारी. (नष्टप्राय). १८. कृष्ण२–पंत. (पार्थाच्या समासांत 'कृष्णार्जुन' अशीं चार अक्षरें मावणें शक्य न झाल्यामुळे 'कृष्ण २' असें लिहिलें आहे). १९. कामक्रोधादि सहा वैरी. २०. माझी दशा. २१. वणव्यांत सांपडलेल्यास. *जीवंत राहिला.

शिरला भीम व्यूहीं जेंवि अजकुळांत[1] लांडगा शिरतो,
दैवें चि रक्षिलें मज, कापित होता चि दांडगा शिर तो. २
या तुमच्या पाखाव्या दुर्बळसेनांसमान वध सेना,
हे जाल्या, कां स्वर्गी, जोडुनि एनांस[2], मानव धसेना? ३
साधाल चि लीलेनें कार्य, तुम्हीं घ्याल जरि मनावर तें,
आवरिलें अंतररिपुबळ[3] बाह्य कसें तुम्हां अनावर तें?' ४
भीष्म म्हणे, "हा! वेड्या! मंदें चि रणांत आंग राखावें,
घ्यावें अपयश, टाकुनि यश, अमृत त्यजुनि कां गरा[4] खावें? ५
धर्मासि कोण जिंकिल? अनुकूळ तपोब्धि[5] विप्र सर्व तया;
हे जरि सहाय असते, हांसुनि म्हणते हरीस[6] पर्वत 'या.' ६
या वृद्धें तुजपाशीं बा! शतदा मारिल्या चि हाका या,
किंबहुना त्यजिल यथाशक्ति भिडोनि त्वदर्थ हा काया."[7] ७
बोलें ऐसें, लावूं न शके कोणीं हि दोष धीरा ज्या,
राज्यासि विशल्य[8] करी देवुनि इलुसी[9] च ओषधी, राज्या! ८
सप्तमदिवसीं व्यूह त्वत्तातें मंडलाह्व[10] नव रचिला,
आठविलें भवदंघ्रा[11], मग गुणदोषा मनांत न वरचिला[12]. ९
धर्मे रचिला 'वज्रव्यूह' विदारावया अरिनगांतें[13],
मग तुमुल युद्ध जालें देवा! जें श्रुत तुला करिन गा! तें. १०
आलीं युद्धें शतशः सर्वप्रेक्षकमनोहरें सरसें,
होय रणांगण रक्तोत्पळवनाचित[14]पद्मरागभूसरसें. ११

---

१. बोकडाच्या समुदायात. २. पातकास. ३. आंतील (शरीरातील कामक्रोधादि) शत्रूचें सैन्य. ४. विषास. ५. तपाचे सागर. ६. इंद्रास. ७. मूळांत द्विरावृत्त झालेली ही आर्या कवीनें हरताळली आहे. ८. बाणरहित करी. (शरीरातील बाण काढी). ९. थोडीशी. १०. मंडल नांवाचा. ११. तुझ्या अग्रास. १२. वरकड, इतर. १३. शत्रुरूप पर्वतास. १४. रक्तकमलवनानीं व्यापिलेल्या पद्मराग-(रक्तमाणिक्य)-भूमीवरील सरोवरासारखें.

करिति त्रिगर्त[1]पतिभट शरपटलें केतुसह रथा पिहितें[2],
तें यद्यपि परम अहित मानी श्रीकृष्णसख तथापि हित. १२
उडवी शरपटलासह पार्थ सुशर्म्या त्रिगर्तपातें[3], जी
होय अवस्था त्याची ती, अंधा राश्रिगर्तपातें[4] जी ! १३
शरपटलांतूनि निघे घनपटलांतूनि अर्यमा[5] साच,
रिपु[6]वाहिनींत तरतां भासे तो वीरवर्य मासा च. १४
पळतां म्हणे सुशर्मप्रमुख नृपांला सुयोधन, 'रहा रे!
कां भ्यालां? रे! हारे सुर हि, न केवळ सुयोध नर हारे[7]. १५
उठला धनंजयावरि भीष्म, पहा, व्हा सहाय, या, परता;
लेश हि पलायनरता न सुख असे किमपि अन्यपापरता.' १६
या दुर्योधनवचनें धीर धरुनि परतले सकल शस्त्री,
नव्हती च भेटली परि त्यांला गृह सोडितां सकलश[8] स्त्री. १७
उठतां कुरुवीरांचे लागों देती जना न थांक[9] थवे,
जालें युद्ध तुमुळ तें आठवितां मज न ती कथा कथवे. १८
करितिल विराटकुरुगुरुसम तरुण हि इतर न कलहा निकरें,
सोडित होते शस्त्रें अन्योन्यवधार्थ सकलहानिकरें[10]. १९
होउनि विरथ सुतरथीं बैसुनि सात्मज[11] विराट युद्ध करी,
जोडी सुतशोक[12], न जय, भी हरिला जेंवि अप्रबुद्ध करी. २०
विकळ करि शिखंडीतें गुरुसुत, खगपति[13] जसा महाभुजगा[14],
स्वरथीं घेउनि रक्षी त्यासि[15] रणीं सात्यकी महाभुज, गा! २१
घाली गांठि अलंबुषराक्षस जो वीर्यमत्त मायावी,

---

१. सुशर्म्याचे वीर. २. आच्छादित. ३. त्रिगतदेशाच्या राजास. ४. खळग्यांत पडल्यानें. ५. सूर्य. ६. शत्रुसेनारूप नदीत. ७. पराभव पावतो., ८. घागरीसहित अशी. ( कार्योद्देशानें घरातून बाहेर पडतांना पाण्यानें भरलेली घागर घेऊन जात असलेली स्त्री दृष्टीस पडणें हा शुभशकुन समजतात ). ९. थांग. १०. सर्वनाश करणारी. ११. पुत्रासह. १२. पुत्रमरणशोक. ( विराटपुत्रास द्रोणानें मारिलें ). १३. गरुड. १४. मोठ्या सापास. १५. शिखंडीस.

कीं कीर्ति आपणा, अपकीर्ति तया वृष्णिसत्तमा[1], यावी. २२
चाप छेदी, भेदी मर्मीं, निर्मी घडींत शतमाया,
शैनेय म्हणे, 'भीतिल भगवद्रविदा*सकिरण[2] न तमा या.'[3] २३
विजयाप्तेंद्रास्त्रा[4] त्या शकल्या बहु बलवती हि न दमाया.
जेंवि गुहाचें[5] रामा[6] नमिति तयाचें दुरूनि पद मायाँ[7]. २४
शरतति[8] गमे पसरिली झांकाया पापयातु[9] पासोडी,
सुर म्हणति, 'पळों देतां कैसा हा वह्नि या तुपा सोडी?' २५
साहेल काय वाटे जो तो मर्मीं शिरोनि शर भाला?
धाकें पळे अलंबुष जैसा भ्याला मृगारि[10] शरभाला. २६
धृष्टद्युम्न तुमच्या विरथ करुनि नुरविलें चि बळ लेंकीं,
'चाहे रथीं शकुनि असिमात्रसहाया[11] नृपासि कळलें कीं. २७
कृतवर्मा हि पळविला विरथ करुनि परमभीरु पामरसा[12],
भीमा भी कौरवबळ बहु, जैसें पाप रामनामरसा. २८
नागीपुत्र[13] इरावान् सत्कीर्तिसरस्वतीसदरविंद[14],
तेणें नृपा! पळविला अनुविंद जसा तसा संदर[15] विंद. २९
भगदत्तें हि घटोत्कच विरथ करुनि संगरीं पळविला, हो!
शक्रें प्रताप असुरां जेंवि तसा पांडवां कळविला, हो! ३०
पीडी भाच्यांसि रणीं, दावी बहु मद्रपाळ[16] कौशल्य;

---

१. यादवश्रेष्ठ सात्यकीस. २. भगवद्रूप मर्यभक्ताचे किरण. ३. या ठिकाणचा खोडलेला पाठ–**हांसोनि म्हणे सात्यकि, 'भीतिल हरिसूर्यकिरण न तमा या.'** * पाठांतर–**दास**. ४. अर्जुनापासून प्राप्त झालेल्या इंद्रास्त्रास. ५. कार्तिकस्वामीचें. ६. स्त्रिया. ७. [ अलंबुषाच्या ] माया. ८. बाणपंक्ति. ९. पातकी राक्षस. १०. सिंह. ११. फक्त तरवार आहे सहाय्य ज्याला. १२. नीचाप्रमाणे. १३. 'नागकन्या उलूपीस अर्जुनापासून झालेला पुत्र. १४. सत्कीर्तिरूप सरस्वतीचें [ निवासस्थानभूत असें ] उत्तम कमल. १५. भयग्रस्त. १६. शल्य.

मुनि वदले, 'मा मैवं पीडय पापाय बालकौ, शल्य[1]!' ३१
सहदेव विरथ होउनि नकुळरथावरि चढोनि कोपानें
शल्यासि करी मूर्छित वक्ष विदारूनि तीव्ररोपानें[2]. ३२
धर्में श्रुतायुराजा शरभें मृगराजसा चि कांपविला,
सत्तेज[3] चि अति दुःसह ऐसें म्हणतील तज्ज्ञ कां पविला[4]? ३३
कृप चेकितान होउनि विरथ परस्पर धरूनियां असितें,
पडले मूर्छित उठले निजशत्रुमुखें करावया असितें[5]. ३४
वर्णिति जसें कृपाचें सामर्थ्य तसें चि चेकितानाचें[6],
प्रेक्षकमन तँद्भटता युद्धें हरि, जेंवि केकिता[8] नाचें. ३५
कृप काढिला शकुनिनें, करकर्षें चेकितान[9] लॅवलाहें[10],
पाहे हा त्वद्दास व्यासपदाब्जद्वयास लॅवला[11] हें. ३६
त्वत्पुत्र विकर्ण, दुजा दुर्मर्षण, चित्रसेन तिसरा, हे
वधितां, उगा चि अर्जुनसुत भीमा करुनियां नतिस[12] राहे. ३७
पार्थ म्हणे, 'देवा! त्वां केलें जें रक्षणा इभाच्या[13] तें
धावन करूनि रक्षीं भीष्मापासूनि आजि भाच्यातें. ३८
भीष्म ग्रीष्मतरणिसा[14] दुःसह, अतरुण हि बाँढ[15] कलहातें;
धरितिल हय[16] भय जरि तरि मम रथ तँद्वाभिमुख[17] वा! ढकल ह्रातें.'
स्वप्नीं हि नसे ठावी शत्रुपुढें विमुख[18] चाल वीरा ज्या,
त्यासि 'अवश्य' म्हणे प्रभु, रथ भीष्माभिमुख चालवी, राज्या!
तेव्हां युधिष्ठिरादिक झाले सर्व हि सहाय जिष्णूस,
जेंवि स्वशत्रुशमनीं शतमखमुख[19] सुर समस्त विष्णूस. ४१

---

१. हे शल्या! बालकास (नकुलसहदेवास) अशी पीडा करू नको; या गोष्टीनें तुला पाप लागेल. २. तीक्ष्ण बाणानें. ३. साधूने तेज. ४. वज्रास. ५. काळीं. ६. हा एक पांडवपक्षीय यादव. ७. त्या वीरांचा समुदाय. ८. मोरांचा समुदाय. ९. दूर नेला. १०. त्वरित. ११. नम्र झालेला. १२. नमस्कारास. १३. गजेंद्राच्या. १४. ग्रीष्मऋतूतील [प्रखर] सूर्यासारखा. १५. अत्यंत. १६. घोडे. १७. त्या भीष्मासमोर. १८. पराङ्मुख. १९. इंद्रप्रमुख.

सानुज[1] सुयोधन जपे वीरवरांसह पितामहा[2] मात्र,
प्रावृण्नदांत[3] तरतां जेंवि गजा निजहिता महामात्र[4]. ४२
ज्याचा प्रताप अहितां[5] वज्रधराचा[6] जसा नगां[7] ठावा,
करुनि त्रिगर्तकटकक्षय विजयें भीष्म कां न गांठावा? ४३
क्रोधें धावुनि आतां सद्गुणमणिसुखनि[8] शांतनवदमना
धर्म म्हणे, 'व्याळाश्रय[9] जालें त्या सुखनिशांत[10] न वद,' मना. ४४
युद्धीं शक्रावन[11] जें करिति यम-वरुण-मनुष्यधर्मा[12] तें
दाविति भीम-नकुळ-सहदेव धरुनि वरधनुष्य धर्मातें. ४५
करिती कलह जयद्रथ-दुर्योधन पांडवांसवें निकरें,
भीष्म हि शिलीमुखांच्या[13] रवभीषितससुरवासवें[14] निकरें. ४६
यत्न न चाले लेश हि म्हणुनि युधिष्ठिर म्हणे शिखंडीतें,
'वीरा! तुवां करावें भीष्मीं, नागीं[15] करी शिखंडी[16], तें.' ४७
धर्मप्रहित[17] शिखंडी शल्याग्न्यस्त्रास[18] वारुणें[19] शमवी,
धर्मध्वजधनु[20] खंडुनि देवव्रत देवदृष्टिला रमवी. ४८
मारुति[21] जयद्रथाच्या स्वगदेनें सर्व घोटकां[22] मारी,
बहु उग्र गमे घेता गरळाचा जेंवि घोट कामारी[23]. ४९
पाहों न शकति डोळे त्या भीमाच्या गदेसि देवांचे,
त्वत्पुत्र चित्रसेन स्वस्यंदनरत्न[24] तीस दे, वांचे. ५०
पळवी बंधु विकर्ण स्वरथीं वाहोनि चित्रसेनातें,
जाल्या चित्रसम क्षण तेव्हां पाहोनि चित्र[25] सेना तें. ५१

१. धाकट्या भावासह. २. भीष्मास. ३. वर्षाकाळच्या नदीत. ४. महात. ५. शत्रूंना. ६. इंद्राचा. ७. पर्वतांला. ८. सद्गुणरूपरत्नांची उत्तम खाण. ( अर्जुन ). ९. सापास आश्रयभूत असें. १०. घर—पंत. सुखाचें घर. ११. इंद्राचें संरक्षण. १२. कुबेर. १३. बाणांच्या. १४. ध्वनीनें भिवविला आहे देवांसह इंद्र ज्यानें अशा ( बाणसमूहानें ). १५. सापाच्या ठायीं. १६. मोर. १७. धर्मानें पाठविलेला. १८. शल्याच्या अग्न्यस्त्रास. १९. पर्जन्यास्त्रानें. २०. धर्माचा ध्वज व धनुष्य. २१. भीम. २२. घोड्यांस. २३. शंकर. २४. आपलें रथरूप रत्न. २५. आश्चर्य.

तों धर्मावर धावे गांगेय, जसा त्रिलोचन[1] रविवर,
ज्याचें[2] सहस्रनयन[3] न पाहे, पाहेल काय नर विवर[4]? ५२
जाले धर्मशर नदीजशरांच्या साहते न वेगा ते,
टिकले न सुरर्षिपुढें[5] जैसे मंदवाहते[6] नवे गाते[7]. ५३
होउनि विरथ युधिष्ठिर, नकुळरथावरि चढे, असुख पावे,
माद्रेयांसि म्हणे, 'हूं; ह्या वृद्धाचे रणीं असु, खपावे.' ५४
भंगी धर्माज्ञप्तनृपशतशरांचें[8] नदीसुत पटळ तें,
हें किति? न त्यास[9] त्याचें काळासीं भिडवितां सुतप टळतें.
तो ताळफळनिकरसा[10] पाडी कौंतेयभटशिरोनिकर[11];
नुरवी अहितबळ[12], जलधिजळ घटजाचा[13] असा शिरोनि कर.
गांठुनि म्हणे शिखंडी जरि असकृत्[14] 'तिष्ठ[15] तिष्ठ,' पाहेना
स्त्रीपूर्व म्हणुनि रंभाभिमुख शुकमुनींद्रसा चि राहेना. ५७
करुनि अनादर त्याचा शिरला पांचाळवीरलक्षांत,
कक्षांत[16] दावपावक[17] किंवा श्रीराम जेंवि रक्षांत[18]. ५८
ऐसा पाहोनि परमनिरुपम संग्राम सातव्या दिवसीं,
जालीं महेंद्रनयनें, अहिपतिनयनें हि ऐकतां हिवसीं[19]. ५९

---

१. शिव. २. ज्या भीष्माचे. ३. इंद्र. ४. छिद्र. ५. नारदापुढें. ६. गर्व वाहणारे. ७. गायक. ८. धर्मानें आज्ञापिलेल्या शेकडों राजाच्या बाणाचें. ९. अन्वयार्थ–त्यास (भीष्मास) काळासीं (यमाशीं) भिडवितां त्याचें सुतप न टळतें (न रहातें). १०. ताडाच्या फळाच्या समुदायासारखा. ११. पांडववीराच्या मस्तकाचा ढीग. १२. शत्रुसैन्य. १३. अगस्तिऋषीचा. १४. पुनःपुनः. १५. उभा रहा, उभा रहा. १६. गवतात. १७. वणवा. १८. राक्षसांत. १९. शीतल, थंड.

# अध्याय आठवा.

( अष्टमदिनयुद्ध ).

अष्टम दिवसीं राया! प्रकुपित[1] खगमृगवरासम[2] रयज्ञ[3],
कौरवपांडवसैनिक करिते जाले बरा समरयज्ञ. १
करिती युधिष्ठिराच्या ज्या ज्या गर्जोनि वाहिनी[4] दाटी,
त्यांसि अमितप्रताप श्रीभीष्म ग्रीष्मकाळसा आटी. २
भीष्मभयभग्न जाले बहु भट, टिकला वृकोदर चि, राया!
व्याघ्र कसा व्याघ्रोदर चिरिल? क्षम तो वृकोदर[5] चिराया. ३
चुटकींत चि नाराचें[6] सूतशिर[7] वृकोदरें उडविलें हो!
तों भीष्मयश हयानीं स्वैरग[8] होवूनियां बुडविलें, हो! ४
वधिले सप्त सुत नृपा! रडवाया बहु तुज्या सुना भवनीं,
होय प्रथम वृकोदरशर दव[9] भवदंगभवसुनाभ[10]वनीं. ५
साश्रु सशोक सुयोधन ऐसें वदला पितामहापासीं,
'अजि! शक्ति असोनि पडों देइल संतति पिता महापाशीं? ६
मारूं दिलीं कसीं हो! भीमास रणांत आठ नातुंडें?
काय तुम्हांसि म्हणावें? करितां नयपठन[11]पाठना तुंडें!' ७
हांसुनि भीष्म म्हणे, 'हित कथिलें पहिलें चि, आयकाना तें;
सांगा जालें तुमच्या तेव्हां आतां हि काय कानातें? ८
सत्यप्रतिज्ञ दुर्जय तक्षक[12]सा भीमसेन कोपन[13], हो!
हो कोप ईश्वराचा[14], याचा कोण्हावरी हि कोप न हो. ९

१. रागावलेले. २. खगश्रेष्ठ ( गरुड ) व मृगश्रेष्ठ ( सिंह ) यामारखे. ३. वेग जाणणारे. ४. सेना. ५. लांडग्याचें पोट. ६. बाणानें. ७. सारथ्याचें मस्तक. ८. स्वच्छंदगामी. ९. वणवा. १०. तुझ्या अंगापासून उत्पन्न झालेला सुनाभ हें च कोणी वन, त्यांत. ११. नीतिशास्त्राचे अध्ययन व अध्यापन. १२. सापासारखा. १३. रागीट. १४. शंकराचा.

कोणें विनिवारावा बळशाली भीम युष्मदंतकर[1]?
बा! यासि तक्षकाचे गुरु म्हणवुनि जोडितील दंत कर. १०
होय न जातां दीपावरि कोण्ही ही पतंग जयशाला[2],
बा! पावले कधीं तरि हारेसीं झगडुनि मतंगज यशाला? ११
चुकलासि प्रथम चि तूं, आतां होईल काय हाकाहीं?
आम्हांला तों नाहीं राखायाचा स्वकाय हा कांहीं. १२
आतां निपटुनि[3] राज्यस्त्रीजीवितपुत्रकामना सोडा,
जोडा स्वर्ग, स्वर्गाहूनि निपट[4] लाभ भूमिचा थोडा.' १३
ऐसें सुयोधनासीं वदतां, गंगासुतास माराया
ये धर्मचमू, भासे क्षुब्धाब्धीच्या[5] उतासमा, राया! १४
जाली मारामारी तेव्हां आम्हांत त्यांत देवा[6]! जी
पाहुनि तीस तरणिचा एक हि पावुल पुढें न दे वाजी[7]. १५
अर्जुनपुत्र इरावान् बहु कुरुवीरांचिया यशांसि हरी,
मारी शकुनिसुतांतें लीलामात्रें जसा शशांसि हरी. १६
त्यातें बहु मायावी नक्तंचर[8] आर्ष्यशृंगि तो खपवी,
दुर्योधनासि दे अरिमथनें, शक्रासि जेंवि तोख पवी. १७
गर्जे कुपित घटोत्कच, भिववी आम्हांसि मूर्त अंतकसा,
त्यासीं सुयोधन भिडे, सेनेचा साहवेल अंत कसा? १८
मथन करुनि बहुतांचें विकळ करी फार तो पलाश मन;
वाटे राक्षसरूपें सर्वांवरि आजि कोपला शमन[10]. १९
तों द्रोणासह धावे भीष्म कराया सुयोधनावन[11], हो!
लोकीं म्हणेल कोण स्वामित्राणें सुयोध नाव न हो? २०
गगनीं शिरोनि गर्जे सर्वांस हि दाखवून हात रणीं,

---

१. तुमचा नाश करणारा. २. मंदिर—पंत. जयाचें स्थान. ३. झाडून सर्व. ४. अगदीं. ५. खवळलेल्या समुद्राच्या. ६. धृतराष्ट्रा! ७. आमचें युद्ध पाहून सूर्याचे हि घोडे चालेनासे झाले. ८. राक्षस. ९. मांसभक्षक–राक्षस. १०. यम. ११. दुर्योधनाचें रक्षण.

वाटे पाडितसे शर न कराया राख वून हा तरणी. २१
धर्म म्हणे भीमाला दूरुनि त्या आयकोनि आरावा,
वीरा ! वत्स घटोत्कच तारावा, शत्रुनीं न मारावा.' २२
सौभद्रादि सुतांसह धांवे तो भीम भूतनायकसा,
सिंहग्रस्त हरिणसे कौरव म्हणती, 'विचार काय कसा?'
तेव्हां नृपा ! सुयोधन रोधी भीमा, जसा उरग उरगा,
किंवा व्याघ्र व्याघ्रा, भेदी प्रखरें शिलीमुखें उर, गा ! २४
अवलंबुनि ध्वजातें भीम क्षणमात्र वेदना साहे;
नसतां धृति प्रतिष्ठा कैंची? म्हणतात वेद, 'नासा हे.' २५
त्या भीमावस्थेतें पाहोनि घटोत्कचादि जे सुत ते
कोपावेशें जाले कल्पांतींचे समुद्रसे उतते. २६
'सर्वांसि द्रोण म्हणे, 'भूपें बहु भीमसेन कोपविला,
बहु यत्न यासि अरिच्या मथनीं गिरिच्या जसा नको पविला.
तावील भीम विक्रम आजि रणामाजि रामरायाचा,
रक्षावा स्वपति, समय आम्हां हा साजिरा मरायाचा.' २८
ऐसे सिद्ध करुनि सुत-कृप-शल्य-जयद्रथादि बा ! राया !
गुरु होय पुढें साक्षाद्दुर्योधनकाळ भीम वाराया. २९
भीम गतव्यथ होउनि धांवे, तों द्रोण बाणवृष्टि करी,
साहे तो तीस जलदवृष्टीस जसा मदांधदृष्टि करी. ३०
भीम गुरूरीं शरतति व्हाया वीरांत नव्य यश हाणी,
मूर्छित करी, न होवूं दे ती तज्जीवनव्यय शहाणी. ३१
द्रौणि-सुयोधन उठले माराया आपणा, असें पाहे,
वाहे गदा, त्यजुनि रथ राहे निर्भय उभा पुढें, बाहे. ३२

---

१. ध्वनीस, शब्दास. २. शकरासारखा. ३. साप. ४. नाक. (मुख्य तत्व). ५. दुर्योधनानें. ६. दुर्योधन. ७. गेली आहे वेदना ज्याची असा. ८. मदानें अंध झाली आहे दृष्टि ज्याची असा (हत्ती). ९. द्रोणाच्या हृदयांत. १०. बाणपंक्ति. ११. नवीन. १२. त्याचे (द्रोणाचे) प्राणांचा नाश.

जळ जलद जसा वर्षे, शस्त्रें द्रोणादि वीर सर्व तसा,
त्यातें साहत होता सत्वांचा[1] सिंधु पार्थ पर्वतसा. ३३
तेव्हां फार खवळले सौभद्र द्रौपदेय हे, राया!
समर असो चि, न शकलों आम्हीं त्यांतें मुहूर्त हेराया. ३४
भीमसखें नीळनृपें, जैसा शक्रें स्वशत्रु नमुचि[2] तसा
गुरुसुत गांठुनि केला कलह हि होय प्रकार संमुचित[3]सा. ३५
गुरुपुत्र शरें भेदी जन्हि नीलें[4]नृपोर अश्मलक्षण[5], हो!
करुनि अचेतन पाडी, त्या धैर्यनिधीस कश्मल[6] क्षण हो. ३६
धावे मार्कंडेयाप्रति जैसा काय कोपला शमनः
तैसा गुरुपुत्राप्रति विकळ करायासि तो पलाश[7] मन. ३७
भस्म चि करी घटोत्कच कटकीं हाणूनियां परा शर, हो!
गुरुपुत्र म्हणे, 'बहुधा या कर्में बहु सुखी पराशर हो.' ३८
दुर्जय जाणुनि योजी मोहाया गुरुसुतास मायेतें,
मोहायाचें तांडव ज्यों[10] गरळाच्या उतासमा येतें. ३९
द्रोण द्रौणि सुयोधन शल्य असे मुख्य जे बळामधिले,
ते पाहिले बळानीं प्रत्यक्ष घटोत्कचें रणीं वधिले. ४०
भ्यालीं सकळें हि बळें, तडक पळालीं, न राहिलीं पळ तीं;
नगशिखरस्खलें[11]दुपळांसम राया! भ्यां चि पाहिलीं पळतीं.
हाका मारित होतों मीं कीं हे राक्षसीतनय[12]माया,

---

१. धैर्यगाभीर्यादि गुणाचा. २ या नावाचा दैत्य. ३. फार योग्य असा. ४. नीलराजाचें हृदय. ५. दगडासारखें कठिण. ६. मूर्छा. ७. राक्षस. (घटोत्कच). ८. रक्षोविनाशरूपें-**पंत.** ९. आपल्या पित्याम-शक्तिमुनीस-राक्षसानीं मारिल्यावरून वसिष्ठपौत्र पराशराने राक्षससत्र केलें होतें. १०. घटोत्कचास. ११. पर्वताच्या शिखरावरून पडलेल्या धोंड्यासारखीं. १२. राक्षसीच्या (हिडिंबेच्या) पुत्राची (घटोत्कचाची) माया (कपटकृति).

न यमा या कर्में वश व्हा, टोंचें[1] कांड[2] हा अनय मा[3]या. ४२
भीष्म हि ऐसें च म्हणे, परि जोडी एक ही न भटप[4] कर,
'आम्हां अवश्य' म्हणतें जन्हि केवळ शून्य ही नभ टपकर. ४३
माज्या भीष्माच्या ही कोणी ही जन न वारणा परिसे,
जयहर्षें सघटोत्कच पांडवभट सर्व गर्जले हरिसे. ४४
सांगों काय परिभवें नृप[5] भीष्माजवळ जें चरफडे तें?
वाटे अहिच्या गेला लावुनि रद[6] दिव्यखेचर[7] फडेतें. ४५
देउनि उत्साहातें भगदत्ता शत्रुजनयमा[8] राया!
सेनापति शांतनव प्रेषी तो भीमतनय माराया. ४६
त्या भगदत्तनृपासीं प्रथम तुमुल सुचिर समर भीम करी,
भंगी दशार्णपतिच्या प्रबळा हि गजा तदीय भीमकरी[9]. ४७
नागें[10] मथावे त्या भगदत्ताच्या अन्य कां न नागानें?
व्हावें चि जिंकुनि इतर अग[11] हरिच्या[12] धन्य काननागानें[13]. ४८
पाहुनि भगदत्तशरद्विपमर्दितसैन्यदैन्य[14] नयनाहीं
धांवे घटोत्कच, जया मरणापासूनि लेश भय नाहीं. ४९
भगदत्तासीं भांडे शक्रासीं मेघनादसा[15] राया!
किंवा प्रवर्तला त्या द्वैता अद्वैतवाद साराया. ५०
किंबहुना, भगदत्तें अत्युग्रा शक्ति सोडिली होती,
गगनांत उडोनि, धरुनि इक्षुपरि[16] स्पष्ट मोडिली हो! ती. ५१
तों 'साधु! साधु!' ऐसें वदले सुर-नर म्हणोनि तो खवळे.
अहितांकडे[17] दुखविला दर्वीकरसा[18] धरूनि रोख वळे. ५२
सौभद्रप्रमुखांतें ताडी, मूर्छित करी विशोकास,"

१. लहान. २. ब्रह्मांड. ३. मावण्यास. ४. वीरश्रेष्ठ. ५. दुर्योधन. ६. दात. ७. गरुड–**पंत.** ८. शत्रुजनास यमासारख्या. ९. भयकर हत्ती १०. हर्त्ता. ११. वृक्ष–**पंत.** १२. इंद्राच्या. १३. कल्पवृक्षानें–**पंत.** नंदनवनातील वृक्षाने. १४. भगदत्ताच्या बाणांनी व हत्तीनी मारलेल्या सैन्याचे दैन्य. १५. इंद्रजिताप्रमाणें. १६. रसासारखी. १७. शत्रूकडे. १८. सापासारख्या.

विरथ करूनि म्हणे, 'रे! बळकट बांधीं पृथाशिशो! कास.'
वरिचेवरि झेलुनि दे गुरुच्या जो भीमसेन सुख निगदा[1]
शीघ्र रथावरुनि उडी टाकी कवळूनि शक्तिसुखनि[2] गदा. ५४
झाली बहु इतुक्यांत चि येतां देखोनि कृष्णसारथितें[3],
न सुचे पळणें, पाहुनि हरि विसरति जेंवि कृष्णसार थितें[4]. ५५
प्रथम इरावन्मरण भ्रात्याला[5] भीमसेन आयकवी,
सुतशोक[6] वसिष्ठास हि दुःसह, न म्हणेल कोण 'हाय!' कवी?
सुतशोकज्वलनाची प्रथम चि हृदयासि लागली आहे,
पार्थ म्हणे, 'देवा! हे गरलगुरुगृहांत वागली आहे. ५७
गमला हित ओगरिता कांजी मधु सूद नाकपाळाला,
अर्थ तसा, आलें हें कां जी! मधुसूदना! कपाळाला? ५८
धिक् क्षत्रवृत्तितें! मज युद्ध न करितां अशक्त म्हणतिल कीं,
हाक हरी[10] येवूं दे अरिदारांच्या[11] अनित्यपण तिलकीं.' ५९
गरुडाहुनि पार्थाचा बहुत पळवि लोकनाथ रथ, राया!
लागे भयें कुरूंचें करुनि बळ विलोकना थरथराया[12]. ६०
कृप भगदत्त सुशर्मा देवव्रत विजयवाहवेगातें[13]
रोधिति, परि त्यांचें बळ निजरक्तनदींत वाहवे, गा! तें. ६१
द्रोणासह पुत्र तुझे भीमावरि धावले मथायाला,
व्यूढोरस्कादिक नव मेले, मन कांपतें कथायाला. ६२
गुरुतें वारुनि नेले एकैक शरें चि ते नव[14] लयातें,
भीमसेम[15] भीमविक्रमः हा किति? मानू नको नवल यातें. ६३

---

१. भाषणाला. २ शक्तीची उत्तम खाण. ३. अर्जुनास. ४. काळवीट. ५. अर्जुनास. ६. वसिष्ठाचे शंभर पुत्र कल्माषपादराजानें भक्षिल्यामुळें वसिष्ठास फार दुःख झालें, ही कथा येथें अनुसंधेय आहे. ७. ज्वाला. ८. स्वयपाकी. ९. इंद्रास. १०. घोडे. ११. शत्रुस्त्रियांच्या. १२. कापाया. १३. अर्जुनाच्या घोड्याच्या वेगास. १४. व्यूढोरस्कादि नऊ पुत्र. १५. भीमाचा पराक्रम शंकरासारखा [आहे].

आला अंबष्ठ[१] विरथ अतिरथ[२]सौभद्रशस्त्रहृतवर्मा,
त्यासि स्वरथीं वाहुनि पळवी अति संकटांत कृतवर्मा. ६४
भीष्मादिकांसि वारुनि विजय तदस्त्रांसि तत्तदस्त्रानीं
झांकी शरपटलानीं, आढ्य[३] जसा दुर्गतांसि[४] वस्त्रानीं. ६५
बहु मानवले अष्टम दिवसीं जाल्या रणासि सुर सांजे,[५]
वीररसा बहु भुलले सेवित होते तदन्य सुरसां जे. ६६
तात सुता, सुत ताता, भ्राता भ्रात्यास, मित्र मित्रास
मारित होते, राया! होउनि विकरुण[६] विखेद[७] वित्रास. ६७
न दिसे, न कळे स्व-पर, ध्वांत[८] परम गाढ वाढवी रजनी,[९]
केला अवहार[१०] नृपा! होय क्षतताप[११] बाढ[१२] वीरजनीं. ६८

---

## अध्याय नववा.

( नवमदिनयुद्ध. )

राजा[१३] कर्णासि म्हणे, "कृप शल्य द्रोण भीष्म हे आर्य
पांडुसुतांतें रक्षिति, कैसें सिद्धीस पावतें कार्य? १
सांगेल कोण मज तुजवांचुनि या संकटीं उपाय सखा,
मिश्रमति च हित करिती, माय चि म्हणती बळें 'सुपायस[१४] खा.'"
कर्ण म्हणे, 'मीं करितों कार्य तुजें, शक्य हें न अन्यास,
परि भीष्माकरवीं त्वां करवावा आजि शस्त्रसंन्यास.[१५] ३
कीं त्यासि तीर्थयात्रा सांगा, वृद्धांसि ती च उचिता कीं;
रुचि अमृतीं सापडतां, रसिकीं घ्यावी कशास रुचि ताकीं? ४

---

१. एक दुर्योधनपक्षीय राजा. २. अतिरथी अभिमन्यूच्या शस्त्रानें हरण केले आहे कवच ज्याचे असा. ३ श्रीमंत. ४. गरिबास. ५. संध्याकाळी. ६. निर्दय. ७. खेदरहित. ८. अंधकार. ९. रात्र. १०. समारोप. ११. जखमाचा त्रास. १२. पुष्कळ. १३. दुर्योधन. १४. उत्तम खीर. १५. शस्त्रत्याग.

शस्त्रन्यास करावा भीष्में, कीं या बळांत न वसावा,
मग कार्यसिद्धि माझ्या हातीं, नलगे चि देव नवसावा.' ५
हें कर्णमत परमहित ऐसें आलें मनासि राज्याच्या,[1]
शीघ्र रथावरि बैसुनि रात्रौ शिबिरासि जाय आज्याच्या. ६
वंदी पितामहा[2] कुरुप, जयंताचा पिता[3] महादेवा
सर्वज्ञा सन्मान्या वरदा किंवा पितामहा[4] देवा. ७
कर जोडुनि दुर्योधन वदला, "अजि! भरतकुलतिलकराया!
भुलल्या मागें विजयश्रीदृष्टि पुढें हि भुलतिल करा[5] या. ८
आम्हां या पायांचा आश्रय, देवांसि जेंवि शक्राचा,
साक्षात्प्रताप तुमचा, आश्रित शिव जेंवि विष्णुचक्राचा. ९
पांडव कितिं? जिंकावे आम्हीं तुमच्या बळें चि सुर सगळे;
युष्मद्यशासि[6] लाजे विधु[7] ज्यापासूनि अमृत सुरस गळे. १०
परि जय दुर्लभ आम्हां, जाले युद्धासि आठ वासर,[8] हो!
हें नवल, मराळ[9] म्हणे तृड्विकळ[10] शिशूंसि, 'आठवा सर[11] हो!'
ऐसें कां जी! कारितां? शत्रुवधें जोडिलें स्वयश राखा;
खाइल अहितांसि, मनाआंतूनि म्हणा असंशय शरा 'खा.' १२
बहुवीरक्षय जाला, आलें आठां दिसांत न यश मला,
शमले[12] मद्बंधु बहु, न एक हि माद्रीपृथातनय शमला. १३
स्वीकृतकार्य मनावरि घ्या प्रभुजी! पांडुवत्स मारा हो!
कीर्ति जसी रामाची लोकीं तुमची हि तत्समा राहो. १४
जरि माझ्या द्वेषें कीं केवळ मद्भाग्य मंद याकरितां
मदरींतें[13] रक्षितसा कीं सदयपणें तुम्हीं दया करितां, १५
तरि कर्णाला आज्ञा द्या, तो त्या पांडवांसि मारील,

१. दुर्योधनाच्या. २. भीष्म-पंत. ३. इंद्र. ४. ब्रह्मा-पंत. ५. हस्त-पंत. ६. तुमच्या कीर्तीस. ७. चंद्र. ८. दिवस. ९. हंस. १०. तहानेनें पीडिलेला. ११. सरोवर. १२. मरण पावले. १३. माझ्या शत्रूंना.

मारीलक्ष[1] हि न तदिषुंहुनि[2] अधिक प्राणिजात[3] सारील." १६
दुर्योधनोक्त परिसुनि जिरवी शांतनव रोषवेगातें,
जें असहनत्व[4] खळमन[*], पळ ही सुजना न पोषवे गा! तें. १७
भीष्म म्हणे, "रे! राया! लागति वाग्बाण काळजाला कीं!
समरीं श्रम आत्रां[5] ही तुज वदतां फार काळ जाला कीं! १८
वाच्यावाच्य[6] न जाणसि, काय म्हणावें तुला? असो दे हें;
दिधले त्वत्कार्यार्थ स्वप्राण; कबंधसे[7] असो देहें. १९
पर्याप्त[8] तें निदर्शनें[9] मोहुनि सर्वांसि मोहनें[10] अस्त्रें,
वस्त्रें विराटनगरीं हिसकुनि नेलीं न हातिचीं शस्त्रें. २०
पर्याप्त तें निदर्शनें, जगदीश्वर[11] जेंवि नक्रमुक्त करी[12],
पळतां कर्ण, विजय[13] सुरगायकबद्धा[14] तुला विमुक्त करी. २१
कोण तयांतें मारिल ज्यांचें जगदीश परम तो कवच,
जे त्या प्रभुला बहुमत जैसें वृद्धासि चरमतोकवचें[15]. २२
ऊन्हि नारदादि मुनिनीं कथिलें, तूं जाणसी परि न मोहें,
तरि जिंकितासि त्यांतें, धरितासि मनीं, मुखीं जरि 'नमो' हें.
हो पुरुष, वैर केलें तैसें युद्ध स्वयें चि कर, जा, गा!
मामाच्या[16] भावाचा होता, आतां चि कां न कर[17] जागा? २४
आम्हीं करूं, शिखंडी वर्जुनि, पांचाळसोमकांतातें[18],
द्रववूं यशःशशीनें[19] सहृदयजनहृदयसोमकांतातें[20]. २५
पांचाळसोमकांतें भाजीन प्रलयसूर्यसम राज्या!

१. लक्षावधि महामान्या. २. त्याच्या बाणाहून. ३. प्राण्यांचा समूह. ४ असहिष्णुता. ५. समय—**पंत**. ६. बोलावें काय व न बोलावें काय हें. ७. धडासारखे. ८. पूर्ण. ९. उदाहरण. १०. संमोहन-नावाच्या अस्त्राने. ११. परमात्मा. ( कृष्ण ). १२. गजेंद्र. १३. अर्जुन. १४. चित्रसेनगंधर्वानें बांधलेल्या ( तुला ). १५. शेवटच्या मुलाचें (लौकिक भाषेंत, शेंडेफळाचें) भाषण. १६. शकुनिमामाचा. १७. इस्तु—**पंत**. १८. पांचाळ व सोमक यांच्या नाशास. १९. यशोरूप चंद्रानें. २०. सहृदय लोकांच्या हृदयरूप सोमकांतास. * खळमन [ पोथी ].

करिन तसा गातिल कविवर[1] यावच्चंद्रसूर्य समरीं ज्या. २६
वधिन तयां मीं कीं मज वधितिल ते, काय आंग राखावें?
अमृत मिळालें त्यागुनि सुखें दाटूनि कां गरा खावें? २७
भगवदितर[2] सकळ हि जन म्हणतिल, 'तूं धन्य! भीष्मचापलते!'
नीज सुखें, आहें मीं तों करितिल काय, करुनि चापल[3] ते? २८
श्रुत आहे आम्हां जो स्वकरें छेदी स्वमांस शिबिराजा'
निववूं त्वद्दृष्टि उद्यां; श्रमलासि, निजावयास शिबिरा जा." २९
हर्षें अभयोक्त्यर्थी अधन जसा मूर्तकल्पवल्ल्यंकीं,
वंदुनि पितामहातें येउनि शिबिरीं निजे सुपर्ल्यंकीं[6]. ३०
प्रातःकाळीं च उठे राजा, राजांसि शीघ्र आणवुनीं,
'सर्व जपोनि नदीसुत रक्षा' ऐसें तयांसि जाणवुनीं, ३१
दुःशासनासि सांगे, 'मज कळलें इंगितें असें आजी,
शांतनव अर्जुनासीं करिल मनांतूनि निश्चयें आजी. ३२
शल्यकृपद्रोणशकुनिसह सर्व तुम्हीं जपोनि सेनानीं
रक्षा, करिल अरिलय प्रलयतरणिसा तपोनि सेनानी. ३३
कुरुसिंह अरिगजांतें नेतो हाणूनि शरनखपवि लया,
परि काय उगा बसतां क्षुद्रमति शिखंडिवृक[11] न खपविल या?'
असि आज्ञा करुनि निघे नृप, कांपे बहुत[12] मेदिनी, नव मीं
आश्चर्य काय सांगों? विश्वप्रलय चि गमे दिनीं नवमीं. ३५
विजय म्हणे, 'ने धृष्टद्युम्ना! भीष्मापुढें शिखंडीतें
तो[13] हो विगतोत्साह प्रेक्षुनि जैसा फणी[14] शिखंडीतें[15]. ३६
रक्षीन शिखंडीतें, याच्या प्राणांसि किमपि भय नाहीं,
जें कांहीं करिन कुतुक तें देखावें दुरूनि नयनाहीं.' ३७

---

१. चद्रसूर्य आहेत तोंपर्यंत. २. भगवताहून इतर सर्व. ३. चपलपणा. ४. पाडववीर. ५. कल्पलतेच्या माडीवर. ६. चागल्या पलंगावर. ७. युद्ध. ८. प्रलयकालीन सूर्याप्रमाणें. ९. सेनापतिभीष्म.—पंत. १०. बाणरूपी नखें हें च वज्र. ११. शिखडीरूप लांडगा. १२. पृथ्वी. १३. भीष्म. १४. साप. १५. मोरास.

आम्हांपुढें महात्मा भीष्म, वृकोदर तयांपुढें चाले,
जाले उत्पात बहुत तेव्हां चळचळ वसुंधरा हाले. ३८
व्यूह प्रथम चि मथिला अर्जुनपुत्रें, जसा वनद[1] वातें[2],
न शके तया सुयोधनबळ वाराया जसें वन देवातें. ३९
कुरुपति अलंबुषाला अभिमन्युवधार्थ पाठवी, राज्या!
सुजना सुनीति तैशा मांया[3] बहुसाळ पाठ वीरा ज्या. ४०
तो मायावी राक्षस सौभद्रासीं करी महासमर,
त्यजुनि रथ पळुनि जातां त्यासि[4] म्हणति साधु ही सहास[5] 'मर.'
नरलोक हा द्विफाल्गुन[6] ऐसें तेव्हां जनांस वाटविलें,
तें वाहिनीशत[7] विजयपुत्रें ग्रीष्में तसें चि आटविलें. ४२
कोपविला भीष्म नृपा! करुनि बहुत कटकमथन पणतुंडें,
'वेढिति सौभद्रातें कौरव बोलोनि हननपण[8] तुंडें. ४३
कार्ष्णि[9] म्हणे, 'वायुपुढें जरि काय टिकत असेल कोंडा, या
होइल दवासि तृण तरि, व्हाल क्षम मज तुम्ही हि कोंडाया.'
कुरु शस्त्रजाळ पसरिति, अवकाशा न उरवी नभाच्या तें.
विजयासि तेथ आणी प्रभु कीं परिभव घडो न भाच्यातें. ४५
काय कथूं गांठि विजय घाली सहसा पितामहासी तें?
जाले पुढें तई बहु नग्नें करुनि रणहिता महासींतें[10]. ४६
कृप भीष्मप्रमुखस्थित[11] पार्थातें पंचवीस शर हाणी,
करिता जाला ज्याच्या न यशाची करुनि युद्ध हर[12] हाणी. ४७
पार्थप्रियकर सात्यकि तुमुल कृपासीं मुहूर्त समर करी,
अन्योन्यभंगकामुक[13] ते क्रोधमदांध[14] जेंवि अमरकरी[15]. ४८

१. मेघ. २. वणव्यास ३. कपटविद्या. ४. राक्षसासि-पंत. ५ उपहासपूर्वक. ६. दोन आहेत अर्जुन ज्यात असा. ७. सैन्यशन ( पक्षी ) नदीशत. ८. मारण्याविषयींची प्रतिज्ञा. ९. अभिमन्यु. १०. मोठ्या खड्गास. ११. भीष्मादिकाच्यापुढे असलेल्या. १२. शकर. .१३. एकमेकाच्या पराभवाची इच्छा करणारे. १४. क्रोधरूपी मदाने अध.झालेले. १५. दवाचे हत्ती.

मामाचा[1] कैवारी अश्वत्थामा त्यासि तैं ने या[2],
मर्मीं खर शर हाणी, न्हाणी क्षतजें[3] सचैल[4] शैनेया[5]. ४९
होते पुष्पितकिंशुकतर्वनुकृति[6] करित ते शरीरानीं,
असुनिरपेक्ष[7] झगडले घटिकाभरि जेंवि केसरी रानीं. ५०
गुरुसुत विधूंन[8], सात्यकिसायकनिकर[9] हि गमे न राहून[10],
राहून नभीं हि तदा दिनमणि[11] हि बहु भ्रमे नराहून. ५१
तों द्रोण 'हा!' म्हणे, कीं, जें पुत्रीं सुख न नंदनवनीं तें.
सुत सर्वमतः मुखींच्या एक चि पोषी न नंद नवनीतें. ५२
नेतां अरिच्या स्यंदन[12], नंदनरक्षार्थ आडवा तातें,
ये विजय, जेंवि दीपक रक्षाया पदर आड वातातें. ५३
गुरुशिष्य तेंवि करिति प्राकृत सहजारि[13] जेंवि कळहातें,
तें त्वां केलें होतें प्रेम न विधिच्या हि जें विकळ हातें. ५४
गुरुभक्तोत्तम हि विजय हाणित होता गुरूसि निकरानें,
शिष्यासि शिष्यवत्सळ गुरु हि प्राणघ्नबाणनिकरानें. ५५
तों धाडिला सुशर्मा, रायें, आला धनंजयावरि[14] तो,
तेव्हां वदले सुर कीं, 'सकुळ शलभ[15] हा धनंजया[16] वरितो.' ५६
गांठुनि करी सुशर्मा शरपटलें जिष्णुच्या रथा पिहितें[17].
तो यद्यपि अहित, गमे विजया विजयोद्यता[18] तथापि हितें[19]. ५७
भस्म चि करी धनंजय लीलेनें तीं समस्त शरपटलें,
दिसतें काळें नभ हें धुरकटलें तेधवां चि करपटलें. ५८
होय पतंग चि, न करी झटुनि हठानें विपन्न दीपातें,

१. कृपाचार्यांचा २. सात्यकास. ३. रक्तानें. ४. वस्त्रासह. ५. सात्यकीस. ६. फुललेल्या पळसाच्या झाडाचें अनुकरण. ७. प्राणाची हि पर्वा न करितां. ८. चंद्रादनः-पंत: चंद्राहून कर्मी. ९. सात्यकीच्या बाणांचा समुदाय. १०. राहूपेक्षा कमी. ११. सूर्य. १२. रथ. १३. निसर्गतः च शत्रु. १४. अर्जुन-पंत. १५. टोळ. १६. अग्नीस. १७. आच्छादित. १८. विजयाविषयीं तत्पर असलेल्या. १९. मित्र.

तैसें सुशर्मबळ तें आपण चि बुडे विपन्नदीपातें.[1] ५९
विजय उडवित चि होता वातास्त्रेंकरुनि जेंवि तृण सुकलें,
परि तें त्रिगर्तकटकव्यसन द्रोणाश्रयें[2]. नृपा! चुकलें. ६०
कुरुगुरुनें शैलास्त्रें[3] नसतें वातास्त्र वारिलें जरि तें
करितें च रितें कुरुबळ, हरितें, एका हि नुरवितें अरितें. ६१
अस्त्रनिवारण होतां, लागावे जों अराति[4] हरिखोंाया[5],
शिरले त्रिगर्तकटकीं विजयशर, जसे गजांत हरि खाया. ६२
विजयातें कोंडाया भट झटले, बहु झटे सुयोधन ही,
'मारा, मरा, पुढें व्हा,' म्हणत्यास म्हणेल कां सुयोध 'नहि'?
भगदत्तें भीमावरि करिटिकटक[6] लोटिलें बहुत, राज्या!
वचकावे प्रलयजलदपटलें[7] हि भयंकरा बहुतरा[8] ज्या. ६४
केलें प्रयाण धर्माप्रति भीष्में धार्तराष्ट्रबळसहितें;
तेव्हां जें वीरांचें रूप न मिरविति सपुष्प पळस हि तें. ६५
शिरला भगदत्ताच्या करिकटकीं भीम, सिंहसा गमला,
ते गज, नग[9], तो वज्री[10], तो तार्क्ष्य[11] चि, ते समस्त नाग[12] मला. ६६
बहुगजविदारण करी भीम जसें वासव[13] नगदारण[14], गा!
मागों नेदि स्पृष्टा[15] कोणा जीवास वन[16] गदा रणगा[17]. ६७
गजरक्तदिग्ध[18] शोभे, जेंवि गणाधिप विलिप्त सिंदूरें,
स्पष्ट फुटावें पाहुनि त्यास अमृतरसमयें हि इंदूरें[19]. ६८
क्षत-हत-शेष द्रुत गज ते अभिचारप्रयोगसे[20] फिरले,
नाशिति कुरुसेनेतें, तनुतें गद[21] सेवटीं जसें शिरले. ६९
निवर्वी कुरुंसि केलें गांगेयें युद्ध सोमकांसह जें,

१. विपत्तिरूप नदीत पडण्यानें. २. द्रोणाने. ३. पर्वतास्त्राने. ४. शत्रु. ५. आनंदावयास. ६. हत्तीचें सैन्य. ७. प्रलयकालच्या मेघसमुदायानीं. ८. अत्यंत. ९. पर्वत. १०. इंद्र. ११. गरुड. १२. साप. १३. इंद्र. १४. पर्वताचें विदारण. १५. स्पर्शलेल्य स. १६. पाणी. १७. रणातील. १८. हत्तीच्या रक्ताने भरलेला. १९. चंद्राच्या उरानें. २०. जारणमारणादि प्रयोगासारखे. २१. रोग.

निववील न प्रसादें कुमुदांतें शुद्ध सोम कां सहजें? ७०
स्पर्शे शिखंडीतें चि स्त्रीपूर्व म्हणुनि करी न रोपानें,
भंगी इतरां सकळां, कल्पांतीं रुद्र जेंवि कोपानें. ७१
द्रुपद-विराट-वृकोदर-सौभद्र-द्रौपदेय-धर्मांचें
भीष्म बळ न चालों दे, जैसा प्रारब्धभोग कर्मांचें. ७२
नकुळ-सहदेव-सात्यकि-धृष्टद्युम्नादि वीर दिनेंदीप
जाले, घटजमुनिपुढें न टिके घटिकार्ध थोर हि नदीप. ७३
रक्तनदींत सजीव हि हय गज, न प्रेत वाहवी राज्या!
म्यां तो किति वर्णावा, बहु वत्रके श्वेतवाह वीरा ज्या? ७४
देव म्हणे, "हा शतशः क्षतजांचे पूर वाहविल, यातें
नेसिल, घेसिल चित्तीं तरि तूं चि श्वेतवाह! विलयातें. ७५
'मजसीं जे रिपुसैनिक भीष्मद्रोणादि युद्ध करितील
गांडीवमुक्त सायक त्यां त्यांच्या जीवितासि हरितील.' ७६
सत्य करीं मत्स्यपुरीं जें हें वदलासि संजयापाशीं,
हित सत्यपाश; दाटुनि बुध अर्पिति शीर्षकंज या पाशीं." ७७
पार्थ म्हणे, 'सद्ज्ञानें सत्तेजें सत्य लोकपति तरणी,
ऐसा कुळगुरु वधितां म्हणतिल मज सत्य लोक पतित रणीं.
हें हि कठिन कीं, शांत हि गुरुवागनधीन शांत न वदावा;
हो कांहीं, हाका हय, घडल्यास वधीन शांतनव, दावा.' ७९
ऐकुनि असें प्रभु नदीसूनुकडे चालवी रथा, राया!
क्षम ज्यापुढें न कोणीं धरुनि तसी चाल.वीर थोपाया. ८०
भीष्म विजयरथ झांकुनि कांपवि पुरुषा परा शरासारें,
अरिदुःसह तेज गुरुसि दावी अर्जुन पराशरासारें. ८१

१. चंद्र. २. दिवसाच्या दिव्यासारखे निस्तेज. ३. अगस्तिऋषीपुढें. ४. समुद्र. ५. अर्जुन. ६. रक्ताचे. ७. विराटनगरात. ८. हितकर. ९. शिरकमल. १०. लोकपाल. ११. गुरूच्या आज्ञेत न राहणारा. १२. थोपविण्यास. १३. परमपुरुषास. (कृष्णास). १४. वृष्टि—पंत. बाणवृष्टीने. १५. सम—पंत. पराशरासारखें.

भीष्मशरांचें पार्थ प्रभुसाधूक्तींस[1] पीतें[2] पटल हरी,
लाजवि सुधानिधीच्या स्तुतिसूक्तिसमुद्रपीतपट[3] लहरी. ८२
छेदी देवनदीच्या[4] दायादाच्या धनुष्यवल्लीला,
तेणें हरि बहु हर्षे, कीं आदरिली मनुष्यवल्लीला. ८३
भीष्मप्रभु दुसरें धनु सज्य करी, जों न हालवे पातें[5],
तच्छेदें सुर वाहति, मग कां न तुम्हीं वहाल वेपातें[6]? ८४
विच्छिन्न निमेषांत चि करितां दुसरें धनु स्वनातुंडें[7],
आशीर्वृष्टि करुनि करि हरिसा गंगार्जनु[8] स्वना[9] तुंडें. ८५
गर्जोनि म्हणे, 'वत्सा! विजया! वीरा! भला! भला! बा! हूं!
बाहूंस तुज्या दृष्टि न लागो, भलत्यांस काय मीं बाहूं?' ८६
ऐसें वदोनि तिसरें सज्य करुनि चाप परमकरुण, पणें[10]
हाणी इषुमागें[11] इषु, करि विजयाचें विगर्व तरुणपण. ८७
चुकवि प्रभु, मंडळगति रथ फिरवि, त्वरित घोटक[12] पिटाळी,
रुतवि जो छायाग्रह[13] तच्छक्तीचा भरुनि घोट कपि टाळी. ८८
हययानीं[14] परमबळ प्रकट करिं प्रभु परोपरी चुकवी,
परि न शके टाळाया प्रारब्ध सुखासुखा जसा सुकवी. ८९
ब्रह्म[15] क्षतजें न्हालें तें पुष्पितपर्ण[16]वज्जना दिसलें,
जालें शल्यार्त मनी यद्ध्यानें न टिकती अनादि सलें. ९०
भीष्म ग्रीष्मतरणिसा, अर्जुन हेमंततरणिसा गमला;
देव म्हणे, "बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचा हि राग मला. ९१
हा शूर, 'दूर ओसर[17]' म्हणणार महाप्रभाव हा रविला,
हार विलासि[18]जनेंसा येणें कैसा प्रभान्न हारविला? ९२

---

१ श्रीकृष्णाच्या उत्तम वचनास. २ श्रवण करींत असता. ३ कृष्ण–**पंत.** स्तुतीच्या उत्तम भाषणाचा समुद्र च असा पीतांबरधारी कृष्ण. ४. गंगापुत्र भीष्म–**पंत.** ५. डोळ्याचें पातें. ६. कपातें ७ आपल्या नातवानें–अर्जुनानें. ८. गंगेपासून आहे जन्म ज्याचा असा. ९. शब्दास. १०. तथापि. ११ बाणामागें बाण १२. घोडे. १३. राक्षसविशेष. १४. घोडे हांकण्यात. १५. श्रीकृष्णरूप ब्रह्म. १६. पळस–**पंत.** पळसाच्या पानासारखें. १७. एकीकडे हो. १८. विलासी पुरुषाप्रमाणें.

जाला धीर, परि परिम्लान सखा जातिपुष्पगुच्छकसा,
तुच्छ कसा हा प्रवया? चिरडिल भलता अहींद्रपुच्छ कसा?
हा पांडवांसि भस्म चि करिल, उपेक्षा करूं नये याची,
पदरासि अकीर्ति श्रितसुहृदनवनपथ करून येयाची." ९४
आणुनि मनीं असें ज्या 'धन्य' म्हणति सर्व विप्र तो दास,
भीष्म वधाया धावे हरि, हस्तें कवळुनि प्रतोदास. ९५
देव रथातें सोडुनि धांवे देवापगाविलापार्थ,
कीं त्या सुदुस्तरारिसमुद्रीं कासेसि लाविला पार्थ. ९६
पार्थाप्रति प्रयत्नें तो बळकारुण्यसिंधु राखाया
क्रोधें गर्जत धांवे, सिंह जसा मत्तसिंधुरा खाया. ९७
'एह्येहि देवदेव! श्रीकृष्ण! नमोऽस्तु ते' असें बोले;
ओले गल्ल प्राज्य प्रेमाश्रुभरें करूनियां डोले. ९८
भीष्म म्हणे, 'त्वद्धस्तें व्हाया समरांत शांत नवसा जा.
होता करीत, तो हा जेंवि हरिहतेभ शांतनव साजो. ९९
जरि मारिसील मज गतिलाभ, तुज हि कीर्तिलाभ गुरुतर तो,
विश्वगुरो! प्राकृत हीं तारुनि शरणागतासि गुरु तरतो. १००
तूं हरिसा हरि, साची हरिणी सुरसिंधु, मीं हि पाडससा;
पाँड, ससाध्वस हो अरि; हरिचा पावेल काय पाड ससा?
ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दरक्तचक्षुच्या पातें,
तो तूं आंगें मारूं पाहसि मज दावुनि प्रतापातें. १०२

१. जाईच्या फुलाच्या घोंसामारखा २. वृद्ध—**पंत.** ३ सर्पश्रेष्ठाचें शेपूट. ४. आश्रित व मित्र याचें संरक्षण न करण्याचा मार्ग. ५. यावयाची. ६. चाबुकास. ७. गंगा—**पंत.** ८. तरण्यास कठिण अशा [ भीष्मरूप ] समुद्रांत. ९. माजलेल्या हत्तीस. १०. एहि एहि=येथें यें. ११. तुला नमस्कार असो. १२. पुष्कळ. १३. मृत. १४. सिंहानें मारलेला हत्ती. १५. गंगा (माझी आई). १६. हरिणशिशूसारखा. १७. मार. १८. सभय. १९. किंचित् आरक्त नेत्राच्या.

जालों धन्य त्रिजगीं, भास पळ[1] प्राकृतांस मार[2]कसा;
[3]त्या प्रभुनें तो केला भस्म स्वातिक्रमेच्छु मा[4]र कसा?' १०३
धावुनि धरी धनंजय मागुनि त्या माधवासि बाहूनीं,
मग दृढ चरणीं च मिठी घाली, पहिली च रीति पाहूनी. १०४
दूर उसळला होता कोपावेशें मुकुंद कंदु[5]कसा,
राहे उभा प्रभु गमे [6]इभसा, धृतचरण[7] भक्त अंदु[8]कसा. १०५
पार्थ म्हणे, "श्रीधर्मावरि धरितिल जे असि[9]प्रति ज्ञाती[10]
मरतील, त्यजिसी कां, 'आयुध न धरिन' असि प्रतिज्ञा ती?
मारिन भीष्मातें मीं इतरांतें ही भवद्द[11]याधारें;
बा! त्वत्प्रसाद ज्यावरि केवळ मेर्वग्रें[12] ही तया धारें[13]. १०७
लोक तुज 'मृषावादी[14]' ऐसें न म्हणोत सत्यसंधपते[15]!
मरतिल तव हक्पातें भीष्मद्रोणादि सर्व अंधप[16] ते." १०८
कुरुकुंजरासि[17] गेला होता यदुसिंह तो खरा खाया,
परते, पर तेथूनि प्राणप्रियमित्रतोख[18] राखाया. १०९
कृष्ण स्वरथीं चढतां, समरचमत्कार मग नवा तातें
दाखविला, वाहों दे न शरव्रजपूर्णगगन[19] वातातें. ११०
भीष्मशरव्रज हाव[20] चि, पांडवभटनिकर तो गमे घास;
क्षण सोसवे न कोणास हि, जैसा वायुयोग मेघास. १११
तो पांच सात हय गज, हाणुनि एका चि सायका, मारी;

---

१. पळभर. २ यमासारखा. ३. शिव-**पंत.** ४. काम-**पंत.** ५. चेंडू-सारखा. ६ हत्तीसारखा ७. धरले आहेत चरण ज्याने असा भक्त. (अर्जुन). ८. साखळीसारखा. ९. खड्गास. १०. स्वजातिजन ११. आपल्या कृपेच्या आश्रयानें. १२. मेरुपर्वताचें शिखर. १३. लघु. १४. खोटें बोलणारा. १५. सत्यप्रतिज्ञातील श्रेष्ठा! १६. अंधाचे (धृतराष्ट्राचे) रक्षण करणारे. १७. कुरुरूप हत्तीस. १८. प्राणांहून प्रिय असलेल्या मित्राचा संतोष. १९. बाणसमुदायानें भरलेले असें आकाश. २०. भीष्माचा बाणगण ही च कोणी हाव (खाखा), तिला पांडवभटांचा समुदाय हा केवळ एक घास होय, असें वाटे. (भीष्माच्या बाणांच्या मान्यापुढें पांडवभट सुखरूप राहणें अशक्य, असा भाव).

वदलीं बहु कटकें कीं, 'करितो कल्पांत काय कौमारी?' ११२
कुंतीसुत माद्रीसुत कृष्णाकृष्णा[2]नुजासुत भ्रमले,
भ्रम लेखांस[3] हि पडला, गतचेतनसे चि सर्व ही गमले. ११३
जेंवि महावात करी अभ्रांचा न लवितां पळ विसकट,
त्वत्तात[4]शरव्रात ध्वंसुनि सर्वांस हीं पळवि सकट. ११४
भीष्मास पहाया हीं त्या समयीं एक ही न पर परते,
जे मदमत्त मतंगज हगले मदसेकहीन[5] परपर ते. ११५
बहु वधिले, उरले जे ते केले बाहुजप[6] पराभूत,
पाहों शकले न जसे श्रीनरहरिमंत्रजपपरा[7] भूत. ११६
तों मावळला दिनकर, होय बहु प्राप्त साध्वस[8], मग तिहीं
केला अवहार[9] परिश्रांताहीं लंघिताध्व[10]समगतिहीं. ११७
आम्हीं गाजंत वाजत गेलों शिबिरासि विजय साधूनीं,
स्तविला भीष्म बहु जसा ध्वस्तासुरसैन्यविजय[11] साधूनीं. ११८

---

# अध्याय दहावा.



## (दशमदिनयुद्ध.)

रात्रौ राजा धर्म व्याकुळ होउनि असें म्हणे हरिला,
'धरिला राज्यमनोरथ म्यां मूढें, न वनवास आदरिला. १
मूर्खें म्यां चि बुडविले संबंधी बंधु आप्त शोकांत,
अयशःपात्र[12] सुयोधन न अधिक तद्बंधु मीं हि लोकांत. २
दे आज्ञा, जावूं दे, आदरिला हा कशास्तव निकामी[13]?

---

१ शंकर. २. द्रौपदी व सुभद्रा यांचे पुत्र. ३. देवांस. ४. तुझ्या ताताचा (भीष्माचा) बाणसमूह. ५. मदस्रावरहित. [होऊन] ६. क्षत्रियपति—पंत. ७. नरहरिमंत्राचा जप करणारास. ८. भीति. ९. उपसंहार. १०. पाथ—पंत. लावून चालून आलेल्या मनुष्याप्रमाणें आहे गति ज्यांची. ११. अर्जुन—पंत. संहारिलें आहे असुरसैन्य ज्यानें असा. १२. अकीर्तीस पात्र. १३. निरुपयोगी.

राज्यायोग्य[1] चि, केवळ तप मात्र करावया बहु निका[2] मी. ३
भीमपराक्रम[3] भीष्मप्रभुच्या वदनाकडे पहावेना,
हरिणां जसें हरिपुढें आम्हांसि तयापुढें रहावेना. ४
जिंकाया शक्य, यम हि शक्र हि वरुण हि कुबेर हि रणांत;
परि हा अशक्य, आम्हीं होतों खद्योत[4] तदिषुकिरणांत[5]. ५
म्यां या प्रभुसीं केला मतिदौर्बल्येंकरूनि संगर हा,
सांगावें होतें त्वां कीं, 'साधूंचा धरूनि संग रहा.' ६
आतां तरि परमाप्ता[6]! देवा! तूं स्वहित सार सांग मला,
शरणागतां तुजा उपदेश जसा सूर्य सारसां[7] गमला." ७
देव म्हणे, "राया! तूं दाटुनि धरितोसि कां विषादास?
म्यावा श्रीकंठार्चा कीं गरुडाचा तऱ्ही विषा दास? ८
विजयी विष्णुभुज[8] तसे भ्राते करितील काम हें भारी,
समरीं हारिप्रति हठ सोडुनि वरितील कां महेभारी[9]? ९
कीं या जनास म्हण 'हूं;' कैसा करितों त्वदर्थ समर पहा;
तो भीष्म वृत्र भासो, संपादुनि सद्यशासि अमरप[11] हा. १०
मत्संकल्प असा की साधुनि द्यावी च सर्व भू पार्था,
आम्हीं प्रजा तुज्या बा! साधूं[12] वेचूनि सर्व, भूपार्था[13]. ११
जसि अर्जुनें करावी त्वद्वशगा[14] बा! तसी च हे महि म्या,
जरि साधु साह्य करितिल, पावतिल तरी च बाहु हे महिम्या.
त्वद्धितें[15] मद्धित ते, जे त्वदरि[16] मदरि ते चि, अन्यथा न मनीं[17].
अन्य प्रेम न माज्या ये, शिशुच्या जेंवि अन्य थान, मनीं. १३
संबंधी शिष्य सखा अर्जुन, तूं आर्य रामसा मान्य;

१. राज्यास अयोग्य. २. चागला ३. भयकर आहे पराक्रम ज्याचा अशा. ४. काजवे. ५. त्याच्या बाणरूप किरणात. ६. परमहितकरा! ७. कमलास. ८. विष्णूचा. ९. माघार घेतील. १०. सिंह-पंत. गजेद्राचे शत्रु. ११. इद्र. १२. संपादूं. १३. राजाच्या मनोरथास. १४. तुझ्या स्वाधीन राहणारी. १५. तुझे मित्र. १६. तुझे शत्रु. १७. मान् नको.

स्वशिर त्वदर्थ कापुनि देइन, हें काय काम सामान्य? १४
विजय म्हणेल तरि वधिन शस्त्रास्त्रें मीं पितामहास रणीं,
होउनि सुयोधनाचा शोकार्त वरो पिता महासरणी[1]. १५
कार्याकार्य न समजे, चळला[2] तो वृद्ध, काय सांगावें?
मणिपंजरीं शुकां कीं सुखें पाळूनि वायसां गावें?" १६
धर्म म्हणे, "जगदीशा! बा! तुझिया साहतिल न वेगा ते,
त्वद्यश अनंत, गातां थकले निपुण हि जुने नवे गाते. १७
आहेसि मच्छिरावरि अवितथसंकल्प[3] तूं परस्वामी[4],
स्वधनातें पावेन चि वांछीत नसेन जरि परस्वा[5] मी. १८
तूं असतां मत्पक्षीं, करद[6] करिन नाकलोकपाळाला[7];
भीष्माची काय कथा? भंगिन मीं संगरांत काळाला. १९
युद्ध न करितां चि करीं साह्य, न जावी लया प्रतिज्ञा ती,
माजे जातील तुज्या दासत्वें लयाप्रति ज्ञाती. २०
शांतनवें[8] समय[9] असा केला कीं, 'करिन युद्ध कुरुपार्थ[10],
मंत्र* त्वदर्थ होइल तो विजयद जेंवि धन्विगुरु पार्थ.' २१
मंत्र पुसाया आम्हीं साजण जावूं चला उठा, राया
प्रार्थूं स्ववधोपाया, देइल सुरतरु जसा कुठारा या." २२
देव म्हणे, 'बहु उत्तम;' ने लाजे शक्रसद्म[11] शिबिरा ज्या.
पावे धर्म[12] नदीज्या, पूर्वी जैसा कपोत[13] शिबिराज्या.
सविनय विशस्त्र विकवच[14] साच्युत[15] पांडव पितामहा नमिती,
त्यांहीं गुरु[16] जिंकायी केली ती प्रणतिमिषें[17] महासमिती[18]. २४

---

१ काळमार्ग-पंत. २. भ्रमला. ३. सत्यसंकल्प. ४. श्रेष्ठ स्वामी. दुसऱ्याच्या द्रव्यास. ६. कर देणारा. ७. स्वर्गलोकाधिप इंद्रास. ८. बाधव. ९. प्रतिज्ञा. १०. दुर्योधनासाठीं. ११. इंद्रभवन. १२. धर्म भीष्माकडे आला. १३. कपोत-(कबुतर)-रूपधारी अग्नि. १४. कवचरहित. १५. श्रीकृष्णासह. १६. भीष्म. १७. नमस्काराच्या मिषानें. १८. मोठें युद्ध. * भीष्म० अ० १ गीति ६७ ते ८१ पहा.

भीष्म प्रसन्नचित्तें 'वार्ष्णेय[1] ! स्वागतं तव' असें च,
धर्मादिकांप्रति वदे, 'सांगा, युष्मत्प्रियोद्यत[2] असें च. २५
प्रीतिकर[3] कार्य तुमचें दुष्कर हि असो, करीन, सांगा तें;
ये धर्म[4] चि, पुत्र स्त्री कोष रथ तुरग करी न सांगातें.' २६
धर्म म्हणे, 'द्याल अभय तरि मीं अतिमंद तोक[5] विनवीन,
जो संता संतानक[6] म्हणता[7] मतिमंद[8] तो कवि नवीन. २७
संत सकळ शरणागतवत्सळ नाहीं च अधिक शिबि कांहीं,
एक्या सदुक्तिनें जी सुगति घडे ती न कोटि शिबिकांहीं. २८
गंभीरता न मिरवू साधुजनामाजि नाव उदधीची,
तुमची च सुकविकरवीं विश्वांत सुकीर्ति गावउ दधीची[9]. २९
केला स्वधर्म म्हणवुनि समरमखारंभ[10], फळ न परिणामीं,
नव दिन तुम्हां हरीसीं रण करितों मेळवूनि हरिणां मीं. ३०
दुस्तर चिंता होतां ती कर जोडूनि गुरुस चि वदावी,
दावा उपायपथ मज, शक्राला जेंवि गुरुसचिव दावी. ३१
न सुचे कांहीं च मला स्ववधोपाय स्वयें चि सांगावा.
गावें तुम्हांसि कविनीं, संतत एक चि दधीचि कां गावा? ३२
तुम्हि च म्हणतां जपावें पार्थिववपुपरिस[11] बहु यशोदेहा[12],
सन्मतिस यशःसंग्रह सर्वस्वाधिक जसा यशोदे हा[13]. ३३
होय प्रजाक्षय न बहु राज्यजयप्राप्ति होय, आजोबा!
ऐसा उपाय सांगा, हा शरणागत जगांत साजो, बा!' ३४
हास्य करुनि भीष्म म्हणे, 'वत्सा! त्वत्हृदयवृत्ति[14] बहु सरला[15],

१. कृष्णा! २. तुमचे प्रिय करण्यास सिद्ध. मूळ पाठ–**युष्मद्धितोद्यत.** ३. प्रीति वाढविणारें. ४. पुण्य च. ५. बालक. ६. कल्पवृक्ष. ७ म्हणणारा. ८. अभिधान–**पंत.** ९. देवांसाठीं आपले प्राण देणारा दधीचि ऋषि. १०. युद्धरूप यज्ञाच्या आरंभ. ११. मातीच्या शरीरापेक्षां. १२. यशोरूप शरीरास. १३. कृष्ण: १४. तुझ्या मनाची वृत्ति. १५. सरळ.

सेर लाजो अमृताचें त्वद्धृदया, ताप तवगुणें[1] सरला. ३५
आम्हीं आहों तों तुज कैंचा[2] जय संगराजिरांमाजि?
सोसिल इतर कसी, दे[3]मैदिषूंची भंग राजि[4] रामा[5] जी? ३६
करिसिल सर्वांचें, जरि करिसील प्रथम मन्मथन[6], राज्या!
कैसे शामविल कोपप्रभृति[7], न शामवेल मन्मथ[8] नरा ज्या? ३७
आज्ञा तुम्हांसि दिधली, निःशंक करा प्रहार पांडव हो!
अस्मद्वधोत्सवीं[9] बहु पुरुहूत[10]सभेंत गीत तांडव हो. ३८
आणा पुढें शिखंडी, म्हणजे पावेन मीं उपरमातें[11],
हाणा दूरुनि विजयप्रमुख तुम्हीं वीर त्यांउपर[12] मातें. ३९
दोघां कृष्णांहुनि मज तिसरा न त्रिभुवनांत जन हंता[13],
मानील सत्य हें जो ज्ञाता, ज्याच्या मनांत अनहंता[14]. ४०
येतां चि पुढें पाहुनि मीं त्या स्त्रीपूर्वका मनुष्यातें,
सहसा समरोत्साहासह सांडिन साशुगा[15] धनुष्यातें. ४१
शस्त्र त्यजिल्यावरि ही बाणांहीं अर्जुनें चि हाणावें,
तरि च विकळ होइन मीं, हें माजें वचन सत्य जाणावें. ४२
वत्सा विजया! सोडुनि शंका करिसिल मदीय वचना कीं?
कच[16] नाकीं सुताच्या[17] तेंवि न हो, हो जसा चि कच[18] नाकीं[19]. ४३
धर्मा! कर जोडुनि जरि पुससी निजविजयहेतुसदुपाया,
तरि हा ऐसा आहे, बा! नाहीं विदित. काय यदुपां[20] या? ४४
मूर्त सदुपाय सकळां पुरुषार्थांचा मुकुंद हा जिकडे
तिकडे जय, तुज देतिल मेरूचे पायवाट आजि कडे! ४५

१. मरोवर. २. अगण–**पंत:** रणागणात. ३. माझ्या बाणाची. ४. पंक्ति. ५. परशुरामास. ६. माझा पराभव, वध. ७. क्रोधादि शत्रु. ८. मदन. (कामवासना). ९ आमच्या वधामुळे होणाऱ्या आनंदात. १०. इंद्र–**पंत.** ११. निवृत्तीस पावेन. (मरेन). १२. त्यानंतर. १३. मारणारा. १४. निरहंकार. १५. १६. बाणासह. १६. केश. १७. निजलेल्याच्या. १८. बृहस्पतीपुत्र. १९. स्वर्गांत. २०. श्रीकृष्णासि.

श्रीभूतिजयनयांतें ज्याची सर्वत्र गुणकथा पिकवी
तो हा भगवान्सारथि, करितां चिंता तुम्हीं तथापि कवी ! ४६
जा, स्वस्थ निजा, प्रातःकाळीं च उद्यां करा जसें कथिलें;
कृष्णाश्रितें करावी चिंता न, जसी रसाश्रितें कथिलें. ४७
अर्यचिंता कां करितो देवा ! कौंतेय बा दयाळो ! हा ?
धन्य करिल तव चरणस्पर्शमणि रजोग्रपाद या लोहा.' ४८
नमुनि कुळगुरुसि, सानुज साच्युत शिबिरासि धर्म ये, राया !
त्या तैशांच्या चि कथा; ऐशा घडतील काय येरां या ? ४९
प्रातःकाळीं होउनि सिद्ध करुनियां पुढें शिखंडीतें
धर्म निघे, भीष्माचें रक्षक कुरुकटक जें विखंडी तें. ५०
बहु भाग्य शिखंडीचें, मोठ्यांच्या ही मदासि जें विरेवी,
कीं दों पार्श्वीं दोघे भीमार्जुन, चक्रपाळ जेंवि रवी. ५१
करुनि पुढें भीष्मातें कौरव आले सशक्र लोकपसे,
वीररसें सुर डोळे भरिति, जळें जेंवि तृषित लोक पसे. ५२
कौरवभट दंशमशक, विजयधनुर्वल्लि काय ती चवरी ?
हरिस हरिजनास हि लघुपण वरितां कीर्ति आयती च वरी. ५३
भीष्मा मर्दाया अरि, विट जेंवि सतीकुचा, मरायास
झटति, तदायास जसा गरुडीं च पृदाकुचामरायास. ५४
भीष्महत लक्ष गमले, जेंवि लयगलित गतासु रवि पत्ती,
स्मरली सुरांसि तेव्हां अमृतार्थ्यच्युतहतासुरविपत्ती. ५५

---

१. लक्ष्मी, ऐश्वर्य, विजय व नीति यास. २. पाऱ्याचा आश्रय केलेल्या कथिलानें. ३. दुसऱ्यांस. ४. नाशी—**पंत.** ५. नाहींसें करी. ६. बाजूस. ७. रथचक्ररक्षक. ८. डांस. ९. अर्जुनाची धनुष्यलता ही, च चवरी. १०. जार. ११. त्यांचे श्रम. १२. यथा सर्पहस्तगतचामरस्यायासो गरुडेऽकिंचित्करस्तथा भीष्मे भटायास इत्यर्थः—**पंत.** सर्परूप चवरीचा श्रमः १३. प्रलयकाळीं गळालेले. १४. प्राणरहित. १५. पायदळ. १६. अच्युतानें मारलेल्या अमृतार्थी असुरांची विपत्ति.

* रज ( धूळ ) आहे टाचलावर ज्याच्या अशा. ( निकृष्ट प्रतीच्या अशा ).

वधिले सारोहे[1] अयुत हयगज हि तुज्या महाकर्थे[2] बाणें,
बहु कडकडे परशरें जैसा अति तैलपाक थेंबानें. ५६
विजयें भीमें हि बहुत रिपु मर्दुनि, करुनि भग्न पृतनेला[4],
भीष्मापुढें शिखंडी, साधुपुढें जेंवि हतसुकृत[5] नेला. ५७
तों तीन बाण हाणी, भीष्म म्हणे, 'त्वां यथेष्ट हाणावें,
आम्हीं स्त्रीपूर्वावरि शर सोडूंना च, सत्य जाणावें.' ५८
कोपुनि म्हणे शिखंडी, 'यद्यपि तूं क्षत्रघातका रामा
दुर्जय, तथापि मारिन तुज याचकपारिजातकारामा[6]. ५९
योद्धा वक्ता दाता ब्रह्मण्य शरण्य अजित तूं हरिसा[7],
परि सावध हो, मारिन तुजला मीं, वृद्ध हरिस युवहरिसा[8]. ६०
दशशतभुजार्जुनाचें[9] रामें, त्यांचें[10] तुवां, तुजें आजी
सर्व यश हराया मीं आलों तुजसीं करावया आजी[11].' ६१
भीष्म नव्हे तो शुक[12], कीं ज्याचे विषयांसि मुखसुरव[13] धूती,
न शिखंडी, आलीसे सेवाया विषयसुख सुरवधू ती. ६२
पार्थ शिखंडीस म्हणे, 'हूं! शांतनवावरि प्रहार करीं;
आहे सिद्ध वराया विजयश्री तुज धरूनि हार करीं. ६३
हें धर्मकार्य सद्यश व्हाया सत्यप्रतिज्ञ साधुनि घे;
मीं वारितों परांला; सुकृतीं न कवण गतिज्ञ साधु निघे?' ६४
हें ऐकुनि तो धाया, मत्तोरण[14] जेंवि मृगवरा, टक्कर,
कीं जाय तो कराया निधिपतिसीं[15] धृतपण वराटकर[16]. ६५
धृष्टद्युम्न-विराट-द्रुपद-नकुळ-ससुतजिष्णु-सहदेव,
हे धांवले नदीजावरि, बळिवरि जेंवि विष्णुसह देव. ६६

---

१. स्वारासह. २. मोठी आहे कीर्ति ज्याची त्या. ३. बापानें. (भीष्मानें).
४. सैन्यास. ५. क्षीणपुण्य. ६. याचकाच्या कल्पवृक्षाच्या वनाला. ७. वासुदेवासारखा. ८. तरुण सिंहासारखा. ९. सहस्रार्जुनाचें. १०. परशुरामाचें.
११. युद्ध. १२. शुकाचार्य. १३. मुखातील सुंदर ध्वनि. १४. माजलेला बोकड.
१५. कुबेरासीं. १६. कवडी आहे हातात ज्याच्या असा.

वारी धृष्टद्युम्ना कृतवर्मा, सोमदत्ति भीमातें,
नकुळा विकर्ण, कृप सहदेवा, तें होय फार भी मातें. ६७
जो कांबोज सुदक्षिण तो सौभद्रासि यश न दे, वारी
सात्यकिला दुर्योधन, जैसा प्लवगेश्वरासि[१] देवारी[२]. ६८
वारी अश्वत्थामा द्रुपदविराटांप्रति प्रतापानें,
धर्मासि द्रोण, जसा वारावा चपळ बाळ बापानें. ६९
हें बहु, किति वर्णावें? अत्यद्भुत एक सांगतों, परिसा;
विजयाला दुःशासन वारी, शरभा सुदुर्जया हरिसा. ७०
मोही युद्ध सुरांच्या, न तसें सिंधूत्थ[३] तें विषं[४], मना, मीं
सम भीष्म भीम म्हणतों, केवळ कविला दिसो विषम नामीं.
मुनि वदले, "कां ऐसा सोडुनि म्हणेल 'इतर वरिन' रैसा[५]?
'सत्य धनंजय कर्मे रूपें, दिसतो उगा चि वरि नरसा." ७२
युद्धीं भीष्म म्हणे, 'रे! धर्मा! होइल दहांत[६] कुत्सा[७] हें
भय न धरुनि वत्सा! मज कथितोपायें[८] चि मार उत्साहें. ७३
बहु वीरक्षय घडला, तेणें बहु जीवितासि मन विटलें.
मेलों रणांत म्हणजे तुमचें यांचें हि सर्व ऋण फिटलें.' ७४
यापरि आज्ञा जाणुनि धृष्टद्युम्नें समस्त कटकांतें
कथिलें[९] 'घ्या भीष्म' असें, मान्य नै करितिल यशोर्थिभट[१०] कां तें?
त्यांसीं करिती गुरुकृपनृपभगदत्तादि नरवरा[११]! जन्य[१२],
सुरमुनि[१३] रुचों देती निर्जवीणेचा[१४] हि न रव[१५] राजन्य[१६]. ७६
भीष्म ग्लहसा[१७], त्यांचे तुमचे हि द्यूतकारसे भट ते,
हरणार्थ रक्षणार्थ, त्यजुनि तदितरार्थ, जाहले झटते. ७७

---

१. वानराधिपास—सुग्रीवास २. कुंभकर्ण. ३. समुद्रातून निघालेलें. ४. हालहालविष. ५. पृथ्वी. ६. चारचौघात. ७. निंदा. ८. सांगितलेल्या उपायानें च. ९. मूळ पाठ—कथिलें 'उठा' असें जें. १०. यशाची इच्छा करणारे वीर. ११. धृतराष्ट्रा! १२. युद्ध. १३. नारदास. १४. आपल्या वीण्याचा. १५. ध्वनि. १६. क्षत्रिय. १७. द्यूतांतील पणासारखा.

विजय गमे काळ चि कीं कोणांत हि बळ न तो टिकों दे, हो!
गगनीं प्रलयघनघटा तैसी तद्विशिखकोटि कोंदे हो! ७८
मर्मी बाण शिखंडी हाणी, परि शांतनव गडबडेना;
जसा म्हणे विवेकी, 'बडबडतो दुष्ट, कां बडबडेना?' ७९
साहे जेंवि समर्थ हि साधु प्रारब्धकर्मभोगातें,
सत्व असें नसतें तरि 'धन्य' म्हणुनि त्यासि कोण हो! गातें?
टिकले विजय-शिखंडी कीं शांतनवापुढें भटकबंध,
विसकटले गरुडपुरोवर्ति भुजगपाशसे कटकबंध. ८१
वधिलें धनंजयानें भीष्में त्याहूनि कटक बहुत रणीं,
दुष्प्रेक्ष्य जसा गमला भीष्म, ग्रीष्मज तसा न बहु तरणी. ८२
चित्तीं भीष्म म्हणे, "मीं स्वच्छंदमरण असें गुरुवरानें,
मन्निधनेच्छा धरिली परि या श्रीविष्णुनें गुरुवरानें ८३
म्यां हि दिला धर्माला वर, वरवा वीरमानवा सव हा,
या समयीं सोडावें वपु मद्विजयें म्हणो न वासव 'हा!'" ८४
व्योमीं ऋषि वसु वदले, 'अस्मदभिप्राय हा चि, शांतनवा!
यावरि समर पुरे, हो शांत, जुना शांत तूं, न शांत नवा.'
'आज्ञा अवश्य' ऐसें त्यांसि म्हणे भीष्म, मान्य तो करि तें,
कळलें मला मुनिवरें कीं सुरभीचें पडे न तोक रितें. ८६
म्हणतां 'अवश्य' भीष्मा पळ न दिसों पुष्पवृष्टि दे, वाहे
हिम मंद सुगंध पवन, झाली बहु धन्य दृष्टि देवा! हे. ८७
जो देणारा विष्टपबाह्यविषयवास विप्रतापातें

१. यम. २. प्रलयकालीन मेघाचा समुदाय. ३. त्याच्या बाणाची कोटि. ४. मळ पाठ—**विजय.** ५. पाहण्यास कठिण—अशक्य. ६. इच्छामरणी. ७. पित्याच्या वरानें. ८. रणयज्ञ. ९. इंद्र. १०. आकाशात; स्वर्गात. ११. अष्टवसु. १२. आमचें मत. १३. सजयास. १४. व्यासाच्या वरानें. १५. कामधेनूचें. १६. वासरू. १७. शीतल. १८. वायु १९. भुवन—**पंत.** ब्रह्मांडाबाहेरील प्रदेशांत वसतिस्थान देणारा. ( दुसऱ्याचा पराक्रम न उरविणारा ).

होय स्वयें चि तो तव तात विषय वासें[1]विप्रतापातें. ८८
जिंकावया न शकला त्रिभुवनजित्[2] तरि हि मारें[3] वीरा ज्या,
गांगेय आपणा त्या विजयाकरवीं च मारवी राज्या ! ८९
पांडववीरांत शिरुनि घे तदिषुंदवें[4] स्वतनुस भाजून,
प्रकटुनि साधूंत जसा घेतो अत्र्यात्मजनु[5] सभाजून[6]. ९०
जाणों[7] गुरुला वाहुनि शर, उंजविति सात[8] धर्म भीम कर,
त्यांच्या शस्त्रसमूहीं भीष्म, जसा सागरीं न भी मकर. ९१
लीलेनें युद्ध करी तन्हि दुर्जय भीष्म, त्यांस शंकरसा,
ज्यासि पतनीं 'अगइ ! कसि तरि मीं स्पर्शूं !' म्हणे सशंक रसा.
भीष्म शिखंडिशरांहीं मर्मांत शिरोनि ही न कांपविला,
किति ते ? हरिजनवर तो करिता न शिरोंनिहीनें[10] कां पविलो[11] ?
हांसुनि पितामहाला हाणी दशदा पळांत विजय शतें.
मानी प्रसन्नचित्त त्वत्तात महाप्रताप निजयश तें. ९४
आपण ही शस्त्रास्त्रें योजी, जाणों निरोप दे हातें;
जों जों कृष्णसख करी व्याकुळ हाणोनि रोपें[12] देहातें. ९५
ज्या ज्यातें सज्य करी, छेदी त्या त्या हि अतनुचापातें[13],
द्रोणादिकांसि तेणें बहु होतें दुःख, न तनुच्या पातें. ९६
निःसंशय खंडाया प्रभु[14] सज्य करुनि धनुष्य दे हातें,
हें काय नवल ? दाटुनि खंडोंवि[15] धरिल्या मनुष्यदेहातें. ९७
सर्व हि शरीर खिळिलें गिळिलें विजयांशुगविसराजगरें[16],
भ्रमला न प्रभु कांहीं, पक्षीश्वर[17] जेंवि भुजगराजगरें[18]. ९८

---

१. अर्जुनाच्या पराक्रमास. २. त्रिभुवन जिंकणारा. ३. मदन. ४. त्यांच्या बाणरूप वणव्यानें. ५. दत्त-पंत. ६. पुजून. ७. यशस्वी होतो. ८. आप्तजनांसह. ९. पृथ्वी. १०. मस्तकरहित-पंत. ११. वज्रास. १२. बाण. १३. मोठ्या धनुष्यास. १४. भीष्म-पंत. १५. छेदून टाकवी. १६. अर्जुनबाणसमुदायरूपी 'अजगरानें.' १७. गरुड. १८. सर्पश्रेष्ठाच्या विषानें.

गमलें शरीर शारदसंध्यांशुच्छुरित[1] जेंवि अभ्र[2] मला,
भ्रमता सहस्रनयन[3] हि, परि धैर्यजलधि नदीज न भ्रमला. ९९
नित्य नवा चि कथेला दिधला बहुमान साधुनीं ज्याच्या
विजय शराहीं ताडुनि सुख दे बहु मानसा धुनीज्याच्या[4]. १००
दुःशासन मात्र जवळि उरला होता, तया तुज्या तातें
स्वप्रेम कळविलें बा! बहु वर्णुनि त्या पृथासुजातातें[5]. १०१
'वत्सा! पहा पहा रे! विजयांशुगनिकर[6] कायहानिकर,
स्त्रीपूर्वें[7] आम्हांवरि हरि! हरि! करिजेल काय हा निकर? १०२
यासि रणीं जिंकाया शक्त नव्हे वज्रधर हि अमरांत,
मातें हि देव दानव राक्षस करितिल न भग्न समरांत. १०३
करिति व्याकुळ आम्हां सर्वामरशत्रुफणिशिखंडीचे[8],
कुरुकुळकमळतरणिचे[9] पार्थाचे शर, न हे शिखंडीचे. १०४
न शिखंडीचे, भेदुनि जातील सुमेरुच्या हि शिखरा जे,
वज्राग्निसमस्पर्श[10] व्याळसमक्रूर हे विशिखराजे[11]. १०५
कर्कटिकेसि[12] तिचे सुत खंडिति. मत्तनुसि हे तसे बाण,
प्राण व्याकुळ होते न शिखंडिशरव्रजें[13] खरें जाण. १०६
होउनि एकत्र सकळ राजे मज विप्रपदनता[14] पातें
सर्वास्त्रांच्या देते कीं शूळाद्युग्रगद[15] न तापातें.' १०७
ऐसें वर्णुनि गंगानंदन जन्हि शक्ति राहिली थोडी,
सोडी शक्ति, तिला तीं[16] बाणांहीं अर्जुन त्रिधा[17] तोडी. १०८

१. शरदृतूंतील संधिकालीन किरणांनीं व्यापिलेलें. २. ढग. ३. इंद्र. ४. भीष्माच्या. ५. अर्जुनास. ६. अर्जुनाचा बाणसमूह. ७. शिखंडीनें. ८. सर्व देवांचे शत्रु (दानव) हे च सर्प, त्यांस मोरासारखा असणाऱ्या अर्जुनाचे. ९. कुरुकुलरूप कमलास विकसित करणारा सूर्य च अशा. १०. वज्राग्नीप्रमाणें आहे स्पर्श ज्यांचा असे. ११. बाणश्रेष्ठ. १२. खेकडी—पंत. (खेकडीचीं पिलें आईचें पोट फोडून बाहेर येतात अशी समजूत आहे). १३. शिखंडीच्या बाणसमूहानें. १४. ब्राह्मणांच्या चरणीं नम्र झालेल्यास. १५. शूलादिक भयंकर रोग. १६. तीन. १७. तीन ठिकाणीं.

मग खड्ग चर्म घेउनि टाकूं पाहे उडी रथावरुनीं,
कीं टाकावें सत्वर वपु, निजरणधर्मसत्पथा वरुनीं. १०९
अंतःखिन्न धनंजय शतधा खंडूनि चर्म करवाल,
प्रभुसि म्हणे, 'गुरुजिपुढें न कळे कीं काय कर्म करवाल.'
तों बाहु उभारुनि निजसैन्यांसि म्हणे, 'त्यजूनि धर्म दया
धांवा, मारा भीष्मा, आम्हां हा धर्म कीर्तिशर्मद, या.' १११
वेढुनि सर्वास्त्रांहीं हाणिति जन्हि एकदा चि अरिसेना,
भीष्म न मानी, जैसा परिसुनि हि दुरुक्ति साधु परिसेना.
त्या समयीं स्वपरांची गणिली तुमच्या न हानि कटकांहीं,
स्वर्गासि पावले बहु भट, परि न पितामहानिकट कांहीं. ११३
भीष्मार्थ युद्ध तुंबळ जालें, पूर्वीं सुधारसार्थ कसें,
असुरांपरि कुरुवीरां गमलें रणमरण तें असार्थकसें. ११४
पार्थशरवर्ष शमवी कुरुकटकातें, जसें जळ दवातें,
बहु उडविले दिगंतीं शरनिकरें गज, जसे जळद वातें. ११५
'हा! हा! हा! हा!' ऐसें म्हणत चि हतशेषबळ पळालें, हो!
तों विजयशरविकळकुरुवरवपु रविबिंबसें गळालें, हो! ११६
पडतां चि भीष्म, पडले, रडले कुरुवीर भूप सुर सगळे,
जाणों तो परमातुरहस्तींचा अमृतरूप सुरस गळे! ११७
शरचिितदेहें जिंकी फळ भीष्म मनुष्यदेव पणसाचें,
समयीं सन्मित्र, तसें भेटे तों त्यास, देवपण साचें. ११८
असुहृदुदासीनांचे भरले भरतिल न अन्य काय गळे?
कांपे क्षिति, जेव्हां तो रथरत्नावरुनि धन्यकाय गळे. ११९
भीष्मावरि दिव्य फुलें देवनिकर, दिव्यतोय घन वर्षे;

१. स्वीकारून. २. अंतःकरण खिन्न झालें आहे ज्याचें. ३. कीर्ति व सुख देणारा. ४. निष्फळ. ५. वणव्यास. ६. अत्यंत आतुर (उतावीळ) पुरुषाच्या हातातील. ७. बाणानीं भरलेल्या शरीरानें. ८. श्रीकृष्ण. ९. शत्रूंचे व उदासीनांचे.

वदले सुरर्षि, 'भो! भो! देवव्रत! साधु! साधु! अनघर्षे!' [1]
पक्वार्कबीजसा [2] न क्षितिस शिवे, वरि च राहिला काय,
वाटे इषुनीं माथां धीरगुरु [3] म्हणोनि वाहिला काय? १२१
पडतां सांजे, बहुधा दिनमणिनें शीघ्र रथ न हाकविला,
मरणानुचित समय हें कळवाया त्वत्पित्या महाकविला. १२२
तों 'दक्षिणायनीं वपु न त्यागावें बुधें, असें कवण
सांगेल या बुधवराप्रति' ऐसें होय दिव्यवाक्श्रवण. [4] १२३
'उदगयन [5] होय तोंवरि मीं शरतल्पी असा चि राहेन,
वाहेन देह शंतनुवरसामर्थ्यें व्यथेसि साहेन.' १२४
ऐसें उत्तर देवुनि, नेत्र झांकी जसा सुपर्यंकीं, [6]
किंवा पूर्वी जैसा गंगेच्या शिशुपणीं उपर्यंकी. [7] १२५
त्यावरि देवनदीनें दायादाचे [8] गुणौघ आठविले,
ऋषि 'उदगयनमरण वर' ऐसें सुचवावयासि पाठविले. १२६
ते हंसरूप घेउनि येउनि करुनि प्रदक्षिणा प्रणती,
'हा दक्षिणायनीं कवि होउनि मरतो कसा?' असें म्हणती.
जाणुनि भीष्म म्हणे, 'या शरतल्पीं [10] तों करीन मी शयन,
भय न धरावें, झांकिन नयन, तंई जैं फिरेल हें अयन. १२८
मज शंतनुगंगागुरुगोविप्रवरप्रसादपात्रास
यात्रासमयभ्रंशें* दुर्गति, ऐसा धरूं नका त्रास.' [11] १२९
इतुकें वदोनि उपनिषदर्थ विचारी सुखें शरास्तरणीं,
रडलों आम्हीं सर्व हि होउनि धवलाश्वशस्त्रपरास्त [12] रणीं. १३०
भीमादि नाचले बहु जेंवि परवधें सुयोध नाचावे,
अस्मच्छोक किति कथूं? शोकव्याळ चि सुयोधना चावे. १३१

---

१. हे पुराणमुने! २. पिकलेल्या रुईच्या बीप्रमाणे. ३. धीरश्रेष्ठ. ४. आकाशवाणी. ५. उत्तरायण. ६. चांगल्या पलगावर. ७. मांडीवर. ८. पुत्राचे. ९. श्रेष्ठ. १०. बाणशय्येवर. ११. भय किंवा खेद. १२. अर्जुनाच्या बाणानी पराङ्मुख केलेले. * अयोग्य काळी मरणामुळे.

द्रोणाला दुःशासन कथिता दे भीष्महानि मोहातें,
रडुनि म्हणे, 'विजयाच्या कुरुगुरु तैसा चि हा निर्मो हातें.'
अवहार करुनि कौरव कवचें शस्त्रें सहाश्रु सोडूनीं,
सकळ मिळाले त्वत्गुरुशरतल्पांजवळ हात जोडूनीं. १३३
पांडव हि सर्व तेथें आले, राया! तयांसि पाहूनीं
भीष्म म्हणे, 'या हो! या' तन्नामग्रहणपूर्व बाहूनीं. १३४
'माजें शिर लोंबतसे, यास्तव उपधान द्या मला तूर्ण,
इतुक्यानें या शयनीं जालें साहित्य वीर हो! पूर्ण.' १३५
तें ऐकतां चि राजे उपधानें बहुत शीघ्र आणविती,
'प्रभुजी! स्वीकारावीं,' ऐसें जोडूनि हस्त जाणविती. १३६
हांसे भीष्म, म्हणे, 'हो! ही उपधानें न युक्त या तल्पीं;
कोण्हा ही वीराचें मन उपभोगीं नसो अशा अल्पीं.' १३७
विजयासि म्हणे, 'बापा! तूं तरि उपधान योग्य दे, हातें
रचुनि दिलें तल्प जसें वत्सा! हें वीरभोग्य देहातें.' १३८
ऐशी आज्ञा करितां त्या शांतनवें समस्तयोधनुतें,
ठेउनि मस्तक चरणीं सज्य करी शीघ्र सुज्ञ तो धनुतें. १३९
अभिमंत्रुनि बाणत्रय गांडीवाच्या गुणासि तो लावी,
सोडी अश्रुसह, नृपा! ती अद्भुत शक्ति काय बोलावी? १४०
लागोनि अधोदेशीं ते घेउनियां सुमंत्रितेषु उशी
उचलुनि धरिते जाले शिर, असि दिधली पितामहासि उशी.
हर्षोनि नदीज म्हणे, "दिधलें उपधान युक्त बापा! हें,
तूं या उचितज्ञत्वें स्वोत्कर्ष रणीं सदैप बा! पाहें: १४२
तुच्छ मजपुढें तो, जो करुनि स्त्रीबाहुची उशी रमला;
चुकतां न लागता तुज पळ ही शापावयां उशीर मला. १४३

१. मूर्छेस. २. मरो. ३. तुझ्या पित्याच्या (भीष्माच्या) बाणशय्येजवळ. ४. उशी. ५. त्वरित. ६. सर्व योद्ध्यांनी स्तविलेल्या (भीष्मानें). ७. धृतराष्ट्रा! ८. सुमंत्रित असे बाण. ९. उसळी.

नृप हो! पहा कसें हें, वीरा शयनीं असें चि ओपावें;
सांबा! समयीं यासम समयज्ञाला म्हणोनि ‘ओ’ पावे. १४४
वपु उत्तरायणीं च त्यागिन, तोंवरि असा चि राहेन,
साहेन उष्ण शीत हि, न तनुकडे, रविकडे चि पाहेन. १४५
परिखा[1] करवा मोटी या शरतल्पासभोंवतीं खोल,
लोल[2] श्वापद मांसीं, लागो तुमच्या न नीतिला बोल. १४६
सोडा वैर नृपति हो! द्या हें मजला, पुरे करा समर;
किति रे तुम्हीं? न पुरला स्पष्ट जरि छंदमृत्यु[3] हा अमर." १४७
तों वैद्यराज आले शिक्षितकचसे[4] चि पोट हि चिराया,
शल्याकर्षणसुनिपुण[5], ज्यांचे कर मूर्त चुंबक[6] चि, राया! १४८
पाहुनि वैद्यांसि म्हणे, ‘घडली हे परम सुगति नवसानीं,
जाळा शरांसह मला, वैद्यांचें कार्य काय अवसानीं[7]?’ १४९
सांगुनि सुयोधनाला त्यांतें धनमान देववी, राया!
त्या सत्वें मानवले भूदेव नृदेव देव वीरा या. १५०
परिखा करउनि, सेवक ठेउनि तद्रक्षणार्थ, पद नमुनीं,
स्वस्थाना गेले नृप, तैसे चि विरक्तिकेलिसदन[8] मुनी: १५१
भगवान् धर्मासि म्हणे, ‘नाहीं च तुळा[9] तव प्रतापा या,
येणें लागेल पर हि लोकालोकाग्रवप्र[10] तापाया. १५२
साक्षात्सूर्य चि मानित होते योद्धे रणीं पहाते ज्या
तो भीष्म भंगिला त्वां, या लोकीं तूं चि बा! महातेजा. १५३
छंदमरण, अतिदुर्जय, अमरांत नसे असी महामरता[11],
भलत्या तेजें कैसा तेज्याचा निधि असीम हा मरता? १५४
स्मरहोम श्रीरुद्रें केला, त्वां भीष्महोम हा देवा!

१. खदक. २. लपट. ३. इच्छामरणी. ४. सुप्रसिद्ध कचासारखे. ५. बाण काढण्यात चांगले कुशल असे. ६. लोहचुंबक ७. मरणकाली. ८. वैराग्याचें क्रीडास्थान. ९. तुलना. १०. लोकालोकपर्वताचें शिखर. ११. मोठा अमरपणा.

योग्य सखा तूं अहितायुर्वारिग्रीष्म[1] हो महादेवा.' १५५
धर्म म्हणे, "जगदीशा! वर्णितिल तुज्या कवि प्रसादास,
केला धन्य तुवां हा, रुद्रें उपमन्युविप्रसा, दास. १५६
पावे तव प्रसादें स्पष्ट नसोनि हि सुयोध नर विजया,
तव सेवका न काळ हि भयद, मग कसा सुयोधनरवि[2]जेयां[3]?
रक्षिसि तूं चि अभिलषित पुरवुनि शरणागता अवनतातें,
बा! तुजपुढें करावें शक्रसमें ही किती अवन[4] तातें? १५८
देतां महत्व दासा, द्या; देतो तात काय तो कनका?
देवूं लागे प्रेमें तरि म्हणतें त्यासि काय तोकें 'नका'? १५९
होउनि बहु प्रसन्न प्रभुजी देतां स्वसेवका महिम्या,
महि म्या न जोडिजेल, सुकीर्ति हि, पूरवूनि देव काम हि म्या?"

---

## अध्याय अकरावा.

प्रातःकाळीं कौरव-पांडव गेले पितामहापाशीं,
दुःखित सर्व हि, जैसे बाळक[5] पडतां पिता महापाशीं. १
स्त्री-बाळ-वृद्ध जाले नुतिनतिपूजांप्रदक्षिणासक्त,[6]
व्यक्त[7] शिवाचे जाणों ते श्रावणसोमवासरीं भक्त. २
लोकांसि मूर्तिमान् शरतल्पीं गमला तुजा पिता महसा.[8]
राजर्षिब्रह्मर्षित्रिदशर्षिसभांतरीं[9] पितामहसा.[10] ३
तो 'पानीयं'[11] ऐसें वदला राया! नृपांसि पाहून,
तों आणविती भक्ष्यें शीतळजलकलश[12] शीघ्र वाहून. ४

---

१. शत्रूच्या आयुष्यरूप उदकास ग्रीष्मऋतूसारखा. २. शनैश्वर—**पंत.** ३. धर्मास. ४. रक्षण. ५. बालक. ६. स्तुति; नमस्कार, पूजा व प्रदक्षिणा यात आसक्त. ७. स्पष्ट. ८. उत्सवसा—**पंत.** ९. राजर्षि, ब्रह्मर्षि व देवर्षि याच्या सभेत. १०. ब्रह्मदेवासारखा. ११. पाणी. १२. थंडगार पाण्याचे कलश.

तें पाहुनि भीष्म म्हणे, 'हा पहिलासा चि काय हो! गमला?
हा! वेडे हो! हे या समईं समुचित[1] मनुष्यभोग मला? ५
काय तुम्हांस म्हणावें? इतरां क्षुधिता पदार्थ हा चारा;
साचा राम चि समरीं जो, तो मद्वत्स पार्थ पाचारा.' ६
प्रार्थी विजय प्रभुला, जेंवि विनयभरविनम्रकाय[2] कपी,
तो 'किं करोमि[3]' हें वागमृत[4] श्रुति भरुनि भरतनायक[5] पी. ७
'शरजाल सोडिलें त्वां भेदाया, जेंवि पर्वता पवि तें,
हें मर्मी चावुनि अहिशतसें[6] मद्देह सर्व तापवितें. ८
बहु बाधते तृषा मज पाजाया तूं चि योग्य तोयातें,
घन जेंवि चातकातें, दावीं स्वोदारभाव तों यातें.' ९
वंदुनि, 'तथास्तु' म्हणुनि, स्वरथीं बैसुनि गुणासि[7] शर ओडी,
सोडी घनास्त्र योजुनि तद्दक्षिणपार्श्वभूमितळ[8] फोडी. १०
भूरंध्रांतूनि निघे सज्जळधारा[9] जसी सुधाधारा,
वदनीं शिरोनि निववी हरिलीलासी च त्या बुधाधारा[10]. ११
होवुनि तृप्त नृपांतें भीष्म म्हणे, 'काय ती सुधा? राहो;
पाजी असा चि मजला गंगास्तन आयती सुधारा, हो! १२
बा! या किरीटिकर्में कौरव ससहाय्य कां न कांपावे?
कंठीरवपाटनपटु[11] भट, यश, मर्दुनि वृकां, न कां पावे?' १३
बहु विस्मित नृप मुनि सुर म्हणती उडवूनि उत्तरीयांतें[12],
'बुडतिल कौरव, दुसरी केंची भेटेल उत्तरी[13] यांतें?' १४
सर्वत्र शंखदुंदुभिघोष परम तुमुळ होय सैन्यांत,
तत्काळ विगतगौरव[14] कौरव गेले बुडोनि दैन्यांत. १५

१. योग्य. २. विनयभरानें वाकलें आहे शरीर ज्याचें असा. ३. मी काय करूं?. ४. वचनामृत. ५ भीष्म. ६ शेकडो सापासारखें. ७. दोरीला. ८. त्याच्या उजव्या बाजूचा भूमिभाग. ९. उत्तम पाण्याची धारा. १०. बुधाचा (शहाण्याचा) आश्रय अशा (भीष्माला). ११. सिंह मारण्यांत कुशल असा. १२. अंगवस्त्रास. १३. उत्कृष्ट नौका-पंत. १४. गेलें आहे श्रेष्ठत्व ज्याचें ते.

शांतनव म्हणे, 'वत्सा! दाखवितो जेंवि नित्य नवल हरी,
तत्सख तसा चि तूं हीं; कीं क्षीराब्धींत नित्य नव लहरी. १६
त्वत्सारथि नारायण तूं नर पूर्वर्षि नारदें कथिलें,
तुमच्या [1]ह्र्षें धन्यें खळकटकें, जेंवि पारदें काथिलें. १७
ज्यापरि नाक तुज यशें न तयापरि मानवे [2]शतक्रतुला,
जिंकिल दुग्धाब्धिसमा कैसें अरिमानवे[3]शतक्र, तुला. १८
जातींत जसा ब्राह्मण, तेजांत तरणि, सरांत कीं जळधी,
चापधरांत तसा तूं श्रेष्ठ, न जाणे तुला कधीं मळधी. १९
हित कथिलें म्यां, विदुरें, द्रोणें, रामें, जनार्दनें; परि तें
मरणारा औषधसें रुचलें नाहीं च या तुज्या अरितें.' २०
दुर्योधनास हि म्हणे, "या जिष्णुपुढें करा पुरे शास्त्रें,
जाणतसे हा अर्जुन सकळें हि महाद्भुतें सुरेशास्त्रें. २१
मोटा सर्वांत हि हा होय महावीर पांडव, न धारा,
केली निर्माण कसी हाणुनि वसुधेंत कांड वनधारा? २२
ऐसें अद्भुत, इच्छुनि सज्जनरक्षा चि, यादवें कृष्णें
हें कर्म करावें की या रिपुकक्षाचियां दवें कृष्णें. २३
ऐकेल कृष्ण माजें, कृष्णाचें धर्म, भीम धर्माचें;
वांच, करूं दे साम; भ्रात्यांचें सख्य मूळ शर्माचें. २४
शेषें असा, वरिली रणरंगीं रंगोनि हानि शांतनवें,
अतिजीर्ण तसें न, जसें म्हणवी भंगोनि 'हा!' निशांत नवें. २५
दे अर्धराज्य, सानुज इंद्रप्रस्थीं अजातरिपु राहो;

१. पान्यानें. (पान्याच्या साहाय्यानें केलेलें कथलाचें भस्म—वगभस्म. फार च गुणकारी होतें, असें वैद्यशास्त्रात सांगितलें आहे). २. शंभर यज्ञ करणाऱ्या इंद्रास. ३. शत्रुरूप राजे हें च नाक. ४. मलिनबुद्धि. ५. इंद्रास्त्रें. ६. लहान. ७. बाण—पंत. ८. पाण्याची धार. ९. शत्रुरूप गवताच्या. १०. वणव्यानें. ११. अर्जुन—पंत. १२. सुखाचें. १३. शिल्लक राहिलेले कौरव. १४. घर.

तुमच्या सामश्रवणें उत्सव या आणि त्या हरिपुरा[1] हो. २६
अत्युग्र भीम काळ चि, हें वचन यथार्थ मान रे! शम[2] रे!;
अमरेश मरेल नृपा! धर्मक्षोभें, न कां नरेश मरे?". २७
राहे भीष्म उगा, कीं, सोडी तव सुत न दुरभिमानातें.
पावे सूक्ति न कुजनीं, हतभाग्यजनीं हि सुरभि मानातें. २८
क्षणभरि उगे चि कौरव-पांडव ससहाय चित्रसे ठेले,
केले प्रणाम दूरुनि, मग सर्व स्वस्थळासि ते गेले. २९
त्याउपरि किंचिदागतभय[3] कर्ण हळू चि जवळ ये, राहे,
पाहुनि मनीं म्हणे, 'शर-कवणा[4] करितिल न केवळ येरा हे?'
तो शरतल्पगत[5] प्रभु गमला गुह[6] शरवणीं[7] जसा पडला,
पडला कर्ण महात्मा, शोकासि कधीं च जो न सांपडला. ३१
कर्ण म्हणे, 'अजि! देवव्रत! निजलां काय हो! विशिखशयनीं?
तो हा, तुमच्या खुपतो कण होउनि सर्वकाळ जो नयनीं.' ३२
नेत्रें उघडुनि, रक्षक दवडुनि, एकांत करुनि हातातें
कंठीं घालुनि, केला पुत्रादर लोभ धरुनि हा तातें. ३३
पुत्रास जसा प्रेमें अनिमिष[8] चंद्राहिपरिस बा पाहे,
एक भुज गळां घालुनि भीष्म वदे, "बोल परिस बापा! हे.
ये ये मजसीं स्पर्धा करिता तूं विप्रतीप[9] मोटा कीं!
आलासि, धन्य होसिल, म्यां त्यजिलां द्वेष, तूं हि तो टाकीं.
जरि काय मजकडे तूं आजि न येतास, समय चुकतास,
कर्णा! कल्याणाला केवळ कविमत असोनि मुकतास. ३६
कर्णा! तुला प्रसवली दिनकरवीर्यें पृथा, न राधा ती,
तरि च कवि विलोकुनि तुज जैसे नारायणा नरा धाती[10]. ३७

---

१ द्वारकेस. २. शांत हो. ३. काहींसा भय पावलेला. ४ ग्रास; घास. ५. बाणशय्येवर पडलेला. ६. कार्तिकस्वामी. ७. शर नावाच्या गवतांत. (कथासंदर्भ परिशिष्टात पहा). ८. टक लावून ९. विरुद्धपक्षी. १०. तृप्त होती.

तूं रविजें[1] असें वदला जो लोकीं मूर्त परमहे[2] व्यास,
दुर्बोधतत्वकथनीं ज्याचा सर्वत्र परम हव्यास[3]. ३८
वदले असें चि नारद केशव मजसीं रहस्य हें मागें,
केले तरी च कुलजें त्वां प्रमुदित विबुध[4] जेंवि हेमागें[5]. ३९
न तुझ्या ठायीं माजा द्वेष, खरें हें मनांत आणावें,
वदलों सभेंत निष्ठुर तें तेजोवधनिमित्त जाणावें. ४०
करितात निमित्तास्तव लोक तिरस्कार जेंवि अनयांचा,
करिसि अधिक्षेप[6] तसा नसतां हि निमित्त पांडुतनयांचा. ४१
संस्कारधर्मलोपें दुष्टजनसमागमें उडे शुद्धी,
मग गुणवंतांची ही सदधिक्षेपीं[7] प्रवर्तती बुद्धी. ४२
हितरतगुरुमन, पाहुनि गतसद्वृत्ता[8] मुलास, कळकळतें;
गुरुकोप भाव्यशिवपरिहारार्थ[9] चि, हें तुला सकळ कळतें.
धरणीवरि समरीं अरिजनदुःसहें[10] मज तुजें सुधनु ठावें;
संध्यार्थ हीं म्हणति तुज सोडुनि निर्लोभ ही बुध नुठावें. ४४
ब्रह्मण्यतागुणें तुज कर्णा! श्रीकृष्ण नित्य मानवतो,
शौर्यगुणें जिष्णु हि, मग काय इतर मागधादि[11] मानव तो?
बा! तूं चि एक दाता, जाले, होतील अन्य बहु दाते;
परिसुनि तव यश, जोडुनि कर, म्हणतिल तुज चि 'धन्य' बहुदा ते.
अस्त्रबळीं शस्त्रबळीं संधानीं लाघवीं वृषाकपिसा[12],
एकांग वीर तूं परबळसिंधुविलंघनीं वृषा[13]! कपिसा[14]. ४७
काशिपुराप्रति जाउनि एकें त्वां शस्त्रवर्ष सोडून,
मोडून शत्रु, कन्यारत्न दिलें कुरुपतीस जोडून. ४८

१. सूर्यपुत्र २. महातेजस्वी. ३. उत्साह; आवड. ४. देव ५ मेरुपर्वताने. ६. तिरस्कार. ७ सज्जननिंदेच्या ठायीं. ८. गेलें आहे उत्तम वर्तन ज्याचें असा ९ पुढें होणाऱ्या अकल्याणाच्या निवारणासाठीं. १० शत्रुजनास असह्य ११. जरासंधादिक. १२. हरिमा किंवा हरसा. १३. 'कर्णा'-पंत. १४. मारुतीसारखा.

दिग्विजयाची केली सत्या त्वां वीरकुंजरा! संधा,[1]
आलें गुणें उणेपण रणरंगीं तुजपुढें जरासंधा. ४९
सर्वमनुष्याधिक तूं तेजोबळराशि दिविषदर्भकसा,[2]
होइल तृणांत तृणसम यज्ञविहित[3] तद्धर्महित दर्भ कसा? ५०
आम्हीं कोप त्यजिला, दैव बहु प्रबळ, पुरुषबळ अल्प;
नाहीं तरि आम्हांला हें व्हावें प्राप्त काय शरतल्प? ५१
मत्प्रिय इच्छिसि जरि तरि पार्थांसीं, नमुनि त्या अजा, मिळ रे!
करिल दया, या नारायणनामें तारिला अजामिळ, रे! ५२
हा कलह मदंतं[6] असो, तूं काळमुखीं न हें कटक टाकीं,
बा! शतकोटि अवीरा म्हणतिल, 'चत! हंत! हा! कटकटा!' कीं!"
कर्ण म्हणे, 'सत्य तुजें भाषण हें भरतनायका! सारें,
म्या तुज अमृताब्धिपुढें मिरवावें स्वयश काय कासारें? ५४
जाणें, राधेय नव्हे, कौंतेय चि मीं असें, असें नातें;
कुंतीमनीं असावें जें पुत्रप्रेम बा! असेना तें! ५५
सांगा, त्याग उचित कीं माजा कुंतीस उचित अत्याग.
मज उपजतां चि मळवत्त्यजिलें याहूनि काय अत्याग? ५६
टाकूं कैसि प्रभुजी! प्राशुनियां सर्व थान, राधा मीं?
स्थिति होय कृतघ्नत्वें नरकांच्या सर्वथा नरा धामीं. ५७
भोगुनि ऐश्वर्य कसें समयीं दुर्योधनासि सोडावें?
मोडावें म्या स्वकृतज्ञत्व, कृतघ्नत्व कोंवि जोडावें? ५८
जैसा धनंजयाचा परमदृढव्रत सहाय यदुप[11] कृती,
तैसा कुरुपतिचा मी कीं बहु राज्यार्पणादि यदुपकृती.[12] ५९
दुर्योधनार्थ यापरि सधनतनयदार सोडिलों काय,
आनृण्य[13] न जोडावें, तरि आम्हीं अर्थ जोडिला काय? ६०

१ प्रतिज्ञा. २. देवपुत्रासारखा. ३. यज्ञास योग्य ४. शास्त्यांनीं स्तविलेला. ५. श्रीकृष्णास. ६. माझ्या अंतापर्यंत ७ निष्पानिसुता—पंत. ८. अरेरे! हाय हाय! ९. लहान सरोवरानें. १०. मोठा अपराध. ११. श्रीकृष्ण. १२ ज्या

व्हावें शस्त्रें चि रणीं वीरांचें गलित, न वपु रोगानें,
सकळा मर्त्यजनानें सुख द्यावें नित्य नव पुरोगानें. ६१
क्षत्रियशरीर जें जें पात्र सुशस्त्रा न आमयातें हो,
हा पक्क विचार; तुम्हीं म्हणतां कां व्यर्थ आम यातें हो!? ६२
दुर्योधनाश्रयें म्यां कोपविले पार्थयोध याकरितां.
हा समरांत मरो द्या क्षत्रियजन, काय बोध या करितां? ६३
बा! सर्वक्षत्रक्षयसूचक उत्पात बहुत होतात,
सकळ मरोत रणीं सुत किंवा शोकांत न हुत हो तात! ६४
अच्युत-पांडव सकळां मर्त्यांस अजेय हें हि या कळतें,
परि योग्यवीरसमरक्रीडोत्सुकाचित्त काय आकळतें? ६५
जिंकिल चवघांस सुखें हा कर्ण, असाध्य पांचवा यास,
सारथि होउनि जपतो जगदीश्वर त्यास वांचवायास. ६६
शक्रास हि प्रतापें मदिषूंचा दापिता महानिकर;
त्यावरि कीं तदिषूंचा मजवरि करु बा! पितामहा! निकर. ६७
बहु कटु तुम्हांसि वदलों, कीं, नुरवी शांति परमनीं चपळ,
प्रभुजी! क्षमा न करितां तरि हा नुरता चि परम नीच पळ.
युष्मदनुमोदनानें धरिल मदुत्साहशक्ति पुष्कलता,
दग्धलता अमृतघनें फळती, न फळेल काय शुष्कलता? ६९
माजें दुरुक्त तुमच्या चित्तीं नाहीं च राहिलें कांहीं;
परि चुकतां विनवावें ताता करुणाकरा हि लेंकांहीं.' ७०
भीष्म म्हणे, 'कर्णा! हे मति हो तुज सर्वकामदा ज्ञात्या!
आपण अनुसरलों ज्या कर्मा होइल न कां मदाज्ञा त्या? ७१
जा, सद्वृत्त न सांडुनि युद्ध करीं, त्यजुनि गर्वभयशोक
हो कठिन, प्राप्त तुला होतील क्षत्रधर्मजितलोक. ७२

१ पुढाऱ्यानें २. रोगास. ३. कच्चा. ४ या पूर्ण विचारास. ५. भस्म. ६. धर्म, भीम, नकुळ व सहदेव यांस. ७ अर्जुन ८. माझ्या बाणाचा. ९. धाक दाखविणारा. १०. मोठा समुदाय. ११. कहर. १२. क्षत्रियधर्माने जिंकलेले (क्षत्रियधर्मानसारी).

प्रशमीं प्रयत्न केला परि माझें ही न चालिलें कांहीं,
हे काढिली नवी धृतराष्ट्राच्या हीनं चालि लेंकांहीं. ७३
जा, परि पळ पाहूं दे वदन, करीं पूर्ण काम हा, भागें;
ठाक पुढें चि; धरावी इतुकी त्वां भीड कां महाभागे?' ७४
यी भीष्मप्रभुवचनें आवरला रविसुतासि न गहिंवर,
प्रेमभर चि विकळ करी धीरा, न तसा पडोनि नग[2] हि वर.७५
वंदुनि आज्ञा घेतां, आणी कर्णासि हुंडका[3] नातें,
सुच्छात्रासि सुगुरुचें जैसें लागोनि तुंड कानातें. ७६
निघतां प्रदक्षिणा त्या परमोदारा करूनि तो रडला.
रामघन वनीं त्यजितां जेंवि बहु भरतमयूर ओरडला. ७७
हें 'भीष्मपर्व' पावो साधु-श्रुतिशष्कुली-नभा[6] सावें,
श्रीव्यासकृत मयूरेश्वरविलिखित वेगळें न भासावें. ७८
पुरुषा आर्यावृत्तें जैसी, ग्रंथा जया तसी मोटी
शोभा आर्यावृत्तें आली, भुलतील यासि कविकोटी. ७९
ग्रंथ प्राकृत दिसतो परि न प्राकृत विलोकितां नीट,
गोपांत गोप भासे कृष्ण, परि नये चि पाहतां वीट. ८०
रसिक कवि, परम सज्जन, भगवद्भक्त प्रसन्न होतील
न गमेल यापरिस हित तो, जो वदनांत अमृत ओतील. ८१
कीं या विजयग्रंथीं हरिहरिजनसत्कथा, दुजी थोडी;
गोडी अन्यकथांची नित्य इला त्यजुनि गर्व कर जोडी. ८२
श्रीनारद वाल्मीकि व्यास पराशर वसिष्ठ शुक सुकवी
प्रतिभारक्षक; नाशक खळ किति? अमृताश्रिता[10] दंव न सुकवी.

इति श्रीमदार्याभारते श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिते भीष्मपर्व
श्रीमत्सीतानाजानिपादपद्मयोः समर्पितम ३० तत्सत

१. शांतनेमाठी, समेटामधी २. पर्वत ३. हुंदका. ४. शिष्यत्वाचें नातें. ५. रामरूपी मेघ. ६ सज्जनांच्या कर्णरंध्रावर जावो. ७. मती-पंत. ८. छंद:-पंत. ९. स्फूर्तिरक्षिते. १० अग्नि-पंत.

# द्रोणपर्व.

## अध्याय पहिला.

(प्रथमदिनयुद्ध).

योधवरतातपतनें[1] अनुदिन धृतराष्ट्र होय कष्टी, तें
किति वर्णावें? विजनीं[2] अंध रडे हारवूनि यष्टीतें. १
योगीश्वरसा साक्षाज्जो[*] पाहे सर्व संजय ज्ञानी,
तो ये पुरासि[3] चिंतित जें गावें पादकंज[4] यज्ञानीं. २
'शिबिराहुनि आलों मीं संजय, नमितों' असें वदे, त्यातें.
नृप वृत्त पुसे, सांगे गावल्गणि[5], कर्ण-चित्र दे त्यातें. ३
'भीष्म पडतां चि गेले सर्वांचे ही पळांत आवांके;
नसतां धुरंधर वृषभ बाळवृष भरें करूनि आ वांके. ४
कुरुकटका आठवला कर्ण महासंकटीं गजा[6] हरिसा;
देउनि दर्शन वदला तो जें तें सर्व सांगतों, परिसा.' ५
'देवव्रतें[7] चि केली सत्य असाधारणा प्रतिज्ञा ती;
आहे क्षम भाराच्या कोण असा धारणाप्रति ज्ञाता? ६
रविरुचिचें तीमागें संपादे स्वल्प काज वातीस?
विसरविल काय तेज प्रकट करुनि अल्प-काजवा तीस? ७
भीष्माच्या पतनाची[9] चित्तांत धरूं नका व्यथा राया!
कुरुगुरुपुढें समर्थ न सुरगुरु, तो ही न काव्य[8], थाराया. ८
प्रार्थुनि अभिषेकावा, देइल वर, होय सुरतरु[10] चि, राज्या!'

---

१. वीरश्रेष्ठ जो पितामह (भीष्म) त्याच्या पतनानें. २. निर्जन अरण्यांत. ३. हस्तिनापुरासि. ४. पादकमल. ५. संजय. ६. गजेंद्राला. ७. भीष्में. ८. शुक्राचार्य. ९. उभे राहण्यास. १०. कल्पवृक्ष. * साक्षात्+जो.

वरितिल देवी आणति सर्व कळा विविध सुरतरुचिरा ज्या.'
कुरुराज म्हणे, 'गुरुजी! सेनापति शत्रुबळविरामा व्हा,
तुमची आज्ञा पळवू अहितमदा, जेंवि पळवि रामाज्ञा.' १०
द्रोण म्हणे, 'सेनापति होतों म्हणतोसि जरि, परि स्पष्ट
धृष्टद्युम्नासि न मीं वधिन, करीन त्वदर्थ बहु कष्ट. ११
मी समर पांडवांसीं करिन, हरिन अरिनराधिपतिकटकें.
भट केंवि टिकेल इतर? गरुड निरग्विजेल काय गा! चटकें?
मज गुरुसीं गुरुवत्सळ पांडव रण न करितील उत्साहें:
येईल चि तद्वित्तीं की होइल सज्जनांत कुत्सा हें.' १३
ऐसें वदोनि कुरुगुरु विधिनें अभिषेक करुनि घे, राया!
त्यासि न शकले पांडवभटकोटि हि धैर्य धरुनि घेराया. १४
गुरुरथवेग असह्य चि जाला त्या विष्णुपत्ररथवेगा,
केला पांच दिवस बहु युद्धचमत्कार तो न कथवे गा! १५
धृष्टद्युम्नें वधिला अन्यायें, सकळ सैन्य हळहळतें,
गुरुमरण तसें देतें जैसें दे मोह दैन्य हळहळ तें. १६
धृतराष्ट्र विलाप करी, बहु आपण आपणासि निंदुनि घे:
स्मृति हरपे करपे चि, न तन्नयनांतूनि अश्रुबिंदु निघे. १७
'सूता! जो वाढविला स्वपराक्रमसा च विप्र मत्तातें
धृष्टद्युम्नें वधिला! हें वाटो साच विप्रमत्तातें. १८
भीष्मद्रोण रविशशी गिळिले पांचाळकाळराहूनीं
निर्वावित होते की ते जननयना सर्वकाळ राहूनीं. १९

१ ऋद्धि, सिद्धि वगैरे देवी. २ शृंगाररसपरिपोषक अशा सर्व कला (कर्णाचा अभिप्राय असा की, द्रोणांनी मन पवक युद्ध केल्यास सर्वशत्रुनाश होऊन आम्हास सुखाने सुखोपभोग घेण्यास सापडेल).' ३ नामप्रभाव. ४. शत्रुकडील राजांचीं सैन्यें. ५. त्रिमणीनें ६. उत्साहानें गुरूबरोबर युद्ध करणें हें. ७. विष्णूचा पत्ररथ जो गरुड त्याच्या वेगाला ८ भीष्मानें. ९. अतिउन्मत्ताला. * मळांत या आर्येपुढें या च अध्यायांतील ४४ वी आर्या चुकून पडला आहे.

मरण न ये, उर न उलें, जन्हि हें बहु शोकपर्व[1] तापविते;
विधि[2] न धरी भेदाया कां या धृतराष्ट्रपर्वता पविते[3]? २०

कविवृंद सदुपदेशें तुज सिणउनि देवि! वाणि! तळमळले:
हा कोळसा कराया शुद्ध धुतां, व्यर्थ पाणितळ मळले! २१

बहु जन बुडउनि शोकीं दुष्टा दुर्योधना! बुडालास;
मकरालय[4] लंघाया मत्ता मशका! कसा उडालास? २२

गज गोष्पदीं बुडाला! हा दैवा! सिंधु शोषिला मशकें!
न शकें सोसाया हें, वधिला तो केसरी कसा शशकें? २३

आली मूर्छा, सूता! उत्तम होईल जरि न वांचेन,
कांचेन आधिपाशीं, सुत शोक चि, गुण सुपाक यांचे न. २४

हा! भार्गवास्त्रसर्वस्वसुपात्रा![5] त्वद्बळें हरिप्रति मी
न वचकलों, नव्हतों जयकण कल्पित अर्जुनीं हरिप्रतिमीं. २५

हा द्रोणा! हा द्रोणा! हा द्रोणा! मृत्यु तुंज कसा घडला?'
ऐसें रडोनि धडडड धरणीवरि तो धरापती पडला. २६

यापरि कुरुगुरुच्या बहु शोकभरें होय काय कारा[6] ज्या,
उठविति वारा घालुनि, सिंपुनि शीतांबु, बायका राज्या. २७

दैवें, आमोपायें कश्मळजळधीस[7] तो नरपति तरे:
करुनि बहु विलाप म्हणे, 'निंदिल धर्मासि जो नर पतित रे!

रे संजया! महात्मा राजर्षि अजातशत्रु कोपविला;
पुण्यश्लोक, तपोनिधि, भस्म कटाक्षें करील तो पविला. २९

एकें चि गदाघातें भेदिल भीमप्रभाव भीम नगा,
शरभास जसें हरिचें, माजें ऐकोनि त्यास भी मन गा! ३०

अर्जुन नर, नारायण कृष्णप्रभु परमपूतनामा,[8] या

---

१. शोकप्रसंग. २. दैव. ३. वज्राला ४ मकर=मगर+आलय=घर=समुद्र. ५. भार्गवरामाच्या सर्व अस्त्रसमूहाचें उत्तम पात्र असा हे (गुरुद्रोणा!). ६. शरीर हा च बंदीखाना. ७. मूर्छारूप समुद्रास. ८. परमपवित्र नाम ज्याचें असा.

बाळपणीं हि न शकली माराया करुनि पूतना माया[1]. ३१
वधिला वत्स, अघ, तृणावर्त, कपटि खळवतंस[2] बक, राहो.
कालियकेशिदमन हरि[3] हरि, हरि! हरि! होय कंस बकरा हो!
न सरेल वानिलें जरि दिव्यसहस्राब्द[4] आठ याम[5] हि म्यां,
लाजोनि अनंताच्या[6] ज्ञानें दिधली[7] च पाठ या महिम्यां. ३३
जात्यंधास हि मजला देवें निज दिव्यरूप दाखविलें:
शकुनि दुर्योधनीं दीना रोगदास[8] अमृत चाखविलें. ३४
केला नाहीं[9] च नरक निज नामानें तसा चि चक्रानें.
बळ पारिजात हरितां दाखविलें यासि काय शक्रानें? ३५
दुर्वासा भगवान् बहु वर देता जाहला सदा गरज्या,
जो जगदीश्वर जपतो, निज निधिला कृपणसा, सदा राज्या. ३६
मरतील जरि कथंचित्[10] सतनय पांडव समस्त हि, तथापी
न भलें; कीं राज्यपदीं ईश्वर चि करुनि समस्तहित थापी. ३७
तो ईश्वर कृष्ण करें कवळिल कदना कराल[11] करवाल[11]:
सांगा तुम्हीं कवि कुशळ काय कसें रे! कराल, करवाल? ३८
कौरव मारुनि देइल निष्कंटक सर्व राज्य आतेला[12].
त्यजुनि हित, अहित घे तो. खळ करितो वमुनि आज्य आ तेला.
मीं, माझें हें घातक; लागो या आजि आग मोहाला:
न मनांत अहंममताभ्यधिका लोकास या गमो हाला[13]. ४०
सांग रणकथा; काढिल, नसतां मनिं मोह, काय बाप रडें?
वांकेल ताजव्याचें भारावांचूनि काय बा! परडें?' ४१
संजय म्हणेः—नृपा! मन लावूनि अनश्वरीं[14] सुखीं[14] न रडें;

---

१. कपट. २. दुष्टशिरोमणि. ३. कृष्ण हरि (सिंह) होय (झाला). [व] कंस हा बकरा झाला. ४. देवांचीं हजार वर्षे. ५. प्रहर. (अष्टौप्रहर). ६. शेषाच्या. ७. माघार घेतली, पळ काढला. ८. रोग्यास. ९. नाहीं च असा. १०. कदाचित्. ११. भयंकर खड्ग. १२ कुंतीला. १३. मद्य—पेय. १४. नश्वर नव्हे असे जें नित्यसुख त्याचे ठिकाणीं.

हो सावध, काळानें जों नाहीं घातलें मुखीं नरडें. ४२
पुत्रासराज्यमोहें होय जरि तुज व्यथा, परि सराया
मोह श्रोत्यांचा, मीं कथिन गुरुवरें कथा, परिस राया! ४३
स्वीकारुनि अभिषेक द्रोण म्हणे, 'मज अभीष्ट वर मागें.
लोपविला चि नतजनासुहृदर्क गुरुप्रसादचरमागें.' ४४
दुर्योधन नमुनि म्हणे, 'धर्म धरुनि मजसमीप आणावा;
गुरुजी! मज कोटिवरस्थानीं हा वर अभीष्ट जाणावा.' ४५
द्रोण म्हणे, "कुरुराया! या भरतकुळांत धन्य पांडव गा!
तरि च सुर म्हणति, 'नट्ट हो! धर्माचे गुण, करूनि तांडवें, गा.'
पुण्यश्लोक, युधिष्ठिर, अजातरिपु, धर्मराज, ज्या नावें,
वानावें भगवत्सम, कविनीं मानव असें न मानावें. ४७
वसुधा त्याचा द्वेष्टा कोणही नाहीं च, आजि हें कळलें;
मळलें न द्वेषें मन तरि च प्रेमें रसें असें वळलें. ४८
प्रथम रणीं जिकावें, मग द्यावें काय राज्यपद भावा?
आणा धरूनि, न वधा म्हणसी, याच्या स्वयें चि वद भावा."
त्वपुत्र म्हणे, "गुरुजी! अर्जुन भीम हि न आवरायाचा,
पाहुनि तुम्हांसि संमुख समरीं, जाईल आव रायाचा. ५०
कीं जन्हि तेजस्वी तो साधु, मृदु शशी, तुम्हीं तपनसे हो!
कुतुकें धराल, त्याच्या पदरांत तुम्हांअसें तप नसे हो! ५१
कथितों द्यूतीं पहिल्यापरि जिंकायास पांडव धराया,
कां अन्यथा न म्हणतों? 'बा! हाण उरांत कांड, वध राया.'
वधिल्या धर्म, नसे जय, भीमार्जुन परम उग्र अंतकसे
कोपें खवळुनि आम्हां सकळांचा न करितील अंत कसे? ५३
म्हणुनि धरुनि दवडावा द्यूतीं जिंकुनि वनास दायाद;

१. शरण आलेल्या लोकांचे शत्रु हा च सूर्य, तो गुरुप्रसादरूपी पश्चिमेकडील पर्वताने लोपविला. २. नृत्य. ३. प्रेमरसानें. ४. मनातील हेतूला. ५. महाभारतें. ६. बाण. ७. धर्मराजाला

आणे स्वहित धूता मच्चित्त, जसें वनां सदा याद." ५४
हृदयीं बहु हांसोनि द्रोण म्हणे, 'युक्ति बहु भली सुचली,
राजमना जी कांहीं रुचली, ती च प्रजामना रुचली. ५५
परि जरि हरिसारथि मज, धर्माला गांठितां, न लक्षील.
तरि करिन कार्य हें मीं; भीमादि न अन्य शूर रक्षील. ५६
याकरितां सर्व तुम्हीं तो कुरुसंताननलिनरवि रोधा,
विजयापुढें जय कवण पावेल करूनि बलि नर विरोधा? ५७
जन्हि म्यां प्रथम पढविला, बाळपणीं पुत्रसा च खेळविला,
तन्हि मदधिक, कीं तेणें परमेशास्त्रप्रसाद मेळविला. ५८
वृद्ध ब्राह्मण मीं, तो तरुण क्षत्रिय, मला न आटेल,
भार्गवनदीजसमर स्मरतां मद्वचन सत्य वाटेल. ५९
न्यील उपायें अर्जुन दूर तरि धरिन रणांत धर्मातें;'
या सांतरैंवरदानें पावे बालिशसमूह शर्मातें. ६०
परहित गुरु म्हणुनि करी मंत्राचा स्वकटकांत बोभाट,
होय श्रुतप्रतिज्ञास्थैर्यार्थ नृप स्वयें चि तो भाट. ६१
हें दूतमुखें परिसुनि, धर्म म्हणे अर्जुना, "महाबाहो!
बा! हा भ्राता, कोणा व्यसनीं घेवूनि नाम हा वाहो? ६२
गुरुनें सुयोधनाला, देतों मज धरुनि, हा दिला वर हो!
न घडो हें समरीं; मी मेल्यावरि तो सुखें इलावर हो! ६३
अंतर वरांत आहे वत्सा! तें कळवितों, बरें परिस;
'धर्म धरिन जरि विजय न रक्षिल' गुरुवर वदे असें अरिस.
यास्तव समीप चि रहा समरीं होऊनि अनलस मदवना,

१ जलाम. २. अर्जुन. ३ कुरुवंशरूप कमलांना (म्लान करणारा) सूर्य च असा (अर्जुन). ४ महादेवाच्या पाशुपतास्त्राचा लाभ. ५. आवरेल. ६ परशुराम आणि भीष्म यामध्ये झालेले युद्ध. ७. अंतर (पळून जाण्याला वाट) ज्यामध्यें आहे अशा (संदिग्ध) वराच्या दानाने. ८. सुखातें. ९. शत्रुचा (पांडवांचा) हितकर्ता. १०. भूपति. ११ निरलस. १२. माझ्या रक्षणाला.

आश्रयगुणें लघु हि गुरु होय जनालंघ्य अनळसम दवेंना.[1]" ६५
विजय म्हणे, 'त्या गुरुचा वध, या गुरुचा[2] हि उचित न त्याग.
जरि करिन भवदुपेक्षा तरि मग याहूनि कोण अत्याग[3]? ६६
सोडीन प्राण, परि न गुरुवरि मरणार्थ बाण सोडीन,
मोडीन न प्रतिज्ञा, बोलुनि अनृत न अकीर्ति जोडीन. ६७
क्षितिवरि खचोनि सहसा सग्रह नक्षत्रमंडळ पडेल,
पृथिवी विरेल, परि हे दुष्टाची कार्यसिद्धि न घडेल. ६८
प्रभुजी! हा मीं सेवक जीवंत[4] असें तसें कसें होतें?
पुण्यप्रताप तुमचा सिंह, सकळ शत्रुबळ.ससें हो! तें. ६९
जरि ससुरासुर साक्षात् स्मरहर होइल सहाय पापा हो.
समरीं अदृष्टपूर्व स्वपरिभवा तो महातपा पाहो. ७०
असतां समर्थ सारथि, अरिचीं आम्हांस काय परवा हो!!
शोणितपुरीं[5] गृध्रश्येनकृतग्रासकाय[6] पर वाहो. ७१
दुर्लभ अहिचा वाळा होय स्पर्शीं च काळसा चि मणी,
होईल काय हंसी गति टाकुनीं हि आळसा चिमणी? ७२
त्याला वर कुरुगुरुनीं, अभयवर दिला तुम्हांसि गुरुगुरुनीं[7],
सिंह शरभाश्रिताचें करतील अनिष्ट काय गुरुगुरुनीं?' ७३
अर्जुनवागवसानीं[8] बहु वाद्यें वीर गर्जले हरिसे;
अरिसेना भी; जाणों ती सिंहरवासि गजघटा[9] परिसे. ७४
मग आह्मी ते करिते झालों स्वजयार्थ आहवारंभा[10];
भट म्हणती, 'वीररसें शृंगाररसांत वाहवा रंभा[11].' ७५

१. एक शिवप्रिय सुगंधी वनस्पती. २. धर्माचा. ३. मोठा अपराध ४. असेंपर्यंत. ५ रक्ताच्या पुरांत ६ गिधाड, ससाणा इत्यादिकांनीं खाऊन टाकिला देह ज्याचा असा. ७. परात्परगुरूनीं. (भगवान श्रीकृष्णानीं). ८ अर्जुनाचें भाषण संपल्यावर. ९. गजसमूह. १०. युद्धारंभा. ११. देवांगना. (असें समरकर्म गाजवा कीं, हजारों वीर धारातीर्थी पडून स्वर्गी देवांगनांना शृंगाररसांत बुडवितील).

आम्हां अर्जुनपालितधर्मनृपबळाकडे पहावेना;
त्या पांडवां हि कुरुगुरुरक्षितकटकप्रभा सहावेना. ७६
राया ! दोन्ही हि चमू स्तिमित क्षणमात्र राहिल्या होत्या;
चित्रीं जेंवि लिहाव्या, सर्वांहीं तेंवि पाहिल्या हो ! त्या. ७७
व्यूहांतुनि रुक्मरथ द्रोण चमूपति निघे महातेजा
घनपटलनिर्गत तरुण तरणि म्हणति निपुण हा पहाते ज्या.
इतर भट किती ? पाहों न शके चि श्वेतवाह,,वीरा या,
सोमक पांचाळ वधुनि रक्ताची सिंधु वाहवी राया ! ७९
भट गांठिती भटांतें, अहि अहितें, जेंवि पतग पतगातें,
कीं हरि हरितें, अत्यद्भुत होय द्वंद्वयुद्धशत गा ! तें. ८०
सौभद्र-पौरवांचें अत्युग्र द्वंद्वयुद्ध परिसा हो !
तुमचें निजापकर्षा धर्मोत्कर्षासि, चित्त परि साहो. ८१
करितां सारथिमस्तककोदंडच्छेद पौरवें अहितें,
आर्जुनि असिचर्म धरुनि गांठी अरितें, जसा गरुड अहितें. ८२
खंडुनि सूतशिरध्वज वामकरें केशभार दृढ धरिला,
पाडुनि रथाखालें द्यावी जों की कबंधता अरिला, ८३
तों खड्गचर्म घेउनि सिंधुप, टाकुनि उडी रथावरुनी,
गर्जुनि हरिपरि अरिवरि धावे तद्वधमनोरथा वरुनीं. ८४
त्या पौरवासि सोडुनि सौभद्र जयद्रथावरि उगारे:
हांसुनि म्हणे, 'हरिपुढें वृक शशकार्या न थावरि, उगा रे !'
सैंधवसैनिकशस्त्रें खड्गें खंडुनि सरोजनाभाचा,

---

१ निश्चल. २ ज्याचा रथ सोन्याचा आहे असा द्रोण. ३ मेघमंडळांतून बाहेर पडलेला. ४ पक्षी ५ धर्मराजाच्या (पक्षी) नीतीच्या उत्कर्षास. ६. शत्रु जो पौरव त्याने ७. अर्जुनपुत्र. (अभिमन्यु). ८. तरवार व ढाल ९. शिरोविहीनता. १० सिंधुदेशाचा राजा जयद्रथ. ११. चालून जाई. १२. सिंहासमोर लांडगा [क्षुद्र] सशाची शिकार करण्याकरितां [सुद्धा] उभा रहात नाही. १३. गप्प बस रे १४. पद्मनाभाचा (श्रीकृष्णाचा) भाचा (अभिमन्यु).

मोही, वीरजना हरसा, स्मरसा अप्सरोजना, भाचा. ८६
असि भंगतां प्रहारें, लोकांत न थापटुनि भुजा माते.
ज्या माता भी तें करि; कीं जाय तुजा पळोनि जामाता. ८७
कटकीं जयद्रथाच्या कदन करी त्यजुनियां दया दवसा;
गमला परां जनकसा[4] तो किंवा दानवांसि यादवसा. ८८
लोकमुखें 'धन्य' असें जों म्हणुनि, रणांगणांत राहुनि, घे,
सौभद्रसुधांशुवरि[5] ग्रासाया मद्रराजराहु[6] निघे. ८९
वारुनि सुतासि भीम, स्यंदन सोडुनि, महाभुज गदेतें
घेउनि शत्रुभटांला दे, भेकांला महाभुजग दे तें. ९०
अवकाश सिंहनादें भरिती ते शूरसत्तम नभाचा,
मामासा नात्यासि न दे वीररसप्रमत्त मन भाचा. ९१
भीमगदा शल्यातें, शल्यगदा एकदा चि भीमातें
ताडी, मूर्छित पाडी; कांपविती सांगतां हि भी मातें. ९२
कृतवर्मा शल्यातें स्वरथीं वाहोनि शीघ्रतर पळवी.
होय स्वयें चि सावध भीम, न तो मोह तद्दशा मळवी. ९३
उठतां चि तो गदीश्वर भीम, पळे कुरुचमू न राहे ती,
अमरा हि जी न सोसे त्याची सोसेल कासि नरा हेती? ९४
कर्णाचा नंदन वृषसेन कुरुबळासि अभय दे, वागे:
तेणें केलें पांडववीर गुहें जेंवि सभय देवारी. ९५
पाहुनियां निज सैन्यें वृषसेनशरप्रलयघनाकुलितें
जें आश्रितावनें यश गिरिधर[11] जोडी, स्वयें हि नाकुलि तें. ९६
चापध्वजी खंडुनि बहु शर सोडी कर्णसुत शतानीकीं,

१ नरवीर २. ममाबता—पंत. ३ ज्या पलायनाला ४ पार्थसा—पंत. ५ अभिमन्युरूप चंद्रावर. ६. शल्यरूप राहु ७ कार्तिकस्वामीनें. ८. राक्षस. ९ वृषसेनाच्या बाणवर्षावरूपी प्रलयमेघानें व्याकुळ अशा १०. आश्रिताचें रक्षण करण्यानें ११ गोवर्धनधारी (श्रीकृष्ण) १२ नकुलपुत्र. (शतानीक) १३ नकुलपुत्रीं—पंत. * अभिमन्यूला एकीकडे मारून.

बंधु म्हणति हा केला अहि विकळ पिपीलिकाशतानीं कीं. ९७
ते द्रौपदेय चवघे वृषसेनीं विशिख वर्षले शतदा,
न उरे कुरुकटकमनीं युद्धजयोत्साह, हर्षलेश तदा. ९८
त्या द्रौपदीसुतांवरि कर्ण, कृप, द्रौणि धांवले हरिसे;
त्यांवरि पार्षत, सात्यकि, भीम हि उठले, जवें मनासरिसे. ९९
करिते जाले युद्ध क्रुद्ध शरभसिंह-देवदानवसे;
मानवसे गमले न, स्नेहकण हि तन्मनीं तदा न वसे. १००
उठली युधिष्ठिरचमू जसि महिषासुरबळावरि भवानी;
शोभति सुभटभुज जिचे असकृत्कृतशत्रुबळपरिभवानीं. १०१
स्वबळक्षय पाहूनि द्रोण करी क्षत्रियांत भार्गवसा;
वीरांसि म्हणे, 'स्वर्गी जा, मच्छर दावितील मार्ग, वसा.
रंविला झांकी गगनीं कुरुगुरु, बहुशर भरी, तिमिर विखरी;
लीळेनें नरकेसरि लक्ष चिरी, शरभरीति मिरवि खरी. १०३
धर्माला गांठाया धांवे तो विप्र, कटक विसकटुन.
यांटे तदेकविशिखाहुनि सिंधुजगरळघट कविस कटु न. १०४
मदमत्त मतंगज की मर्दी जैसा समीर कदलीतें,
कुरुगुरु तसें करी, तें पुरिसा कटकें सकंप वदली तें. १०५
'पक्षिपति पक्षपवनें उडउनि जळ सागरी अहिस धरितो,
करितो तसें चि कुरुगुरु, हा! हा! कृतकृत्य होतसे अरि तो.
हा आला! हा आला! कोंडील युधिष्ठिरासि शरभवनीं:
शिरला समोर चि, जसा सिंहासि वधावयासि शरभ वनीं.'
आम्ही वदलों, 'केलें जें हृदय निसर्गमृदुल कर्कश तें,
धरिला चि धर्म गुरुनें:' निश्चय केला असा चि तर्कशतें. १०८
येतां समीप गुरुला पाहुनि आधीं मनांत कर जोडी:

१. बाकीचे चौघे बंधु. २ शेंकडो मुंग्यांनी, ३. द्रुपदराजा. ४. अनेक वेळां केलेल्या शत्रूंच्या पराभवानीं. ५. नरश्रेष्ठ द्रोणाचार्य ६. लाखो वीर. ७. गरुड. ८. पखांच्या वाऱ्याने. ९. शत्रु. (दुर्योधन).

सोडी श्वास शर, तया धर्म म्हणुनि धर्म संगरीं झोडी. १०९
धर्माच्या चापातें कुरुगुरु एकें चि मार्गणें तोडी;
झोडी भीमप्रमुखां बहुतांतें, बहुबळें बळें मोडी. ११०
भग्नार्तस्वभटोच्चध्वनि परिसुनि विजय निजयशोदात्या
सूता 'हूं, हाक' म्हणे, ज्या जपल्या देवकी-यशोदा त्या. १११
दुस्तर संकट पडतां मारिति शक्रादि हाक वीरा ज्या,
त्या जगदीशाकरवीं 'हूं' म्हणुनि हयांसि हाकवी राज्या! ११२
द्रोणानीकीं केला शरवृष्टि करूनि घोळ वीरानें
लोळविलीं रथवृंदें बहु, जैसीं वात लोळवी रानें. ११३
रक्तनदी वाहविली राया! त्या शत्रुसिंहशरभानें,
केवळ कुरुकटकांचीं हरिलीं, विखरुनि अनंतशर, भानें. ११४
जे विजयमुक्त सायक भरिती, झांकुनि रविप्रति, नभा ते;
सरतिल सरतिल मागें कधिं तरि च्यारि हि अपांपति, न भाते.
दाटे बहु निबिड तिमिर राया! त्या विजयरचित शर-भवनीं
आम्हां दिग्भ्रम जाला जैसा सिंहांसि होय शरभ-वनीं. ११६
असुरचमूचा बहुधा धीर तसा नृहरिनें नसे नेला.
म्यां सर्पदष्टकन्येहूनि उणें पाहिलें न सेनेला. ११७
तों रवि गेला. जाणों सकळकटककदन राहवाया तें
करिजेल कां न अद्भुत शक्राद्यजितें नराहवायातें? ११८
आलों शिबिरा वर्णित विजया गुरुहून अंगपाहून,
भ्यालों अन्योन्याचें पर्णकुसुमवर्ण अंग पाहून. ११९
परते पार्थ, गजांच्या शून्य करुनि जेंवि हरि समस्त वना;

---

१ बाणानें. २. पराभूत झाल्यांमुळे आर्त झालेल्या स्वपक्षीय वीरांनीं मोठ्यानें केलेला कोलाहल. ३. द्रोणसैन्यामध्यें. ४. तारबळ उडविली. ५. चार दिशेचे चार समुद्र. ६. दिशाभूल. ७. कृष्णें-**पंत.** ८. अर्जुनाच्या युद्धासाठीं आलेल्या. ९. द्रोणाचार्याहून. १०. कर्णाहून-**पंत.** ११. पलाश-**पंत.**

अजितत्वगुणें होय स्तोत्यांच्या विषय हरिसम स्तवना. १२०
द्रोण म्हणे, 'कुरुराजा! मद्वचन प्रत्ययासि आलें कीं?
विजयनिवारणशक्ति न माज्या चापीं, न माजियां[1] लेंकीं. १२१
युद्ध कराया हटकुनि विजयाला न्याल दूर जरि सारे,
धरिन न पळतां धर्मा; कौरव हो! हें यथार्थ परिसा रे!' १२२
तेव्हां म्हणे सुशर्मा, 'जरि न द्विभुंज[2] हि सहस्रबाहून,
अर्जुन नेवूं ओढुनि दूर बळें संगरार्थ बाहून. १२३
आम्हांला तो किंवा त्याला आम्हीं वधूं प्रतिज्ञानीं;
बहु रक्षिति प्रतिज्ञांप्रति जैसे कुळवधूंप्रति ज्ञानी.' १२४
बोलुनि ऐसें स्वमतीं घे तो[3] सुतबंधुवीरवर्गातें,
स्वर्गातें साधाया, सुखवाया रणमखांत[4] भर्गातें[5]. १२५
सुतबंधुवीरकटकासह निश्चितचित्त देवदेशपथ
अवलंबाया, होवुनि विप्रांला वित्त दे, वदे शपथ. १२६
जैसें मरण सुशर्मा तैसें तद्भट अशेष[6] पथ करिती.
'करितां रणीं पलायन नरक घडावे,' असे शपथ करिती.
ते संसप्तकसंज्ञ[7] प्रबळ सुभट सिद्ध जाहले युद्धा,
क्रुद्धाशीविष[8] गरुडा को जिंकाया अशुद्धधी शुद्धा! १२८

---

## अध्याय दुसरा.

( द्वितीयदिनयुद्ध ).

दुसरे दिनीं सुशर्मा जेव्हां रणमख करावया बाहे,
अर्जुन धर्मासि म्हणे, 'दे आज्ञा शत्रु बाहती बा! हे.' १

१. अश्वत्थाम्याचे ठिकाणीं. २ दोन हात असणारा अर्जुन जरी हजार हात असणाऱ्या सहस्रार्जुनापेक्षा उणा नाहीं. ३. सुशर्मा. ४. शंकराला. (ही देवता महारप्रिय आहे). ५. स्वर्गाचा मार्ग. ६. सर्व. ७ संशप्तक नांवाचे शपथ घेऊन लढाईस जाणारे वीर. ८. खवळलेला सर्प.

धर्म म्हणे, 'मागितला मद्ग्रहवर[1] कीं सुयोधनें[2] अहितें;
गुरु धरिल मला, धरितो लीलेनें पक्षिपति जसा अहितें.' २
कृष्णसख म्हणे, 'देवा! होवूं द्यावें न भीत चित्त रणीं.
होइल गुरुशरतिमिराप्रति हा पांचाल्य सत्यजित्तरणी.[3] ३
रक्षित आला तुमचा धर्म तुम्हांला पुढें हि रक्षील.
गुरु[4] तों करुण चि, कठिन हि काळ न कोपेंकरूनि[5] लक्षील. ४
जरि सत्यजित् कदाचित् समरीं पावेल मरण, न रहा हो!
स्वस्थमनें आज्ञा द्या, दव[6] संसप्तकतृणांत नर हा हो.' ५
'वत्सा! विजयी हो, ये संहारुनि शत्रुसैन्य सत्वर तें,'
यापरि वदोनि आज्ञा दिधली सत्वनिरतास सत्वरतें. ६
जे जे प्रताप शस्त्रास्त्रांचे संसप्तकांकडे होते,
पांडवचंडांशुपुढें[7] जाले तत्काळ कांकडे हो! ते. ७
पार्थाचा प्रलयघनाधिक[8] दारुण देवदत्त दर[9] वाजे.
दरवाजेसे डोळे झांकिति, आइकति भीतिद रवा जे. ८
शर्मा, रथ, धर्मा, धनु, बाहु, भ्राते 'सुं[10]' पूर्व पांच विती.
ज्यां, त्यांसि पूतनाशा विजयविशिखवृष्टि पळ न वांचविती. ९
नरहरशरदृक्पातें[11] पडला सहसा खचोनि सुधनुरवी.
धैर्य परजनीं अर्जुन, षड्वर्गी तिळ हि जेंवि बुध, नुरवी. १०
सर्व त्रिगर्तबळ त्या प्रेक्षुनि भटनायका द्रवे[12]; यश तें
किति वर्णू? विपतिपुढें[13] ठाकावें काय काद्रवेयशतें[14]? ११
त्यांला म्हणे सुशर्मा, 'सुखद न हा वासवा हि लेश पथ;

१. मला धरून देण्याचा वर. २. शत्रु दुर्योधनाने. ३. हा पचालकुलोत्पन्न सत्यजित नावाचा राजा सूर्य होईल. ४. गुरु द्रोणाचार्य हे नर. ५. रागानें पडत्या काळाचा फायदा घेणार नाही. ६. अग्नि. ७. अर्जुनरूप सूर्यापुढें. ८. प्रळयकाळच्या मेघगर्जनेहून अधिक. ९. शंख. १०. 'सु' पूर्व शर्मा, रथ वगैरे म्ह० सुशर्मा, सुरथ वगैरे. ११. अर्जुनरूप शंकराच्या बाणरूप नयनकटाक्षप्रेक्षणानें. १२. विरून गेलें, गलितधैर्य झालें. १३. गरुड–पंत. १४. सर्प–पंत.

परता, भीतां तरि कां दावुनि भावांस वाहिले शपथ ? १२
फिरले ते नारायण-गोपाळे हि, बहु जसे घन रविवर.
विवर न तच्छर देती वाता, लोपे *पराहिनरविवर. १३
शरतिमिरीं कृष्ण म्हणे, 'मच्चेतोंबुजनवातप ! कोसि ?
चित्र, अपक्का हि फळप्रकरा पाडी न वात पक्कासी.' १४
पार्थ म्हणे, "स्वस्थ असें, होतीं त्वच्चिंतनें चि नरक रिते.
नसतां आधार तुजा मज भस्म रणीं कधींच नर करिते. १५
देवा ! निजप्रसादा म्हणसिल तूं 'होय दासः' मीं रणगा
काळा पळविन, काय न होइन पंरस्तोयदा समीरण गा !?" १६
ऐसें वदोनि योजी त्वष्ट्र्यानें ओपिल्या वशास्त्रातें.
जेंवि सुकवि सुमतातें कुतुकें खंडावया अशास्त्रातें. १७
अर्जुनरूपें शतशः क्षणमात्रें प्रकट जाहली कटकीं;
भुलले ते संसप्तक; केली बहु आपणांत कटकट कीं ! १८
वीर म्हणति, 'हा अर्जुन, हा केशव, काय पाहतां ? हाणा.
आणा मनीं कुलज हो ! ज्या अग्निसमीप वाहिल्या आणा. १९
वेष्टा धनंजयाला, आत्मयशें सत्यपांड वेष्टाया;
वेष्टा करूं न द्याव्या गोपाळा सत्य पांडवेष्टा या.' २०
पार्थ म्हणोनि परस्पर हाणुनि शस्त्रांचिया महानिकरें
मेले बहुत भुलविले, त्या अस्त्रें शत्रुधामहानिकरें. २१
समरीं स्वयें हि वासवि बहु शत्रूंतें, हरूनि असु, खपवी.
याचा जेंवि शर परां, तैसें देईल काय असुख पवी ? २२

१. मनःपूर्वक. २. हे कौरवपक्षीय यादव होत. ३. माझ्या अंतःकरणकमलास बालसूर्याप्रमाण असणाऱ्या अजना ' तू कोठे आहेस ?'. ४. आश्चर्य. ५. फलसमूहाला. ६ तुझा प्रसादरूपी जो मी त्याला हे देवा ! तू [ 'हा माझा ] दास होय ' [ असे ] म्हणशील [ तर ] रणात गेलेला असा मी काळाला हि पळवीन. ७. शत्रुरूप मेघास. ८. विश्वकर्म्याने. ९. मोहनास्त्रातें. १०. मारामारी. ११. सत्यांड-पंत. १२. पांडवांना हितकर असणाऱ्या. १३. शत्रूच्या तेजाची हानी करणाऱ्या अस्त्रानें. * शत्रुरूप सर्पाचा अर्जुनरूपी गरुड.

संसप्तका नर, जसा नरहरि मारी विशृंखल खळांतें;
होय असृक्स्त्रोतःशत, वाहे समराजिरीं खळखळां तें. २३
अरिकदन जसें अर्जुन, कुरुगुरु हि तसें चि वीरकदन करी.
मिरवी तयापुढें भट जेंवि हरिपुढें बळी हि मद न करी. २४
धृष्टद्युम्नवृकोदरसौभद्रप्रमुख वीर कंपविले
द्रोणें बहु शूरांचे समरसवोत्साह सर्व संपविले. २५
कौंतेयें गांठिला रणरंगीं नटउनि महाभिटकबध,
जैसा जलद समीरें, तैसा विसकटुनियां कटकबंध. २६
धीर धरुनि धर्मेश धीरें धर्में धनुष्य चढवीलें;
दाखविलें तें गुरुला जें होतें आपणासि पढवीलें. २७
'गुरुनें नृप धरिला रे! धरिला! हाणा हयां कशा, हाका;'
'हा! काय पाहतां? द्विज वेढा,' भट मारिती अशा हाका. २८
तों धावे वेचाया धर्मार्थ स्वायुधासुवित्त रणीं.
वाटे मुहूर्त तो द्विजराज द्विजराज शत्रुजित् तरणी. २९
त्या पांचाल्यातें गुरुराज स्वर्गासि पाठवी राज्या!
तेव्हां धर्म 'पलायन धर्म' म्हणे, धर्म पाठ वीरा ज्या. ३०
धर्म न भांडे गुरुसीं, जैसा सत्पुत्र पाठ दे वडिलां.
त्यासि न म्हणति नभींचे सोडुनि स्तोत्रपाठ देव 'ढिला.' ३१
समराजिरासि राया! सोडुनि जैसा युधिष्ठिर पळाला,
कुरुगुरु तसें चि पळवी त्याच्या स्वनिवारणोद्यत बळाला. ३२
भ्याले गुरुसि पर, जसे पंचाक्षरमंत्रजपपरा भूत.
हतशेष भट पळाले, जेंवि असुर विष्णुबळपराभूत. ३३

१. शेकडों रक्तप्रवाह. २. समरांगणांत. ३. मस्त हत्ती ४. रणयज्ञांतील उत्साह. ५. धर्मराजा. ६. मोठमोठ्या वीरांचीं धडें. ७ व्यूहरचना. ८. चाबूक. ९. स्वतःचीं शस्त्रें आणि प्राण हें च ज्यांचें धन. १०. ब्राह्मणश्रेष्ठ द्रोणाचार्य हा चंद्र. ११. द्रुपदपुत्र सत्यजित् हा सूर्य. १२. वडिलांच्या म्हणण्यास मान देतो.

कुरुपति कर्णासि म्हणे, 'आचार्यें पळविले पहा पर ते,
भ्याले सात्यकि, धृष्टद्युम्न, वृकोदर[1]; न एक ही परते. ३४
गुरु भीष्माहुनि शतगुण अधिक, धनुर्वेद मूर्त हा सत्य!
हास त्यक्तावधि[2] ये, जाला मद्रिपुगदांस[3] नासत्य[4].' ३५
राधेय म्हणे, 'राया! जयहर्षें हांसतोसि, परि समज,
परम अनर्थ परतला, भीम गमे उग्रमृत्युपरिस मज. ३६
पांडववीर पळाले, भ्याले, ऐसें तुवां न मानावें;
यांचें बळ सत्कविनीं हरिहरबळसें सदैव वानावें. ३७
आतां गुरुवरि धर्म स्वकटक फिरवील, भीम परतेल;
परम प्रदीप्त होइल, कीं, तो[5] नररूप वन्हि, पर तेल. ३८
रक्षावा द्रोण रणीं यत्नें आम्हीं तुम्हीं ससेनाहीं;
म्हणतिल[6] काय अरक्षितहरिमथनयशःस्पृहा मनें नाहीं?' ३९
ऐसें कर्ण वदे तों मागें सहसा फिरे कटक; राया!
प्रळयींचा पाथोनिधि[7] जैसा पृथ्वी-प्रजा गट कराया. ४०
द्वंद्वशतें किति वर्णूं? भीम क्रीडे रणीं समुद्धरसा[8];
युद्धरसा त्या सेवू त्वक्क्षति, सेवी जसी अशुद्ध[9] रसा[10]. ४१
भीमासीं युद्ध करी द्विरदीं[11] बैसोनि पुत्र नरकाचा[12],
टिकला भीम चि, टिकता त्यासीं समरांत काय नर काचा[13]?
मर्दुनि करिकटकातें व्याकुळ दुर्योधनासि भीम करी;
तों प्रेरिला तयावरि अंगें[14] म्लेच्छाधिपें स्वभीमकरी[15]. ४३

१. वृक नावाचा अग्नि आहे उदरांत ज्याच्या तो भीम. २. अमर्याद. ३. माझ्या शत्रुरूपी रोगास. ४ अश्विनीकुमार ५. कारण, तो भीम मनुष्यरूपधारी अग्नि आणि शत्रु हे तेल होय ६ ज्याचें रक्षण झालें नाहीं अशा सिंहाचा नाश करून मिळणाऱ्या यशाची इच्छा [ क्षुद्र ] मनें [ हि ] करणार नाहीत काय? ७. समुद्र. ८. [ महारप्रिय ] अशा आनंदित शंकरासारखा. ९ रक्त. १०. पृथ्वी. ११. हत्तीवर. १२. नरकासुराचा पुत्र भगदत्त. १३. कच्चा, भित्रा १४. अंग नावाच्या एका म्लेच्छ राजानें. १५. आपला भयंकर हत्ती.

एकें चि शरें मस्तक भेदुनि, येतां चि, नाग लोळविला.
परलोकाप्रति अंग छेदुनि मूर्धा, पळांत बोळविला. ४४
ज्या ऐरावतकुळजा अर्पुनि पूर्वी महेंद्र साम करी,
तो प्रेरिला, सकोपें भगदत्त, सुप्रतीकनाम करी. ४५
भीमावरि, न गणुनि शरवृष्टीची झड, करी करी लगटे;
वाटे जनासि काळ चि तो, त्याला झडकरी करील गट. ४६
तो क्रोधमदांध, महानागायुतशक्तिमूळपीठ करी
शुंडापादाघातें साश्वरथातें पळांत पीठ करी. ४७
भीम गमे मेला, परि त्याच्या पोटातळीं दडाला हो!
तो चित्तांत म्हणे, 'बहु मंदलाभें ताप या जडाला हो.' ४८
भ्रमला कुलालचक्रासम नाग धरावया लपाल्याला.
जरि तो प्रवर्तला श्रितनाशीं, मदमत्त न त्रपा त्याला. ४९
सत्वर निघोनि पळतां, धरुनि करें कंठ, दे उरीं गुडघे;
चीत्कार करी, जाणों पतिला 'वांटावया' म्हणे 'गुड घे.' ५०
बंधापासुनि सुटला, वेगें भीम भ्रमोनियां उलटा,
शुंडा तसि होय, बळें जसि पडली साधुच्या गळां कुलटा.
पोटातळीं पुन्हां त्या द्विपपतिच्या तो पृथासुत लपाला.
वाटे जनासि, म्हणती कवि एक बळी, वृथा सुतलपाला. ५२
भीम निघे, दृष्टिपुढें येतां निजगजघटा सिरे तींत.
भ्रम होय सुप्रतीका जैसा नटतां नटासि रेतींत. ५३
जन म्हणति, 'नवल! साहुनि वज्राघातासि भीमनग ज्याला!
कीं या भगदत्ताच्या देवगजांचें हि भी मन गजाला.' ५४
वेष्टिति भगदत्ताला पांडव होवूनि एकवट सारे.

१. तो सुप्रतीकनामा हत्ती भीमावर चालून गेला. २ मन+अलाभे=मोठ्या न सापडल्यामुळें. ३. आश्रिताच्या नाशाविषयीं. ४. गुडघे. ५ भगदत्तास म्हण-पंत. ६. बळीला-पंत. सुतलनामक पाताळाचा राजा. ७. आपली गजसेना. ८ नृत्य करितां. ९. भीतरूपी पर्वत. १०. वाळला-पंत

तेव्हां सुर म्हणति, 'अहा! गमतो जलधींत एक वटसा रे!'
मुनि म्हणति, 'या बळीं हा गज, त्या सिंधूंत जेंवि मंदर तो,
एवंविध[1] रणयज्ञ त्यागुनि, यज्ञांतरांत मंद रतो.' ५६
बहु भग्न, चूर्ण केलें बळ त्या भगदत्तसिंधुरागानें.
वाटे जग बुडवितसे प्रलयसमयमत्तसिंधु रागानें. ५७
भीम रथीं बैसुनि ये, त्यावरि 'फूं' करुनि तो थुकी उडवी.
बुडवी भयांत वाजी, पळवी, धावुनि सहाय बहु तुडवी. ५८
गजगर्जितें धनंजय समजे भगदत्तकृत्य चित्तांत.
होय बहु विकळ, कीं, बुध लुब्धयशीं, कृपण जेंवि वित्तांत. ५९
कृष्णानुमतें भंगुनि, भुलवुनि निजविशिखभवतमीं[3] पर ते,
मोहुनि सुशर्म्यातें सोदरशोकें, शरें विजय परते. ६०
कुरुकटका तप्त करी पार्थ, ग्रीष्मीं जसा पतंग[4] जगा.
तों प्रेरिला तयावरि भगदत्तें काळसा मतंगज गा! ६१
देव[5] गजासि म्हणे, 'रे! गर्व अयस्तंभसमरदा[6]! न वहा:
हा मत्सख नर सिंह चि, वज्रधरासह्यसमर[7], दानवहा[8]. ६२
होय पुढें चि, न मागें पार्थशराहत हि शांतमखसख[9] सरे.
मुनि म्हणति, 'अर्जुनीं तव शक्ति, जसी सागरांत खसखस रे!'
हाणी वज्रप्रतिम प्राग्ज्योतिषवीरराय[10] तोमर[11] तो.
भगवत्प्रसाद सुकवच ल्याला जो साधु, काय तो मरतो? ६४
प्रकट करूं दे समरीं श्रीदेवी जेंवि सैरिभास[12] कळा,
तेंवि विजयचापलता; मग दवडी दूर वैरिभा[13] सकळा. ६५
विजयविशिखार्त होतां, पूर्वीं दुष्कर हि आयकोन, करी

१. असल्या प्रकारचा. २. भगदत्ताच्या हस्तिरूपी पर्वताने. ३. आपल्या बाणांनीं उत्पन्न झालेला अंधकार–मोह यात ४ सूर्य. ५. श्रीकृष्ण ६. लोखंडाच्या खांबासारखे दांत ज्याचे अशा हे गजा! ७. उद्रास [ मुद्दा ] ज्याचे युद्ध असह्य असा. ८. हता–पंत. दानवांना मारणारा. ९. इंद्रमित्र भगदत्त. १०. प्राग्ज्योतिषनामक देशाचा राजा. ११. गदेसारखे एक लोखंडी आयुध. १२. म्हैष–पंत. महिषासुराला. १३. शत्रूचे तेजाला

भगदत्ताचें कथिलें[1], अधनाचें जेंवि बायको न करी. ६६
शस्त्र सरतां आला पार्थविमथनार्थ अंकुश मनाला;
विष्णवस्त्रें अभिमंत्रुनि सोडी, हरि[2] जेंवि रंकुशमेनाला[3]. ६७
प्रभुनें अनिवार्य म्हणुनि वक्षस्थळ अंकुशास ओडविलें;
अत्युग्र वैष्णवास्त्रापासुनि निज मित्ररत्न सोडविलें. ६८
होवूनि वैजयंती[4] अवलंबी अस्त्र विष्णुचें उर तें.
त्या अंकुशप्रहारें न निमेष हि वक्ष जिष्णुचें उरतें. ६९
हें नेणुनि पार्थ म्हणे, "ओडविलें अंकुशासि कां उर गा!?
सुर गाती अनृत मला? गरुड न खंडील कोणत्या उरगा? ७०
कां भीसी? भय कैंचें मंज असतां त्वत्प्रसादपविकवच[5]?
'भक्तः[6] प्रणश्यति न मे' हें कीं वदलासि तूं चि भविककवच.[7] ७१
समयीं[8] न आठवूं दे हे वत्सलता[9] गुरुप्रतिज्ञा[10] ते.
काय व्यासपराशरमुख म्हणतिल तुज गुरुप्रति ज्ञाते?" ७२
देव म्हणे, 'भूक्त[11] म्यां दिधलें याच्या पित्यास[12] रक्षाया
तें वैष्णवास्त्र, जालें दाय[13] तसें प्राप्त युद्धदक्षा या. ७३
त्या अस्त्रें अभिमंत्रित भगदत्तांकुश तुला न सोसवता;
अथवा तुजें चि उर हें, भाव सख्या! त्वन्मनीं नसो सवता.
अस्त्रबळरहित जाला, जय तुज देती मरोनि भगदत्त.
होसिल सकळरिपुक्षयकर, तुजहुनि अधिक काय मग दत्त?
आर्धी पट्ट[14] छेदीं, त्या वृद्धाची मिळोत बा! पोतीं[15].

१ सांगितलेलें. २. राम ३ हरिण–**पंत.** ४. [ब्राह्मणाच्या] गळ्यातील माळ. ५. तुझी कृपा हें च वज्रकवच. ६ माझा भक्त नाश पावत नाहीं. (श्रीमद्भगवद्गीता अ०९ पहा) ७. भावुक भविक भव्यमित्यमरः–**पंत.** कल्याणकर असें वचन. ८. कठिण प्रसंगीं. ९. भक्तवात्सल्य. १० 'न धरीं शस्त्र करीं मीं' ही मोठी प्रतिज्ञा. ११. पृथ्वीच्या मागण्यावरून. १२. नरकासुरास. (हा पृथ्वीचा पुत्र होय). १३. वडिलार्जित द्रव्य. १४ [आपल्या लांब असलेल्या] पापण्या डोळ्यावर येऊं नयेत म्हणून भगदत्तानें त्यावर बांधलेला पट्टा. १५. पापण्या.

दुर्जय सुरासुरांस हि, तुज ही जों लागलीं न बापा ! तीं.' ७६
मारी भगदत्तातें खंडुनि तत्पक्ष्मबंधन, करींतें.
गुरुवचनरत्न डोळस मान्य करी, मान्य अंध न करी तें. ७७
प्रभुनें 'हुं ! वध ' म्हणतां, वधिला पार्थे महेंद्रसखे चुलता.
उलता शोकें, परि गुरुबोधें बाधों दिली न आकुलता. ७८
गांधाररथ खवळले पाहुनि त्या पार्थशरविपन्नास;
ते ही वधिले विजयें, सिंहें गज जेंवि तेंवि, पन्नास. ७९
तेव्हां तुमचे श्यालक, वृषक अचळ, फार तापले रागें,
नागें मूषकसे; ते वधिले एकें शरें महाभागें. ८०
जाले सुयोधना जरि शोकद शरदलितकाय मातुळ ते,
तरि धन्य चि देवांसी, सुचिरें हि वांच्रोनि का यमा तुळते ?
यत्न करी शकुनि कपटशतदहनीं पार्थकाय होमाया,
त्याच्या चालों देइल भगवत्सख पार्थ काय हो ! माया ? ८२
मायांक्षयभीत शकुनि सूतासि म्हणे, 'रथा पिटाळावें;
जऱ्हि रणमरण हित, अहितमर्दनकामें तथापि टाळावें.' ८३
जो नीळभूप दावी बळ हरिचें मृगकुळांत शिरत्याचें;
हटकुनि तटकरि तोडी भटतिलक द्रोणपुत्र शिर त्याचें. ८४
कर्णापुढें चि वधिले त्याचे भीमानुजें तिघे बंधु.
सिंधु अगस्त्याचमना न पुरे; पुरतील काय मग अंधु ? ८५
दुसरे दिवसीं गुरुशरनिकरें बहु धर्मवाहिनी आटे.
कुरुकटकासि किरीटी स्पष्ट कटुकुठारपाणिसा वाटे. ८६

१. पातीं, पापण्या २. त्याच्या पापण्याचें बंधन. ३. भगदत्त हा इंद्राचा मित्र, अर्थात पर्यायानें अर्जुनाचा चुलता च. ४. गांधार (कंदाहार) देशचे रथी योद्धे. ५. अर्जुनाच्या बाणानीं मरण पावलेल्या भगदत्तास. ६. बाणानी विच्छिन्न झाला आहेत शरीरें ज्यांचीं असे. ७ चिरकाल. ८. शेंकडो कपटें हा च अग्नि, त्यांत. ९. एक पांडवपक्षीय राजा. १०. सांगूनसवरून. ११. कृप-पंख. १२. धर्माची सेनारूप नदी १३. तीक्ष्ण कुऱ्हाड धारण करणाऱ्या परशुरामासारखा.

गुरुनें कर्णादि, जगद्गुरुनें धर्मादि रक्षिले पार्थ.
विश्वाच्या यश केलें कर्पूरसुचूर्ण अखिलेपार्थ. ८७

---

# अध्याय तिसरा.

(तृतीयदिनयुद्ध.)

तिसरे दिवसीं प्रातःकाळीं वंदन करूनियां राजा
द्रोणासि म्हणे, 'गुरुजी! कां आशाभंग करितसा माजा? १
प्राप्त युधिष्ठिर जाला असतां, धरिला तुम्हीं न कां काल?
आंकाल[1] तपन[2] नयनें, तेजें काळास ही न वांकाल. २
आत्मा हि उपेक्षावा, परि रक्षावा च बोल संतानीं.
जाला भक्तमनोरथ न गुरुजनीं, कीं न फोल संतानीं[3]. ३
सगळी तिकडे चि असे, तुमची इकडे नसे कृपा लेश;
ऐसें नसतें तरि, तो कां मरता शक्रसख नृपालेश?' ४
द्रोण म्हणे, 'त्यजुनि कुमति, सन्मतिसीं करुनि संग, रम राया!
निंदिसि कां तुजकरितां जन्हि सजलों करुनि संगर मराया?
त्रिभुवन हि न जिंकिल हरिसखरक्षितधर्मनंदना, सत्य;
हे अजित-कृष्ण साक्षान्निजजनहृद्रोगकंदनासत्य. ६
जेथें जगदुत्पादक केशव, तन्मित्र विजय सेनानी,
तेथें नरवीरांच्या साधावा काय विजय सेनानीं? ७
एक त्र्यंबक वर्जुनि इतर सकळ पुरुष जन्हि बळनदीप[6],
तन्हि दीन हरिपुढें ते दाखवितिल रविपुढें बळ न दीप. ८
पाडीन निश्चयें मीं कोणा एका महारथा आजी;

१. डोळ्यांत अंजन घालण्याकरितां. २. सूर्य. ३. श्रेष्ठ लोकांच्या संगतींत.
४. कृष्णमित्र (अर्जुन) यानें रक्षण केलेल्या यमधर्माचे पुत्रास (धर्मराजास).
५. प्रत्यक्ष स्वजनांच्या हृद्रोगकंदाविषयीं अश्विनीकुमार च असे. ६. बळसागर.

गातील जिला सत्कवि ऐसी होईल सर्वथा आजी. ९
परि हटकुनि[2] दूर तुम्हीं त्या पार्था वीरसत्तमा न्या, हो!
योगकथांसी प्रबळारिलयकथा हे हि दत्तमान्या[3] हो.' १०
ऐसें वदोनि चक्रव्यूह सुदुर्भेद्य युक्तिनें रचिला,
जो धीरवीरहीरप्रवरप्रकरेंकरूनियां[4] खचिला. ११
प्रभुला म्हणे भरार्ता भू ज्यातें 'करुनि बोध वळवा जी!'
संसप्तक माराया जाय हटकितां चि तो धवळवाजी. १२
चक्रव्यूहामध्यें भूप पुढें द्रोणगुरु महातेजा;
अढळ, सदाश्रय म्हणवुनि 'मेरु' असें म्हणति कवि पहाते ज्या.
व्यूहातें भेदाया धर्म झटे करुनि यत्न सानुजनी[6]
परि लोपवि प्रतापा गुरु, तपना[7] जेंवि रत्नसानु[8] जनीं. १४
धर्म म्हणे, "सौभद्रा! दुर्भेद्य व्यूह, यत्न चालेना,
व्यूहपुरःस्थित[9] अस्मद्गुरु, कुरुकटकेश लेश हालेना. १५
गुरुनें सकळ पळविले, गज जेंवि मृगेश्वरें समन्यूनें[10];
पूर्ण गुरुदया नव्हतां व्हावें कैसें तयासम न्यूनें? १६
तत्काळ मातुळें कीं भेदावा व्यूह हा तुज्या तातें;
पांडित्य जें तयांचें तुज पाठ असे चि बा सुजाता[11]! तें. १७
म्हणतिल म्हणोत पर, परि म्हणेल मज ससख यदुप[12] 'हा साधू[13];'
म्हणुनि व्यूह विभेदुनि बा! स्वयशें तूं चि मदुपहासा धू." १८
अभिमन्यु म्हणे, 'चिंता करितां हे व्यर्थ काय हो! तात!?
या वाक्यें बहु लज्जित कीं हे तुमचे चि पाय होतात. १९
तातें कथिला आहे दुर्भेद्यव्यूहभेदनोपाय;

---

१. युद्ध. २. बोलावून, आह्वान करून. ३. श्रीदत्तात्रयाना मान्य अशी. ४. धीरवीररूप उत्तम हिऱ्याच्या समुदायानें. ५. पार्थातें-**पंत.** ६. अनुजनासह असा धर्म. ७. सूर्याला. ८. रत्नमय आहेत शिखरें ज्याचीं तो मेरुपर्वत. ९. व्यूहाच्या तोंडाशी असलेला. १०. सक्रोधें-**पंत.** ११. सत्कुलोत्पन्ना! १२. मित्र अर्जुनासह श्रीकृष्ण. १३. हा धर्म साधु-सत्वशील अर्थात् युद्धकर्माला निरुपयोगी आहे.

शिरतों भय काय मनीं? आहेत सहाय राय! हे पाय. २०
व्यूहीं शिरेन शरसा, मागें परतेन एक पद ही न;
युष्मत्पदप्रसादें होतिल[1] युष्मत्सपत्न मदहीन.' २१
धर्म म्हणे,' त्वद्रचितद्वारें आम्हीं समस्त हे मागें
येतां रक्षाया तुज द्यावें स्वस्थैर्य[2]धैर्य हेमागें.' २२
मारुति[3] म्हणे, 'शिरे अहि[4]रदरचितें जेंवि तद्विष द्वारें;
त्वन्निर्मितें शिरेन, व्यूहीं टिकिजेल न द्विषद्द्वारें.' २३
सौभद्र म्हणे, 'शिरतों व्यूहीं डोहीं जसा मतंगज वा
हरिपोत[6] दंतियूथीं[7] कीं दहनीं करुनियां पतंग जवा. २४
जें करिन आजि, होइल पितृमातुळसुचरितानुरूप चि तें;
क्रव्यादांला खाया देइन उधळुनि बळें[10] कुरूपचितें.' २५
ज्येष्ठपित्याला देवुनि अभय म्हणे तो सुवीर सूतातें;
"हूं! हाक रथ, म्हणावी माय सुभद्रा 'सुवीरसू' तातें." २६
तो सूत सुमित्र म्हणे, 'भो आयुष्मन्[11]! कुमार आपण कीं!
हाकिन हरि[12] अरिवरि परि कुरुगुरुसीं गाठि, कठिन हा पण कीं.'
हांसुनि सौभद्र म्हणे, 'हटकीन हठें रणास भीमातें[13],
शक्रार्जुनकृष्णांसीं करितां समर न शिवेल भी मातें. २८
द्रोणानीका[14] मानू जन सागर, मज हि सत्वरा[15] मकर;
ग्र काय न्यायपरस्वच्छात्रनदीजसत्व[16] राम[17]कर?' २९
तन्निर्बंधें नीट चि चालविला रथ विमानसा सूतें;
देती प्रभूक्तितें श्रितमति; कुलजा जेंवि मान सासूतें. ३०

१. तुमचे शत्रु. २. मेरुपर्वतानें. ३. भीम. ४. सर्पाच्या दातानें उत्पन्न केलेल्या द्वार. ५ शत्रुसमूहें—पंत. ६. सिंहाचा छावा. ७. हत्तींच्या कळपांत ८. वेगातें. ९. मांसभक्षकाम—राक्षसास. १०. कौरवांनीं जमविलेलीं सैन्यें ११. सारथानें रथीस "भो आयुष्मन्" अशी हाक मारण्याचा प्रघात आहे. १२. घोडे. १३. शंकरास. १४ द्रोणसैन्याला. १५. त्वरायुक्त अशा मला. १६. न्यायनिष्ठ स्वशिष्य जो भीष्म त्याचें सत्व. १७. परशुराम—पंत. १८. त्याच्या अत्याग्रहानें.

भीमादि सबळ सर्व हि उठले तो व्यूहकोट फोडाया,
'इकडुनि कौरवकटक हि होय पुढें शत्रुसैन्य मोडाया. ३१
रथ थडकले, भडकले हय, शस्त्रजवान्हि धडकले वरते,
अन्योन्य द्व्यंगुल ही राहों देती न धड कलेवर ते. ३२
पावत असतां दोन्हीं करुनि सुतुमुलाहवास वध सेना
व्यूहीं शिरे गुरुपुढें; चित्तें हि जयांत वासव धसेना. ३३
व्यूहीं गमे सुभद्रासुत गजयूथांत जेंवि बालहरी,
त्यावरि पडल्या सेना त्या मंथाद्रिवरि जेंवि बा! लहरी. ३४
बहुतांसीं एकाकी सौभद्र कलह करी समुत्साहें,
असकृत् सूतासि म्हणे, 'सुयशस्कर समर हो, समुत्साहें.' ३५
तच्चापलतेसि दुजी दावील श्रीस काय मद नारी?
वाटे करितो कौरवसंहार मनुष्यकाय मदनारी! ३६
मूर्त वसंत गमे तो, गमति रिपु विपत्र ते करीराग!
कुरुकटकीं पशुनिकरीं श्रीरुद्र तसा चि तो करी राग. ३७
समरीं बाळासि म्हणे रक्तप, 'गगनीं च करुनि आ वर्ते;'
किंबहुना हय, रथ, गज गिळिले शोणितनदींत आवर्तें. ३८
तेव्हां त्वत्पुत्रांचीं वदनें झालीं रणांत शुष्क रसें;
शोभे विजयोत्साहें अभिमन्युमुख प्रफुल्लपुष्करसें. ३९
दुर्योधन स्वयें मग सौभद्रवधार्थ धांवला कोपें;
कलभमथन हरिसि, तसें त्याला तें कर्म वाटलें सोपें. ४०
तें द्रोण म्हणे, 'भद्र हो! रक्षिति सुर जेंवि तारका सुरसा,

१. व्यूहरूप किल्ला २ दोन बोटें ३. नीट. ४. अत्यंत घनघोर युद्धास. ५. इंद्र, ६. समुद्रमथनास घेतलेल्या पर्वतावर. ७. अत्यंत उत्साहाने. ८. सहर्ष-पंत. समुत+साहें=आनंदाने सहन कर. ९. मानवदेहधारी शंकर. १०. पत्ररहित. ११. नेर्मा-पंत. एक जातीचे झाड. १२. राक्षस. १३. आहे १४. भोंवऱ्याने. १५. विकसित कमलाप्रमाणे. १६. गजशावकमारण. १७. रक्षणकर्त्यां अमृतरसाला.

रक्षा, अभिमन्यु न हो गुहसा[1], कुरुराज तारकासुरसा[2].' ४१
भूरिश्रवा, शकुनि, कृप, कृतवर्मा, कर्ण, शल्य यांसहित
धांवे ससुत गुरु, कसें होऊं देइल समक्ष तो अहित? ४२
सोडविला नृप तेव्हां होय नृपा! शस्त्रमय नभ क्षण हो[3];
करितें चि त्या स्मराचें[4] तत्तेजोरुद्रनयन[5] भक्षण हो! ४३
आठवला जो मारुतिपासूनि सुटोनि वांचला तरणी[6]
वसती कुरुपशिरीं परशरशनिची तधवां च लात रणीं. ४४
सुप्तोत्थित[7] हरिसा तो उघडी होउनि विमोह दृष्टीतें;
स्वविशिखनिकरसमीरें[8] उडवी बहु शत्रुशस्त्रवृष्टीतें. ४५
नृप न दिसतां म्हणे, 'हा! गेलों खाया करुनि आ जवळ,
तों कवळ[9] पळविला कीं! पावेल चि आज लाज आजवळ.' ४६
सौभद्र बहु क्षोभे, गर्जे पाहोनि कवळ हरित्यांतें;
जाणों अपराधी गज हटकी दापूनि जवळ हरि त्यांतें. ४७
त्यां सिंहनाद होय, व्याळां पुच्छीं जसा पदन्यास[10];
वेष्टुनि हाणिति सर्व हि; देखवते ही न ते तदन्यास[11]. ४८
प्रभुचा, मर्मी हाणी सर्वांस हि तीन तीन शर, भाचा;
वाटे, बहु सिंहांसीं समर करी क्रुधितपोत शरभाचा[12]. ४९
द्रोणद्रौणिकृपादि प्रबळ बहु भटांस ही न तो आटे;
फाटे तद्दृष्टिपुढें बळ, जळदीं मूर्तवातसा वाटे. ५०
होय पुढें अश्मकपति, की तत्तेजें न वीर करपोत;
खंडी तद्धय[13], सूत, ध्वज, धनु, भुज, शिर सलील नरपोत[14]. ५१

१. कार्तिकस्वामीसारखा. २. तारकासुरासारखा. (तारकासुराला गुहानें मारलें). ३. आकाश शस्त्रांनीं भरून गेलें. ४. मदनाचें. ५. अभिमन्यूचें तेज हाच कोणी शंकराचा तृतीय नेत्र. ६. सूर्य. (मारुतीनें पक्वफलभ्रमानें सूर्याचा ग्रास करण्याचा प्रयत्न केल्याची कथा सर्वश्रुत च आहे). ७. झोंपेंतून उठलेल्या. ८. आपल्या बाणसमुदायरूप वायूनें. ९. ग्रास. १०. पाय ठेवणें. ११. त्या अभिमन्यूवांचून दुसऱ्यास. १२. रागावलेला शरभबालक. १३. त्याचे घोडे. १४. अर्जुनपुत्र

पडतां च अश्मकेश्वर कर्णद्रोणादि करिति शरवृष्टी;
'फुल्ल[1]पलाशश्री तो निववी, भिववी सुराधिपति[2]दृष्टी. ५२
भेदुनि शरें उरस्थळ चळचळ बळजंळधि कर्ण कंपविला;
मूर्छित करूनि मद्रप सौभद्रें तत्प्रताप संपविला. ५३
एकें सुषेण वधिला बाणें, एकें चि दीर्घलोचन हो!
एकें चि कुंडभेदी; गमले ते घूक, तो विरोचनें[3] हो! ५४
मानी वीर पळाले गुरुनें हि निवारितां तडक राया!
स्यंदन शीघ्र हि पिटितां सांगति सूतांसि तांतड कराया. ५५
जाला पुढें महाबळ शल्यानुज जो तयास तो खपवी.
होय जयापरि पावुनि पर्वतपाटनजया सतोख पवी. ५६
मर्दी मद्रपकटका असुरबळा जेंवि तारकाराती,
रोधिल काय परचमू त्या, तो पूर्णावतार, कारा ती? ५७
सप्रेम पार्थपुत्राप्रति पाहुनि तत्पराक्रमें डोले,
कुरुपति परिसत असतां द्रोण कृपासीं कृपाभरें बोले. ५८
'हर्षवितो मज पुत्राहूनि, नव्हे हा कुमार सामान्य;
धन्या सती सुभद्रा! नंदन जीचा कुमारसा मान्य. ५९
मारावें सकळ हि बळ, परि सुज्ञा! तत्वँ वद, न कां मारी?
वाटे धृतरणकुतुकच्छादितबहुबाहुवदन कामारी.' ६०
कुरुराज म्हणे, 'कर्णा! कुरुगुरु पळवील अंतकाला ही;
गरुडापुढें महाहि हि काय न पावेल अंत कालाही? ६१
परि जाला त्या शिष्यस्नेहानें मूढ हा तपोराशी;
स्तवितो भाट तसा कीं! वाटे जोडील हात पोराशी! ६२

१. फुललेल्या पळसाच्या वृक्षाप्रमाणें ज्याची शोभा असा २. इंद्राची दृष्टी. ३. भय—पंत. ४. ज्या अभिमन्यूप्रमाणें ५. पर्वतविदारणाच्या जया. ६. कार्तिकस्वामीसारखा. ७. रहस्य. ८. द्रोणाचार्य म्हणतात, संहारकर्ता मदनशत्रु शंकर हा धरलेल्या युद्धकौतुकामुळे आच्छादिलीं आहेत बहु (दहा) बाहूंनीं (पंच) वदनें ज्यानें असा वाटे; अर्थात शंकर च स्तब्ध झाल्यामुळे संहारक्रिया थांबली. ९. काळसर्प.

बाळा दिलें बळ, जसें धावें दहनाचिया[1] लवा वातें.
हें पाळावा पदरें जेणें तेणें चि मालवावा तें. ६३
गुरुनें करुनि उपेक्षा केला दुःसह असाध्य[2] आमयसा;
पसरिल न जग गिळाया रुद्रप्रिय कोण भूत आ मयसा[3]?" ६४
दुःशासन बोले, "जड काय मदनहानिकाम[4] उग्रास?
मद्बाहुराहुचा शशधरसा[5] शिशु हा निका मउ ग्रास. ६५
आहे मच्छरनिकरा अवगत पांडित्य जें अजगरा तें;
या असुहृदपत्यातें गिळिल, ग्रासी जसा अज[6] गरातें. ६६
मरतिल सकृष्ण पांडव, धीर हि ते सोडितील आवास;
आवास अंतकाचा प्रियशोक[7], हरिस म्हणेल 'आ वास.' ६७
एकक्षयें समस्तक्षय होय, असें पहा कसें करितों.
सौभद्रमस्तकासह आतां निजकटकसंकटा हरितों." [8] ६८
ऐसें बोलुनि धावे, विधुसि गिळायासि जेंवि राहु निघे;
कार्ष्णि म्हणे, "ये, देतों सच्छळफळ, पळ समोर राहुनि घे. ६९
सर्वंसहेसि[9] ही बहु देतो खळकायभार ताप सदा.
ताता भीमाचें हें नोहे बळ काय? भारतापसदा[10]! ७०
माजे न पावतिल तव हननें साधूंत न्हींप्रति क्षार्ता,
जन्हि खळ म्हणतिल,'भग्ना' आम्ही साधूं तन्हीं प्रतिज्ञा ती. ७१
'आत्मा पुत्र' असें हें श्रुतिचें मत, भीम तात, हा तनय,
श्रुतिकिंकरासि[11] देवांधमांसह जोडितात हात नय." ७२
परिसुनि धिक्कार रणीं मानी रथ, चाप कां न नीट करी?
गमले, सजले क्रुद्धद्विप मारायासि काननीं टकरी. ७३

१ अग्नीच्या फुणगीला. २. असाध्य रोगामारखा. ३. मयासुरासारखा. ४. शिवास–**पंत.** ५. चंद्रासारखा शिशु. (अभिमन्यु). ६. शंकर. ७. प्रियजनाबद्दलचा शोक हें च यमराजांचें ठिकाण (वसतिस्थान) आहे. ८. अभिमन्यु. ९. भूमीस–**पंत.** १०. भरतवंशजांतील नीचा! ११. वेदवचनांचा केवळ अनुचर, त्याला.

सक्षत तव सुत गमला, पुष्पानीं दाटला पळस साच;
मूर्छित म्हणुनि पळवितां सूतानें, वाटला पैळ ससा च ! ७४
धर्मादि सर्व झाले दुःशासनपरिभवें परमहर्षी;
ज्ञानें मोहपराभव होतां जैसे तपःपर महर्षी. ७५
धांवति सहाय व्हाया सौभद्रा द्रोणसैन्य फोडूनीं;
सोडूनि विशिखवृष्टी सारूं पाहति परांसि मोडूनीं. ७६
भूप म्हणे, "कर्णा ! शिशु, झटले जन्हि भट समस्त, न निवारे:
स्वभुजांसि म्हण, 'सुरीचे आलिंगुनि घटसम स्तन निवा रे !'
तूं या धनंजयाच्या शरवर्षे शमविशील फुणगीतें:
घेसिल चित्तावरि तरि, भुलविसिल सुर स्वकीर्तिगुणगीतें."
शस्त्रास्त्रवृष्टि करितां, घन कर्ण गमे सुवर्णनग बाळ;
किंबहुना व्यासेतररचित सविस्तर सुवर्णन गबाळ. ७९
शस्त्रें, अस्त्रें, छत्र, ध्वज, धनु, खंडुनि, वधूनि अनुजातें,
राधेयातें पळवी सौभद्र, कुमार जेंवि दनुजातें. ८०
व्यूहीं शिरतां पांडव वारण केलें जयद्रथें बा ! तें
हरवरकृत्यः जलधितें करिल प्रभु थेंब, जलधि थेंबातें. ८१
वसुषेणसूत नरजें वधितां झाले रणीं चपळ वाजी;
जाणों परस्पर म्हणति, 'जावूं द्या यश, धणी च पळवा जी!'
वधितां वशात्यराजा तद्भट काळें मुखांत लपवीले;
शल्यज रुक्मरथैसहित तत्सखशतराजपुत्र खपवीले. ८३
हरिशिशुवरि यूथवधप्रकुपितमदमत्तयूथपाळकसा
धांवे कुरुप, परि पुन्हां त्यासि न पळवील पार्थबाळ कसा ? ८४
अंध म्हणे, 'रे संजय ! हें त्या पौत्रास वर्ष सोळावें,

१. पळभर २ देवांगनांचे. ३. अग्नीच्या ठिणगीतें. (पक्षीं) अर्जुनाच्या पत्रातें ४. मेरुपर्वत ५. तारकासुराला ६ कर्णाचा सारथी. ७ अर्जुनपुत्रें. ८ एक कौरवपक्षीय राजा. ९. मृत्यूनें. १०. सुवर्णरथसहित.

लोळावें मांडीवरि, तेणें द्रोणादिकांसि घोळावें! ८५
न पवे सुनीतिचें परमार्थाची वाट लेंकरूं काय?
सत्य चि कथिसी; परि हें मज लटिकें वाटलें करूं काय?' ८६
संजय म्हणेः-म्हण अनृत, भीष्माचा एकला पणतु मुलगा
करिता जाला गुहसा, बहुतानीं वेढिला पण तुमुल गा! ८७
कुरुसैन्यांत रमे ज्यापरि रंभाकाननांत वारा हो!
त्या विजयश्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो? ८८
समरीं स्मरोनि वदलों, 'मी धन्य!' 'अधन्य' विनयना! तूतें.
काय कथूं? कुरुगुरुस हि पळवि पळ त्यक्तविनय नातू तें. ८९
लक्ष्मण धांवे, जेव्हां द्रोणाद्यखिल हि सुयोध नावरिती;
घननाद दशमुखावरि जी स्थिति घाली सुयोधनावरि ती. ९०
हनन चि बहुमत जालें पहिलें, तुमच्या न नातवा नातें!
वदनें न वानवे, तरि शौर्य शिशूचें मनांत वाना तें. ९१
कार्ष्णि म्हणे, "ये, शोकद हो ताता साधुगंजनकुशीला;
आलें भानुमतीच्या मळवाया वंश अंजन कुशीला! ९२
तूं त्या योग्य, सुमित्रासुत धरि खळदुर्मिळा सुनामा ज्या?
कोकी म्हणत्ये, 'तुम्हा करुत यशें ऊर्मिळा सुना माज्या!' ९३
'लक्ष्मण' हें योग्य मला, योग्य तुला 'मेघनाद' हें नाम;
रावणसा पाप तुजा बा, माजा शुचियशा जसा राम." ९४
धिक् प्रथम, मग करुनि रण, वधिला लक्ष्मण किरीटितनयानें,
हें पुत्रशोकविषफळ दिधलें दुर्योधनासि अनयानें. ९५
सुत मरतां भूप म्हणे, 'होईल अधर्म म्हणुनि न चपापा;

१ धवमाना—**पंत.** २. केळीच्या बागेत. ३. आलिंगनाला. ४. नेत्रहीना! (धृतराष्ट्रा!) ५. क्षणभर टाकला आहे विनय ज्यानें असा. ६. रावणपुत्र इंद्रजित. ७ साधुच्छळक व दुष्टस्वभावी अशा बापास (दुर्योधनास) ८. ही दुर्योधनपत्नी ९. काजळ. १०. खळाला दुष्प्राप अशा. ११. भानुमती. १२. दाशरथी लक्ष्मणाची पत्नी.

सारे मिळोनि मारा, राहों द्या एक पळ हि न च, पापा. ९६
'द्रोण, द्रौणि, बृहद्बळ, कृतवर्मा, कर्ण, कृप असे सा हे
वळले घमसे, त्यांतें कार्ष्णि महावातसा न तो साहे. ९७
कोंडुनि म्हणत होते 'विझवूं, मारूं, दिवा, ससासा' जे,
तो त्यांसि भंगुनि जयश्रीयोगें श्रीनिवाससा साजे. ९८
क्राथसुत मथुनि केला विरथ कृपाचार्य बा! तुज्या नातें:
कुरुकीर्तिदवृंदारक वधितां स्मरलें न जातु ज्या नातें. ९९
वधितां बृहद्बळातें, म्हणती सुर, 'सर्व कांपवीना?' कीं
वज्रशताधिक याचे शरः मिरवी गर्त्त कां पवी नाकीं? १००
कर्णासमक्ष मारी त्याचे निधियक्षवत् सचिव सा हो!
त्यांसि म्हणे, 'होवुनि चिर वीरसुगतिसुरभिवत्स चि वसा हो!
कर्णाचा भंग करुनि मागधसुत अश्वकेतुला खरची:
प्रतिकूल विधि, तसा तो परबळनाशार्थ हेतु लाख रची. १०२
कालियसा दौःशासनि 'करिन' म्हणे 'त्या परासुः' धीटांचा
प्रभु तन्मर्मी हाणी इषु, जैसा तो परा सुधी टांचा. १०३
त्यासि म्हणे, 'सुत त्याचा की तूं, नरकाय पापखनि रीसें
जो झोंबला सतीच्या सोडाया सत्क्रियेसह निरीस. १०४
मज जिंकाया कैंचें बळ खळजन्मा! तुला निरी हातें
सोडुनि? अजितत्व जयी एका मन्मातुला निरीहातें. १०५
जैसा बाप मळाला, तूं ही तैसा चि पाप! पळसील:
मळसील अपयशें की आतां चि पतंगसा चि जळसील. १०६
ऐसें बोलुनि सोडी दुःशासनसुतवधार्थ नाराच्या;

१. दुष्ट अभिमन्युला. २. एका राजाचे नाव. ३. ससासारखा. ४. नातवाने. ५. कदाचित–पंत. ६. निधिरक्षणार्थ ठेविलेल्या यक्षासारखे. ७. चिरकाल ८. वीरांना प्राप्त होणारी सद्गति ही च कामधेनु, तिचे बालक. ९. मारी. १०. धीर लोकांचा प्रभु. (अभिमन्यु). ११. कृष्ण–पंत. १२. अस्वल. १३. हाते निरी सोडणाऱ्याचा तू मुलगा, अर्थात शास्त्रदृष्ट्या तो च तू. १४. निरिच्छाला. १५. बाणाला.

छेदी शरत्रयें कुरुगुरु त्या मिश्रा सुदर्शनाराच्या. १०७
ती शरहानि तया, जसि हरिच्या नाकांत घातली काडी!
द्रोणध्वज सौभद्र छेदुनि तत्काळ भूतळीं पाडी. १०८
शल्य पुढें होय, तया तत्काळ उरीं शरत्रयें ताडी;
मद्रप शर नव नव नवनीतमृदुकुमारदारणा धाडी. १०९
विरथ करूनि पळविला शल्य जसा तारकासुर कुमारें;
शत्रुंजयादिपंचप्रबळरथी मारिले मग कुमारें. ११०
शकुनि म्हणे, 'कुरुनाथा! हा सर्वांहीं मिळोनि मारावा;
भ्याले यास भट, जसे भीती गजशिशु मृगोत्तमारावा. १११
मारिल एकैकातें, शरगोचर शूर कोण न खपविला?
मृदुपूर्व परि न कंपद काय नृहरिरक्तशोणनख पविला?' ११२
द्रोणासि कर्ण हि म्हणे, "गुरुजी! मज तों नसे चि आवांका;
आवांका युक्ति, म्हणो न तुम्हांस हि हा, करूनि आ वांका.'"
गुरु हि म्हणे, 'कर्णा! हा तक्षक चि, गरळ, करूनि आ, वमला;
आहें संकोचें, परि सोडुनि गेला मघां चि आव मला. ११४
मज भंगुनि हि सुखविता, वा! हा सामान्य काय गा! बाळ?
उतरुनि सांडावा यावरुनि ससर्वस्व काय गावाळ. ११५
याचा धन्य गुरु, जसे धन्य प्रद्युम्न, गुह, कुशलवांचे;
न दिसे आजि मज रणीं जो सौभद्रापुढें कुशल वांचे. ११६
स्पष्ट अभेद्य कवच हा बीभत्सुकुमार अंगपा! ल्याला,
कीं अभिनवा हि, याचें भ्यावें सुकुमार अंग, पांल्याला! ११७
म्यां विजयासि पढविली, विजयानें कवचधारणा तनया;
भेदुनि कवच करिल सुरप हि तिलतुल्य व्यथा रणांत न या.
जरि इच्छिसि हतसुतकुरुपतिशोकप्रशम कार्णिच्या पातें,

१. सुदर्शनचक्राच्या २. कोरनरू बाण. ३. महश्रेष्ठाच्या गर्जनेस. ४. बाणाच्या टापत आलेला. ५. मांसहाचे रक्तानें लाल झालेले नख. ६. योजा. ७. देह. ८. जवमेली. ९. सूतपुत्र जो कर्ण त्याच्या शोकशांति. १०. अभिमन्यूच्या.

तरि पाहूं पाड कसा आधीं तोडूनि कार्ष्णिचापातें. ११९
'कार्मुक-गुण-हय-सारथि-खंडन इतुकें चि शक्य बापा ! हें:
जें यांत घडेल तुला, तें करिसिल तरि करूनि बा ! पाहें. १२०
अक्षत धनु तोंवरि हें वीरशिरोरत्न नावरायाचें;
यास्तव सर्व हि रक्षूं; आजि करुनि यत्न, नाव रायाचें.' १२१
प्रभु वृत्रशिरास जसा खंडी भयदायकास नाकाचा,
तैसा चि कर्ण करिता काय तया सायकासना काचा. १२२
मारी हयांस सहसा कृतवर्मा; सारथीस गौतम हीः
परि न गडबडे तो पितृमातुळसमशुद्धकीर्तिधौतमही. १२३
सौभद्र विरथ होतां धर्मज्ञ हि करिति शस्त्रवृष्टीतें;
तें निष्कृपत्व पाहुनि झांकिति बहु सदयसाधु दृष्टींतें. १२४
म्हणती, 'हाणा, मारा, पाडा, घ्या, काय पाहतां तोंडा?
कोंडा, प्राणव्यसनीं बाळ बुडो, कर्दमीं जसा घोंडा.' १२५
तो खड्ग-चर्म घेउनि अवलंबी वीरनायक विहाय:
संकट पडतां सोडुनि धैर्यासि, म्हणेल काय कवि 'हाय!'?
पाहुनि गरुडा गगनीं धैर्य जसें काय काद्रवेयांचें,
तैसें चि भगवदनुजातनुजा कुरुनायका ! द्रवे यांचें. १२७
केवळ हृदयीं भ्याले जे जे त्या पविंपरीस गाढाला,
शिरले रथातळीं, मग घेतील शिरीं न काय गा ! ढाला? १२८
खड्ग क्षितिवरि पाडी द्रोण छेदूनियां नव त्सरूस;
चित्तीं म्हणे, 'न मज, तुज 'धन्य' त्रिभुवन म्हणो: न वत्स ! रुस.
कर्ण करी चर्माचे, श्रितविघ्नाचे जसे गणप, टुकडे.
तन्हि पाहों हि न शकले वीर विशस्त्रा हि त्या रणपटुकडे. १३०

१. इंद्र—**पंत.** २ धनुष्यास ३ घोड्यास ४ बाप व मामा याच्याप्रमाणे शुद्ध कीर्तीने पवित्र केली आहे पृथ्वी ज्याने असा तो अभिमन्यु. ५. ढाल. ६. आकाशाचा आश्रय करी—उंच उडी मारी. ७. सुभद्रापुत्राला. ८. वज्रापेक्षा हि बळकट जो अभिमन्यु त्या खड्ग त्याला. ९. खड्गमुष्टि—**पंत.**

कार्ष्णि म्हणे, 'पळ इकडे पाहुत सज्जन, न पत्रिकेतुकडेः
चर्मापरि लिहिले की वपुचे मज्जननपत्रिके! तुकडे?' १३१
शत्रुमुखींचें, क्षितिवरि उतरुनि घेवूनि चक्र, पाणि हरी!
भासे, साक्षात् सिरला असुरसमूहांत चक्रपाणि हरी! १३२
वारिति जसें प्रयत्नें एकमतें सर्व संत परचक्रः
कर्णद्रोणादि तसें खंडिति बहु तें स्वअंतपर चक्र. १३३
मग भेकमूषकां जें क्षुधित क्रोधी महाभुजग दे, तें
दुःसह भय आम्हां दे, धरुनि करी तो महाभुज गदेतें. १३४
तेणें हय-सूत वधुनि, अश्वत्थाम्याप्रति प्रभावातें
दावुनि, हरिली कौरवदीप्ति, जसी दीपकप्रभा वातें. १३५
पाहुनि संमुख जेव्हां धांवे सौभद्र सिंहसा रागें,
त्यजुनि रथोपस्थ सरे गुरुनंदन तीन पावुलें मागें. १३६
'खा माते! देवि! गदे! धर्माहितमाहिषकालिके! यातें,'
ऐसें म्हणोनि मारी तो सुबळतनूज कालिकेयातें. १३७
गांधार समसप्तति, बाह्यवसातीयरथ दहा मथिले;
केकय वीर सप्त, द्विप दश, हे मुख्य मुख्य म्यां कथिले. १३८
केला चूर्ण सहयरथ दुःशासनसूनुचा गदाघातें;
साहे न परबळातें जसा हरिनाममनु गदाघातें. १३९
बाहुप्रतापचरितें दावी तो पार्थकायज गदी शें;
वाटे वर्तविला यमसा यमकोपार्थ काय जगदीशें? १४०
त्या सौभद्रावरि बळसागर गरगर गदेसि फिरवीत
दुःशासनसुत धावे, निजभुजभुजगप्रताप मिरवीत. १४१

१. गरुड आहे ध्वजस्तंभी ज्याच्या त्या कृष्णाकडे. २ माझ्या जन्मपत्रिके! ३. रथाची जागा. ४. धर्माचा अहितरूप जो हा महिषासुर याला कालिकादेवी च अशी तू. ५ गांधारदेशाचा राजा. ६ सत्याहत्तर, ७ हे कौरवपक्षीय राजे. ८ हरिनाममंत्र. ९ रोगरूप पापानें. १०. पार्थपुत्र अभिमन्यु. ११. शेकडो. १२. उत्पन्न केला.

युद्धचमत्कार रुचिर, सुचिर प्रकटुनि महागद भ्राते
अन्योन्यकृताघातें वा ! मूर्छा पावले अदभ्रा ते. १४२
आधीं उठोनि, उठतां सौभद्रशिरीं प्रभो ! गदा घाली;
विवश करी ती दुष्परिहार्या जेंवि प्रभोगदाघाली. १४३
पडली जसी कराया प्रेक्षकसुरविरस मस्तकोपरि ती,
भूवरि सौभद्रतनु हि ओकुनि सरुधिरसमस्तकोप रिती. १४४
आधीं श्रम बहु जाला होता, तो त्यांत ही असावध, हो !
केला दौःशासनिनें धर्मनय त्यजुनियां असा वध हो ! १४५
प्रेक्षक, सुर, मुनि, सज्जन बहु हळहळले किरीटिसुतपातें;
रडला पाहुनि सत्यब्रह्मज्ञ हि नारदादि सुतपा तें. १४६
ज्यांचा संकल्प, प्रियसुतशोकें जिष्णुचे असु खपावे,
ते तव पुत्र चि जाले मुदित, इतर अहित ही असुख पावे. १४७
धर्म स्वभटांसि म्हणे, 'वृत्ति परमदुर्लभा असी मरणीं
कां रडतां? सौभद्रें वत्सें यश जोडिलें असीम रणीं.' १४८
चित्तीं च पळांत म्हणे शतदा, बाहेर न बहुवस, 'हाय !'
समजावुनि कटकातें धैर्यें शिबिरासि जाय ससहाय. १४९
कवच विकळ होउ न दे धर्मासि, जसा तुरंगमा तंग,
सुतशोका शिबिरीं भी, जेसा सिंहा कुरंग, मातंग. १५०

---

## अध्याय चवथा.

( चतुर्थदिनयुद्ध ).

धर्म म्हणे, "हा ! हा ! म्यां मंदें दाटुनि कुमार मारविला;
बहुवीरसूत दिसल्या अधिक सुभद्रा, उमा, रमा, रविला. १

१. फार २. आसन्नमरण ३. पुष्कळ दुःख भोगावयास लावणारी पादपंक्ति. ४ पुष्कळ वेळ. ५. हरिण. ६. हत्ती. ७ अभिमन्यु, कार्तिक व प्रद्युम्न या बालवीराच्या माता सुभद्रा, उमा व रमा.

अर्जुनकृष्णसुभद्राकृष्णाकुंतींस काय समजावूं?
काळ न भेटे कैसा? तद्वदनीं पुत्रकायसम जावूं. २
अद्यापि उत्तरेचें मुख पीत असेल बहळ हळदीनें.
म्यां जेंवि, लब्धसंन्निधिनाशें करिजेल न हळहळ दीनें. ३
तुज उत्तरे! मुलि! दिला म्यां कापायास मान विश्वास,
कलिकाळ काय बुडविल मज बहुपापासमान विश्वास? ४
कथिलें कसें असें मज धर्मा! 'करवाळ काढ कलहातें,
मृत्युमुखीं कुलकरगुणशर्माकरबाळका ढकल हातें.'?" ५
धर्माच्या सुतशोका शमवाया, ये महातपा व्यास;
ज्या जोडिलें त्रिभुवनें प्रभुच्या जैसे च हात पाव्यास. ६
तो मुनि म्हणे, 'श्रुतिस्मृतिशास्त्रज्ञा! पांडवा! नको चि रडूं;
शोकभरें, प्राकृतसा बा! कृतसाफल्य तूं नको चिरडूं. ७
गेला उत्तमगतिला, पुरुषोत्तम तो जगीं असामान्य;
शोच्य नव्हे बा धर्मा! पुत्र असावा कुळीं असा मान्य. ८
मृत्यु हरितसे समयीं अमरांस हि; कवण मृत्युला चुकवी?
ऐसें जाणुनि तत्व, व्यसनांत न मोह पावती सुकवी,' ९
धर्म म्हणे, 'हो! गुरुजी! मजला मृत्युस्वरूप कळवा हो!
या तमावरि तुमचा सूक्तिसुधासिंधु एक पळ वाहो.' १०
व्यास म्हणे, "कथितों मी इतिहास पवित्र तुज पवित्रास;
बाधों न दे बुधा जो शोक, महेंद्रा जसा पवि त्रास. ११
होता कृतीं अकंपन नृप तो, हरि गांठिजे असा हरिनीं,
तन्नंदन हरिसमबळ हरिनामा मारिला रणीं अरिनीं. १२
शोकार्त तूं जसा मज पुससि, अकंपन हि नारदा नमुनी;

१. पुष्कळ २ प्राप्त झालेल्या उत्तम ठेव्याच्या नाशामुळे ३. क्षत्रधर्मा—पंत. ४. खड्ग. ५. कुलवृद्धि करणाऱ्या गुणाचे व सुखाचें स्थान च अशा पुत्राला. ६. मुरलीला, ७. सुवचनरूप अमृताचा सदा: ८. इतिहास. कृतयुगा. १० इंद्र किंवा विष्णु यासारखा बळवान.

मृत्युस्वरूप सांगुनि करि ऐसें मोहपारदान मुनी. १३
जें तूं मज पुससि, पुसे तें चि अकंपन हि नारदा नमुनीं:
मृत्युस्वरूपकथनें त्यासि करी मोहपारदान मुनी. १४
"पूर्वी, बहुभारार्ता ऐसें चतुरानना धरा विनवी,
'वाटे भय, दाटे, न च आटे, किति स्यां प्रजा धरावि नवी?'
न सुचे युक्ति चतुर्विधभूतग्रामासि संहरायातें:
कोपे ब्रह्मा, जाणों त्या भूतांचें चि अंह, राया! तें. १६
तेव्हां विधिच्या रोमच्छिद्रवदननयनकर्णनाकानीं
वमिला वह्नि, अशा या आइकतां कोपवर्णना कानीं. १७
वनवह्नि तृणासि, तसा भूतग्रामांसि वह्नि तो कवळी:
रुद्र जगत्क्षयसमर्था धावुनि ये पद्मयोनिच्याजवळी. १८
रुद्रप्रभुला प्रार्थुनि लोकक्षयकारि तेज आवरवी.
इतरें किती विनवाया? तेजस्वी ही धरी न आव रवी. १९
प्रार्थुनियां आवरवी जेव्हां कोपानळासि मदनारी,
प्रकटे रक्ता कृष्णा पिंगा, सुरदृष्टिविभ्रमद नारी. २०
तों प्रभु सांगे, ठेउनि 'मृत्यु' असें नाम, तें चि काम तिला:
त्या उग्रनामकार्यश्रवणें होइल न खेद कां मतिला? २१
मृत्यु म्हणे, 'प्रभुजी! हें काय? बरें तें चि कार्य करवा जी!
योजावा जन सुपथीं धीरें, वीरें हि कार्यकर वाजी.' २२
ऐसें म्हणुनि रडे, कीं गुरु हि सुशीळासि सोडवी पाणी,
प्रभु अश्रुबिंदु तीचे न गळों दे, क्षिप्र ओडवी पाणी. २३

१. मोहाच्या परताराचें दान. २. मागील १३ वी व ही अशा दोन्ही आर्या समानार्थक आहेत. यावरून यांपैकीं पहिली अनपेक्षित असलेली आर्या खोडून टाकण्याचें ते विसरले असावेत असें दिसतें. ३. [प्रजा] वाढत आहे. ४. चार प्रकारच्या (उद्भिज, स्वेदज, अंडज व जारज) प्राणिसमूहास. ५. पाप-पंक. ६. देवाच्या दृष्टीला भ्रम उत्पन्न करणारी. ७. भयंकर नांव आणि काम ऐकून. ८. घोडा. ९. पाणी सोडणें=स्वत्वाचा त्याग करणें, दान देणें. १०. हात

द्रुहिण म्हणे, 'मृत्यो ! तूं माझ्या होसील मान्य उक्तीतें;
कीं जन्मलीस, योजित असतां संहारहेतुयुक्तीतें. २४

'लघु, गुरु,' असें न म्हणतां ओढुनि घे सर्व जीव सरसकट.
जैसा गंधगजाचा[1] मोहुनि हरितो अळींस सरस कट. २५

माज्या वरें तुला अघ कोण्ही हि न लावितील अनघेतें.[2]'
ऐसें बहु समजावी, परि न तिचें क्रूरकार्य मन घे तें. २६

'करित्यें आज्ञा' ऐसें स्पष्ट न वदतां हि देव हर्षविला;
तो पूर्वदग्धजीवांवरि करुणामृतपयोद वर्षविला. २७

एकें चरणें चि उभी, धेनुकनामाश्रमीं नृपा ! होती,
तप एकवीस पद्में[3] तपली; गमली खरी कृपा हो ! ती. २८

त्यावरि चवदा पद्में पुण्यारण्यांत ही सती तपली;
मग अयुत पद्म मृगसहचर्या[4] करितां पितामहा जपली. २९

जीचें अतिशीतोदक त्या नंदे[5]माजि ती उभी हर्षें
होती निजनियमातें संरक्षुनियां अशीतिशत[6] वर्षें. ३०

तितुकें चि कौशिकी[7]च्या तीरांत, तसें च पंचगंगां[8]त,
वेतसकां[9]त हि तपली, जों ये केवळ कृशत्व अंगांत. ३१

तपली तुहिननगीं[10] सुरयजनस्थानीं निखर्व वत्सर ती;
तीश्चित्तरति[11] तपीं बहु, जसि जननीच्या स्तनीं च वत्सरती. ३२

गंगातट, मेरु, मलय, पुष्कर, गोकर्ण, नैमिषवनांत

१. मदोन्मत्त हत्तीचें द्रवत असलेलें गंडस्थळ. २. निष्पापेला (तुला). ३. पद्म=दाभर कोटी. ४. मृगाबरोबर संचार. ५. हा कुबेरनगरीच्या बाह्यप्रदेशीं वाहणारी नदी. ६. आठ हजार. ७. ही हिमालयांत उगम पावणारी विश्वामित्रनामक नदी. ८. ही पंजाबांत वाहणारी एक नदी. ९. तीर्थविशेष. १०. हिमालयपर्वतावर. ११. तिच्या चित्ताची आवड.

तपली, धरिले ते, जे उग्र नियम वाटले प्रिय मनांत. ३३
भेटे प्रसन्न होउनि विधि आचरतां अनंत तप तीस;
स्मित करुनि म्हणे, 'मृत्यो! कां दुर्धर नियम धरुनि तपतीस?'
मृत्यु म्हणे, 'कांपवितो प्राणिवधाधर्म, म्हणुनि तप वरिलें:
जगदीशा! अभय मला द्यावें, त्वां सर्व विनतभय हरिलें.' ३५
द्रुहिण म्हणे, 'न अधर्म स्पर्शेल, मृषा नसे चि विधिवाणी.
सति! सद्गुरूपदेश न बुडवी कोणा हि अमृतनिधिवाणी.' ३६
मृत्यु म्हणे, 'जरि आग्रह, तरि भूतांची असी च हो हानी:
भेदावें प्राणिवपु द्रोहेर्ष्याक्रोधलोभमोहानीं.' ३७
'कर्मानुरूप दुर्गुण, रोग, प्राण्यांसि नित्य खातील.
तुज, काम-कोप सोडुनि करितां संहार, साधु गातील. ३८
तव अश्रुबिंदु धरिले, रोगांचा तो चि होय हा निकर
प्राण्यायुर्हानिकर, ग्रीष्मीं रवि जेंवि तोयहानिकर.' ३९
संहारनिमित्त असी मृत्यु विधिकृता अकंपना! आहे.
रडतोसि पुत्रमरणें कां? मृत्युग्रास सर्व ही बा! हे." ४०
करुणानीरद नारदमुनिच्या वर्षोनि उक्ति गारा या,
देती अकंपनाला तापापासूनि मुक्ति गा! गाया!" ४१
सांगे शोक शमाया ऐसा इतिहास हा शुभ व्यास.
याच्या श्रवणें श्रोते निवती पावोनि आशु भव्यास. ४२
धर्म म्हणे, 'पुनरपि मज, निववाया, कीर्तिसत्सुधाभरितें
चरितें राजर्षींचीं सांगा: मन या चि सद्वरा वरितें.' ४३
व्यास म्हणे, "जरि म्हणासि, 'श्रवणीं राजर्षिचरितरस ओता.'

१. ही आर्या लिहिली गेल्यानंतर मागील ३२ व्या आर्येचा कवीचे हातून चुकून द्विरावृत्ति झाली आहे परंतु पदरचनेचा फरक कमी झाला आहे पहा —

तुहिननगीं सुरयजनस्थानीं तपली बिखर्व वत्सर ती,
तच्चित्तरति तपीं, जसि बहु जननीच्या स्तनीं च वत्सरती.

२. अमृताच्या निधीसारखी. ३ दयामेघ. ४ तत्काळ. ५. कर्णी

तरि ऐक; श्वित्यनृपतिसुत सृंजय पांडुनंदना ! होता. ४४
सख्यें करूनि पर्वत[1]-नारद आले तया पहायाला.
सृंजय पूजी प्रेमें, प्रार्थी सर्वस्व ही वहायाला. ४५
तों तत्सुता तयाप्रति येउनि, वंदुनि पदें, उभी राहे.
पर्वत म्हणे, 'नृपा ! रविभा ऱ्ही श्री, कीर्ति, कोण हे आहे ?'
भूप म्हणे, 'आली वरवर[2] मागायासि पर्वता ! तनया.
हें कन्याकृतिचिंताह्रदिनीशत[3]; तरति सर्व तात न या.' ४७
नारद म्हणे, 'नृपा ! मज योग्य जरि तुझें म्हणेल मन दे हें;
कन्यारत्न न केवळ, अर्थिकरीं[4] देति साधुजन देहें.' ४८
भूप म्हणे, 'योग्य सुतारत्ना तूं, जेंवि आनना रदन,
कोण सुबुद्धि म्हणेल, 'स्वप्रियकर योग्य आन[5]: नारद न ?'.४९
स्तव्या[6] त्रि पिशाचसखा झाली जाणुनि सुपर्वता[7] वरिती;
स्तविते न ठेविती जरि मन हरिवरि की.सुपर्वता वरि ती.'
पर्वत म्हणे, 'न कोण्हां तूं बहुकलिहेतु[8] वांकसी[9] वरिली ?
गति[10] तुज नसो, मनें म्यां वरिली जी, हे तुवां कसी वरिली ?'
'वाग्दानादिविधिविना हृदयें वरिली, म्हणोनि कसि भार्या ?
तुज हि मजविना स्वर्गति न घडो, कीं व्यर्थ दूषिसी आर्या.'
ऐसें परस्परातें शापुनि, सकळारिकाळबाहो[11] ! ते
सृंजयसदनीं नारदपर्वतमुनि बहुत काळ बा ! होते. ५३
ज्या ब्राह्मणांसि पूजित होता पुत्रार्थ भूप तो भावें,
ते म्हणति, 'नारदा ! सुतदीपें सृंजयनिशांत[12] शोभावें.' ५४
त्यासीं देवर्षि, जसा प्रियपुत्रासीं सुखें वदे तात;

---

१. एक ऋषि. २. श्रेष्ठ पति. ३. कन्यारूप चिंतानदीचें शत. ४. याचकांच्या हातीं. ५. अन्य. ६. परिशिष्ट पहा. ७. देवस्व–**पंत.** ८. पुष्कळ तंट्याला कारण. ९. वाकडें. ( नारदा ! तूं मोठा भांडखोर, तूं कोणाबरोबर तंटा केला नाहींस ? ). १०. स्वर्गति. ११. सर्व शत्रूंस काळ च असे बाहु ज्याचे अशा धर्मा ! १२. गृह–**पंत.**

'तुज हे सुसंतति, जसी सुजनासि सुजन सुखेंव देतात. ५५
बोल, जसा तुज व्हावा, ऋषिवरवचनें तसा चि सुत पाहें.'
त्या सृंजयासि वदला होउनि बहु सुप्रसन्न सुतपा हें. ५६
भूप म्हणे, 'विख्यात, स्वायुधदहनांत अहित होमुनि, हो
यन्मळमूत्रादि सकळ कनक, असा पुत्र महित, हो! मुनि हो!'
दिधला तसा चि वर, सुत अद्भुत जाला, तयासि तो जनक
ठेवी नाम 'सुवर्णष्ठीवि' असें, तो हगे मुते कनक! ५८
त्याचें कनक चि सारें मळ, मूत्र, स्वेद, लाळ, सेंबूड!
कां न म्हणेल तशाचें 'मोहीं' तातासि बाळसें 'बूड'? ५९
भाग्यभरें बहु भारी भासे सृंजयपुरी, जसी अलका;
परि इतें चि धन वाढे, म्हणवुनि दृष्टांत होय हा हलका. ६०
किंबहुना, कौंतेया! बा! अनुपायज्ञलुब्धघोरांनीं
चोरांनीं, हरुनि बळें वधिला कनकार्थ बाळ तो रानीं! ६१
नृपति म्हणे, 'हा! हा! हे होइल मिथ्या शिशो! कदा वार्ता?
निवविल मज कवण तुज्या कुशळसुधेकरुनि शोकदावार्ता?'
नारद त्यासि म्हणे, "रा! तुज उचित नव्हे चि शोक तोकाचा;
तो काचा, स्पष्ट मणि त्यागुनि जो काय वेंचितो काचा. ६३
पणज्याला, आज्याला न रडसि कृतपोषयत्नबाला हीं;
श्रेयस्कर ते कीं हा विरहगरद सुगुणरत्न बालाहीं? ६४
कथितों, पुण्यतर तुज्या पुत्राहुनि पुरुष, ऐक, यास रड;

१. क्षमालिंगन २. आपल्या आयुधाग्नीत ३. सुवर्ण च मलोत्सर्जन् ज्याचें असा अर्थ ४. अलकावती ( कुबेरनगरी ) ५. सृंजयनगरांत. ६. उपाय न जाणणाऱ्या लोभी व क्रूर अशा ७. न कुशल आहेस अशा अमृतरूप वार्तेनें. ८. शोकरूपी दावानलाने पीडित अशा मला. ९. बालकाचा. १०. कच्चा. ११. रत्न. १२. पोषणाचा यत्न ज्यानें केला अशा बापाला. १३. वियोगरूप विष देणारा. १४. बालरूप.

कवि[1] म्हणति उगें त्रि शिरःकंपसह हि सूक्त ऐकत्या 'सरड.'
होता यज्वा[2], दाता, शक्राहुनि लब्धरस[3] मरुत्त रणीं;
ज्याची सदुपायनियाति[4] इष्ट सुगति तोंवि न समरुत्तरणीं[5]. ६६
यज्ञ कराया प्रार्थी स्वर्गी त्या स्वकुळगुरुवरा जीवा[6],
चुंबी शिरें पदयुगा, जेंवि मुखें तृषितमधुप राजीवा[7]. ६७
'सुरपति सोडुनि जाणें नृपयज्ञा, हें नव्हे उचित मातें.'
ऐसें मनांत आणुनि जीव उपेक्षी तया शुचितमातें[8]. ६८
भेटे नारद त्याला फिरतां, पावोनि फार खेदास
ऐकुनि वृत्त, म्हणे, 'हो! लेखावे सर्व सारखे दास.' ६९
सांगे सुरर्षि, 'आहे गुरुबंधु, तदीयवृत्ति पैशाची[9];
'संवर्त' नाम त्याचें त्यासि यशाची स्पृहा[10] न पैशाची. ७०
वाराणसीशिवधी[11] तो, वळखावयासि हे खुण गा!
वळखावा बहुयत्नें, अतिकृपणाचा नृपा! जसा कुणगा: ७१
वाराणसीपुरीच्या द्वारीं मांडूनि कुणप[12] उमगावा,
पुसतां, 'दहनीं शिरला' म्हण, कविनीं त्वत्प्रताप धुंम[13] गावा.'
छळ सोसितां मरुत्तें गुरुमंत्रबळें विशंक पद नमुनीं,
होय परमइष्ट, वरद, शिष्टवर दयाप्रसन्नवदन मुनी. ७३
भक्ता अभयप्रद जो, इतरां लोकां संकायसंवर्त[14],
घालील न शरणागतकार्या तो कास काय संवर्त? ७४
करितां मरुत्तमख, ये शतमख उचलूनि वज्र माराया;

१ उगीच मान डोलवीत उत्तम भाषण ऐकणाऱ्याला (तदनुसार न वागणाऱ्याला), शहाणे लोक, नेहमी न चलनवलन करणाऱ्या सरडाची उपमा देतात. २ यज्ञकर्ता. ३ मिळविला आहे वीररस ज्याने असा. ४. उत्कृष्ट उपायाचा नियम. ५ अनुकूल वायुसहित अशा नौकेमध्ये. ६ बृहस्पतीस. ७. कमलाला. ८ अत्यंत पवित्र अशा मरुत्ताला. ९. पिशाचतुल्य. १० इच्छा. ११. काशीतील प्रेताचे ठिकाणी मंगलबुद्धि ठेवणारा (प्रेतालीहि अमंगल न मानणारा). १२ प्रेत. १३. नगाऱ्याने. १४. मानमन प्रलयकाल.

कांहीं चालों न दिला संवर्तें तदभिमान बा ! राया ! ७५
ज्याच्या मखीं सभासद सुर सर्व, मरुत्समूह[1] परिवेष्टा[2].
म्हणति परस्पर भुक्तद्विज, 'जरि पेट[3] न धरि पोट परि वेष्टा.'
शक्रा धनदा देवू, उधळुनि बहु कनक, तो त्रपा दास,
म्हणउनि गुरु[4] दे ज्याला कांचनमयतुहिनगोत्रपादास[5] ७७
केली सफळा ज्याची संवर्तें सर्वपावन[6] सवेहा[7];
ज्याच्या राज्यांत म्हणे, 'तस्कर, दारिद्य, दुःख, नसवे[8]' हा.
गाहे पथीं च ऋत्विग्, विप्रजना बहुत दक्षिणा विटवी;
त्या सुगुणसागराचा पावेल न अंत सुकविधीटिटवी[9]. ७९
कां रडसि सुताकरितां? यज्वा, दाता, असा मरुत्त मरे !
होता बहुप्रकारें त्वत्तनयापरिस परम उत्तम रे !" ८०
देवर्षि म्हणे, "सृंजयराजा ! दुसरा सुहोत्रनृप होता.
न तसा दुजा प्रतापी, अहितमहीपतिमहाहुतीहोता[10]. ८१
त्याच्या राज्यामध्यें वर्षति घन बहुत वारिपरि सोनीं,
चित्तीं 'मिथ्या' न म्हणें, हें परमाश्चर्यकारि परिसोनी. ८२
ज्या तद्राज्यांत नद्या, वापी, जे कूप, काय कासार,
तत्तोय, पंक, शैवळ, कनक[11] चि तें[12] मनुजनायका ! सार. ८३
त्यांतील स्वर्णमय प्लव[13] दर्दुर[14], मकर, मीन, कांसव, हो !
ऐसा सभाग्य न करिल होउनि गुरुचरणलीन कां सव[15] हो !?
जें हेमयादः[16] पडलें मेघांतुनि तें हि हेमयादः वी.

१. मरुद्गणाचा समूह. २. वाढपी. ३. भोजनप्रिय ब्राह्मण परस्परास म्हणतात कां, आता धोतरें रहावयाचीं कठीण, तेव्हा त्याच्यावर न पोटावर वेढणी घाला ! असा भाव. ४. सवर्त. ५. सुवर्णमय हिमालयाचा लहानसा भाग. ६. सर्वांत पवित्र अशी. ७. यज्ञेच्छा–पंत. ८. असणार नाहीं. ९. चांगल्या कवींची बुद्धिरूप टिटवी. १०. शत्रुराजांच्या मोठ्या आहुतींनीं हवन करणारा. ११. सुवर्ण. १२. सगळें. १३. पाणकोंबडी. १४. बेडुक. १५. यज्ञ. १६. सुवर्णमय जलचर.

अद्भुत दाखवि त्या अतिअद्भुत नृपभाग्य हें मया[1] दावी. ८५
यज्ञांत सर्व सोनें दे, छत्र चि त्या न देववे, दानें
त्या यादांचीं हि दिलीः यजिले जे उक्त देव वेदानें. ८६
जो हयमेधसहस्त्रें सविधि यजी, वीर राजसूयशतें;
परवीरसू न जें तिळ मिरवि बहु सुहोत्रराजसू[2] यश तें. ८७
मेला असा हि; कोणि हि जन न मृतिस करुनि पुण्य तरतो की.
वद आपणांत अथवा गुण ऐसा कवण पुण्यतर तोकीं? ८८
हयमेधसहस्त्रांचें जेणें केलें सहस्र सन्मत रे!
ऐसा हि अंग मेलाः काळाला कोण वरुनि जन्म तरे? ८९
जो शतसहस्र देता जाला यज्ञांत दक्षिणा कन्याः
मख उत्तरोत्तर अधिक; वर्णाव्या दानजाति किति अन्या? ९०
मखनटनर्तकसुख तें ऐकुनि हि दिलें नृपा! सुख न कानें.
अंगें[3] मखक्रिया मरुमार्गीं केली कृपा सुखनकानें. ९१
तुजहुनि चतुर्गुण बरा, त्वत्पुत्रापरिस पुण्यतर अंगः
तो ही मेला; राया! कां रडसी? सोड शोककर संग." ९२
देवर्षि म्हणे, "राया! श्रवण तुवां तो नसेल शिबि कुलीं.
ज्याच्या कीर्तिहुनि उणी म्हणति सुकवि अमृतवर्षिशिबिकेला[4].
युद्धहताहित[5]नृपहृतवित्तें विष्ण्वादिसर्वदेव यजी.
गोब्राह्मण[6]प्रजावननिजधर्मकरी च सर्वदे वय, जी! ९४.
श्रीगणपतिजवळ गणक[7]सिद्धांतरहस्य जो सुधी सिकता

१. मयासुराला. २ सुहोत्रराजाचा माना. ३. अन्वयार्थ.—मखनकानें (उत्तम खणणाऱ्यानें) मरुमार्गी (निर्जल प्रदेशांत) [जेंवि] कृपा [करावा] (विहीर वगैरे खणून पाण्याची सोय करावी) [तेंवि] अंग [जनीं] मखक्रिया केली. ४ चंद्राच्या [शुभ्र] पालखीला. ५. युद्धांत मारलेल्या शत्रुगणापासून हरण केलेल्या द्रव्यानें. ६. गोब्राह्मण व प्रजा यांचे पालन हा जो स्वधर्म त्याच्या ठायीं. ७. ज्योतिषाच्या सिद्धांतातील रहस्य.

तो त्या बळें न मोजिल कां गंगासिंधुजंतुसह सिकता? ९५
मोजील वर्षधारा, तारा, सारा सुमेरुपाखाण.
शिबिदत्तधेनु वर्णिल जरि वरदेश्वर म्हणेल 'वाखाण.' ९६
रथहयचतुष्टय जसे प्रेरित अस्तो कवि प्रतोदानें,
वपु बोधें प्रेरी, बहु सुखवी अस्तोक विप्र तो दानें. ९७
बहु अश्वमेध केले, बहु गोकन्यादिदक्षिणा दिधल्या.
कवि म्हणति, 'कंठकर्णी सन्मुक्तावृंद यद्यशोभिध ल्या.' ९८
ज्या शिव म्हणे, 'शिवेचा धनपत्वें अपरमित्र देवर, हो:'
अक्षय धर्मश्रद्धा, सुयश, असे बहुत चित्र दे वर हो!" ९९
धर्मा! देवर्षि म्हणे, 'गेला, मेला, असा हि शिबिराजा.'
म्हणुनि तव नको रडों, म्हण या साधुजनास हि, 'स्वशिबिरा जा.'"

---

## अध्याय पांचवा.

देवर्षि म्हणे, "होता दशरथनृपपुत्र रामराजा, गा!
जेणें साधूनि दिला लोका, सुरसिद्धपामरा, जागा. १
वधिला जेणें राक्षसवर, विश्वविनाशकर, दशानन गा!
आली, ध्याया यत्पदयश, देवांच्या हि वरदशा न नगा. २
यच्चरणांच्या घेती मस्तक मळवूनि देव धूलीला.
तीर्थाधिक हें, गौतममुनिची कळवूनि दे वधू लीला. ३
कीं पाहे शापतमीं चिंतुनि चित्तांत जें विभात शिळा.

१. गंगानदींतील प्राण्यांसह २. वाळु ३ पाषाण. ४ गणपति ५ अमनो ६. टोचण्याच्या शस्त्राने. ७. पुष्कळ. ८. ज्याच्या कीर्तिनामक उत्तम मौक्तिकाचा समुदाय ( पेंढें ) ९. धारण करा. १०. दीर. ( शंकर हे कुबेरास आपला भाऊ मानितात, तसें च शिवास मान लागले ). ११. कल्पवृक्षास. १२. अहल्या. १३. किंवा. १४. चरण. १५. प्रातःकाळ. १६. शिलारूपी अहल्या. * स्वर्ग.

यत्पदयशें सुधारस विरस, सुरसिकांसि जेंवि भात शिळा.
द्रववुनि अजेंडा[1] केली यत्पादरजोलवानिलें[2] कुशिला[3];
यज्जननीच्या होउनि दुग्धधिनें[4] लोले[5] वानिलें[6] कुशिलैं[7]. ५
यत्तेजें जलनिधिच्या तरले न दगड, विशाळनग हि, वर[8];
ज्याच्या सुयशें आला स्पष्ट दशमुखास.मात्र न गाहिवर. ६
न तुळा शतांत पहिल्या मधिल्या अंत्या हि तुरगमेधा त्या;
गुरुकुळ मख[9]श्रुतींचें साक्षात् साकेतपुर[10] गमे धात्या[11]. ७
युववृत्त[12] असो; चाविति सर्प पिसा वा हि न वपु ढेकुण, गा!
राष्ट्र प्रेमें पोषी, कृपण जसा नित्य नव पुढें कुणगा. ८
करिते जाले ज्याच्या कीर्तिसुखें शंभुसे चि कपि लास्य[13].
यद्दर्शनें हि सर्व हि तत्वज्ञ, न पाहतां हि कपिलास्य[14]. ९
रुद्रसहस्राब्द[15] करुनि रंजन दे सेवटीं सुपद विश्वा;
किंबहुना पाववीला जेणें यतिपतिमता सुपदवि श्वा[16]. १०
गेला ऐसा हि प्रभु; बा! करिसी शोक काय तोकाचा?
सोनें हगो, मुतो; जो स्वजना दे शोक काय तो काचा. ११
भूप भगीरथ होता जो शत्रूंतें हि सुगति दे वधुनी.
ज्यासि म्हणे, 'त्वत्पुत्री मी' ऐसें नमुनि सुगतिदेवधुनी[17]. १२
उगमापासुनि सागरसंगमपर्यंत इष्टकामहिता[18]
गंगाचयनें[19] रचिली कनकाच्या करुनि इष्टका[20] महिता. १३
यज्ञांत दक्षिणा दे विप्रांला भूप भूपसुतकन्या.

१ हलका, निष्पाप. २. ज्याच्या पादरजाच्या मदवाय्नें. ३. कुत्सितशीलाला. ४ क्षीरसागरानें. ५. साभिलाष. ६. स्तविलें. ७. कुसव्याला. ८. समुद्रावर. ९. यज्ञ आणि वेद याचें गुरुकुल च. १०. अयोध्याशहर. ११. ब्रह्मदेवाला. १२. पुढे लोकाची गोष्ट तर राहो च. १३. नृत्य—पंत. १४. [ महायोगी ] कपिलमुनीचें मुख. १५. अकरा हजार वर्षे. १६. कुत्रा. १७. सुवृत्त (?) अशी भागीरथी नदी. १८. इष्ट मनोरथ पूर्ण करणारी. १९. गंगेवर घाट. २०. विटा. ( कवीनें ही आर्या पोथी लिहून झाल्यानंतर समाविष्ट केली आहे).

अन्या न घडायाचें घडलें हें दान, त्या चि अतिधन्या. १४
विप्रांसि सहस्रांचें कन्यांच्या दे सहस्र तो भूप;
आच्छादिलें जयांचें दिव्यांबररत्नभूषणें रूप. १५
प्रतिकन्याकनकरथीं, जोडियले च्यार, नव, चतुर गमनीं;
कैंची[1] कशा? प्रतोद[2] हि? साहति 'हूं' हें हि न वच तुरग मनीं.
एका एका रत्नध्वजभूषितकन्यकारथामागें
शत शत सुमणिसुवर्णस्वंबर[3]धर गज दिले महाभागें. १७
नागानागामागें[4] कांचनमाली[5] सहस्र दे वाजी.
तें हरिहरां म्हणति कवि, 'तुमचें देणें अनंत देवाजी! १८
वाजीवाजीमागें शत समवत्सा[6] यथोक्त[7] दे गाई;
विप्रसती म्हणति, 'शिवे! ऐसें चि सदा कथोक्त[8] दे गाई!' १९
गाईगाईमागें जें, वर्णू काय किति अजाविक[9] तें?
हें साधुभाग्य घेइल विश्वस्रष्ट्या हि त्या अजा विकतें. २०
ऐसा हि भूरिदक्षिण[10], यज्वा, राजा भगीरथ न राहे;
राहेल कसा त्वत्सुत? कवणा न स्पर्शली गति नरा हे?" २१
देवर्षि म्हणे, "होता सत्पालक विष्णुचा दिलीप गडी;
ज्ञेणें अप्रणतांच्या न शिरीं शाश्वत उरों दिली पगडी. २२
यत्सुपदासीं हरिच्या[11] मैत्री संपादिली पदानें हो!
सुरनिलय[12]रत्नसानु हि पावे कंपा दिलीपदानें हो! २३
यज्ञांत दक्षिणा वसुपूर्णा[13] वसुधा दिली पदा नमुनी.
ऐसें हें अत्यद्भुत गाती प्रेमें दिलीपदान मुनी. २४
शतमन्यूपें[14] जो प्रभु मान्य जसा व्यजनवायु[15] वायूपें.

---

१. चाबूक. २. घोड्याना टोंचून प्रेरणा करण्याचें शस्त्र. ३ स्वबर=उत्तम वस्त्र. ४. प्रत्येक हत्तीमागे. ५. सुवर्णमालायुक्त अश्व. ६. सारख्या वत्साच्या किंवा वत्सासह. ७. शास्त्रोक्त. ८. कथेंत सांगितल्याप्रमाणे. ९. शेळ्यामेंढ्याचा कळप. १०. पुष्कळ दक्षणा देणारा. ११. इन्द्राच्या. १२. देवांचे वसतिस्थान जो मेरुपर्वत तो. १३. संपत्तीने पूर्ण. १४. इन्द्रापेक्षा. १५. पंख्याचा वारा.

ज्याच्या, लाजविला विधु सुदृग्गौदृतभजन वा युवा, यूपें.[1][2]
असति कनकमय वेदी, मंडप, यूप हि; परंतु हेमाचे
यज्ञवाटवाट[3] हि, ज्यांत निजुनि नृप हि म्हणति, 'हे माचे.'[4]
सुर शिवसे देखति ज्या करित्या सुखवृष्टिच्या दिलीपातें,
दूरुनि विलोकित्यां ही स्वर्गति यष्टिच्या दिली पातें. २७
ज्याचें रथचक्र जळीं न बुडे, आत्मज्ञमन[5] जसें भवनीं.
कृपण जसा वित्ताच्या सत्याच्या अति निविष्ट[6] जो अवनीं.
कवि वदले, 'नेत्रांहीं कर्णांहीं लोक हो! दिलीपा प्या.'
पुण्यश्लोकें रामें सद्गति जेणें तसी दिली पाप्या. २९
स्वाध्यायज[7], चापगुणज[8], 'खा' 'जेवा' 'प्या' असे, जसे अब्द
तैसे, उदार ज्याच्या सदनीं हे पांच न जिरती शब्द. ३०
मेला असा हि; ज्याचें अरिला[9] लिहिलें हि दे वपु त्रास;
कां आठवूनि शोचिसि? रे सृंजय! मनुजदेव! पुत्रास." ३१
नारद म्हणे, "वियोगें पुत्राच्या पावलासि कष्ट महा,
तरि परिस, सांगतों तुज शोक सराया समर्थ अष्टम हा. ३२
नृपति युवनाश्व होता, गेला मृगयार्थ तो वनीं दूर;
तेणें श्रांतें, तृषितें, ऋषिसत्रींचा विलोकिला धूर. ३३
सत्रीं शिरोनि न पुसे देउनि एका हि हांक विप्रासी,
भाविबळें[10] स्वार्थ चि, मुनिसाधितपृषदाज्य[11] हा कवि प्राशी. ३४
तत्काळ गर्भवान् नृप होउनियां होय सभय सत्रप, हा;
पृषदाज्यपानसंकट जाणुनि वदले समस्त सत्रप[12][13] 'हा!' ३५

१ (चंद्रपक्षा) चांगल्या दृष्टांना ज्याचें भजन स्वीकारलें असा, (युवापक्षीं) मुलींच्या स्त्रियांनीं ज्याच्या सेवेचा आदर केला आहे असा. २. यज्ञस्तंभानें ३. ज्याच्या यज्ञशाळेचे मार्ग. ४. मचक. ५. ब्रह्मवेत्त्याचें मन. ६. तत्पर. ७. वेदाध्ययनापासून उत्पन्न झालेला शब्द. (वेदघोष). ८. धनुष्याच्या दोरीपासून झालेला शब्द. (टणत्कार). ९. मित्र. १०. भवितव्यतेच्या बलानें. ११. दधिमिश्रित आज्य. १२. याज्ञिक. १३. मलज्ज.

भेटुनि युवनाश्वाला, हांसोनि म्हणे सदेव वासव, हो !
'हें संकट हरितों, परि सांगुनि पुत्रासि देववा सव हो !' ३६
वैद्याकरवीं तदुदर, व्हाया गर्भासि वाट, तो चिरवी:
या कर्मे बहुकर हि द्विकरसुतन्यून वाटतो चि रवी. ३७
काढुनि उदरांतुनिं शिशु, मोहांतुनि नृप हि, तूर्ण बाहेर,
शक्रासि दस्र म्हणती, 'केला आदेश पूर्ण, बा ! हेर.' ३८
शक्र म्हणे, 'युवनाश्वा ! करिताहे उर्वशी हि बा ! लास्य.
ऊठ सख्या ! नेत्रांहीं प्याया पीयूषपूरबालास्य.' ३९
अमर म्हणाति, 'कां धास्यति ?' तों 'मां धाता' असें म्हणे शक्र,
घाली अंगुलि वदनीं, ती हि अमृत, जेंवि गोपिका तक्र. ४०
'मां धाता' शक्र म्हणे; झालें तन्नाम तें चि गा ! राज्या !
तत्कीर्ति सुखा देती पीतां, तशा जनासि गारा ज्या. ४१
जाला श्रुतिशास्त्रनिपुण, तरुण, सुभट हि भरतां दिवस तीस;
दिवसांत चि तो विजयी जिंकुनि देवासुरादिवसतीस. ४२
विषयीं प्रथम शिरावें, जैसें पावोनि यौवना श्वानें.
ऐसी जंतुस्थिति; परि वरिलें शुचि शील यौवनाश्वानें. ४३
गमला मूर्त घटजकर एरनृपबळसिंधुपतित मांधाता,
ज्यातें निर्मुनि पावे कीर्ति त्रिजगांत अतितमां धाता. ४४
'यद्राजसूयहयमखशत' म्हणाति 'अपूर्व !' अमर ही राज्या !
भंगावया न शकले परनृपमणि, करुनि समर, हीरा ज्या. ४५
विश्व हि, शतदा पावुनि ज्याचें तें यज्ञपुण्यपर्व, तरे,
घृतमधुदुग्धदधिनदीशत ज्यांत बहुत सदन्नपर्वत रे ! ४६

---

१. पुत्राकडून यज्ञ करवा. २. देववैद्य अश्विनीकुमाराकडून. ३. युवनाश्वाच्या दोन हात असलेल्या मुलापेक्षा बहु ( सहस्र ) कर ( हस्त–किरण ) असलेला सूर्य हि उणा ( अल्पतेज ) वाटतो. ४. त्वरित. ५. कोणाते पान करील? ६. मातें पान करील. ७. दुग्धस्वरूपी. ८. एका दिवसात. ९. प्राणिमात्राची गति अशी च. १०. अगस्त्याचा हात. ११. शत्रुराजांच्या सेनासागरामध्यें पडलेली. १२. हिऱ्याला.

जो जो गयादि होता समरीं, जिंकी पराक्रमांधा त्या.
आलें चि मरण बापा! सृंजयराया! अशा हि मांधात्या. ४७
भाग्यें, शौर्यें, ज्ञानें जो विश्वाधिक, असा हि तो मेला.
ऐकसि कीं? कां शिशुच्या शोकें त्वन्मुखशशांक[1] कोमेला? ४८
होता असा चि हरिच्या जो सुगुणें उतरला ययाति तुकीं.
वदले कवि, 'सत्कर्में, सुयशें जीं, तीं वशें यया तितुकीं.' ४९
वज्रधरास हि बहुभयदायक यत्पाणिवर्तिकुश[2] नाकीं,
तो ज्याचा श्वशुर असुरपतिवृषपर्व्यासमेत उशना[3] कीं. ५०
ज्याच्या प्रसूसि परिसुनि, 'धन्य' म्हणे देवराजसू[4] 'यश तें;'
की तो यजिता झाला, हयमेधशतें सराजसूयशतें. ५१
बहुधा घडलें नुरवी तिळ जें अघ वाजपेयशत गा! या
यज्ञासें बहु 'हरिहर' नामें मघवा जपे यश तगाया! ५२
अरि यत्समरीं, हरिच्या जेंवि शिरःपुंडरीकद[5] शश, तरे;
दशशत अतिरात्र[6] करी जो विधिनें पुंडरीक[6] दशशत रे! ५३
सत्रें, चातुर्मास्यें[6] त्यांची संख्या वरी कथावि किती?
स्वल्प चि रसिकमत वदाति. बहुत लिहुनि काय कवि कथा विकिती? ५४
भूमंडळ विप्रकरीं, करुनि ब्रह्मस्ववेगळें[7], दे, हा.
आधीं राज्यश्री, मग वरुनि तपस्या, म्हणे 'गळें देहा!' ५५
जें हिमहेममहिधरीं[8] क्रीडे बैसोनि देवयानीं, तें
नृपरत्न क्षण रडवी, वरुनि विरक्तीस, देवयानीतें. ५६
ऐसा हि प्रभु मेला, बरवा तुजपरिस जो चतुर्गुण[9] गा!
गुण गाउनि पुत्राचे काय रडसि? शुद्ध शंभुचे गुण गा. ५७
नृप अंबरीष होता, यत्पितृसंबंधिनाम नाभाग;
जो नित्य म्हणे, 'न विषयभजनें हरिनतिविना मना! भाग.'

१. तुझा मुखचंद्र. २. ज्याच्या हातातील दर्भ. ३. असुरगुरु शुक्र. ४. इंद्र. ५. शिरकमल देणारे. ६. यज्ञविशेष. ७. ऋणमुक्त. ८. हिमालय व मेरुपर्वत यांवर. ९. चौपट गणी.

क्षितिस प्रजा, प्रजेस क्षिति हि, म्हणे, ‘ सुगुणसद्म[1]नाभागा
आम्हांकरितां करिता[2] जो सदय, तया चि पद्मनाभा गा. ’ ५९
परिपाळिल्या प्रजा बहु जैशा भगिनी, सुता, सुना, भाच्या;
जेणें आशीराशी वरिल्या, मर्दूनि खळ सुनाभा[3]च्या. ६०
अरिराजसहस्रांचें जिंकूनि सहस्र, जो सदय न वधी;
शरणागताभयव्रत सोडुनि सुकुलज कशी करिल नव धी? ६१
न सुधेसीं ज्याचा मख[4]विप्रोच्छिष्टान्नवसुवास वदे.
हा एकीं हि सर्वी, तें हयमेधशतीं हि न वसु वासव दे. ६२
यज्वे वदान्य राजे सपरिच्छद[5] लक्षसंख्य, विप्रकरीं
दिधले, यज्ञांत जसे पशु द्यावे ! ख्यात हें कविप्रकरीं. ६३
येथें सर्व हि पहिला संपन्न गणेशदेव दोंदानें,
धा ! अन्नदान एक चि ज्याचें, दुसरीं न दे वदों दानें. ६४
मूर्धाभिषिक्त[6]दानें तो दे तैसी[7] सदा न गँज दानें:
किति सांगों? दिधली हयगोदानें त्या सदान[8]गजदानें. ६५
प्रमुदित विप्र पहाया यज्ञचमत्कार अंबरीख रची.
इतरीं धन, नग्नजनीं निजअंबर, जेंवि अंबरी खरची. ६६
‘हा पुत्र !’ काय म्हणसि? काय रडसि? जो असा अरिसभारी[11],
मेला तुजपरिस चतुर्गुण गुणवान्, त्वत्सुतापरिस भारी.” ६७
देवर्षि, “म्हणे राजा ! परिसावा नृपजनेंद्र शशबिंदु:
यद्दृष्टिपुढें अरिनृपसिंह, तयाचा[12] बळाब्धि, शश[13], बिंदु. ६८
त्या शतसाहस्र होत्या सुगुणामृतसिंधु बायका, राज्या:

१. सद्गुणाचे माहेरघर जा नाभाग त्याला २. करणारा. ३. चक्राच्या—**पंत.** सुदर्शनचक्राच्या. ४ यज्ञांतील ब्राह्मणाच्या उष्ट्या अन्नाचा नूतन वास. ५. लवाजम्यासह. ६. पट्टाभिषिक्त राजदाने. ७. गज आणि दातृपुरुष यांतील उपमान-उपमेयसंबंध प्रसिद्ध आहे ८ मदोन्मत्त हत्ती देणाऱ्या त्याने. ( दान—मदोदक ). ९. बलवान. १०. दंतो. ११ शत्रुसमूहाचा शत्रु. १२. शत्रूचा. १३. ससा. ( ज्यापुढें शत्रुसिंह ससा आणि त्याचा बलसमुद्र हा थेंब, असा अर्थ ).

लिहिति 'रतिस्तुति' पूर्वीं मात्रा देवूनि बा! 'य'[1] कारा ज्या.
पुत्र सहस्र[3] सहस्र स्वसमगुण दिले स्वदार[4]लक्षातें
जेणें, कथिलें, 'देणें हें धर्माचें; स्वदार[2]! लक्षा तें.' ७०
सुरुचिर, सुशीळ, सुचरित, साक्षर[5], ते सर्व ही अयुतयाजी[6]
देह प्राणांसि, तसे जे येतां ब्राह्मणां म्हणति 'या जी!' ७१
तितुके हि अश्वमेधीं दिधले, देता[7] हि सुत नवे दानीं.
कथिला एक हि भावी ऐसा कविलोकनुत न वेदानीं. ७२
एकैकसुतामागें शत शत कन्या दिल्या महाभागें.
कन्येप्रति शत शत गज, बा! आइकतां न या महा[8] भागें[9]. ७३
एकैक गजामागें शत शत रथ दे; रथारथामागें
शत शत हरि दे; हरिला श्रद्धा, परिसावया कथा, मागें[10]. ७४
एकैका हरिमागें दशशत ज्या भरिति घट[11] सुधेनु[11] तिघे;
ज्यांच्या पयें म्हणावें करुनि[12] अयज्ञोचितें सुधे[12] 'नुति घे.' ७५
एकैक धेनुमागें बहु दे जो दानपति अजाविहि[13] रे!
ज्यासि तसे विषय, जसे क्षीरसमुद्रालया[14] अजा[14] विहिरे[15]. ७६
हयमेधांतीं उरले कोशोन्नत अन्नराशि तेरा हो!
कांचनयूपाद्यद्भुतसाहित्याची[16] कथा चि ते राहो. ७७
ऐसा शशबिंदु, न जो करितां अरिकायहोम[17] घामेला,
तो ही वृद्धमुनि म्हणति, 'बहु पुसतां काय? हो! मघां मेला.'"
देवर्षि म्हणे, "भूपा! परिस बरें हें सुवर्णन गयाचें.

१ 'य' या वर्णास. (रतिस्तुतिपूर्वी 'ये' लिहिती म्हणजे 'येर ति स्तुति,' ती रतीची स्तुति येर–निष्फळ आहे असे म्हणती, असा भाव). २. बायका. ३. एक एक हजार. ४ आपल्या लक्ष स्त्रियास. ५. सुशिक्षित. ६. दशसहस्रयज्ञकर्ते. ७. नवे सुत झाले असते तर ते हि देता. ८. उत्सवास. ९. कष्टी होऊं नकोस. १०. मागून घे. ११. तीन घागरी. १२. अमृताला यज्ञकर्मांत त्याज्य करून. १३. शेळ्या आणि मेंढ्या. १४. क्षीरसागर च घर ज्याचें अशा विष्णूला. १५. झरे. १६. सुवर्णयज्ञस्तंभादि अद्भुत साहित्यांची. १७. शत्रुदेहाचा होम.

प्रतिहयमेध धरी भय अधिकाधिक मणिसुवर्णनग याचें. ७९
मेळविलें पुण्ययश न्यायाचरणें अनंत रायें हो!
केलें शतवर्षें हुतशिष्टान्नाशन अनंतरायें हो! ८०
गय, सुप्रसन्न होतां अग्नि, म्हणे त्यासि, 'पावका! मातें
जरि वर देसी, पान्नसि, या पुरवायासि पाव कामातें. ८१
वरदा! वरदानाधिक कांहीं जरि नाठवे दयावेगा!
तरि सद्गुरुप्रसादें यमनियमें पाठ वेद यावे गा! ८२
मज अक्षयें मिळावीं धर्में, न करूनि अन्यहानि, धनें.
या सुवरें धन्य जरि न करिशिल, हो दास धन्य हा निधनें.
देतां सर्वस्व, सदा श्रद्धा ब्राह्मणपदांवर असावी.
शिवमूर्ते! नाशाया सर्व सुरद्रुममदा, वर असावी. ८४
भार्या भल्या सवर्णा थोड्या चि बहुत, नको बहु कुशीला.
पुत्रत्वें साध्वींच्या यावें म्यां द्यावया यश कुशीला. ८५
श्रद्धा बहु दे आलें असतां अशना वराक राजे वा;
सम विनवावें कीं, 'द्या सूदां यश, नावरा करा; जेवा.' ८६
बा! जेंवि पिशुनमन परमर्मीं, धर्मीं च मन्मन रमो, जी!
धर्मरसिविना वानरजन्मांत चि कां न जन्म नर मोजी? ८७
माझ्या विहिताचरणीं दृक्पात नसो चि अंतरायाचा.
व्हावा या निजधर्माचरणांतासह चि अंत रायाचा.' ८८
अग्नि म्हणे, 'अप्रतिम प्रभुसत्तम, तूं नृपा! इलेवर हो.'
जें मागितलें तें त्या रूपें जगदीश्वरें दिले वर हो! ८९
नित्य प्रातःकाळीं शतवर्षें जो प्रभु प्रमोदानें
अयुत वरतुरगदानें दे, निष्क हि लक्ष लक्ष गोदानें; ९०

१. याच्या प्रत्येक अश्वमेधाचे वेळीं मेरुपर्वताला भय पडे कीं आता आपले पुष्कळ सुवर्ण व रत्ने खर्च होणार' २. निर्विघ्नपणे. ३. कल्याणस्वरूपा! ४. कल्पवृक्षाच्या गर्वाला. ५. दे. ६. सजातीय. ७. वाईट चालीच्या. ८. गरीब, भिकारी. ९. क्षुद्रांचें मन. १०. पृथ्वीवर.

मणिवालुकान्वित[1] कनकमय करुनि क्षोणिवलय[2] दे हातें.
करि गय हयमेध यशश्चंदनशतनिलयमलय[3] देहातें. ९१
सव्विस गावें जीची रुंदी, जी लांब तीस गावें गा!
असि गयहयमखवेदी[4], काशीस तसें च तीस गावें, गा. ९२
ती विप्रजना गयनृपवाक्[5] हयमेधक्रियासुखनि[6] वेदी,
मणिकनकमयी जसि तनु साध्वी व्हाया प्रिया सुख निवेदी.
द्विजदत्तशेष[7] बहु मणिकांचनमययूप इक्षुसे वेची;
ज्यास रुचि अर्थिरतिची[8], जेंवि मुमुक्षूस भिक्षुसेवेची[*]. ९४
ने तृप्तिप्रति भूतग्रामातें खमहिसिंधुनिलयातें[9],
गय हयमखीं; रणीं ही विशिखें[10] मर्मीं च विंधुनि लयातें. ९५
परमपवित्रान्नांचे पृथ्वीपाताळतृप्तिला पुरले.
पुर[11] लेखांचें[11] धालें, परि पर्वत पंचवीस कीं उरले! ९६
वाहत होत्या पुष्कळ पूतपयःप्रमुखसर्वरसकुल्या[12].
तैशा चि बहुत उरल्या वस्त्राळंकारराशि गिरितुल्या. ९७
वर्णूं अक्षय्यकरणवट[13] कीं तें ब्रह्मसर चि; न गयाचें
यश वर्णवे कविशता; 'देणें बहु' म्हणाति अमरनग 'याचें.'
बा! लागला चि समयीं पुरवावा अंतकाळकाम गया.
राजा! त्वां शोचावें कां हें ऐकोनि बाळका मग या?" ९९

---

१. रत्ने ही च वाळू तिने युक्त. २. भूमंडल. ३. अश्वमेधाचे यश हे च चंदनतरुशत त्यास स्थानभूत जो मलयगिरि तो. ४. गयाची अश्वमेधभूमि. ५. गयराजाची वाणी. ६. अश्वमेधकर्माची उत्तम खाण च अशी. ७. ब्राह्मणाना देऊन उरलेले. ८. याचकावर प्रेम करण्याची. ९. आकाश, पृथ्वी आणि समुद्र यांत राहणाऱ्या प्राणिसमूहाना. १०. बाणानें. ११. देवनगर—अमरावती. १२. पवित्र दुग्धादि सर्व रसांच्या नद्या. १३. अक्षय्यवट. * मन्याशी.

# अध्याय सहावा.



नारद पुन्हा म्हणे, "गा राया! सोडूनि खंति दे, वाचीं
मंजु हरिहरस्तोत्रांपरि, चरितें नित्य रंतिदेवाचीं[1]. १
अभ्यागतातिथींतें ज्याचे सूद[2] द्विलक्ष ओगरिते!
की अन्य रंतिदेवा गमले बाहूनि सर्व योग रिते. २
ज्याचें स्वयें चि वरिति स्वर्गार्थ सुसत्र पशु, भय जनाचें
न धरिति; हें वर्णिति यश शतमखमुख[3] सत्रप[4] शुभयजनाचें[5]. ३
पशुचर्मराशिपासुनि जाली चर्मण्वती नदी, नांदे
कृमि यत्पानें स्वर्गीं; जी भलत्यां अर्थ ती न दीनां दे. ४
साष्टशत[6] सुवर्णात्मकनिष्कशतसहस्रदान ओपावें
जेणें, द्विजां म्हणावें, 'अणु[7]' वितरणपाणिनें[8] 'न कोपावें.' ५
जो एकदिवसमात्र द्विज राहे, निष्ककोटि तो लाहे.
किति वनदधनदकीर्ति[9]? प्रभुकीर्तिसवें चि कीर्ति तोला हे. ६
देऊनि कोटि म्हणे, 'हे वाहिलि,' जोडूनि हात 'पाकोळी[10],'
'तंतुपटें काय हरिल दिग्गिभाच्या घनहिमातपा[11] कोळी[12]?' ७
अभय न देवू, माज्या तुमचा, वदतां मृषा, कुळा पाणी[13],
आवडतें मज याचें दर्शन, जैसें तृषाकुळा पाणी. ८
प्राणविरह सुसह, पळ हि बहु दुःसह विप्रपाणिविरह मला.
वमला जो विष वासुकि, ऐसा तापद नसेल तो गमला. ९
मीं मीनसा चि, माज्या द्विजवृंद घरीं, जसें चि आप[14] सरीं.
पाहुनि मेघांसि जसा चातक. मीं ब्राह्मणांसि आ पसरीं.' १०

---

१. राजविशेष २ आचारी. ३. इंद्रप्रमुख देव. ४. सलज्ज असे. ५. पवित्र यज्ञकर्माचे. ६. फक्त आठ ७. किंचित. ८. दानशूर हस्त ज्याचा अशा ज्या रंतिदेवाने. ९. मेघ आणि कुबेर याची कीर्ति. १०. फुलाची पाकळी. ११. पाऊस थंडी आणि उष्ण याना."१२. उर्णनाभि—पंत. कीटकविशेष. १३, हात. १४. पाणी.

जो रंतिदेव ऐसें बोले, विप्रांसि कनक दे हातें,
द्विजबहुमानासि जपे, साधु जसा वृद्धजनकदेहातें. ११
कांचनमयगोशतयुत कांचनमयवृष सहस्रशः पूर्ण
शतवर्षे नित्य दिले, कीं हें जाणार सर्व ही तूर्ण. १२
श्रीरंतिदेवसदनीं अतिथि द्विज एक रात्रि जो राहे,
तो एकविस सहस्र प्रातःकाळीं च धेनुधन लाहे. १३
जें अग्निहोत्रहयमखमुखयज्ञगृहोपकरण[1] सर्व हि तें
विप्रांसि दिलें भूपें सर्व जनांचीं करूनि सर्व हितें. १४
कव्यांस[2] पितर घेती प्रत्यक्ष तसे चि देव हव्यांस[3],
हव्यास धरुनि करि बहु यज्ञांचा जनसुखावह व्यास[4]. १५
श्रीस न आली वेचुनि बहुमणिकार्तस्वरा[5] जरा ज्याच्या;
लाजवि समृद्धिला जो न हरुनि आर्तस्व[6] राजराज्याच्या[7]; १६
मेला असा हि, कारिता जो हयमेधादि सर्व सव सुकृती.
न रडति, अनित्य जाणुनि जातां सुत, दार, वपु हि सवसु कृती."
नारद म्हणे, "प्रसवली ज्या कण्वसुता शकुंतला, गावा,
परिसावा भरत; तुज न सुतशोकहुताशकुंत[8] लागावा. १८
म्हणसी 'शकुंतलासुतरत्नाचा सुमहिमा वदा,' तरि तें
पाडी गहन, हरुनि हरिशत[9] मल्लीसुमहिमावदात[10], रितें. १९
व्याघ्रवराहमहिषगजमद नुरवी मूर्ति सुरुचिरा शिशुची,
हरिशत दमुनि मुनिवनीं जी बहु वर्धिष्णु[11] सुरुचिराशि[12] शुची;
सुतपोवनांत लावी हरि[13]हरितोकांस दामनीला[14] जो
तेणें न कण्व हरिसह हरि हरि, तो कां सदा मनीं लाजो[15]? २१

---

१ अग्निहोत्र व अश्वमेधप्रमुख यज्ञगृहातील यज्ञसाहित्य. २. पितृभागास. ३. देवभागास. ४. विस्तार.–पंत. ५. पुष्कळ रत्ने आणि सुवर्ण याम. ६. दुःखिताचे धन. ७. कुबेराच्या. ८. पुत्रशोकाग्निरूप भाला. ९. शेंकडो सिंह. १०. हरिशतविशेषण–पंत. जाईचे फूल आणि वर्फ तद्वत् शुभ्र असे. ११. वाढणारी. १२. शुद्ध अशी तेजाची राशि. १३. सिंहांस व त्यांच्या छाव्यांस. १४. दाव्याला. १५. परिशिष्ट पहा.

सिंहादि सर्व सत्वें सोडी तो सर्ववीरवर दमुनीं;
यास्तव 'सर्वदमन' हें ठेविति भरतासि नाम वरदमुनी. २२
शत यमुनेच्या तीरीं, तीन शत सरस्वतीतटीं भरतें,
गंगातटीं चतुःशत केले हयमेध धर्मलाभरतें. २३
पुनरपि हयमख केले दशशत, शत राजसूय साधूनीं.
स्तविला रिपुनीं हि भरत, केवळ वाखाणिला न साधूनीं. २४
तैसा चि विश्वजितुत्सव, अग्निष्टोमातिरात्रसन्मख गा!
इतरा भरतयश, गरुडयश दुर्लभ जेंवि नीडजन्मखगा. २५
बा! 'वाजपेय' म्हणति ब्राह्मण पुण्यर्धिच्या अगारा ज्या,
त्या यज्ञसहस्रांचीं तीन सहस्रें करी अगा राज्या! २६
हंस तसा आरब्धाखिलमखकर्माब्धिला भरभर तरे.
शुचिसचिवशिरीं ठेवी राज्याचा सर्व ही भर भरत रे! २७
अर्पूनि शुचि जांबूनदपद्मसहस्र क्रतूंत, पद नमुनीं
जेणें केला कण्व चि न, सकळ ही सुप्रसन्नवदन मुनी. २८
शंभर वावें ठोसर कनकाचा यूप भूपरत्नानें
यज्ञांत घडविला, तो होय उभा सामरेंद्रयत्नानें! २९
धनधान्यगृहक्षेत्रग्रामरथद्विरदधेनुहयदानें
दिधलीं, 'नको नको' तों, त्या भरतानें कुबेरभयदानें! ३०
दासी बहु कोटि दिल्या पात्र करुनि बहुसुवस्त्रमणिकनका,
ज्या म्हणती, 'भूषणभर दुर्वह, इतुका चि फार, अणिक नका.'
बहु कोटि दिले भूषिततनु, कार्यसमर्थभुज, नवे दास,
स्वामीस आदरें जे भजणारे, जेंवि सुजन वेदास. ३२
ऐसा हि भरत मेला; मग संसारांत कां न इतर मरे?
त्याणुनि सुतशोक, सदा जाणुनि भगवत्पदीं च हित, रम रे!"

१. यज्ञविशेष. २. घरट्यातील पक्ष्यास. ३. आरंभिलेल्या सर्व यज्ञकर्मरूप समुद्राला. ४. सुवर्णकमळसहस्र. ५. जाड. ६. देव व इंद्र याच्या यत्नाने. ७. कुबेरास भय देणाऱ्या भरताने.

देवर्षि म्हणे, "बहुधा त्वां आइकिला नसेल पृथु कानें,
तरि च मरोनि तुजें मन मोहीं केलें निमग्न पृथुकानें.[1] ३४
पृथुचा पृथु[2] प्रताप प्रेक्षुनि जाली भयें इला[3] दुहिता[4];
गाईस गोपसा, जो राजा जाला स्वयें इलो दुहिता.[5] ३५
पृथ्वी अकृष्टपच्या,[6] सर्व सुखस्पर्श[7] दर्भ कनकाचे
जाले. कोणाला ही ज्याच्या राज्यांत अर्भक न काचे. ३६
वत्सें प्यावें, धावें, गाईनीं दुग्ध भरुनि घागर गा!
कुसुमरसमिश्रितामृतकल्पोदकपूरपूर्ण सागरगा.[8] ३७
वृक्षांच्या वल्लींच्या पुटकीं पुटकीं[9] प्रभूत मधुरस रे!
बा! ज्यापुढें न अमृत हि म्हणवाया आपणासि 'मधुर' सरे.
जन तुष्ट पुष्ट, अकुतोभयें,[10] नयमय, सर्व ही अगदैवातें[11]
पृथु राज्य करित असतां नव्हते च वनांत ही अग[12] दैवार्ते.[13] ३९
बहुत चि जन रंजविला लाउनि निजगुणरसीं पृथुकथामीं;
जननीनीं जेंवि करुनि तप परम चरमवयीं[14] पृथुक थानीं. ४०
स्तंभितजल[15] होय जलधि, देती ज्या प्रभुसि मार्ग पर्वत रे!
जन ज्याचें यश गावुनि, पावुनि काशींत जेंवि पर्व, तरे. ४१
सर्वदैवतमात्रास[16] न, दे विश्वास प्रमोद तो यजनीं.
मखमंडपीं न तितुकें दानजळ, बहु प्रमोदतोय[17] जनीं. ४२
क्षितिवरि होते पार्थिव[18] जे जे ते करुनि हेममय सारे
दे दान हयमखीं, पृथु परिस गमे अर्थिलोक[19] अयसां[20] रे! ४३

---

१. बालकानें. २. मोठा. ३. पृथ्वी. ४. कन्या. ५. भूमीला दोहनकर्ता. (भूपति). ६. नांगरल्याशिवाय पिकणारी अशी. ७. सुखकर स्पर्श ज्याचा असे. ८. नद्या ह्या पुष्परसानें मिश्रित अशा अमृततुल्य उदकाच्या पूरांनीं भरलेल्या [अब्धि]. ९. झुबक्यामध्ये. १०. निर्भय. ११. रोगवातारहित. १२. वृक्ष. १३. दावानलानें पीडित. १४. उतार वयांत. १५. स्थिर झालें आहे उदक ज्याचें असा. १६. केवळ यज्ञदैवतास. १७. आनंदाश्रुजल. १८. राजे. १९. याचकजन. २०. लोखंडासारखा.

पृथु सांगे, 'गज[1] ओता, पाहुनि हरिचा[2] करी लपो. कळतो
श्रम मज किति; घेत्यांचें देत्याचें हित करील पोकळ तो?' ४४
ओतविले कनकरसें सासष्ट सहस्र भव्य दंती हो!
विप्रांसि दिले, तेव्हां मीं होतों, हे न किंवदंती[3] हो! ४५
मणिरत्नभूषिता हे कनकाची करुनि दान दे वसुधा;
पृथुकीर्तिरत विसरले*, रंभा विसरतिल कां न? देव सुधा.
एवंविध चरितसुधानिधि हि निधन पावला चि पृथु कवि रे!
ज्या काळाच्या वदनीं मेरु विरे त्यांत कां न पृथुक[4] विरे?" ४७
देवर्षि म्हणे, "भार्गवरामाची सृंजया! कथा परिस.
अतुळप्रताप दुःसहशर जो विश्वास मन्मथापरिस[5]. ४८
रणपंडितकोटिपुढें ज्याचा मार्गे न परशु कवि[6] सरला;
जो आपणा समरपर, जैसा हरिकीर्तिपर शुक, विसरला. ४९
भिक्षुवी ज्याची श्रीमद्दत्ताप्तसहस्रबाहुता[7] शमना[8];
जो अर्जुन[9] अर्जुनतां[10] दे अरिच्या, होय बा! हुताश, मना: ५०
त्या जलधीस[11] शरकरें भृगुवंशघटज[12] महातपा प्याला;
तप्तायःपिंड[13] तसा जो लावूं दे न हात पाण्याला. ५१
जो प्रभु म्हणे, 'दिले क्षितिवार्ति क्षत्रियः सुखें कुठारा! खा;
उठलां कबंध हो! यश राखाया? बहु बरें, उठा, राखा.' ५२
राम चतुःषष्टिअयुत[14] बाहुज[15] मर्दी धरून कोदंड,
कोण म्हणेल पितृवधक्रुद्ध प्रभुला 'करूं नको दंड?' ५३
खड्गें सहस्र हैहय[16] ताडी, पाडी सहस्र तो मुसळें.

१. सोन्याचा ओतीव हत्ती करा. २. इंद्राचा. ३. लोकवार्ता, गप्प. ४. पन्हा. ५. मदनापेक्षा. ६. कुशल असा. ७. श्रीमत् दत्तकृपेनें प्राप्त झालेले सहस्र-बाहुत्व. ८. समास. ९. सहस्रार्जुन. १०. तृणता–पंत. ११. सहस्रार्जुनरूप सागरास. १२. भृगुकुलोत्पन्न परशुरामरूप अगस्त्य. १३. तप्त लोहाचा गोळा. १४. ६ लक्ष ४० हजार. १५. क्षत्रिय. १६. कार्तवीर्याच्या देशाचें आणि तेथील लोकांचें नांव. * 'देव सुधा विसरले' असा अन्वय.

खळरक्तासि म्हणे, 'जा, भेटें मित्रा कुजा, कुजा! उसळें.' ५४

अत्यंतोत्कंठित जो ओतु तसा मत्तपरशुकाऽपाया
लागों दे अयुतातें पळ हि न हरदत्त परशु कापाया. ५५

उद्बंधनें हि वधिले प्रबळ ब्रह्मघ्न पाप दशशत रे!
क्षत्रिय एक हि न, जसा लावुनि मृगभूमिपा पद शश, तरे. ५६

देखिलि रामें केली निःक्षत्रा एकवीसदा महि ग्यां;
या गाती, जे हरिहरचरितरसिक, ते कवी सदा महिम्या. ५७

रक्तें भरी प्रतापी प्रभु तो रक्तप-चमू-सुखकर तळीं;
स्थापी स्वयश कविमुखीं, सर्वक्षत्रियवधूमुख करतळीं. ५८

निष्कंटक सद्वीपक्षितिमंडळ सर्व वश्य पाहून
राम म्हणे, 'या दाना पात्र नसे अन्य कश्यपाहून.' ५९

संपादुनि सर्व हि, सव करुनि सकळरत्नहेममंडित हो,
कन्यारत्न तसें, दे भूमंडल युद्धयज्ञपंडित हो! ६०

कश्यप रामासि म्हणे, 'माज्या राहों नको चि विषयांत,
कीं यशआयुःक्षयकर दत्तपुनर्ग्रहणरूपविष यांत.' ६१

राम म्हणे, 'बहु उत्तम.', मागे स्थळ तो नदीनदेशाला.
प्रभुनें प्रभुला द्यावा, देइल दीना न दीन देशाला. ६२

उत्तर हि याचकास न जैसें बहुभाग्यमत्त मानव दे,
तैसें चि तो हि जलधी कांहीं त्या वीरसत्तमा न वदे. ६३

बहुधा घटजापासुनि, पूर्वीं जें काय होय तें विसरे.
शर-सुटतां मागें, खळबळ जेंवि, समुद्रतोय तेंवि सरे. ६४

---

१. मगळ—पंत. २. दुष्टोत्पन्ना—पंत. ३. माजर; बोका. ४. उन्मत्त शत्रुरूप शुकाला अपाय करण्याला. ५. गळफासानें. ६. मृगराजास. ७. पिशाचसमुदायास सुखदायक. ८. तळहातीं. (सर्व क्षत्रियवधूंना हातांनी तोंड झाकून दुःख करावयास लावी). ९. देशांत. १०. नदी आणि नद याचा स्वामी समुद्र त्याला.

त्या इषुपातक्षेत्रीं पाहोनि महेंद्रनामनग रमला.
राम म्हणे, 'करिन सुचिर रुचिर तप; कशास देश नगर मला?'
ऐसा हि राम अंतीं मरणार, यथार्थ जाण सन्मत रे!
संसृतिनदींत काळावर्तीं पावोनि कोण जन्म तरे!" ६६
व्यास म्हणे, "हें षोडशराजिक आख्यान सर्वसन्महित;
धर्मा! याच्या श्रवणें एकीं जन्मीं च कोटिजन्महित. ६७
हा सोळा राज्यांचा महिमा पूर्णायु करि लवायूतें;
यापरि जें मंद दहनतेज, सबळ काय करिल वायू तें? ६८
सांगुनि आख्यान असें देवर्षि म्हणे, 'नृपा! असे तोकीं
होते गुण? सांग खरें गेला तच्छोकभर, असे तो कीं?' ६९
भूप म्हणे, 'बा! चातकचित्ताला मुदिर हर्ष दे, वर्षे;
परि अल्प चि तो, म्यां तुज सांगावा काय हर्ष देवर्षे! ७०
जो अस्मदादिजीव प्राकृत, होईल तो कसा मान्य?
ज्यासि रडत होतों मीं बहु मानुनि, तें हि तोक सामान्य. ७१
त्वद्दृष्टिपुढें प्रबळ हि नतमोह, ज्ञानिनायका! सरतो.
देवासमक्ष उरला, त्रिभुवनदुर्जय हि, काय कासर तो?' ७२
देवर्षि म्हणे परिसुनि, 'सूक्ति न घे पशु; भला भला! मागें.
उपदेशासि न वळतां, कोणी ही न शुभ लाभला मागें.' ७३
वंदुनि तो भूप म्हणे, 'जे झाला सुप्रसन्न, हा च वर.
श्रीकर माथां असतां, बहु काय छत्र? काय बा! चवर?' ७४
नारद म्हणे, 'कृपेची त्वत्साधुत्वें न आवरे उकळी;
हो पूर्णकाम. सुरभीपोषक जन ताक काय गा! उकळी? ७५

---

१. बाण पडलेल्या स्थळीं (परशुरामक्षेत्रीं). २ 'अश्वत्थामा बलिर्व्यासो' या सुप्रसिद्ध श्लोकांतील सात चिरजीवामध्यें परशुराम आहे, तथापि तो हि कधीं काळीं मरणार च, असा भावार्थ. ३. काळरूप भोंवऱ्यांत. ४. मेघ. ५. रेडा. (महिषासुर). ६. सुभाषित. ७. [ वर ] मागें.

भेटो त्वत्सुत तुज, जो गेला होऊनि परासु[1] नरकास.
घालूत साधु भजनें पावाया गति[2] परा[2] सुनर कास.' ७६
या वागवसानीं[3] तो अंकीं च प्रकट होय जनकाच्या.
सनकाच्या बंधुपुढें, अमृतकथा म्हणति सुज्ञ जन 'काच्या.'
धरिला पुत्र सुवर्णष्ठीवी हृदयीं द्रवोनि मग, नमुनी
प्रथम प्राज्यप्रेमें नित्यत्तवदयामृताभ्र गगनमुनी. ७८
हयमेधादि मखांच्या ठेवी सप्रेम चित्त तो यजनीं.
वर्षे सृंजयधाराधर सर्वत्र स्व-वित्त-तोय जनीं. ७९
शिशु अनपत्य अयज्वा[4] रणयज्ञांत हि न पावला मरण,
म्हणुनि उठाविला मुनिनें करवाया सुगतिकर सदाचरण. ८०
अभिमन्युसि धन्य म्हणति गेले करुनि सुकृतें सुगतिला जे;
ज्यास स्वर्गति घडली या मर्त्यगतीस तो सुगति लाजे. ८१
निववितसे जो विखरुनि सुखकर करनिकर[5] इंदु नित्य जगां,
तो चि अभिमन्यु. धर्मा! धरिल्या शोकांसि निंदुनि त्यज गा!
उरले शोच्य; सुगतिला गेल्याचा शोक कां करावा हो!?
कर्पूर कुशळ वाहे नेत्रीं, जड[6] लोक कांकरा वाहो. ८३
जोडावा स्वर्ग तुम्हीं, सोडावा सर्व मोह, माजा तो
हा भाव; शोक सारा सरला कीं; राजसत्तमा! जातों. ८४
स्पर्श न मोहाचा हो तुज, अंतर्हित परा शराचा हो."
ऐसें बोलुनि झाला सुत[10] अंतर्हित पराशराचा[10] हो! ८५
नृप आपणा मनिं म्हणे, "'कोठें तो वत्स उत्सन्नदशील[11]?'
हें पुसतां, विजया तूं काय कसें प्रात्तकुत्स[12] वदशील?" ८६

---

१. गतप्राण. २. श्रेष्ठ गति. (मोक्ष). ३. भाषणार्ती. ४. यज्ञ न केलेला. ५. किरणसमूह. ६. मूढ. ७. खडे–पंत. ८. मूळ पाठ–साधुसत्तमा! ९. गुप्त शत्रूला. १०. व्यास. ११. आनददायक शील ज्याचे. १२. निंदित असा.

# अध्याय सातवा.

संसप्तक मथुनि विजय सांजे[1] शिविरासि यावया परते;
प्रभुसि म्हणे, 'कां कांपे मन, कांपविले जरि स्वयें पर ते? १
कंठ गहिवरें भरला! शिरली हृदयांत केशवा! धडकी!
येतें रडें वृथा कां? बा! माजी प्रकृति काय गा! रडकी? २
स्फुरण[2] हि अनिष्ट, भिववित उत्पात हि, सांग काय बापा हें!
कुशळ असे कीं माजा राजा? ध्यानांत नीट बा! पाहें.' ३
देव म्हणे, ' कुशळ असे प्रभु, ऐसें मन्मनास वाटतसे;
कीं थोडे जन जगतीवरि धरिते धर्मनीतिवाट तसे. ४
आलें असेल आणिक कांहीं, त्वद्धिक्रिया[3] नव्हे वंध्या.
यद्भावंतद्भवतु[4]; करूं आधीं न गणूनि आधिला संध्या.' ५
संध्या करवुनि नेतां सेनेंत, मनीं म्हणे परस्वामी[5],
' स्वधना न जपों कैसा? काय रथी वाहतों परस्वा मीं?' ६
अर्जुन अस्वस्थहृदय होय गतश्रीक शिविर पाहून.
प्रभुसि म्हणे, ' महदप्रियसूचक बहु चिन्ह काय याहून? ७
मीं नायकें सुवाद्यस्तुतिगीतरवासि, तूं हि नायकसी.
मज पाहुनि आप्त अधोमुख होती. गति असेल हाय! कसी? ८
अतुळ प्रताप लोकीं ज्या खळबळजळधिवाडवाभाचा[6]
तो कृष्णा! आज तुजा मज आला कां न आडवा भाचा? ९
व्याकुळ होय महाजन, भाजन होउनि जसा महाघातें,
लोक तसा हा दिसतो, व्हावे विकळत्व हें महाघातें.' १०
शिंबिरीं शिरोनि विजयें धर्मादिक देखिले अधोवदन.

---

१. सायंकाळचे. २. वामनेत्रादि स्फुरण ३. तुला होणारी चिन्हे ४. जे असेल ते असो. ५. श्रीकृष्ण. ६. दुष्टाचे सैन्यरूप समुद्रास वडवानलासारखा. ७. मोठ्या पातकाला. ८. मोठ्या घाताने.

तें पुत्ररत्न एक चि न निरखिलें सद्गुणधिचें सदन. ११
मृदुलप्रकृति न साहे सुतशोका, जेंवि न रविला पाला;
शिबिरीं करी परोपरि नाराणमित्र नर विलापाला. १२
" मज आडवा न आला, तरि या पांचांत पृथुनयन सावा
कां नीरजनाभाचा भाचा सुगुणाब्धि पृथुनय नसावा ? १३
बोले, कृष्णमुखींची वेणु तसा, परम लाडिका वाणी.
जो स्पर्शे, शिशु हि, न घे गुरुसंन्निध, पर, मला डिकावाणी.
जो बहु परपृतनांसीं, गोपींसीं बाळकृष्णसा, रमला,
दावा हो ! सत्वर तो स्वगुरुवचनगीतकृष्णसार मला. १५
बाळ हि जो खड्ग-परशु-चक्र-गदा-चाप तोमरा वाहे,
संकल्प दुर्जनांचे जाले की सफळ ' तो मरावा ' हे. १६
ज्याचीं शास्त्रीं शस्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् समज,
काय तुम्हीं केला हो !? आणुनि तो भेटवा चि वत्स मज. १७
बहुधा तुम्हीं धरुनि गुरुकृतचक्रव्यूहभेदकामातें
केला चि पुढें. नाहीं तरि करिता स्पर्श खेद कां मातें ? १८
न तुम्हीं. न कौरव हि; मीं तद्धातक; कीं, तया रिघायाचा
कथिला उपाय चपळा; आधीं स्यों न कथिला निघायाचा. १९
इतक्यांसि एक बाळकसंरक्षण कठिन कां? नवल यांचें
भुजसौकुमार्य ! ‡ सुचलें अपनयन हि सेवकां न वल्यांचें. २०
तुमच्या भुजशस्त्रांतें धिक् ! हा निःसार हो ! खटाटोप.
शिर ज्या न रक्षवे, तो कार्याचा काय ओखटा टोप. २१
वदला असेल कृष्णा, ' अव्हेरिसि बाळनमन कां ? पावें.'

१. दीर्घनेत्र २. मरावा ३ नीतिमान ४ बालक असताना हि जरी मी त्याला वडिलांसमक्ष धेत नसे, तरी तो मला गोंदाप्रमाणें चिकटून रहा. ५. शत्रुसैन्यांसीं. ६ आपल्या पित्याचें वचन हें च गान, [त्याला लुब्ध होणारा] हरिण. ७. ज्ञान. ८ द्रोणरचित चक्रव्यूहाचा भेद करण्याच्या इच्छेला. ९. काढणें. १०. वल्ह्याचे. ११. व्यर्थ. * प्रतिविंध्यादि पांच द्रौपदीपुत्रांत. ‡ परिशिष्ट पहा.

अथवा त्या तेज्याचें समयीं अळुमाळ[1] न मन कांपावें. २२
हर! हर! जाणों चुरिला तो बाळ करेणुनीं[2] चरणपातें.
शिव! शिव! भरितिल कीं हो! तो बाळक रेणुं[3] नीच रणपातें.
कुंतीस काय सांगूं? कृष्णेला दाखवूं कसें वदन?
दुष्कर मला सुभद्रासांत्वन, दुर्दर्श उत्तरासदन. २४
जावूं दिला मजविना परलोका काय एकला भाचा?
होता उपाय हातीं सुयशाच्या हा हि एक लाभाचा. २५
खाता चि अद्वितीय सुदर्शनं[4] परबळ पळांत चाटून,
परि बुडविल निजयश[5] तें कर्म करिल[6] कवि कशास दाटून? २६
यांचें[7] स्वरूप कळतें तरि पळ न विसंबता चि बाला[8] हां;
'शिव! शिव!' म्हणेल मरणावधि वैधव्याधिमग्न बाला[9] हा!
समयीं कोठें गेल्या बा! तुज सोडूनि गुरुजनवराशी?
वाहेल आधिच्या किति ती मृदुलप्रकृति नित्य नव राशी? २८
स्वार्थपर, अकृप, निस्त्रप[10], आम्हीं म्हणउनि मनांत विटशील;
परि उत्तरा सती परगतिकामा[11] तुज म्हणेल 'विटशील[12].' २९
न म्हणे 'अमृतरस अधिक,' करि ज्याच्या बाप लालना कवि तो;
काय पितृपरिष्वंगज[13] जें सुख त्या बा! पलाल[14] नाक[14] वितो? ३०
कां माजें उर न उले? कवि 'पवि' कीं म्हणति तोकशोकाला!
लोका लाजे मन, कीं जावें यश हारवूनि ओकालीं[15]. ३१
न तुतें पार्थ कदाचित्, कृपण हि वांचेल सोडुनि, धनातें;
चुकविल न चकोराच्या विधुवांचुनि सर्व[16] सोडुं[17] निधनातें. ३२

१. यत्किंचित. २ हत्तिणींनीं. ३. धूळी. ४. सुदर्शनचक्र. ५. आपला शस्त्र न धरण्याचा नियम ६. शहाणा (कृष्ण) ७. धर्म, भीम व नकुलसहदेव यांचे. ८. मी.(अर्जुन) ९. उत्तरा. १०. निर्लज्ज. ११. श्रेष्ठ गतीची (मोक्षाची) इच्छा करणाऱ्या. १२. जारस्वभावाचा. १३. पित्याच्या आलिंगनापासून झालेले. १४. तृणप्राय, क्षुद्र असा स्वर्ग. १५. गृहाला. १६. इतर कोणी हि. १७. नक्षत्रमंडळासह अशा (चंद्रावाचून).

हा वत्सा रक्ताक्षा! जाले त्वत्सुगुण आजि घातकसे!
बा! वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे? ३३
अभिमुख परप्रहारें पडला कीं, धर्मराज! सांगावें.
प्रभुजी! न जें यशस्कर तें स्वगुरुसमक्ष तोक कां गावें? ३४
संरक्षिलें न, असतां शस्त्र नयन बाहुही विपुळ, याला;
निष्फळ भार[1] वहातां कां? सोडा, जो नव्हे रिपु-लयाला." ३५
भगवान् म्हणे, 'बुडाला कीं हा मोहांत! रक्ष[2] भो गीते[3]!
जीवांला विषय, तसे संमोहाया न दक्ष भोगी[4] ते.' ३६
प्रभु पार्थासि म्हणे, 'भो बुधवीराशिरोमणे! सखे! दमन
केलें तुजें हि शोकें; माजें येणें चि बहु संखेद मन. ३७
गळबंधन कीं पुत्रप्रेम विवेकें चि तोड; बापा! हें
सुखकर नव्हे चि; उघडुनि विषरत्नांचा न तो डबा पाहें. ३८
सोत्साह युद्धधर्मी होता; नव्हता चि तो असावध हो!
गेला उत्तम गतिला; त्याचा कां शोकं[5] हा असा वध हो!' ३९
धर्म म्हणे, "जें झालें तें कथितों सर्व ऐक बा ज्ञात्या!
म्या 'व्यूहीं द्वार करीं' ऐसी केली स्वयें चि आज्ञा त्या. ४०
द्वार करी, शिरतां भी न व्यूहा, जेंवि सागरा मकर.
नुरवी कुमार परमद लव हि, जसा धरुनि राग रामकर. ४१
होय, जयद्रथ आम्हां हेतु कुमारास अंतरायास,
त्यास न निवारवे, बा! जेंवि प्रबळास अंतरायास[6]. ४२
आम्हां त्या क्षुद्रवरें रुद्रवरेंकरुनि वारिलें वाटे.
प्रभुनें[7] सौभद्रासि न, पांचांस हि आजि मारिलें, वाटे. ४३
कृतवर्मा द्रोण कृप द्रोणज कौशल्य कर्ण रथ सा हे,
शर वर्षले जलदसे; परि धैर्यें धरुनि धर्मपथ साहे. ४४

१. जो रिपुलयाच्या कामांचा नाहीं तो निष्फळ भार. २. रक्षण कर. ३. हे भगवद्गीते! ४. सर्प. ५. शोककारक. ६. यमद्रायास. ७. शंकरानें.

केला विरथ अधर्मे दूषुनियां शुद्धयुद्धसव सानीं,
दौःशासनिनें वधिला स्वगदेनें कश्मळांत अवसानीं. ४५
अष्टसहस्र रथ, द्विपपति नवशत, राजपुत्र रणदक्ष
द्विसहस्र, मर्दिले बा ! सौभद्रें अश्व पत्ति बहु लक्ष. ४६
गुरुला न सांपडावें म्हणउनि ऐसें करावया गेलों,
तों शोका सांपडलों पुत्राआधीं च मीं न कां मेलों ? " ४७
पाडी विजयास, म्हणे, 'तुज ही मी ' शोकवेग ' मोहीन.'
हा अधिक, क्ष्वेड करी मूर्छित तन्हि ओकवे, गमो हीन. ४८
धर्ममुखें वृत्तांत स्वसुताचा ऐकतां चि तो कानें,
पडला मूर्छित अर्जुन 'हा वत्स !' असें म्हणोनि शोकानें. ४९
सर्वाप्त-वीरमंडळ झालें अत्यंत घाबरें होतें.
धर्म म्हणे, ' दाखवितें न तपोवन या अंधा, बरें हो ! तें. ' ५०
सावध होउनि अर्जुन सोडी बहु दीर्घ उष्ण निश्वास,
कोपें पेटे, वाटे जाळील सधार्तराष्ट्र विश्वास. ५१
विजय म्हणे, " सत्य उद्यां मारीन जयद्रथासि आपण, हो !
म्या केला, होइल जरि मिथ्या, शरणागतीं च, हा पण, हो. ५२
वांचेल, कराया तप, जरि जाइल काय तो अरण्यातें,
अथवा म्हणेल, 'शरणागत मीं ' या केशवा शरण्यातें: ५३
किंवा युधिष्ठिराच्या आश्रय तो जरि करील पायाला,
गेला शिवाहरिभयें प्रभुमागें तरि करीं लपायाला: ५४
अथवा भीम-नकुळ-सहदेवांसि म्हणेल, 'त्यांचवा दास,'
तरि खोट्यास हि राखिति साधु, जसे काय लांच वादास.
ज्या जीवदान दिधलें, तो हा कीं ? कां अजीं ! वदाना तें ?
कळलें, पात्र, दुखविला अहिंसा वैरी, न जीवदानातें. ५६

१. सहाजणींनीं. २. मूर्छेत असता. ३. विष. ४. या दुःखाला. ५. शरणागताचे ठायीं मात्र मिथ्या होवो. ६. दुर्गावाहन सिंहाच्या भयाने. ७. हत्ता. ८. [ खोट्या ] वादास.

वधिला चि रणांत उद्यां म्यां बाळकघातहेतु सिंधुप हा,
या गरुडें धरिला तो[1] अहि उडउनि शत्रुसैन्यसिंधु, पहा. ५७
मारिन जयद्रथाला, कोंडिन दोघे[2] गुरू हि शरभवनीं[3].
भ्रमतिल कौरव माज्या ईषुपटलीं[4] जेंवि सिंह शरभ-वनीं. ५८
न वधिन जयद्रथा तरि पावेन असत्यसंध[5] नरका मीं;
ज्या ज्या पावे क्रोधी, लोभी, बहुसंपदंध नर कामी. ५९
मारिन जयद्रथ, करिन यश भुवनीं, विशिखजाळ[6] वितत[7] रणीं;
हें न घडतां जळेन ज्वलनीं, होतां चि अस्तमित[8] तरणी." ६०
करितां असि प्रतिज्ञा, जगदीशें पांचजन्य वाजविला.
लाजविला प्रलयजलदनाद, ब्रह्मांडगोळ गाजविला. ६१
वाजउनि शंख जाला कौरवहृदयास्मि देव दत्तदर.
तैसा चि सखा त्याचा अर्जुन फुंकोनि देवदत्त दर. ६२
देतां दुर्जनहृदया स्वदररवेंकरुनि कंप देवांद्यें[10]
प्रकटिति कटकीं भेरीप्रमुखें बहु नादसंपदें वाद्यें. ६३
चारकथित[11] प्रतिज्ञा परिसुनि बहु सिंधुराज तो भ्याला.
भिववी धननाशाची वार्ता अत्यंत जेंवि लोभ्याला. ६४
राजसभेप्रति जावुनि पार्थाची श्रुत करी प्रतिज्ञा ती.
'पळतों' म्हणे, 'न रक्षिति पळ हरिभागा[12] करीप्रति ज्ञाती.' ६५
'जा च्र म्हणा, न उगे तुम्हि धरुनि असा ध्यान; हा निरोपाळा
पावों, रिपुची त्याच्या[13] लेश असाध्या न हानि रोपालीं[14].' ६६
कुरुप म्हणे, "पतनावधि[15] निजधर्मीं कार्य[16] हा न्भावो जी!
शुद्धयशोहानिपरिस, बहु वपुची काय हानि भावोजी[17]!? ६७

१. तो (जयद्रथरूप) सर्प. २. द्रोणाचार्य व कृपाचार्य. ३. बाणाच्या घरामध्ये. ४. बाणाच्या आच्छादनांत. ५. खोटी झाली प्रतिज्ञा ज्याची असा. ६. बाणांचें जाळें. ७. विस्तृत. ८. अस्तास गेलेला. ९. भयदायक. १०. श्रीकृष्णानें. ११. हेरांनीं सांगितलेली. १२. सिंहाचा भाग जो हत्ती त्याप्रत. १३. अर्जुनाच्या. १४. बाणाला. १५. मरेपर्यंत. १६. देह. १७. असे मेहुण्याला संबोधितात.

दुःशासनादि आम्हीं आहों तुज सर्व वज्रकोट[1], रहा.
कर्ण भुजाश्रितजीवा न म्हणों दे कीं सुरद्रुकोटर[2] 'हा!' ६८
आहेत कृप, द्रोण, द्रौणि, शुचियशासि सर्व थारा जे,
रक्षितिल तुला यत्नें हे कालिंगादि सर्वथा राजे. ६९
आहेसि शूर; तूं हीं सोडूं धृति-धर्म-नय नको, पावें.
कोपुनि काय करिल पर? न महेशानें चि नयन कोपावें." ७०
बोलुनि ऐसें, येउनि वंदुनि गुरुच्या पदाप्रति ज्ञाते
कुरु-सिंधुराज कथिती पार्थकृता तापदा प्रतिज्ञा ते. ७१
सिंधुपति म्हणे, 'गुरुजी! लाघव[3] दृढ दूरलक्षवेध[4] रणीं
बहु जाणें मीं कीं तों; रविला चि अशेष लक्षवे धरणी.' ७२
द्रोण म्हणे, 'सिंधुपते! ठावें हें तुज हि, त्या हि सभ्यास;
परि तुजहुनि विजय अधिकः त्याचा चापीं अखंड अभ्यास.
बहु खवळला धनंजय वनवासें; त्यांत आजि सुतपातें[5];
तत्तप बहुमत त्यां[6], जे तपले पंचाग्निमाजि सुतपातें. ७४
परि तूं भिवों नको चि; त्यजुनि मरणभय सुखें करीं समर.
न शकतिल मद्भुजाश्रितमर्त्यविलंघन करावया अमर. ७५
रक्षीन असंशय मीं, तूं वदन करूं नको चि अवनत रे!
कांसेसि लागल्याचें[7] क्षुद्र[8] अलाबु हि करुनि अवन, तरे. ७६
करिन असा व्यूह, जया तो न शके वासवि[9] हि तरायातें.
प्रिय, हित, सत्य वदावें; मज भूदेवांस[10] विहित, राया! तें. ७७
अनुभविले साध्वीसुतरत्न-परिष्वंग-सुरसदाम[11] हि म्यां.
गाती यशोरसाच्या, अमृतरसाच्या न, सुर सदा महिम्यां. ७८
पुरवी, प्रयागसा कीं, हा धीरांचा समस्त काम, रण.

१. अभेद्यकोट. २. कल्पतरूची ढोल च असा. ३. चातुर्य. ४. लांबचे निशाण मारणे. ५. पुत्रमरणाने. ६. खालते. ७. आश्रयास आलेल्याचे. ८. मूळ पाठ—**प्राकृत हि नदींत करुनि.** ९. अर्जुन. १०. मला ब्राह्मणाला. ११. साध्वीपुत्राचे आलिंगन हा च सरस हार.

नाचवि अमस्तका[1] हें, कां नाचविना समस्तका मरण? ७९
कौरव, पांडव, यादव, अन्यजन तसा च, ससुत मीं हि महा
अध्रुवे[2] सर्व हि. नुरवी काळ जगीं स्थिति, जसा तमीं हिमहा:[3]
नरवर्या! पर्यायें[4] आम्हीं हरिलों असों चि कालबलें.
सुगतिद रणमरण उपस्थित होतां केंवि चित्त कालवलें?' ८१
गुरुच्या अभयें, बोधें, काळें ही सिंधुपाळक वळविला.
हा काय? मृत्युकरवीं दैवें प्रभुमित्रबाळ[5] कवळविला. ८२
सैंधव म्हणे, 'विभय मीं झालों; कीं गुरु नव्हे अलीकवचा[6].
गुरुवचना कीर्ति जसी, क्लैंची पविच्या[7] तशी भली कवचा?' ८३
सस्मित सचिंत होउनि गुरुशिष्यांच्या गुरुप्रतिज्ञानीं,
प्रार्थिति, 'अपकीर्ति न हो,' ऐसें त्रिजगद्गुरुप्रति ज्ञानी. ८४
ऐकुनि गुरुप्रतिज्ञा कुरुकटकीं वाद्यमात्र[8] वाजविलें,
बहु नरसिंहध्वनिनीं घटिकाभरि सर्व गगन गाजविलें.. ८५

---

# अध्याय आठवा.



देव म्हणे, "सखया! मज, भीमा धर्मा हि, न पुसतां स्वमतें
कासि दुर्घट प्रतिज्ञा केली? बा! परम कठिन हें गमतें. १
जाणों, वेडे ते, जे स्वगुरुजना सुमतिदायका पुसते!
बा! तूं सत्य धनंजय काय? द्रोणादि काय[9] कां पुसते? २
हे चार म्हणति, 'भ्याला सैंधव परिसुनि गुरुप्रतिज्ञा ती
कथिते झाले त्यासह पाय धरुनि हें गुरुप्रति ज्ञाती. ३
तद्रक्षणार्थ केली स्वमुखें गुरुनें तुज्या प्रतिज्ञा, ते
कीं हे सत्या? गातिल त्याच्या कीं तव भुजाप्रति[10] ज्ञाते? ४

---

१. कवधाते. २. अस्थिर, अशाश्वत. ३. सूर्य. ४. प्रकारांतराने. ५. अभिमन्यु. ६. असत्य बोलणारा. ७. इंद्राच्या. ८. एकूणएक वाद्ये. ९. अग्नि. १०. हेर.

शकट[1]व्यूहीं पद्म[2]व्यूह, तयाच्या हि कर्णिके[3]माजी
राहेल जयद्रथ कीं; बहु चिंता बुद्धि पावली माजी. ५
कर्ण, वृषसेन, गुरुसुत, मद्रप, भूरिश्रवा, कृपाचार्य,
सिंधुपतिपुढें षड्रथ हे; तेव्हां साधतें कसें कार्य ! ६
हे दुर्जय जिंकावे त्वां आधीं मग सुदुर्जय द्रोण,
तेव्हां कीं सैंधववध ! हें शक्य म्हणेल तुजविना कोण? ७
मंत्रज्ञ सचिव, सात्यकि, भीमादिक, धर्मराज, हा आर्य
साध्यासाध्य विचारूं, कीं व्हावें सिद्ध योजिलें कार्य." ८
अर्जुन म्हणे, "मुकुंदा ! मानिसि ज्यां सारथांसि[4] अधिकबळ,
ते मद्बळार्ध; समबळ न; जसे नवनीतकबळ[5] दधिकबळ. ९
कृष्णा ! असोत मदधिकबळ, ते कर्णादि सा रथ, कवीनं[6],
कोदंडवेदपंडितँ[7]; मीं त्यांसि हरूनि सार थकवीन. १०
सैंधवशिर हरिन, करिन रण, सगणद्रोणगुरुसमक्ष, महा.
चिंता करूं नको वा ! गुरुमाहात्म्यें चि गुरुसम क्षम हा. ११
किंबहुना, जरि तिकडे होइल, जिंकीन तूर्ण विश्वास.
माज्या शस्त्रास्त्रांचा मज़ला आहे चि पूर्ण विश्वास. १२
मजसीं करील गुरु, त्या पापा रक्षावयास कटकट कीं,
एक हि अभग्न राहों देईन न मीं, तयासकट कटकीं. १३
गांडीव यशस्वि, जयश्रीचें लोकीं अगार मानिल या
दुर्योधन हि उद्यां; अभिमानी तो कीं अगा रमानिलया[8] ! १४
गांडीवचापयोद्धा मी, सारथि तूं श्रितस्वरग[9], काय
मग जिंकिला न मागें कोण, पुढें ही न, त्वत्करंगकाय[10] ? १५

---

१. शकटाकार सैन्यरचना. २. कमलाकार सैन्यरचना. ३. मध्यभागी-(कर्णिका=कमलाच्या मध्यभागी असणारा केसरपुंज). ४. कर्णादि महा महारथींस. ५. लोण्याचा घास ६. कविश्रेष्ठ—पंत. ७. धनुर्वेदचतुर. ८. रमावासा श्रीकृष्णा ! ९. भक्तकल्पतरु. १०. माझ्या अधीन शरीर ज्याचें असा.

'सर्वार्थदर्शक' म्हणे तुझिया भास्वच्छवि प्रसादास;
या स्वार्थपात्र, सुगृहस्था अतिथि स्वच्छविप्रसा, दास. १६
मद्रथ सिद्ध असों दे उदयापूर्वीं च हें च कर, जा, गा!
आहे चि तुजा स्वीकृतसर्वसमवनीं सदैव कर जागा." १७
त्या रात्रींत श्रांत हि गज मन निद्राकरीं न दे, वाजी
जो तो हि म्हणे, 'सैंधव मेल्या निद्रा करीन, देवाजी!' १८
विजय म्हणे, 'माधवजी! दावाया वदन न स्वसे लाजा,
शोकाग्नि तिचा विझवा, भिजवा पुसुनि नयन स्वसेला, जा.
सुविवेक सुभद्रेच्या द्या परिदेवनपरा सुनेला हो!
बहुधा देह शिवामीं त्याचा होतां परासु नेला, हो!' २०
अंतःपुरांत जावुनि देव सुभद्रेसि बोध युक्त करी.
त्या सकरुणासि हें किति? केला जेणें क्षणांत मुक्त करी. २१
"तूं वीरजा सुभद्रे! बाइ! उगी. वीरबांधवा कन्या,
जालीस वीरपत्नी, वत्से! तैसी च वीरसू धन्या. २२
सुयशें पितृमातुळकुळ उज्वळ करिता असा असावा गे!
बाई! वदले सुर, 'गिरिजासुत तारकबळीं असा वागे.' २३
त्यजुनि अमृत, मधुर म्हणुनि जेंवि न मधुखंड-पायसां गावें;
तव सुतयश इतरयशोधिक, ऐसें बहुत काय सांगावें? २४
वत्से! आम्हांसि असी गति देवू वरद्रनायक पिनाकी.
रणमरण अमरताधिक; जाले नाहींत काय कपि नाकी? २५
उडविल उद्यां स्वसुतवधहेतुजयद्रथशिरासि सितवाजी.
आण तुझी, होईल प्राप्त दशा, योग्य होय कितवा जी." २६
ऐकुनि म्हणे सुभद्रा, 'हा वत्सा! काळ काय हा निधना?

---

१. परिशिष्ट पहा. २. अंगिकारलेल्या सर्वांच्या उत्तमप्रकारे रक्षणाविषयीं. ३. भगिनीला. (सुभद्रेला). ४. विलापमग्न. ५. कोल्ह्यानी. ६. गजेंद्र. ७. कार्तिकस्वामी. ८. तारकासुराच्या सैन्यामध्ये. ९. शर्करायुक्त क्षीरीला. १०. देवत्वाहून श्रेष्ठ.

जाली कसी अकस्माद्धनलुब्धाच्या समूळ हानि धना? २७
शोकीं कसे बुडविले माजे असु, उत्तरासुसह, सारे.
जालासि स्वप्नींचा निधिसा तूं, दृष्टनष्ट, सहसा रे! २८
धिक्! पांडुयदुबळातें, रक्षाया न शकलें मुलाला जें.
स्वपतिपराक्रमवर्णनशीलत्वें मीं हि बा! तुला लाजें. २९
जालें व्यर्थ वृकोदरभावोजींचें बळाढ्यपण आजि.
वाटे मरेल शोकें, नातू आहेत फार पण, [1]आजी. ३०
हा वत्सा! धैर्यनिधे! हा वत्सा! जनमनोहराकारा!
हा वत्सा! कुलतिलका! हा वत्सा! सर्वसद्गुणाधारा! ३१
[2]जी शूरसाधुधार्मिकपितृसुरगुरुविप्रभक्तपरमगती,
प्राप्त असो तुज वत्सा! विरह न देवू कदापि पर मग ती.'
इतुक्यांत उत्तरेसह कृष्णा ये, होय भर विलापाला
शोकीं आप्तसमागम, विषतरुचा जेंवि भरविला पाला. ३३
मूर्च्छित पडे सुभद्रा, शीघ्र तिला सांवरी कमळपाणी.
वारा घाली, लावी नेत्रांला शीतसें अमळ पाणी. ३४
कृष्ण म्हणे, 'कृष्णे! दे पुण्य, असावी च उत्तरा [3]सासु;
[4]हा, [5]हे तिची, वदवितों; परि किमपि न दे चि उत्तरा, सासु.'
प्रभुला 'हाय!' म्हणाया लावी मोहीं बुडोनि घटिका हो!
स्नेह असा चि असे, ज़रि लटिका करितील साधु, लटिका हो.
उठवुनि अनुजेसि म्हणे, 'हें तुजला योग्य काय गा बाळ!?
त्यजिति, हित सुयश जोडुनि, कवि [6]पलभुग्भोग्यकाय गाबाळ.
जें [7] तव उदार, देता झाला सर्वा परा, सुत रणीं, तें
मुनिदुर्लभः कीं भेदुनि गेला [8]तत्कृतपरासु तरणीतें. ३८

१. अभिमन्यूची आजी कुंती. २. ही आर्या पोथी लिहिली गेल्यानतर, समाविष्ट करण्यात आली आहे. ३. जीवत. ४. हा मी कृष्ण. ५. ही तिची सासू सुभद्रा. ६. मांसभक्षक अशा श्वापदानीं उपभोगाव्यास योग्य असे शरीर. ७. जे यश. ८. त्या शत्रूनीं मारिलेला.

सत्य करिल प्रतिज्ञा, हा न कधीं विजायिबाहु टळला गे!
न उडेल अरिशिरस्तृण कां ज्या [1]विजयेषुवाहुटळ लागे?' ३९
कृष्णोत्तरासुभद्राधेनूंच्या मथुनि मोहयवनातें,
भवनातें येउनि, तो प्रभु विजयाच्या करी [2]समवनातें. ४०
प्रक्षाळुनि करचरण, प्रभु विमळजळें करूनि आचमनें,
शुचिशयन रचीः मानी मित्रा मणि, आपणास काच मनें. ४१
[3]लिप्तस्थंडिलशयनीं एक हि सोसेल शुष्क दर्भ कसा?
देवाला भक्त नवानवसांचा, [4]गतवयास अर्भकसा. ४२
शयनासमीप मांडी गांडीवप्रमुख सर्व [5]हातेरें.
[6]श्रिततेज वाढवीः निजतेजाचें घे करूनि मातेरें. ४३
निजतां रात्रौ [7]त्र्यंबकबलिविधि हा शिष्टपथ सदा साचा,
त्या [8]महदस्वास्थ्यांत हि लोपों दे लोकगुरु न दासाचा. ४४
अर्पावें गंधकुसुमउपहार त्र्यंबकासि जें कांहीं,
कृष्णासि आर्पिलें तें पार्थें, कीं स्वास्थ्य मानसी नाहीं. ४५
स्मित करुनि मनिं म्हणे प्रभु, 'गेलें सोडूनि भान निज यातें.'
स्मितदर्शन होतां [9]स्वस्खलित समजलें मनांत विजयातें. ४६
यच्चापरवें खचले पावुनि अहितांसमेत कांप [10]हुडे,
तो पार्थ [11]स्वापार्थ प्रभुनें संप्रार्थिला, न कां पहुडे? ४७
समजुनि [12]शरण्यवर्य, स्वर्गी स्तवितो जयास शिबिराजा,
अर्जुन म्हणे तयाला, 'श्रमलासि, निजावयास शिबिरा जा.'
निधिरक्षणार्थ जैसा अतिसादर [13]राजराज यक्षांतें,
पार्थावनार्थ तैसा स्थापी शिबिरीं मुकुंद दक्षांतें. ४९
शयनीं निजोनि पाहे परमेश्वर, परि न पळ हि निज लागे.

१. अर्जुनाचे बाण हीच वावटळ. २. चांगल्या प्रकारें रक्षणातें. ३. यज्ञासाठीं सारवन तयार केलेल्या ओट्यावरील शयनाचे ठायीं. ४. वृद्धारा. ५. शस्त्रें. ६. आश्रितांचें सामर्थ्य. ७. शंकरपूजाविधि. ८. त्या मोठ्या अस्वस्थ स्थितींत. ९. आपली चूक. १०. बुरुज. ११. निद्रार्थ. १२. रक्षण करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ. १३. कुबेर.

चित्तीं चिंतेसि म्हणे, 'त्वां वरिला कोण जड हि निजला गे!'
देव निशीथीं[1] शयनीं बैसे; मग दारुकासि[2] आणउनीं,
त्यासीं वदे प्रतिज्ञा पार्थाची, प्रथम सर्व जाणउनीं. ५१
"भक्तीं जसा मदात्मा, देहीं हि तसा न, दारुका! रमला.
या विजयवेदवचना[3] द्यावा लागे सदा रुकार मला. ५२
निजरक्षणाधिक ध्वजरक्षण राज्यासि दारुका! पडतें.
मोलें राजशिराहुनि बहु असतें काय दारु[4] कापड तें? ५३
मद्रथ सिद्ध असों दे. जाणोनि व्यसन कां गळांठावें?
पतिच्या श्रितप्रतिज्ञा[*] बुडतां, पडती स्त्रिया गळां, ठावें. ५४
विश्वास हि कुरुगुरुचें आप्तविपत्सरिदलाबुधनु[5] ठावें.
कोण म्हणेल 'व्यसनीं स्वजनसमवना' भला बुध 'नुठावें'?
तूं पांचजन्यनाद श्रवणीं शिरतां चि शीघ्र पाव कसा.
पेट्टेन बसोनि रथीं मीं कुरुकटकीं, तृणांत पावकसा. ५६
साची करिन सख्याची, मारुनि सर्व हि अरि, प्रतिज्ञा ते.
जोडितिल उद्यां बहु कर या शार्ङ्गाप्रति[6] अरिप्रति[7] ज्ञाते. ५७
प्राकृत् हि लुब्ध, जातां पदरींचा एकदा रुका हि, मरे.
सर्व हि पदार्थ तापद मज, भक्त चि एक दारुका! हिम[8] रे!" ५८
दारुक म्हणे, 'अवश्य, स्यंदन आहे चि सिद्ध. अजि तरणी
तेज न मिरविल; तुमचा प्रभुजी! सेवक हि सर्व अजित रणीं.'
मोहे प्रियसुतशोकें, करुनि पण हि दुःशलाविलापार्थ[9];
स्वप्नीं दर्शन दे प्रभु; की तो कासेस लाविला पार्थ. ६०
स्वप्नीं हि प्रेमें दे प्रत्युत्थानासनादि वासवि त्या;
जोडी कर तेजस्वी तेजस्वीशा, जसा दिवा सवित्या. ६१

१. मध्यरात्री. २. हा कृष्णाचा सारथी. ३. अर्जुनाच्या वेदतुल्य वचनाला. ४. लाकूड. (ध्वजाची काठी). ५. प्राप्त झालेल्या विपत्तिरूप नदींत भोपळ्यासारखे तारणारे असे धनुष्य. ६. धनुष्याप्रति. ७. चक्राते. ८. थंड. (शांतिदायक). ९. दुःशला ही जयद्रथस्त्री. * स्वीकारलेल्या प्रतिज्ञा.

श्रीपति म्हणे, 'सख्या! कां म्लान वदन, चित्त काळजी वाहे?
चिंता चतुर न वरितीं; नाशी धृतिवित्त, काळ जीवा हे. ६२
भीती न काळकाळप्रभुचे[1], काळाहि[2]च्या विषा, दास;
सांग स्पष्ट सख्या! तूं कां सांपडलासि या विषादास?' ६३
पार्थ म्हणे, 'देवा! कसि होइल केली खरी प्रतिज्ञा ती?
रक्षितिल सकळ सैन्य व्यूहामागें अरिप्रति ज्ञाती. ६४
मज दुर्घट न सकळकुरुकटकचटक[3]कदनकर्म; परि सविता
द्रुतगति[4]; कृतप्रतिज्ञ द्रोणगुरु हि सर्वधर्मपरिसविता. ६५
सैंधवशिर न उडवितां जैरि जाइल काय भानु अस्तनगा[5],
तरि जीवित अयशस्कर व्यर्थ, स्त्रीरत्न जेंवि अस्तन, गा! ६६
दुसरी तरि प्रतिज्ञा रक्षिन, दहनांत काय होमीन.
नाक हि नरक तुजविना. वांचे अन्यत्र[6] काय हो! मीन? ६७
स्पर्शमणे! संगक्षणविघ्नें[7] धरिला विषाद या लोहें.
मित्र तुझें पात्र न हो विरहापयशोविषा दयालो! हें.' ६८
प्रभु करुनि जळस्पर्श, प्राङ्मुख बैसे उगा चि पळ आर्धी;
मग विजयासि म्हणे, "मीं सांगेन तसें चि कार्य तूं सांधीं. ६९
जेणें देव महेश्वर समरीं असुरांसि मारिता जाला,
परमास्त्र सनातन जें, ज्ञाते म्हणताति 'पाशुपत' ज्याला, ७०
तें जरि असेल अवगत, मारिसिल उद्यां जयद्रथास रणीं.
अवगत नसेल तरि, मन लावीं त्या श्रितसुरद्रुच्या चरणीं. ७१
करिल प्रसाद, देइल अस्त्र, सुनिश्चय करीं असा; ध्या तें
शिवपद; सुसाध्य करितें, ध्यातां मोक्षा हि कीं असाध्यातें. ७२
बैस स्वस्थ ध्यानीं, पात्यांसीं पातयांसि लाव कसा.
हो श्येनसा सख्या! तूं, शत्रु जयद्रथ हि शीघ्र लावकसा." ७३

---

१. मृत्युंजय शंकराचे. २. काळसर्पाच्या. ३. चिमण्यां. ४. त्वरित चालणारा. अस्ताचलास. ६. जलरहितस्थळीं. ७. समागमोत्सवामध्ये आलेल्या विघ्नामुळे.

उदकस्पर्श करुनि नर बैसे दर्भासनीं असा ध्याया
कीं, नारायण हि म्हणे, 'परमा सिद्धि हि नसे असाध्या या.'
धरितां समाधि पार्थ ब्राह्ममुहूर्तीं[1] च तो असें पाहे,
जातों स्वयें उदीचींप्रति[2] गगनपथें, सवें[3] हरि हि आहे. ७५
चालविला, दक्षिणभुज[4] धरुनि, नभीं पार्थ जळजनाभानें[5].
ज्याच्या तेजःश्रवणीं, सोडुनि जावें चि खळजना, भानें[6]. ७६
पाहे हिमनग मणिमान् श्वेताद्रि धनाधिपप्रिया नलिनी;
कविनीं शिवलीलासी, जी सादर सेविली सदा अलिनीं. ७७
स्वर्गासि सुखें जीच्या स्नानें पानें, सुरापँ[7] गेला हो!
अवलोकी नारायणसख बहुमानें सुरापगेला[8] हो! ७८
प्रेक्षी मंदारद्रुमभूषित मंदरगिरिप्रदेश तदा.
पाहुनि काळनगातें 'दृष्टि न लागो,' असें वदे शतदा. ७९
जो ब्रह्मतुंगपर्वत तैसा चि सुतुंग आणि शतशृंग,[9]
शर्यातिवनीं तापस, कमळवनीं जेंवि हंसखग भृंग. ८०
अश्वशिरःस्थान[10] सकळ सिद्धींचें जें सभाग्य माहेर;
आथर्वणाश्रम हि, ज्या त्यजुनि पळ हि न मुनि निघति बाहेर.
वृषदंशे महामंदर पूर्वीं हृदयांत रेखिले होते,
जे परम रम्य तापससुरसिद्धनिवास देखिले हो! ते. ८२
श्रीरामबाणसमगति देउनि दावी सख्यासि नवल हरी,
देवदया दासा दे सुख, न तसें अमृतसिंधुनवलहरी. ८३
तो श्रीनारायणसख नर तेजःपुंज पर्वता पाहे,
चित्तीं म्हणे, 'निवाले डोळे सोडूनि सर्व तापा हे.' ८४
त्या शैलाच्या अग्रीं जाले सुर चित्रसे पहाते ज्या,
अवलोकिला भवानीसह भगवान् भूतपति[11] महातेजा. ८५

---

१. रात्रीच्या चवथ्या प्रहरीं. २. उत्तर दिशेस. ३. बरोबर ४. उजवा हात. ५. कृष्णाने. ६. देहभानानें. ७. मद्यपी. ८. देवनदी भागीरथीला. ९. या नावाचे पर्वत. १०. हयग्रीवस्थान. ११. शंकर.

ज्याच्या शुद्ध तपासम कोठें ही, किमपि, तप न भास्वर[1] गा!
कृष्ण नमस्कारी त्या दासांच्या कोटितपनभा[2] स्वरगा. ८६
अजित तसा विजय नमी क्षितिवरि ठेवूनि सुचिर शिर गुडघे;
बहु नमनलाभलोभी, जाणों दुष्काळसुक्षुधित गुड[3] घे. ८७
ईश्वर म्हणे, "उठा; बहु साधु तुम्हीं मुनि कविप्रवर दास;
मज 'आशुतोष[4]' म्हणती सर्वज्ञ अनेक विप्र वरदास. ८८
झालों प्रसन्न; मागा" ऐसें ऐकोनि अभयदान मुनी[5],
स्तविति प्रेमें सात्विकभावांत बुडोनि, अभयदा नमुनी. ८९
'त्वत्सेवासुरभीच्या कासेला भक्तवत्स लागावा,
कविनीं तुजा प्रसाद चि अनुदिन बा भक्तवत्सला! गावा. ९०
सर्वार्थसंप्रदर्शक अर्क तुझे पाय, अंधकाराते[6]!
यांचे आश्रित जे जे, भीति भवाख्या[7] न अंधकारा ते.' ९१
नमनें स्तवनें अर्जुन होय स्नात प्रसादवृष्टींत,
आलें धैर्य मनांत, प्रभुदर्शनयोग्य तेज दृष्टींत. ९२
जें आपण कृष्णासि त्र्यक्षबळिद्रव्य[8] वाहिलें होतें,
प्रभुच्या पायांपाशीं पार्थें पुष्पादि पाहिलें हो! तें. ९३
पार्थिवमूर्तिसमर्पितमाल्य[9] किरातीं, तसें चि हें वाटे.
हरिहररूपाभेदज्ञानानंदाप्तिनें[10] गळा दाटे. ९४
मागे मग प्रतिज्ञासिद्ध्यर्थ प्रभुसि पाशुपत नमुनी;
कीं म्हणति, 'न हो अयशीं, हो मृत्युमुखांत आशु[11] पेतन,' मुनी.
स्मित करुनि महेश म्हणे, 'यदुकुरुवर हो! पुरेल हा हेत.
जा, चाप-बाण आणा; त्या अमृतसरोवरांत आहेत.' ९६

---

१. देदीप्यमान. २. कोटिसूर्यासारखी कांति ज्याची अशा कल्पवृक्षाला. (शंकराला). ३. आर्या० वन०अ० १२।३१ मधील १५ वी टीप पहा. ४. त्वरित संतुष्ट होणारा. ५. नरनारायणमुनींचे अवतार कृष्णार्जुन. ६. शंकरा! ७. संसारनामक. ८. त्र्यंबकाचें पूजासाहित्य. ९. पार्थिवलिंगास अर्पिलेलें पुष्प. १०. हरिहरांच्या रूपांतील अद्वैतज्ञानाच्या आनंदप्राप्तीने. ११. त्वरित.

कृष्णं प्रभुसि नमुनि जों गेले रविमंडलप्रभा सुसरा,
तों एक नाग आहे, घोर सहस्रास्य, घोरतर दुसरा. ९७
पहिल्याहुनि बहु दुसरा दुष्प्रेक्ष्य, विषाग्निसंपदे वमुनीं;
ज्यातें पाहुनि पावति दूरस्थित नत हि कंप देव-मुनी. ९८
वंदुनि भावें, म्हणतां शतरुद्रियपाठ, हात जोडून,
झाले धनुष्यशर ते नाग, स्वमहोग्ररूप सोडून. ९९
कृष्ण स्कंधीं घेती; चाप गमे हळ, विशाळ शर भाला.
प्रभुला नमुनि निवेदुनि, नमिति पुन्हां, सिंह जेंवि शरभाला.
गुण शर जोडुनि जेव्हां प्रभु मांडुनि ठाण, चाप आकर्षी,
तें ध्यान पाहुनि 'जितं,' कृष्ण चि न म्हणाति, समस्त नाकर्षी.
श्रीमूर्ति राजमुद्रा, नर कागद, त्यांत सम ठसा हो! तो;
तो ध्यानयोग, बुडतां सर्वां हि जडासि, कमठसा होतो. १०२
हृदयांत ध्यान तसें धरिलें, सरहस्य पाशुपत गा! तें,
जें काळातें जिंकी, जेंवि गरुडतेज आशु पतगातें. १०३
प्रभु, दावुनि निजविजयद सदरिघ्न ध्यान, चाप चढवूनीं,
शर त्या सरीं च टाकी, कार्मुक हि, महास्त्रमंत्र पढवूनीं. १०४
'विजयी व्हा, जा,' ऐसी आज्ञा होतां, महेशपद नमुनीं,
होउनि कृतार्थ आले शिबिरासि पुन्हां प्रसन्नवदन मुनी. १०५
प्रभुनें स्वप्नीं केला कृतकृत्य सखा, न लेश भागविला.
इकडे दारुक गोष्टी सांगोनि प्रातरवधि जागविला. १०६
प्रथम करी जपहोमब्राह्मणपूजादि विहित जें कर्म;
मग विश्वकर्मनिर्मित भासुरभद्रासनीं, बसे धर्म. १०७
शुभ्रांबर, मुक्ताधर, सितचामरवीज्यमान शोभे तें
बहु राजरत्न, ओढूनि घे शारदपूर्णचंद्रशोभेतें. १०८

१. कृष्णार्जुन. २. सहस्रमुख. ३. नागर. ४. धनुष्याची दोरी. ५. जिंकिले! (आमचा जय झाला). ६. कूर्मासारखा. ७. रक्ष्यातें. ८. प्रातःकालपर्यंत. ९. तेजस्वी अशा. १०. शुभ्र चामरांनी वारा घातला जात आहे ज्याला असे.

चंद्र किति? जसा धर्मा, न तसा कवि मानवे शतक्रतुला.
मग तद्यशोमृताची धरिल कसें मानवेशतक्र तुला? १०९
ज्याचा प्रतापरवि मधुकैटभतिमिरीं लव प्रभा वमला,
तो प्रभु ज्याच्या द्वारीं, वाच्य न त्याचा लव प्रभाव मला.
तों भूपप्रभ कवची खड्गी मणिकुंडली युवा वंदी
द्वास्थ, म्हणे, 'प्रभु येतो तो, वेद स्तविति ज्या, जसे बंदी.'
धर्म म्हणे, 'त्यजिति, जया नमुनि, कुळधनादिभवमदा, ज्ञाते,
प्रभुचरण दर्शन मला द्याया इच्छिति कसे मदाज्ञा ते? ११२
तिमिरहत गर्तिच्छु कवण रविच्या घालील आण वाजीतें?
आणा हो द्वास्थ! तया, पूजासाहित्य आणवा जी! तें.' ११३
येतां, प्रभुचें, धर्म स्वकरें लागे, सभाजन कराया.
'धन्य' म्हणे या, जसि रघुपतिबहुमानीं सभा जनकराया.
भक्तापुढें न मिरवी तेज श्रीमूर्ति, रविस भाजी जी.
दावी बहु विनय, म्हणे जरि हि ब्रह्मादिकांविसभा 'जी जी.'
द्रुपद विराट वृकोदर सात्यकि इत्यादि सर्व ही आले,
झाले कृतार्थ हरिला पाहुनि, चंद्रा चकोरसे, धाले. ११६
धर्म म्हणे, 'माधवजी! भ्यालें मन, करुनि बोध वळवा जी!
व्यसनी तरेल मंदरसा, जरि तारील तो धवळवाजी.' ११७
कृष्ण म्हणे, 'राज्याजी! कां भ्यालां? विजय हा असामान्य,
एकां पुरारिवांचुनि नाहीं च जगत्त्रयीं असा मान्य.' ११८
ज्या पाहुनि सुर हि म्हणति, 'कृष्ण चि कृष्णानुजाधव, लवा जी!'
तो धर्माला सर्वांमागुनि येउनि नमी धवलवाजी. ११९
आलिंगुनि धर्म म्हणे, "वत्सा! विजयोत्सुका! महाबाहो!

---

१. दुर्योधनरूप ताक. २. मधुकैटभरूप अधकाराच्या ठायी. ३. झाकिता झाला. ४. सत्कुल; द्रव्य इत्यादिकापासून उत्पन्न झालेल्या गर्वाला. ५. माझी आज्ञा. ६. अधकारामुळे अडलेला. ७. गमनेच्छु ८. शपथ. ९. धर्माला. १०. दाह करी. ११. शंकरावाचून. १२. सुभद्रापति. १३. नम्र व्हा. १४. अर्जुन.

'मारिन जयद्रथ,' म्हणसि, तरि सत्य तुजा सुकाम हा बा! हो.
आश्रय मोट्या विजया विजया! होतोसि तूं करुनि आजि,
कीं हा प्रसन्न बहु तव मुखवर्ण, असा चि अच्युत हि, आजि."
धर्मासि विजय सांगे स्वप्नींच्या अद्भुता अनुभवातें.
नमिति, क्षितिवरि ठेवुनि शिर, सर्व सदेवकीजनु भवातें.१२२
किति म्हणति, 'काय सुरभी? पुरवी आस्था पिनाकिलीला हो!'
किति म्हणति, 'एक हरिहर; इतरीं हा स्थापिना किलीला हो!'
धर्म म्हणे, 'हूं! अद्भुत करुनि, मला आजि समरसव दावा.
काय इतर रस? योग चि एक भला आजिसमरस वदावा.'
धर्मप्रेरित गेले ते भीमादिक सुरोपम रणाला;
रामप्रहित जसे दशमुखकटकांच्या सुरोप मरणाला. १२५

---

## अध्याय नववा.

श्रितवत्सलें मुकुंदें त्यजिला स्वस्वामिभाव सार थिता;
प्रेमें श्री हि न वरिली तैसी, जैसी स्वदाससारथिता. १
सिद्ध करिति यन्नामें ब्रह्मादिसकळमनोरथास जुनीं,
'तो प्रभु म्हणे, 'पटु न मीं, दे पंचाक्षरमनो! रथा सजुनीं.' २
देव म्हणे, 'अर्जुनजी! व्हा सिद्धरथस्थ तपनकोपार्थे.'
तैं कां न म्हणेलें मनीं, 'ब्रह्मपदाद्यर्थ तप नको,' पार्थ? ३
करुनि प्रदक्षिण द्विजवृंदासि, रथासि, तो कवि नयानें
मग वेघोनि अधिष्ठी, जनकांका जैंवि तोकें विनयानें. ४

१. युद्ध. २. देवकीनदन कृष्णासह. ३. शंकरातें. ४. कामधेनु. ५. किलीला, युक्तीला. ६. युद्धध्वज. ७. उत्तम बाण. ८. अल्पसा. ९. पुराणानि—पंत. १०. पंचाक्षरमंत्रा! ('नमःशिवाय' हा मंत्र). ११. सूर्यकोपार्थे. १२. चढोनि. १३. रथासि अधिष्ठी—रथांत बसे.' १४. बाल.

काय उणें त्यां[1], करि सश्रीकृष्णा ज्या निवास विप्राशी ?
कर्णाहीं स्वस्तुतिस श्रीकृष्णाजानि[2] वासवि प्राशी. ५
जाला निजदासाचा, ज्या स्तविति सुधीर विप्र, तो दास;
श्रीनलिनीचा[3], चक्र त्यजुनि, धरि, सुधी रवि, प्रतोदास. ६
पांसुनिकर[4] हि, प्रभुच्या हेतु बहु प्रीतिचा, बुकासा च.
वाटे न कौस्तुभाला, जपला जगदीश चाबुका साच. ७
अनुभविती रूपाची एक स्थिति, एक हानि, पट सूत[5],
तैसे हे कृष्ण सखे, एक रथी, एक हा निपट सूत[6]. ८
कृष्ण रथीं चढले; मग तो हि चढे पुत्र सत्यकाचा हो !
जेंवि हररथीं विधि-हरि[7]; दुसरा दृष्टांत सत्य काचा हो. ९
अवलोकुनि सात्यकिला पार्थ म्हणे, 'धर्मराज रक्षावा.
सैंधववधाहुनि उणा न तुवां हा कार्यभाग लक्षावा. १०
चिंता करूं नको, तो कुरुगुरु तेजें असो अनळ[8], सर हा,
एक मजपुढें माधव, तूं जा धर्मापुढें, अनळस[9] रहा.' ११
गेला तो धर्माला रक्षाया, जेंवि सत्यकपित्याला.
सुगलोक्त[10] रामसेवा स्मरला पाहोनि सत्य कपि त्याला. १२
द्रोणें रचिला सैंधवरक्षार्थ व्यूहनाम्यकव्यूह[11],
परमार्थरक्षणक्षम अपराजित जेंवि काय कव्यूह[12]. १३
चोवीस कोस लांब व्यूह, दहा कोस रुंद तो मागें.
जेणें श्रिता न बाधों द्यावा परकाळ[13] जेंवि सोमागें[14]. १४
जिंकीसा कोणी हि न शास्त्रें, शस्त्रें, तपोनि धीरा ज्या,

---

१. ब्राह्मणाच्या आशीर्वादाने श्रीकृष्णासह ज्याला आपले निवासस्थान केले आहे त्या अर्जुनास. २. द्रौपदीपति अर्जुन. ३. लक्ष्मीरूप कमलिनीचा सूर्य. (लक्ष्मीप्रियकर कृष्ण). ४. धूलीसमूह. ५. वस्त्र आणि सूत. ६. सारथि. ७. मूळ पाठ–**विधि-व हि.** (व=वरुण). ८. अग्नि. ९. हा अर्जुन सरोवर [आहे]. १०. सुग्रीवाने सांगितलेली. ११. सर्व व्यूहापेक्षा श्रेष्ठ व्यूह. १२. कवितर्क. १३. शत्रुरूप काळ. १४. कैलासें–**पंत.**

तो जपला, अमृतरसा बहु शक्र तसा, तपोनिधी राज्या. १५
सैंधव[1] मागें दूर स्थापूनि व्यूहगूढगर्भांत,
होय पुढें परकटकीं जाया, दव[2] जेंवि शुष्कदर्भांत. १६
व्यूहापुढें स्वयें गुरु, दुर्मर्षण[3] त्यापुढें, उभा राहे.
मृग जैसा वाराया हरिची, तो वाट जिष्णुची पाहे. १७
सेनाग्रीं वाजविती नरनारायण सखे दरवरा[4] जे,
ते मोरसे, भुजगसे ऐकति होउनि सखेद रव राजे. १८
रोमांचकंचुकाला[5], कडकडतां कृष्णकंबु[6], कंपि त्याला;
पर सोडी भानाला, सिंहरवें जेंवि जंबुक पिल्याला. १९
बहु गज हय हगति मुतति, दे शंखस्फुरण तें विपत्तीतें.
श्रीनृहरिनामगर्जन भूतांतें होय, तेंवि पत्तींतें. २०
ज्याचे निवातकवचाद्यसुरबळा निपट म्हणति, शर 'दभ्र[8],'
त्या दुर्मर्षणबळ किति? गर्जुनि भिववील वायु शरदभ्र[9]? २१
अर्जुनबाणसमूहें दुर्मर्षणकटक सर्व भंगे तें,
जरि विजयशक्तितें पर रोधिल, सैकत[10] हि सेतु[10] गंगेतें. २२
दुःशासन होय पुढें दुर्मर्षणसा चि भग्न हि, रणांत.
खद्योततेज उरतें कांहीं तरि काय अर्ककिरणांत? २३
दुःशासन शीघ्र पळे, जेंवि गिरिवरुनि दगड तो घसरे.
गुरुवरि जाय कपिध्वज, जेंवि पुढें, मथुनि सेतु, ओघ सरे. २४
कृष्णानुमतें अंजलि जोडुनि, अर्जुन म्हणे, "अहो गुरुजी!
'स्वस्त्यस्तु[11]' म्हणा, द्या मज शिष्या आशी, जयप्रदा उरु[12] जी.
पांडुसम, युधिष्ठिरसम, कृष्णसम, तुम्हीं त्रिनेत्रसम महित[13].
करिल प्रसाद तुमचा जेंवि, तसें नाकनाथ न, ममहित. २६
प्रेम असामान्य करी गुरुराज, दयाळु जनक सामान्य,

१. जयद्रथास. २. दावानल. ३. या नावाचा धृतराष्ट्रपुत्र. ४. शंखश्रेष्ठां. ५. रोमांचरूप कवचाला. ६. कृष्णाचा शंख. ७. मारुती. ८. तुच्छ. ९. शरदृतूंतील मेघ. १०. वाळूचा बांध. ११. कल्याण असो. १२. फार. १३. पूज्य.

तें न स्मरेल जो, तो होईल कृतघ्न जन कसा मान्य? २७
या दुर्भेद्यव्यूहीं इच्छितसें आजि मीं शिरायास.
तुमचा प्रसाद नसतां होइल माजा वृथा चिरायास[1]. २८
अश्वत्थामा तैसा सैंधववधपण हि, हा हि राखावा;
कीं भंगतां प्रतिज्ञा मानधनें अग्नि वा हिरा खावा." २९
हांसोनि द्रोण म्हणे, 'पार्था! मजला न जिंकितां आजि
जिंकावया जयद्रथ शक्य नव्हे; मजसवें करीं आजी.' ३०
ऐसें वदोनि मार्गणवृष्टि[2] तयावरि महातपा सोडी,
जैसी आटोपाया मत्तगजाशिरीं महात पासोडी[3], ३१
तों अर्जुन, गुरुकार्मुक खंडाया, बाण निजगुणीं जोडी,
तों जाणोनि गुरुप्रभु गांडीवाच्या चि त्या गुणा तोडी. ३२
जोडुनि गुण पार्थ करी कुरुसेनापालविप्रकटकांता[4],
कीं गुरुपराभवें ही कु[5] रुसेना; पालवि[6] प्रकट कांता[7]. ३३
त्या दोंहीं कृष्णांवरि गुरु खवळे जेंवि देव कीनाश[8];
बहुधा म्हणे, 'पृथेसह शोकें पावो चि देवकी नाश.' ३४
द्रोण करी नाराचें क्षत वक्षीं, जेंवि तक्षक रदानें[9].
कांपे क्षण, जो[10] भीता रक्षाया परम दक्ष करदानें[11]. ३५
धैर्य धरुनि गुरुवरि शर सोडी श्वेताश्व जेंवि कुपिता ही.
हर्षे द्रोण, न कोपे. पुत्रोत्कर्षें कुढे[12] नें[12] कुपिता ही. ३६
जो योजिला गुरूनें, सर्व हि तो कृष्णरक्त सायक पी.
याच्या व्रजीं[13] प्रसादें खाती ब्रह्माद्यलभ्य[14] साय कपी. ३७
गुरुशर पडति नररथीं, नवजळजीं[15] जेंवि भृंग सुरसार्थ[16].

---

१. चिरकालीन परिश्रम. २ बाणवृष्टि. ३. झापड. ४. कौरवसैन्याचें पालन करणाऱ्या द्रोणाचे सैन्याच्या नाशास. ५. पृथ्वी. ६. रक्षण करणी. ७. प्रिय पुरुषाला, (धर्माला.) ८. यम. ९. दातानें. १०. कृष्ण. ११. हात देऊन. १२. दुःख न मानी. १३. गोकुळीं. १४. ब्रह्मादिकाना अलभ्य अंशाः १५. नूतन कमलावर. १६. उत्तम मकरंदार्थ.

की त्या सुयज्ञवाटीं[1] शिरला, घ्याया स्वभाग, सुरसार्थ[2]. ३८
केशव म्हणे, 'सख्या! हा गुरु सोडुनि मुख्य कार्य साधावें;
सैंधववधार्थ सत्वर, नियत शिवार्चार्थ आर्यसा, धावें.' ३९
पार्थ म्हणे, 'सूचविलें समयीं हित, उचित काय तुज वाहूं?
चाल सख्या! लवकरि, हा कुरुसेनापाल घाल उजवा; हूं.' ४०
गुरुतें प्रदक्षिण करुनि रथ काढी वासुदेव वेगानें,
न च म्हणितलें जयाच्या 'किमपि' यशाच्या 'न देववे,' गानें.
जातां गुरुवरि सोडी शर नर, होऊनियां पैरावृत्त[3].
असुरा अमृत तसें बहु दुर्लभ, ज्यां[4] साधुचें परा[5] वृत्त. ४२
द्रोण म्हणे, 'रे अर्जुन! कोठें जातोसि? कां निसरलास?
शत्रुस न जिंकितां तूं, न निघासि कीं; कां पणा विसरलास?'
पार्थ म्हणे, 'शत्रु न तूं, माजा गुरुराज, बा दयालो! कीं.
जोडील कोण समरीं तुज जिंकुनि साधुवाद या लोकीं?' ४४
ऐसें बोलोनि निघे अति सत्वर सिंधुराजवधकर्मा.
त्या अयुतबळें रोधिति जय, कांबोज, श्रुतायु, कृतवर्मा. ४५
त्या कटकातें मथितां, गांठी कुरुगुरु पुन्हां हि; परि त्यातें
सोडी पार्थ महामति, कालविलंबार्थ युद्ध करित्यातें. ४६
कृतवर्म्यासीं झटतां, देव म्हणे, 'चाल करुनि मथना, तें
आणूं नको चि चित्तीं, व्याही हें, त्यजुनि धर्मपथ, नातें.' ४७
मोहुनि भोज निघे, कीं, प्रभु वरिचेवरि म्हणे 'सख्या! निघ रे!'
शिरतां नर, द्रवे परबळ अर्कें घन हि घृत जसें विघरे. ४८
पांचाल्य, उत्तमौजा, चक्रत्राता दुजा युधामन्यु,
त्यां गांठी भोज, जसा गतसत्संगा[6] तपीं बुधा मन्यु[7]. ४९
व्याली[8] ज्याला वरुणापासूनि नदी प्रसिद्ध पर्णाशा[9];

१. उत्तम यज्ञमंडपी. २. देवसमूह. ३. परतलेला असा. ४. ज्या द्रोणाचे. ५. शत्रूला. ६. गेला आहे सत्संग ज्यापासून अशा. ७. कोप. ८. प्रसवली. ९. या नावाची नदी.

जेणें पूर्ण न केली स्वपरिभवें शत्रुची च कर्णाशा. ५०
पर्णाशा प्रार्थी बहु, 'ज्या अमर करा वरें,' असें वरुणा,
ज्याला मंत्रपुरस्कृत सुगदा देउनि पिता करी करुणा; ५१
ज्यासि म्हणे वरुण, 'तरणि होउनि अरिसागरांत तारील;
युद्ध न करि, त्यावरि जरि सोडिसिल, गदा, तुला चि मारील,'
तो धांवला श्रुतायुधराजा भीमानुजासि वाराया;
होउनि विरथ, स्वगदा सोडी नारायणासि माराया. ५३
जें भक्ष्यभ्रांत्यागतमूषीतें भय महाभुजग दे, तें
त्या वरुणसुतनृपाच्या, देता जाला महाभुज, गदेतें. ५४
जसि योजितां अविषयीं कृत्या, तसि ती महागदा परते;
मारी श्रुतायुधाला, सर्व भयें भंगले तदा पर ते. ५५
मग कांबोज सुदक्षिण नृप वधिला, जेंवि सिंह शरभानें.
हरिति शिरें बहुतांचीं जैशीं तैशीं च पार्थशर भानें. ५६
हाणी श्रुतायुराजा समरीं रक्तप्रपार्थ तोमर तों
मोहे प्रभु ही; जाणों वदला, न वदोनि, पार्थ तो 'मरतों.' ५७
तद्बंधु अच्युतायु हि हाणी शूळेंकरूनि सितवाहा.
देव म्हणे, 'बा! सावध हो; देइल हर्षमोह कितवा हा.' ५८
उठतां, वाटे, आला जाबूनि प्रेतराजसदनातें,
वारा घालूनि पुसी प्रभु वारंवार मित्रवदनातें. ५९
गमले स्वकाळिजा अहि डसले शर शौरिच्या शरीरा जे,
विजया; निजनयनयुगीं कण, दोघे बंधु, ते शरीं राजे. ६०
दावी विकळत्व प्रभु, जों कांहीं कौतुकें चि कोपार्थ;
इंद्रास्त्रें कटकासह करि दोघांचें हि भस्म तो पार्थ. ६१
नियुतायु एक, दुसरा दीर्घायु, कुमार वीर जे त्यांचे,

---

१. श्रवणेच्छा. २. मत्रपूर्वक. ३. नौका. ४. भक्ष्य पदार्थांच्या भ्रातीनें आलेल्या उदरीस. ५. अर्जुन. ६. देहपाने हरिति. ७. रक्तांची पोई होण्याकरिता. ८. दुर्योधनास–**पंत.** ९. बाणधारी श्रुतायु आणि अच्युतायु. * [गदा] तारील.

ते ही वधिले विजयें राहों न दिले चि गर्व जेत्यांचे. ६२
वेष्टिति अंग कलिंग प्राच्य[1] असे बहुत भूप कोपानें;
ते दंडिले नरानें, जेंवि स्वपशु प्रमत्त गोपानें. ६३
पार्थ प्रवर्तवी, परबळ मर्दुनि, शोणितापगेला[2] हो!
जैसा वर्षाकाळें, तैसा चि क्षोणिताप[3] गेला हो! ६४
प्रभुसि गदेनें हाणी तों अंबष्ठश्रुतायु जगदीशा.
हृदयीं 'धन्य' म्हणे त्या[4] विजयध्वजनिलय वायुज[5] गदीशा.
नर त्या गदेसि खंडी जों तों धावे धरूनि दुसरीतें;
आला गमे नदाचा, लोंढा चि पुढें करूनि सुसरीतें. ६६
ताडी आधीं प्रभुला मग पार्थाला पुनःपुन्हां रागें;
अद्भुत तें, चावावे गरुड-गुहशिखी[6] बळें जसे नागें. ६७
जासि गति घटकर्णाची[7] करि, पुरवाया स्वकाम राम रणीं,
झाली प्राप्त तसि च त्या पार्थापासूनि पामरा मरणीं. ६८
शिरतां विजय बहु करी दुर्योधनकटक तें विकळ पातें.
भिववील न प्रवेशें, हरिणांच्या, हरि हि तेंवि, कळपातें[8]. ६९
व्यूहीं शिरतां अर्जुन, दुर्योधन निजमनीं म्हणे 'हाय!'
जाय द्रोणापासीं, नमुनि म्हणे त्यासि, 'हें बरें काय? ७०
तो तुज समक्ष कैसा सिरला व्यूहीं? शिरों नये वातें!
तेजें अलंघ्य की तूं आचार्या! वासवादिदेवातें. ७१
भ्याले सर्व हि योद्धे पार्था, हरि जेंवि वधपरा शरभा.
आम्हां न सोडवे नररथभा, जसि राक्षसां पराशरभा[9]. ७२
दिधलें जयद्रथाला अभय, व्यूहीं सितांश्व शिरकविला.

---

१. पूर्वदेशाचे राजे. २. रक्ताच्या नदीला. ३. पृथ्वीचा [उष्णतारूप व पीडारूप] ताप. ४. त्या गदाधरश्रेष्ठाला (श्रुतायुला). ५. अर्जुनाचा ध्वज हे च घर ज्याचे असा मारुति. ६. कार्तिकेयाचा मोर. ७. कुंभकर्णाची. ८. हल्ल्याने. ९. पराशरमुनीचें तेज. (आपल्या पित्याला, राक्षसांनी मारल्याबद्दल या मुनीनें राक्षससत्र केल्याची कथा आहे).

रक्षोचितें[1] प्रतिज्ञावच, न तसें धन, कळत्र, शिर, कविला. ७३
विश्वासघात कीं हा! लावियला त्वां चि पाप डाग मला.
अभयद जयद्रथा तव कर माथां, जेंवि पापडा, गमला[2]. ७४
मद्विप्रियरत, धर्मप्रियरत, तूं स्पष्ट आजि कळलास.
मंज पोषित्या विषफळें, अमृतफळें मदहितार्थ[3] फळलास. ७५
तूं मधुनें सारविला, केवळ वरि मात्र गोड, वाखर[4] ची.
जो गुण करी, तयाचें, अरिवश होउनि, अनिष्ट वाख[5] रची. ७६
खेदें प्रलाप केला, गुरुजी! चित्तीं धरूं नका, पावा,
रक्षा सैंधव; आपण लाउनि पोषुनि तरू न कापावा.’ ७७
द्रोण म्हणे, “ तूं अश्वत्थामासा, हें न अन्यथा नातें.
सेवी गुरुमातेच्या विद्यारूपा, न अन्य थानातें. ७८
कोप नसे चि तुजा मज, सांगतसें सत्य मीं, न वंचकसा.
माजा धनंजयाचा होइल तुल्यप्रताप संचें[7] कसा? ७९
मीं वृद्ध, रथी सारथि नर नारायण, सखे तरुण वा! ते;
अक्षय लक्षयशोधनजनसन्नुत[8] रथ, तुरंग, धनु, भाते. ८०
बा! सोडिले शर पुढें जे जे त्या अर्जुनें महाभागें,
वेगातिशयें पडती ते, एक क्रोश त्वद्रथामागें[9]. ८१
हयबळ बहु, कृष्णाचें निपुणपण हि बहु, न सांगवे गा! तें.
न तसा संच हि, सोसिल हि प्रवयाचें[10] न आंग वेगातें. ८२
व्यूहांचें मुख सोडुनि त्यामागें म्यां वृथा न लागावें.
वदलों ‘धर्म धरिन’ तें करिन; मग तुम्हीं न कां मला गावें? ८३
करितां युद्ध, धनंजय उजवें घालूनि, हात जोडूनीं

---

१. रक्षण करण्यास योग्य. २. [नाशकारक] गमला. ३. माझ्या शत्रूसाठीं. ४. वस्त्रा-पंत. ५. दोरी वळतो. ६. ताग. ७. सर्व साहित्याचा मेळ. ८. यश च आहे धन ज्याचे अशा लक्षजनांनीं उत्तम प्रकारेंकरून स्तुत असा. ९. अर्जुनाच्या रथाच्या मागे. (त्याच्या रथाचा वेग बाणापेक्षा हि अधिक होता हा भाव). १०. वृद्धाचें

गेला, न जिंकितां[1] मज बहु होकेरितां हि, शीघ्र सोडूनीं. ८४
अर्जुन शिरला व्यूहीं, त्यामागें धर्म सांपडेल मला;
सुखसाध्य यक्षराजत्यक्त निधि जसा, तसा चि तो गमला. ८५
मीं जातों धर्मावरि, तूं जा त्या पांडवास वाराया.
होय सुदुःसह जीवितनिस्पृहजनकांड[2] वासवा राया!' ८६
भूप म्हणे, 'इच्छावा बाळें घ्याया सुधांशु[3] उडुनि करें,
तैसें हें. गुरुजि! कसा जिंकावा चंडभानु[4] उडुनिकरें[5]? ८७
हें न घडेल, न म्हणवे; धरिता झाला धरेसि दर्भ कसा?
रक्षावें यश आपण. हा शिष्य करिल गुरूक्त अर्भकसा.' ८८
द्रोण म्हणे, 'कुरुराजा! पार्थ दुराधर्ष सत्य, परि त्यातें
तूं रोधिसील माझ्या सामर्थ्यें, सैंधवांतकरित्यातें. ८९
होसील त्या प्रवाहा पर्वत तूं, मीं नव्हें अलीकवचा[6].
तुज लेववितों तें ज्या, दृढता वज्राहुनीं भली, कवचा. ९०
घे कवच, अभेद्य सुरासुरवरसर्वास्त्रशस्त्रवृष्टीनें,
श्रीशुकवैराग्य जसें रंभादिस्त्रीप्रकांडदृष्टीनें.'[7] ९१
श्रीगुरुनें लेवविलें नव कनककवच, जपोनि मंत्रास,
जें अरिघा हरि[8], सत्पदरज मृतिचा[9] जेंवि, सर्व संत्रास. ९२
द्रोण म्हणे, 'वृत्रासुर या सामर्थ्यें चि जिष्णुनें[10] मथिला;
साक्षाद्रुद्रें चि कवचधारणमंत्रप्रयोग हा कथिला. ९३
हरिपासुनि जोडुनि दे हें विद्यासुधन अंगिरा[11] जीवा[12].
तो अग्निवेश्यगुरुला[13], ह्रद[14] जीवन[15] जेंवि संगिराजीवा[16]. ९४
लेवविलें तुज म्यां हें, कौतुक दाविल अभेद्य कवच, रणीं.'

---

१. हटकिता. २. शर–पंत. जीवावर उदार झालेल्याचा बाण. ३. चद्र. ४. प्रचड सूर्य. ५. नक्षत्रसमूहें. ६. मी द्रोण मिथ्यावादी नाहीं. ७. रंभादि उत्तम स्त्रियाच्या दृष्टीने. ८. हरण करी. ९. मृत्यूचा. १०. इंद्रानें. ११. बृहस्पतीचा बाप. १२. बृहस्पतीला. १३. माझ्या अग्निवेश्यगुरूला. १४. डोह. १५. जल. १६. चिकटून असणाऱ्या कमलास.

ऐसें ऐकुनि गुरुच्या, घाली निघतां नृपाळ कैव[1], चरणीं. ९५
जाय सुयोधन, वारुनि पार्थातें, सिंधुराज राखाया.
स्पर्शो युधिष्ठिरचमू व्यूहा, जसि सिंधुरा[2] जरा[3] खाया. ९६

---

# अध्याय दहावा.

मारुति सात्यकि धृष्टद्युम्न तसे कुरुबळासि तुडवीती,
कुनृपतिराष्ट्रासि जसे दुष्काळ, व्याधि, चोर, बुडवीती. १
द्रोण न थारे क्षण परकटकांत, जसा न रुद्र थारावा.
तच्चापरवा पांडव भीति जसे अहि गरुडरवा[4] थारावा. २
द्रोण क्षत्रियहृदया बहु, जैसी भीति राम[5], दे वधुनीं.
करि पूर्ण, सेवित्यांचे, रक्तनदी, जेंवि काम देवधुनी. ३
शतसंख्य नाचले त्या अद्भुतसमरोत्सवीं भटकबंध.
वातें घनसा, द्रोणें धर्माचा भेदिला कटक[6]बंध. ४
रक्तनदींत बुडाले गज, मग गेले न कोण वाहोन?
गमला गोवर्धन[7]नगवर्षिघनसमूह शोण[8]वाहोन. ५
द्रोणरण विलोकुनि, सुर, सिद्ध, स्मरती तदा पिनाकिरण;
म्हणती, 'दापिल काळा हा, रविच्या काय दापिमा किरणा?' ६
गांठी धृष्टद्युम्न द्रोणाला, राहु जेंवि रविला हो!,
सिकताद्रि नदेसा, तो वाटे त्या बाहुजें[9] विरविला हो! ७
भिडवूनि हयांसीं हय, घेउनि तेजस्वि चर्म करवाळी[10]
तो स्वरथावरुनि उडे जैसा समरोग्रकर्मकर वाळी[11]. ८

---

१. झिळी. २. हत्तीला. ३. वार्धक्य. ४. गरुडाच्या शब्दास. ५. परशुराम. ६. सैन्यरचना. ७. गोवर्धनपर्वतावर वृष्टि करणारा मेघसमूह. ८. रक्ताश्व जो द्रोण त्याहून उणा. ९. क्षत्रियें. (धृष्टद्युम्नानें). १०. खड्गधारी. ११. सुग्रीवबंधु.

द्रोणावरि झड घाली तो, जेंवि श्येन आमिषा नेया[1].
कौरव म्हणती बहुधा, 'काळ चि हरणार या[2] मिषानें या[3].' ९
चढतां युगीं[4], हयांच्या पृष्ठीं हि, क्षिप्र सर्व विप्रभ या
पाहुनि पर पृथ्वीपति झाले; परि पावला न विप्र भया. १०
खंडुनि असि, चर्म रथ हि, मर्मीं सर्वत्र विंधुनि, करानें
घेउनि खरें[5] शर जोडी चापीं, तो शक्तिसिंधु निकरानें. ११
प्राण हरावे चि म्हणुनि जो प्रखरतराशुगासि[6] गुरु सोडी,
तो तत्काळ चतुर्दशबाणाही त्यासि सात्यकी तोडी. १२
सात्यकिला षड्विंशति[7] शर हाणि द्रोण तो महाकोपी.
तो माधव[8] तितुके चि प्रखर शर गुरुस्तनांतरीं ओपी. १३
तों वीरांला राजा धर्म म्हणे, 'सैन्यप[9]ाळ पळवा हो!
सात्यकिरणप्रवाहीं पडला गुरु, हा असा चि पळ वाहो.' १४
बळप पळविला तें गुरु दावी भृगुवीरसा समरसरणी[10].
किति म्हणति, 'देखिला चि न यामागें या रसासम रस रणीं.'
शैनेय म्हणे, 'सूता! द्रोणावरि नीट वाह* हाक रणीं;
करित नसे विप्राची, धृतपरधर्मप्रवाह[11] हा, करणी. १६
षट्कर्मीं[12] च असावें नित्य रत, ब्राह्मणें अघातरतें[13].
क्षत्र स्वधर्मयुद्धानुष्ठानें सर्वथा अघा तरतें.' १७
सात्यकिसीं द्रोणासीं होय महायुद्ध, तेधवां कविला
वाटे, तद्बाणनिहतकटकशवभरें[14] अहींद्र[15] वांकविला. १८
इषुनीं झांकुनि घेती ते, करुनि छत्र, केतु विध्वस्त.

---

१. न्यावयाच्या. २. या धृष्टद्युम्नाच्या रूपानें. ३. द्रोणास. ४. युग=रथ. ५. तीक्ष्ण. ६. त्या हि पेक्षा प्रखर बाणास. ७. सव्वीस. ८. मधु यादवाचा वंशज सात्यकी. ९. सेनापति धृष्टद्युम्न. १०. युद्धरीति. ११. परधर्माचा ओघ स्वीकारला आहे ज्याने. १२. अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह या षट्कर्मीं. १३. अहिंसारतें. १४. त्याच्या बाणानीं मारिलेल्या सैन्यातील प्रेताच्या ओझ्यानें. १५. शेष. * घोडे.

तो अप्रकाश[1] त्यांचा आप्तकुमुद[2]खेदहेतु विध्वस्त[3]. १९
सात्यकिनें गुरुगुरुंचीं[4] कोदंडें खंडिलीं रणीं सोळा.
त्या समरचमत्कारें केले ब्रह्मादिसुर नभीं गोळा. २०
शिष्याच्या शिष्याला तो गुरुवर बहु मनांत मानवला.
कीं नवलाव नव्हे, घटकर्णगळीं[5] जरि बसेल कानवला? २१
गुरुयोजित सर्वास्त्रं प्रत्यस्त्रें सात्यकी स्वयें शामवी;
रमवी सत्सुरदृष्टिसि, वमवी मद, अहितदृष्टिसि भ्रमवी. २२
करितां गुरुशरपटळें दिनकरतेजोविनाश, तम खवळे.
सात्यकिकडे मनें, विजयार्थ, विनविल्याविना, शतमख वळे. २३
गुरु सात्यकि रक्षाया, धरुनि सुधैर्यायुधां बहुतरा जे
भिडले, झाले शस्त्रज्वलनीं, न करुनि विलंब, हुत, राजे. २४
हरिनें जेंवि नराचा, अरुणें रथ पळविला न तपनाचा.
मुनि म्हणति परस्पर, 'हें पाहुनि जालें चि सफळ तप, नाचा.' २५
[6]अरि एक क्रोश पुढें लक्षुनि ज्या ज्या शरां विजय सोडी,
क्रोश पुढें गेल्यावरि मागें तो तो तदीयशिर तोडी. २६
तो की सूत, मिरविला तिळभरि हि जयापुढें न वेग मनें,
रविचे उणे गुणें हय, जिंकितिल कवण तयां नवे गमनें? २७
विंदानुविंद ताडिति पार्थासि[7] जसे, तसें चि गोविंदा[8].
विरथ करुनि अनुविंदा मारी लोकैकवीर तो विंदा. २८
ताडीं भाळीं त्यातें कोपें अनुविंद तो गदाघातें,
ज्याचें चरणस्मरण चि नाशी बहुनरकभोगदाघातें[9]. २९

---

१. अंधकार. २. त्याचे आप्त अर्जुनदुर्योधनादि ही च चंद्रविकासिनी कमळे, त्यांना खेदकारण. ३. चंद्रास्त. ४. सात्यकीचा गुरु अर्जुन, त्याचा गुरु द्रोण, त्याची. ५. कुंभकर्णाच्या घशांत. ६. अर्जुनाची गति इतकी विलक्षण होती की, एक कोस अंतरावरील शत्रूवर त्यानें सोडलेले बाण शत्रूंना भिडून त्याचा शिरश्छेद करीपर्यंत तो त्या शत्रूंच्यापुढें एक कोस चालून जाई! ७. अर्जुन. ८. कृष्णाते. ९. बहुत नरकयातना देणाऱ्या पातकाते.

अनुविंदबाहुमस्तकखंडन केलें पळें सितावानें.
नर[1]कीर्ति नर[2]बळें जरि, हरितिल हरिची[3] बळें सिता[3] श्वानें. ३०
श्वश्रूकर जेंवि शिरे गेहीं, जन्हि न म्हणती सुना 'सीर;'
व्यूहीं तेंवि कुरुचमू धिक्कारुनि तो धरा[4]सुनासीर. ३१
श्रमला, जयद्रथाच्या, जायासि न शक्त हा, निकट कांहीं.
हें योजुनि वेढियला पार्थ, करायासि हानि, कटकांहीं. ३२
त्या समयीं पार्थ म्हणे, 'देवा! संश्रितशुभाकरा[5]! वाजी
श्रमले कीं; श्रमशमना घडिभरि तरि रथ उभा करावा जी!'
कृष्ण म्हणे, 'माज्या ही हें चि मनीं, लोळवीन हे वाजी.
लोळिव तूं हि कुरुचमू, बा! करित्ये तुजसवें हि हेवा जी.' ३४
उतरे रथावरुनि नर, पळवी कुरुकटक कृतपराभव तें;
करि निर्मनुष्य मंडळ, तो एक क्रोश आपणाभवतें. ३५
स्वस्थ[6]स्वांतें क्रीडे कुरुबळपंकजवनांत[7] पार्थकरी[8].
मंत्र[9]बळें सुसरोवर निर्मुनि, शरगृह अनातपार्थ करी. ३६
शर जेंवि किरण भवतें, जें कौरवकटक तो चि परिवेषें[10].
रवि च कविमतें अर्जुन तेजें रूपें हि, भिन्न परि वेष. ३७
निःशंक कुरुबळीं नर जेंवि, हरिशतावृतीं हि शरभ वनीं,
पर्वीं[11] शिवालयींसा, शिरला देवर्षि[12] शीघ्र शरभवनीं[13]. ३८
प्रभुनें मुक्त करुनि हय, चुचकारुनियां हळू च कौशल्यें,
निजबोधें[14] श्रितहृद्गत[15] दुःखेंसीं, सकळ काढिलीं शल्यें. ३९
अश्व पदशराहीं, भवतापाहीं जेंवि दास, पोळविले,
ते देवें, भक्तिरसें जाणों स्वचरणरजांत, लोळविले. ४०

---

१. अर्जुनाची कीर्ति. २. सामान्य मनुष्यांचीं सैन्यें. ३. सिंहाची स्त्री. ४. धरा=पृथ्वी+सुनासीर=इंद्र=पृथ्वींद्र अर्जुन. ५. भक्तांच्या कल्याणाची खाण च अशा देवा! ६. स्वस्थ मनानें. ७. कुरुसैन्यरूप कमलवनांत. ८. अर्जुन-रूप हत्ती. ९. सावलीकारितां. १०. खळें, घेर, परिधि. ११. पर्वकाळांत. १२. नारद. १३. शरगृहीं. १४. आत्मबोधें. १५. भक्तांच्या हृदयांतील.

देवर्षि मुखीं घालुनि बोट म्हणे, 'हा! सुयोधना कुटिला!
भक्तिबळें चि पहा हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला! ४१
ज्याचा पदनख दासां जें सुख दे, तापल्यां न तें विधु, तो,
भगवान् स्वयें अहा! या विजयहयां, सत्यदास तेंवि, धुतो.
आम्हीं दत्ततसे गुण गुरु लघु हो! वर्जुना, नरा बावा!
तूं धन्य; खळ हि; नातरि यापरि हा अर्जुना! न राबावा. ४३
ज्याच्या श्रीपददास्यें पावे तोखा सदा रमा ज्याया,
हरितो मना, नराचा होउनि तो खासदार, माज्या या. ४४
पुरुषार्थद ते केले, दासहयहितोदयाकर खरारे.
जालासि दासदास, प्रभु ही, तूं बा! दयाकर खरा रे! ४५
सुखद स्पर्श श्रीच्या, बहुधा न हयांसम, स्तनाचा या.
हें यश गावुनि, शिवसा, लागेल सुधी समस्त नाचाया. ४६
प्रेमें माता बाळा न्हाणी, कीं भक्त शंभुच्या लिंगा,
तैसा चि नरहया हरि. कवि हो! याचे चि पाय आलिंगा.' ४७
औषध सुचणक, कल्पी पीतपट पसा हि तोबरा माप.
श्रितसाहित्य कराया न बरा मंदार; तो बरा माप. ४८
हरि हरिततृणीं चारी तो प्रभु, ज्याचा प्रताप दुर्वार.
'हरि हरि!' तई करिति, पद देउनि गणपतिशिरीं हि दूर्वा रे.
तोकतृषाशमना कीं क्षाळाया तात तोकमळ, पाणी
प्यायाचें ही वेची; करि, न पिवुनि, तेंवि तो कमळपाणी. ५०
उच्चैःश्रवा म्हणावा पार्थाच्या कां न 'नीच' तुरगांनीं?
ज्यां पूजी तीं, ज्याचें यश नंदनकाननीं चतुरंगानीं. ५१
योजुनि तुरगवर रथीं, आपण कुरुबळ पहात देव रिघे;

१. खरोखरीच्या नोकरांप्रमाणे. २. दत्तात्रेयासारखे. ३. दुर्योधन–पंत. ४. कृष्ण. ५. चांगले हरभरे. ६. पीतपट (पीतांबर) हा तोबरा आणि पसा हे माप कल्पी. ७. कल्पवृक्ष. ८. लक्ष्मीपति. ९. हिरव्या गवतांत. १०. रड. ११. इंद्राचा घोडा. १२. चतुरांच्या ग्राण्यांत.

मग विजयातें, मर्दुनि रडवाया खळप, हात दे, वरि घे. ५२
चालवितां प्रभुनें तो, गरुडें स्तविला तसा चि, रथ, वातें.
फाटे परबळ, वाटे तम चि, कनककशिपुवक्ष अथवा तें. ५३
वेदांसि नास्तिक, तसे गेले पार्थासि भीरु सोडूनीं,
मोडूनि धर्मसन्नयमर्यादा, प्राज्यं पाप जोडूनीं. ५४
नद सिंधुपासुनि, नरापासुनि पर, परतले न माघारे.
सुर म्हणति, 'भला! क्रीडा करिसी शात्रवशशांत, वाघा रे!
कुरुकटकराहुवदनाआंतुनि ते कृष्ण रविशशी सुटले,
कीं ते मकर, व्यूह हि जाळ, सुभट तंतु, तटतटां तुटले. ५६
कृष्ण जयद्रथ पाहुनि होति सुखी, जेंवि यज्ञवाट सुर;
मरुधन्वदेशमार्गीं जैसे, प्राशूनि तोय वाटसुर. ५७
गज गांठिला हरीनीं, तुडवुनि गेला मदांध पुच्छातें,
तुच्छातें बहु मानिति, तृषित मधुप जेंवि कुटजगुच्छातें. ५८
श्वेताश्व म्हणे, "न शकुन झाले यां आजि सा रथां बरवे.
प्रभुजि! म्हणा, 'सुद्रष्टा तरि हि पहा आजिसार थांब, रवे!'
श्यां वाहिला प्रभुपदीं, तो, जिंकिल आजि सा रथां, बेल.
जन्हिं भानु बहुद्रष्टा, देखाया आजिसार थांबेल. ६०
देसिल जयद्रथा! तूं मरुनि अयशीं आजि सा रथां नीच्या!
देवींच्या पदराला ढाळिल हा आजिसार थानींच्या." ६१
विजय असा हर्षे, तों दुर्योधन होय आडवा राया!
विघ्नहरा विघ्न जसा किंवा उदधीस आड वाराया. ६२
कृष्ण म्हणे, 'कौंतेया! श्रीमद्रुद्रापुढें जसा मार,
आला पुरुषव्याघ्रा! दुर्योधन मूढ हा ससा, मार. ६३

---

१. हिरण्यकशिपूचे हृदय. २. धर्म आणि सुनीति याची मर्यादा. ३. बहुत. ४. शत्रुरूप सशात. ५. यज्ञमंडप. ६. मारवाड देशाच्या मार्गात. ७. कुडाच्या फुलाचे झुबक्यास. ८. चांगला पाहणारा. ९. युद्धसामर्थ्य. १०. स्तनावरच्या. ११. गणपतीस. १२. मदन.

तुज हा वराक बाहे, तरि हरिस रणार्थ कां न बाहु रुरु[1]?
घालुनि गांठि, अधर्म हि धर्माची करिल कां न बा! हुरुरु[2]? ६४
मरणार्थ बाहतो हा तुज, नरसिंहास मस्त बकरा गा!
करितील मराळाचें काय, धरुनि ही समस्त बक रागा?' ६५
झाला धनंजयाला मान्य अभिप्राय हाटकपटाचा[3].
त्या वाटे मोडावा खळ, सुनृपा जेंवि हाट[4] कपटाचा. ६६
कुरुपतिरथाभिमुख रथ चालवितां नीट लोकनाथानें,
कटकें न रोधिति, जसीं रंभेचीं शुकविलोकना थानें. ६७
पार्थावरि नृप उठतां, कुरुसेना विप्रभा वदे, 'हा! हा!
होमी पतंग दीपीं, तुमर्जुनि तेजप्रभाव, देहा हा.' ६८
भूप[5] म्हणे, 'कां भ्यालां? भट हो! माजा प्रतापहात पहा.
परजीवन निःशेष प्राशील प्रलयभास्वदातप[6] हा. ६९
जाणा म्यां[7] कृष्ण सख्यापार्थासह आजि, हरुनि मद, वधिला;
पावेल भुजबळें नर न, जलधिच्या तेंवि, तरुनि मंदवधिला.'
पार्था हि म्हणे, 'जरि तूं वीर्यें झालासि पांडुच्या, पाहूं
शस्त्रास्त्रबळ तुझें; दे यश शारदचंद्रपांडु[8] चापा; हूं.' ७१
हाणी तीन शर नरा, च्यार हयां, नवघनप्रभास[9] दहा;
तोडी प्रतोद हि; म्हणे तें पाहुनि जिष्णुचा[10] सभासद 'हा!'
पार्थें शर पाठविले भेदाया मर्म, वातसे, चवदा.
कृपणगृहीं अतिथि जसे, नृपदेहीं ते हि बा! तसे च, वदा. ७३.
तितुके चि पुन्हां झाले विफळ, जसे दुर्जनीं सदुपदेश,
तेव्हां, 'सख्या! तुझें बळ कोठें गेलें?' म्हणे यदुपदेश[11]. ७४
पार्थ म्हणे, 'कवच दिलें[12] गुरुनें वात्सल्य देवविल याला.

१. मृगविशेष. २. हुऱ्यो, हुररेवडी. ३ सुवर्णासारखे पीत वस्त्र धारण करणाऱ्या कृष्णाचा. ४. बाजार. ५. दुर्योधन. ६. प्रलयकालच्या सूर्याचे ऊन. ७ माझ्या पाराला. ८. शरत्कालीन चंद्रासारखे शुभ्र. ९. नवीन मेघासारखी कांति ज्याची अशा कृष्णाला. १०. इन्द्राचा. ११. कृष्ण. १२. दिलेले.

नेतील न शस्त्रास्त्रें शक्रादि समस्त देव विलयाला. ७५
परि मीं तुज्या प्रसादें ऐसें हि अभेद्य कवच खंडीन,
दंडीन अरिसि, माजी शक्ति तसी कांपवील, थंडी न.' ७६
ऐसें वदोनि मंत्रुनि शर कवचाविदारणार्थ जों सोडी,
सर्वास्त्रघातकास्त्रें अश्वत्थामा तयासि तों तोडी. ७७
विस्मित होउनि पार्थ प्रभुसि म्हणे, 'गुरुसुतप्रभाव मला
हित अहित हि, जेंवि तमीं वाटेत फणी[1] मणिप्रभा वमला. ७८
योजीन जरि पुन्हां, तरि मजवरि च फिरेल अस्त्र बापा! हें.
साहें क्षणः जिंकितसे लीळेनें अरिस दास हा, पाहें. ७९
वश करिल, रसिकसा शिर बहु तुकुनि[2] हि काय गा! शरठ[3] कविला?
काय इतर नरसा हर, हाणुनि हृदयीं स्मरें शर, ठकविला?'
हयसूतपार्ष्णिसारथि मारुनि, खंडुनि समस्त हातेरें,
फोडूनि करतळें करि पार्थ खळाचें पळांत मातेरें. ८१
श्येनासीं धृष्टपणें गांठि बळें घालितां जसा चटक[4],
व्यसनीं पडे सुयोधन; तें पाहुनि सर्व धावलें कटक. ८२
पार्थाचा रथ झांकुनि नाना शस्त्रांचिया समूहांनीं,
चुकविति सुयोधनाच्या प्राणांची, सर्व कुरुचमू, हानी. ८३
त्या काळीं जगदीशें परधृतिहर पांचजन्य वाजविला.
तन्नादें गजवरमदनाशक केसरिनिनाद लाजविला. ८४
प्रभुशंखरवें कौरव, जेंवि गरुडगर्जनें महासर्प,
केले भग्न, नुरविला गांडीवें तिळ हि परबळीं दर्प. ८५
कुरुबळविमुक्त नररथ, जंगमजनमुक्त माध्वसा[5], साजे.
गर्जति, जयद्रथाच्या हरणारे मृत्युसाध्वसा[6] सा[7] जे. ८६
कृष्णांहीं[8], निजदरवर[9] वाजउनि बहु, स्वशत्रु कोपविले;

१. सर्प. २. डोलवून. ३. सरड. ४. चिमणा. ५. लिंगायत लोकांच्या तावडीतून सुटलेल्या मध्वमतानुसाऱ्यासारखा. ६. मरणभयाला. ७. सहा. ८. कृष्णार्जुनांनी. ९. आपापले श्रेष्ठ शङ्ख.

कर्णकृपाश्वत्थामप्रभृतींचे सिंहनाद लोपविले. ८७
बहुतां कर्णादिमहावीरांसीं एक विजय युद्ध करी;
बहुत हि, करितिल काय क्रुद्धा कंठीरवासि[1] रुद्ध, करी? ८८
भूरिश्रवा प्रभूच्या खंडी करगत नवप्रतोदास,
ज्येणें काळ हि कांपवि केवळ न सुमेरुवप्र[2] तो दास. ८९

## अध्याय अकरावा.

येरीकडे[3] वृकोदर सात्यकि पांचाळ मत्स्य हे, भारी
भांडति कुरुवीरांसीं, जेंवि महेभांसवें[4] महेभारी[5]. १
धावे द्रोण धराया धर्मातें, गरुड जेंवि नागातें;
गुरुशिष्ययुद्धचरित प्रेक्षकजनभान ठेविना गा! तें. २
खंडी युधिष्ठिराच्या, आधीं खरतरशरव्रजें, धनुला;
हनुला धरुनि विनविला वात्सल्यें,म्हणुनि हळु चि मग तनुला.
करुनि प्रसाद गुरुनें दिधली, ती गुरुसि दाखवी शक्ती:
भक्तिमदुत्तम[6] धर्म प्रेषी द्रोणाकडे महाशक्ती. ४
'द्रोणासि स्वस्ति असो,' ऐसीं तें सर्व बोलिलीं भूतें[7].
शक्ति महाकृत्यासी चळचळ तत्काळ कांपवी भूतें[8]. ५
शक्ति ब्रह्मज्ञानें[9] ब्रह्मज्ञानें[10] जसी च काळाची,
तेंवि द्रोणें हरिली ब्रह्मास्त्रें ती मनुष्यपाळाची. ६
भस्म करुनि शक्तीतें ब्रह्मास्त्र क्षुब्ध होय; तच्छमना
ब्रह्मास्त्रानें चि करी गुरुवत्सळधर्मराज अच्छमना[11]. ७

१. सिंहासि. २. मेरुपर्वताचा कडा. ३. दुसरीकडे. ४. मोठ्या हत्तींबरोबर. ५. मोठे सिंह. ६. भक्तश्रेष्ठ. ७. प्राणी. ८. पृथ्वीतें. ९. ब्रह्म जाणणाऱ्यानें. १०. ब्रह्मज्ञानाचे योगानें. ११. शुद्ध अंतःकरण ज्याचें असा.

शरपंचकें विदारुनि काय, क्रूर क्षुरप्रें[1] सोडूनीं,
गुरुचें धनु मनुजेंद्र क्षितिवरि पाडी, पळांत तोडूनीं. ८
सोडी द्रोण गदेतें तीवरि, धर्म हि महागदेतें, हो!
सच्चरित सवंग कुतुक दे; नंदन[2] बहु महाग देतें हो! ९
पडल्या भंगुनि पावुनि सद्वीरमुखें सुवर्णन, गदा त्या.
गुरुशिष्यरणा वर्णिति कवि, जेंवि अधन सुवर्णनगदात्या. १०
च्याऱ्ही वाजी वधुनि, छेदुनि धनु, केतु[3] भूमिवरि पाडी,
भारद्वाज[4] महात्मा धर्मासि शरत्रयें उरीं ताडी. ११
विरथ व्यायुध[5] होउनि सहदेवरथीं चढे, पळे, धर्म.
कर्म असें घडतां त्या कविचा न स्वल्प ही मळे धर्म[6]. १२
भूप पळाल्यावरि, बहु नाश रणीं प्राप्त होय राज्यांस.
वध्य चि अहिंसा, अभिमुख येतां, गुरु, बंधु, सोयरा, ज्यांस.
धृष्टद्युम्न, घटोत्कच, सात्यकि, भीमादि वीर धर्माचे
मर्थिती कुरुकटकातें, जैसे दुःसह विपाक कर्माचे. १४
दूरूनि पांचजन्यध्वनि परिसुनि, बहुत भय धरी धर्म.
सात्यकिसि म्हणे, "बापा! धांव कसा; हो धनंजया वर्म[7]. १५
व्यसनीं सहाय होउनि आप्ताला, होय जो परासु कृती,
शक्रादिलोकपाळांमध्यें बहुमान्य तो वरा सुकृती. १६
समयीं सहाय होता पुरुष श्रीविष्णुसीं च तोलावा.
प्रियसख माधव[8] दोघे असतां न बुडो; तटासि तो लावा. १७
धांवा शीघ्र, असों द्या स्नेहरसाचा मनांत ओलावा.
माधवजी! आजि तुम्हीं मित्र थडीला, म्हणोनि 'ओ' लावा. १८
आहेत भीमधृष्टद्युम्नादिक मजसमीप, भय नाहीं.
बा! त्वद्भुजाश्रितें म्यां विड्वर[9] पाहों नये चि नयनाहीं." १९

१. खुरप्याच्या आकाराचे फळ लावलेला बाणविशेष. २. नंदनवन. ३. ध्वज. ४. द्रोण. ५. शस्त्रहीन. ६. क्षात्रधर्म. ७. कवच (रक्षक). ८. मधुकुलोत्पन्न कृष्ण व सात्यकी. ९. अतिशय दुःखद अशी स्थिति, नायनाट.

सात्यकि बोले, 'प्रभुजी! चित्तीं चिंता करू नका कांहीं.
हंसध्वंस कधीं तरि केला, संगर करून, काकाहीं? २०
गुरुकर चि शिरोरक्षक; भारावह काय औखटा[1] टोप?
गुरुवर सहाय असतां, व्हावा काशास हो! खटाटोप? २१
असतां सहाय साक्षात् प्रभु, काय धनंजयास मीं? राज्या!
कृष्णा नरा क्रिया त्या सुकरा, न धनंजया[2] समीरा[3] ज्या. २२
मीं जातां चि करिल कीं तुझिया तो द्रोणविप्र हरणातें;
बा! सांपडतां सोडिल सप्रहरण[4] कोण विप्रहरणातें[5]? २३
सांगावें धनपतिनें निधिचें रक्षण जसें चि यक्षातें,
कथिलें तैसें चि तुजें विजयें मज आजि आजिदक्षातें. २४
गुरु तूं हि अर्जुन हि; म्यां आज्ञा तुमची कधीं न मोडावी.
सोडावी प्राणाची, प्रभुची च प्रीति पूर्ण जोडावी.' २५
वदुनि असें, मान्य करी धर्मवचन, सबहुमान, सत्वर तें;
गुरुकार्यास चि कविचें, निजकार्या न, बहु मानस त्वरतें[6]. २६
तो वीर वीरपान[7], द्विजपूजन, करुनि, सत्वराशि कवी
शीघ्र निघे, ज्याला बहु गुरुभक्ति समररसत्वरा[8] शिकवी. २७
व्यूहीं सहसा सात्यकि शिरला, जैसा दवाग्नि शुष्कवनीं;
खंडन करी प्रतिपदीं कटकीं, दोषज्ञ जेंवि दुष्कवनीं[9]. २८
सुर म्हणति, 'अहा! शिरला हा या जलधींत काय हो! मकर?
बा! दुसरा जिष्णु[10] चि तूं. हूं! धर्मारातिकायहोम[11] कर.' २९
व्यूहीं शिरे महाबळ करिहरिणकुळीं जसा चि हरि शिरतो.
कमळ जसा लीळेनें द्विरद, अरींचें तसा चि हरि शिर तो. ३०
द्रोण तयाला गांठी, रोधी, जैसा महाचळ नदास.

---

१. वाईट, व्यर्थ. २. अग्नीला. ३. वायुला. ४. सशस्त्र. ५. निःशस्त्रातें. ६. त्वरा करते. (नामधातु). ७. सुरापान. ८. युद्धकौशल्याची त्वरा. ९. अधमकाव्यांत. १०. इंद्र. ११. धर्मशत्रूचे देहाचा होम.

गुरुसा समरप्रेक्षकपक्ष्मीं[1] तुरवी च तो[2] चळन दासें. ३१
सात्यकिला द्रोण म्हणे, "त्वद्गुरु शुभ्राश्व हात जोडूनीं,
करुनि प्रदक्षिणा मज गेला केल्या पणासि सोडूनीं. ३२
म्हणशिल, 'यशोर्थ वेचिन सर्वस्वा मीं, सदा समरशील:'
तरी तूं पावोनि मला स्वगुरुस्वामीस, दास मरशील." ३३
सात्यकि म्हणे, ' गुरुगुरो ! स्वस्ति असो तुज सदैव आर्यास
काळक्षेप नसावा विजयपरामर्शधर्मकार्यास. ३४
ज्या वाटेनें गेले गुरु, धरिति छात्र त्या चि वाटेतें.
आचार्यें पार्थें जें केलें, मज हि प्रशस्त वाटे तें.' ३५
एवं वदोनि, वंदुनि, घालुनि गुरुगुरु रणांगणीं उजवा,
सात्यकि निघे, म्हणे, 'कुरुभट हो ! हूं ! शंख करुनि मुख सुजवा.'
कर्णाचें बळ भंगुनि, कृतवर्म्यातें हि संगरीं उडवी.
नलिनवनासि गज जसा, त्या कुरुकटकासि तो तसा तुडवी. ३७
मागुनि उठले पांडव सात्यकिच्या रक्षणार्थ जे, त्यांतें
भग्न करी कृतवर्मा, भ्यावें ज्यां पविकरें[3] हि जेत्यांतें. ३८
मुरडे, सात्यकि, सर्प चि, जाणों बळपुच्छ[4] तुडविलें, मागें:
भोजातें विरथ करी, मर्दी तत्काळ तच्चमू रागें. ३९
पुनरपि परते मार्गी माधव[5], हरिसा शिरे गजानीकीं[6];
अजितं चि तो, वरिला नरनारायणपादुकारजानीं कीं. ४०
मथुनि गजघटा[7] मारी शक्रप्रतिमप्रभा हि जलसंधा;
कीं सर्वदा हि सत्या सत्संधा[8], निष्फळा चि खलसंधा. ४१
गांठी गुरु सात्यकिला, तों दुःशासन-सुयोधन हि रायां[9],
जैसे वनांत सधना बहु तस्कर वेढिती धन हिराया. ४२
युयुधानें[10] दुर्योधन करुनि विरथ, पळविला पळांत रणीं.

---

१. युद्ध पाहणाऱ्यांच्या डोळ्याचे पापणीत. २. सात्यकी. ३. इंद्राने, ४. सैन्य हे च कोणी पुच्छ. ५. सात्यकी. ६. गजसमुदायांत. ७. गजसमुदाय. ८. साधूची प्रतिज्ञा. ९. धर्मराजाला. १०. सात्यकीने.

शोषी बळां शरानीं, जेंवि करानीं[1] नदीजळां तरणी[2]. ४३
हांसति धृतराष्ट्रसुता शीघ्रपलायनपरा सुर विमानीं,
'हा मंदा[3], तेजस्वी स्वाधिक, होतां पराङ्मुख, रवि मानी.' ४४
गुरुसात्यकिमुक्ताशुगपटळ न दे लेश मार्ग वातातें.
त्यां विंधुनि मिळविलें यश, जें भीष्मा आणि भार्गवा, तातें.
समरीं सारथि मरतां, द्रोणासि स्वैर पळविती घोडे.
मोडे सैन्य; स्वामीव्यसनीं स्थिर वीर राहते थोडे. ४६
द्रोण व्यूहद्वारीं राहे, मग शीघ्र सात्यकि निघाला;
घनपटलांत पवनसा परकटकीं तो सुदुर्धर रिघाला. ४७
काय इतर गज? देता जंभारातीभ[4] वाट वीरा या.
त्या[5] सुज्ञा सेना[6] बहुसंभारा ती भवाटवी[7] राया!. ४८
सात्यकि जातां, मथिलें द्रोणें पांचाळकटक बहुत रणीं.
धृष्टद्युम्नें केला तो[8], नव्हता समय म्हणुनि, न हुत रणीं. ४९
चढला होता धावुनि ईषेवरि[9], नग्न करुनि तरवारी,
परि गुरु वितस्तिमित[10] शर हाणुनियां, त्यासि शीघ्रतर वारी.
तें पाहुनि कवि वदले, 'झड घाली लावकीं[11] असि ससाणा.'
गुरुशिक्षा उग्रत्व चि देती, उग्रा जशा असिस[12] साणा[13]. ५१
वधिले शिशुपाळजरासंधात्मज वीर संगरीं बहुत;
गुरुनें, पुढें न झाला जो, केला तो चि रणमखीं न हुत. ५२
'अर्जुन-सात्यकि-चिंताकुळ,' धर्म असें वृकोदरास वदे,
'आम्हां उत्साह तुझा दे अभय, जसें सुरांसि वासव दे. ५३
भीमा! धनंजयाचा[14] घ्याया क्षम तूं मरुत्[15] समाचार.

---

१. किरणानीं. २. सूर्य. ३. हा रे मूर्खा! ४. इंद्राचा हत्ती. ५. सात्यकीस-**पंत.** ६. कौरवांची-**पंत.** ७. संसाररूप अरण्य. ८. द्रोण. ९. धुरेवर. १०. वीतभर लांबीचे असे. ११. लाव्याचे ठायीं. १२. खड्गास. १३. सहाणा. १४. अर्जुनाचा (पक्षीं) अग्नीचा. १५. भीम (पक्षीं) वारा.

तत्कुशळवृत्त मौक्तिकसम; तें मज सितगरुत्[१]समा चारें[२]. ५४
सात्यकि बळें चि म्यां कुरुकटकमहासंकटांत शिरकविला.
गेला शरसम. समयीं बा! द्यावें लागतें चि शिर कविला. ५५
कां पाठवितों? कळतें जरि करिल व्यूहनद गडप यातें.
तूं सेतु; तरेल इतर न कुरुबळा, जेंवि न दगड पयातें[३].' ५६
तों पांचजन्य ऐकुनि धर्म म्हणे, 'हा! अभाग्य बहुधा मीं.
कृष्णा[४], पृथा, सुभद्रा उत्पात विलोकितील बहु धामीं. ५७
बा! स्पष्ट पावला चि क्रूरारिगणांत वत्स मरणातें.
सख्य स्मरोनि करितो अभिमानी कृष्ण तत्सम रणातें.' ५८
भीम म्हणे, 'आहे प्रभुवर सारथि; अर्जुनासि भय नाहीं.
तूं त्या कृतप्रतिज्ञाप्रति[५] शीघ्र विलोकिसील नयनाहीं. ५९
आज्ञा धरुनि शिरीं, हा मीं जातों, सर्व शत्रु पळवीन;
मळवीन सुयोधनमुख, शंखरवें कृष्णकुशळ[६] कळवीन.' ६०
धर्मा देवी च गमे, 'केली भीमें असि प्रतिज्ञा ती.
द्विज म्हणति, 'तुजे होउत अहित[७] वश तुज्या आसिप्रति ज्ञाती[७].'
पूजुनि नमुनि द्विजगुरुचरण, निघे पिवुनियां नवसुरेतें.
हा तों ईश चि; न परां भी, जो जन्मे सुमानव सुरेतें. ६२
बळ जळधि गमे शिरतां, जो भीम हि मत्त, तो खरा मकर;
वर्षे शरे परनिकरीं[९], जेंवि सुहृद्दत्ततोख[१०] रामकर. ६३
तों भीमातें वारुनि, गुरुनें नाराच हाणिला अळिकीं[११].
तो अमृतकनककलशीं भासे कृष्णाहि[१२], नीरजीं[१३] अळि कीं[१४]. ६४
द्रोणमनीं कीं, "वश हा मज गुरुतें, जेंवि हरि ल[illegible]ामातें.
नमिल; म्हणेन, 'सुखें जा, त्वद्भुज परतेज हरिल; गा[१५] मातें[१५].'"

---

१. हंसासारख्या अशा. २. खाऊ घाल. ३. पाण्यातें. ४. द्रौपदी. ५. प्रतिज्ञा शेवटास नेलेल्या अर्जुनाला. ६. कृष्णार्जुनांचे क्षेम. ७. शत्रुरूप भाऊबंद. ८. तेजस्वी वीर्याने. ९. शत्रुसमुदायात. १०. मित्रांना दिला आहे संतोष ज्याने. ११. ललाटीं. १२. कृष्णसर्प. १३. कमलीं. १४. किंवा. १५. माझे स्तवन कर.

गुरु हांसोनि म्हणे, 'या व्यूहीं भीमा! तुला न शिरवेल,
शिरसिल तरि जरि, घालुनि वांचेल दवानळांत शिर, वेल।
मज वंदुनि, मदनुमतें शिरला व्यूहांत कृष्णसारथि रे!
शरभापुढें टिकेना सिंह हि; मग काय कृष्णसार थिरे? ६७
अक्षत अरि मीं, शिरणें तुज या व्यूहीं अशक्य मद्रचितीं,
जाणे करावया जीं कर्में भलतीं च एक मद्रचि तीं.' ६८
रक्तेक्षण भीम म्हणे, "झालासि ब्रह्मबंधु, चळलास.
कळलास अधम कीं तूं, खळसंग, धनुष्य, धरुनि मळलास.
योग्य नव्हे, घ्याया तव अनुमत, तो वासवि प्रवेशाला.
कुतुकें सभ्य प्रभु हि न बहु मानिति काय विप्रवेशाला? ७०
हें किति तुच्छ? मदनुज स्वबळें चि धसेल शक्रकटकांत.
वचकेल काय शिरतां, हंसाद्यनिरुद्ध गरुड, चटकांत? ७१
मीं भीम त्वदरि, नव्हें त्वत्पूजक; सदय तो धवळवाजी.
मज प्रद्दा म्हणतसे, 'तेजें चि खळारियोध वळवा जी!' ७२
'आपण पुत्र, पिता तूं,' म्हणतों, द्रव परि न हें तुला लव दे,
पदपतितरजां, देउनि पात्रत्व, गुण स्वयें कुलाल वदे. ७३
म्हणतों नित्य निजमना कीं, 'या द्विजनायका पिता माम.
परि तूं निर्दय; इतर प्रणतांची काय कापिता मान? ७४
तूं काय गा!? स्वधर्म चि सर्वांची पुरविणार आळ पितीं.
किति नागकाळपाश? स्वान्याय चि करकरूनि आळपिता. ७५
जरि आपणासि मानुनि शत्रु असें पातलासि कळहातें,
तरि या कर्माचें घे; देतों मीं भीमसेन, फळ हातें." ७६
ऐसें बोलुनि सोडी, ती द्रोणरथीं उडी गदा घाली;

१. माझी रचना(?). २. आरक्त नेत्र ज्याचे असा. ३. ब्राह्मणाधम. ४. हसादिकानीं रोधिला जात नाहीं असा. ५. दुष्ट शत्रूकडील योद्धा. ६. पायांपासून, पडलेल्या धुळीला. ७. कुंभार. ८. बाधणारा. * मूळपाठ—**विप्रवेषाला.**

अनिवार्या चि खवळली, जसि पाडाया कुंडी[1] गदौघाली[2]. ७७
तों स्वरथावरुनि उडी टाकुनियां, त्या गदेसि गुरु चुकवी,
अभिमान त्यजुनि जसा काळगतिस आत्मयोगपटु चुकवी.
पडतां रथीं गदा, तो स्वसुसा[3] पळ वीरविप्र भासेना.
कौरव वेष्टिति भीमा; तों त्या पळवी रविप्रभा सेना. ७९
भंगी भीमगदाशनि[4] सतुरगसूतध्वजा[5] रथनगा[6] ती.
रुद्र चि वृकोदर गमे. त्या त्रिपुराचें चि तें मथन गातीं. ८०
सुखवध्यें त्वदपत्यें भीमशरां, जेंवि हरिनखां बकरीं.
म्हणुनि तुज म्हणत होतों कीं, 'खळ कुळमंडपा न खांब करीं.'
भीमें एकैकशरें एकैक सुषेण दीर्घनेत्र असे
वधिले सुदर्शनांत[7] त्वत्सुत दश, मृगवरें जसे चि ससे. ८२
द्रोणें पुनरपि केलें दारुण शरवर्ष, धरुनि वाटेतें,
वर्षे व्रजीं प्रलयघनवृंद, तसें गुरुधनुष्य वाटे तें. ८३
भीम रथावरुनि उडी टाकुनि, गुरुयश करावया गोळा,
धांवे, यंत्रापासुनि[8] वेगानें जेंवि उसळला गोळा. ८४
शरवृष्टींत वृकोदर, लेश हि न धरूनि साध्वस[9], रिघे; तो
वाटे, डोळे झांकुनि वृष[10] त्या लीळेकरूनि सरि[11] घेतो. ८५
द्रोणरथातें कवळुनि तो नित्य नवा युवा सवाहातें[12]
दूर झुगारी; म्हणवी शतवार सवायुवासवा[13] 'हां[14]!' [15]तें. ८६
गुरु मनिं म्हणे, 'विलोकुनि हें, गरुड हि चित्रसा उगा राहो.
ऐसे चि वत्सभुज हो! दूर समस्तारिमद झुगारा हो!' ८७
स्वरथीं भीम बसविला शीघ्र [16]विशोकें, जसा तपन अरुणें.

१. शरीर. २. रोग आणि पाप याची पक्ति. ३. सजीव-पंत. ४. भीमाची गदा हे च कोणी वज्र. ५. अश्व, सारथी आणि ध्वज यांसहित. ६. रथरूप पर्वतातें. ७. सुषेणापासून सुदर्शनापर्यंतचे. ८. तोफेपासून. ९. भय. १०. बैल. ११. पावसाची सर. १२. अश्वसहिताला. १३. वायूसह इंद्रातें. १४. येथें हा शब्द धन्यतार्थक आहे. १५. क्रमें-पंत. १६. या नांवाच्या सारथ्यानें.

नवयानीं गुरु हि बसे, ज्या 'वृद्ध' असें म्हणों नये तरुणें. ८८
द्रोण द्वारीं राहे; मार्ग सोडूनि, पद, विरोध, सरे.
मारुति म्हणे, 'विशोका! हूं! व्यूहीं, शत्रुभद विरो, धंस रे!'
भीम करी वीरांचें, वृक्षांचें, मथन, वातसा वाटे;
निर्मावा जेंवि वनीं दहनें, तो पथ नवा तसा वाटे. ९०
कल्पांतीं कदन जसें रुद्र, तसें तो गदीनें भीम करी;
ती हि गदा कुरुकटकीं शिरतां, जैसी नदीं, न भी मकरी. ९१
परसेना लीळेनें, शिरतां, तत्काळ तो विदारी ती.
रामशराची बहुधा आली त्या युद्धकोविदा रीती. ९२
दूरुनि सात्यकि अर्जुन पाहुनि, दे भीमयोध हाकेला.
धर्माला कळवी कीं, 'आहेत स्वस्ति, शोध हा केला.' ९३
तें परिसुनि, कृष्णसखे सात्यकिसह गर्जले, सुखें फुगले.
असतिल मयूर परमप्रियघननादोदयीं, कसे उगले? ९४
भीम धनंजय माधव सात्यकि हे वीर गंर्जतां चवघे,
धर्म म्हणे, "शीतळ हो कर्णयुगा! या सुधोर्मिची चव घे. ९५
वत्सा! जेंवि निववितीं इंदुकर चकोरदृष्टिला गोरे,
तेंवि सुहृन्नयना तव भुज; यांसि न पापदृष्टि लागो रे! ९६
बा! चिंतातटिनीच्या, गिळिले बहु देव दैत्य नर, डोहें.
श्रीगुरुनें चि म्हणावें की त्वां 'स्वाश्रित कदापि न रडो,' हें.
बा! तूं ज्यांचा द्वेष्टा, कैसें जय पावतील ते जन गा!?
शक्रापुढें टिकावें; ऐसें कैंचें प्रचंड तेज नगा? ९८
श्रीकृष्ण कृष्ण सात्यकि कुशळी आहेत, धन्य मीं आजि.
आजिक्रतूंत गिळितीं रिपु, काळीसी करूनियां आ जी; ९९
आजीसीं बहुमान्या गांडीवलता परायुधग्रांमा

१. धैर्यानें शीर. २. वाटेमध्ये. ३. गदाधरश्रेष्ठ. ४. अमृतलहरीची. ५. गौरवर्ण चंद्रकिरण. ६. समरयज्ञात. ७. कालिदेवीसारखी. ८. गांडीवलता—पंत. ९. शत्रूच्या शस्त्रसमूहास.

विजया जय देउ, जसी कोदंड[1]लता परायुधग्रामा[2]. १००
रवि अस्तासि न जातां, मारूनि जयद्रथासि धवलहरी
उठविल काय सुखाच्या, जेंवि पयोधींत रात्रिधव[3], लहरी?
सैंधव[4] मेल्यावरि तरि कौरवपति करिल काय सामातें?
तो दुःखप्रद हि प्रिय सर्वस्वा[5]वरिल कायसा मातें." १०२
अंध म्हणे, 'हा भीमोत्कर्ष मला संजया! परिसवेना.
गमला नसेल दुःसह मुनिधिक्कृतिगंज[6] यापरिस वेना[7]. १०३
कांपविला कीं व्यूह, व्याघ्रानें जेंवि कातराक्ष[8] ससा!
सुत शेष राहिले जे, त्यांचा ही करिल घात राक्षससा. १०४
चुकवावें हरिणांच्या, कैसें क्षुब्धा हरीस, कळपानें?
वधिल मुलें तो, तरुचीं जेंवि महानिळ हरी सकळ पानें. १०५
कुरुकटकीं भीम करी कर्म कसें काय तें कळीव मला;
उग्रा[9] हि सूग्र न जिरे, बा! कर्कोटा[10]हिविष कीं वमला.' १०६
सूत म्हणेः-श्रवण करीं, कथितों मीं भीमकर्णसमरा, ज्या
पाहुनि सुर-मुनि वदले, 'रणपंडित भीम कर्ण सम' राज्या!
केला तें रोमांचित भीमानें कर्ण, वासवें[11] काय[12].
गमलें प्रळयीं भिडतो तो अर्णव अर्णवासवें काय? १०८
नरहरिचे लाजवितीं जैसे बालार्कवर्ण[13] नख पविला;
भीमशर तसे चि, तिहीं केला परिभूत कर्ण, न खपविला. १०९
होउनि विरथ पळाला कर्ण, तया घे सुषेण निजयानीं[14];
भीमभुजानीं[15] केलें त्रस्त सकळ सैन्य लब्धविजयानीं[15]. ११०

१. रामाच्या धनुष्याचे नाव. २. परायुदाहक रामास-**पंत.** ३. चद्र. ४. जयद्रथ. ५. सर्वस्वाधिक देहसा-**पंत.** ६. पीडा-**पंत.** मुनींना दिलेली धिक्काररूप पीडा. ७. या नावाच्या राजाला. ८. भयाने चंचल दृष्टि झालेला. ९. अत्यत उग्र. १०. कथासदर्भ वन० अ० ४, नलाख्यान पहा. ११. इद्राने. १२. शरीर. १३. बालसूर्याप्रमाणे (रक्त)-वर्ण. १४. आपल्या रथी. १५. मिळाला आहे जय ज्याना अशा भीमभुजानीं.

भीमाच्या सिंहरवें भ्याले बहु; एक ही न पर परते.
जे शूर मदांध द्विप, हगले बळधैर्यहीन परफर, ते. १११
कळैला, कर्णपराभव जाला, हें भीमसेनसिंहरवें,
धर्मै, म्हणे, 'जोडावें वत्सा! ऐसें चि यश तुवां बरवें.' ११२
कर्णपराभवहर्षें वाजविले शंख बहु अनीकांहीं
त्या आनंदा माया नाहीं अवकाश जनमनीं कांहीं. ११३
परिसुनि परदररव, बहु वाजविती शंख तावक हि मानी;
तो प्रभु शंख, तव चमूभा, जेंवि प्रलयपावकहिमानी. ११४
गांडीवपांचजन्यध्वनि ही,लीळेकरूनि लोपविले
भीमरवें; मग योगी पळ तरि नसतील काय कोपविले? ११५

---

## अध्याय बारावा.

शिरतां अर्जुन सात्यकि भीम व्यूहीं, गजव्रजीं हरिसे,
धांवत जाय गुरुकडे दुर्योधन, वसति षडरि ज्यासरिसे. १
द्रोणासि म्हणे, 'गुरुजी! शिरले व्यूहीं कसे तिघे अरि ते?
तुमच्या प्रतापतपनें केले तुच्छ प्रवाह कां न रिते? २
गेले अर्जुन सात्यकि भीम महाबळ जयद्रथाजवळ;
साक्षात् काळांतक यम जाणों त्याचा करावया कवळ. ३
तुज जिंकिलें तिहीं हें अद्भुत लोकांत कां न वीटावें?
ग्रीष्मीं जेंवि तडागें, तेंवि समुद्रें हि काय आटावें? ४
हतभाग्य मीं च बहुधा; आहे माजा चि नाश या कळहें;

१. शत्रु. २. सैन्यानीं. ३. तुझे लोक. ४. हिमसंहतिः—पंत. प्रलयाग्नीने वितळलेला बर्फाचा ढीग. ५. तो भयंकर शब्द ऐकिल्यानें योगसमाधीला विघ्न आल्यामुळे मुनीना राग आली. ६. ज्याच्याबरोबर. * धर्म समजला.

कीं जें तुजें त्रिलोकालंघ्य, तिघानीं च लंघिलें बळ हें. ५
आतां काय करावें? कैसी होईल सिंधुराजगती?
जाली त्या पार्थमयी, सिंहमयी जेंवि सिंधुरा, जगती.' ६
द्रोण म्हणे, 'सर्वाधिक भीताभयदान सत्य, जावें च;
शिरतिल पर यास्तव, हें म्यां व्यूहद्वार न त्यजावें च. ७
त्वत्साहित्याविषयीं आहें मीं नित्य अनळस मराया,
जा सैंधव रक्षाया, परदुःसह तूं हि अनळसम, राया! ८
दिव्यकुरुक्षेत्र पट, ग्लह सैंधव, ढळति अक्षे[3] हे बाण;
या युद्धद्यूतींचे जय-परिभव सत्य, ते[5] मृषा, जाण. ९
मीं द्वारीं नसतां, गज सरसीसी[6], पर चमू ढवळितील.
शत्रुकरातें सैनिकपति, दत्ताभय अमूढ, वळितील. १०
जाणें युक्ति, बळाचा जोंस्तव कुरुनायका! पुरावा, ती.
शिवतां चि पराभूति स्वच्छ यशा खाय, कापुरा वाती.' ११
मानुनि शासन[10] गुरुचें व्यूहाबाहेरुनि क्षितिप तूर्ण
जाय, कराया जीवनकामजयद्रथमनोरथा पूर्ण. १२
तों वीर उत्तमौजा, तद्बंधु हि देखिला युधामन्यु;
तत्काळ तिघांकरवीं धरवी युद्धार्थ आयुधा मन्यु[11]. १३
होऊनि उत्तमौजा विरथ, युधामन्युच्या रथीं चढला.
रथ भंगितां तिहीं[12], बहु कुरुपति कोपेंकरूनियां कढला. १४
भूप गदा पडताळुनि[13], सिंह गजांवरि जसा तसा, तूर्ण
धावे, दोघे भ्राते वीर कराया रथासकट चूर्ण. १५
आयु म्हणे त्यांसि, 'मरण आलें हें, टाकुनी उडी, दवडा.

१. हत्ताला २ पणद्रव्य. ३. फासे ४ खरोखरीचे. ५. पूवाच्या घतानल. ६ सरोवरासारखी ७ ज्याना अभय दिले आहे असे जाणते सेनापति हि ८. परवठा ९. म्हणोनि सावधान राहे, असा भाव–**पंत.** अन्वय–स्वच्छ यशा शिवता चि पराभूति खाय, [ जसी ] कापुरा वाती खाय. १०. आज्ञा. ११. क्रोध. १२. उत्तमौजा व युधामन्य यांही. १३. आजमावन. ( नतर हातात घेऊन ).

वधिल चि 'हा, शूळार्ता वाटुनि केला जसा उडीद वडा.' १६
ते[1] भूपृष्ठीं पहिली, मग घाली तद्रथीं, उडी, दरदा[2];
तो जाला पीठ, जसा सांपडला चर्वणीं[3] उडीद रदा. १७
परिभूतिनीं तळमळे, जेंवि नखीं विद्ध मानव सुयानीं.
भूप चढे शल्यरथी, ते ही राजोत्तमा! नव-सु-यानीं[4]. १८
पार्थाकडे चि गेले ते त्याचे चक्ररक्षक रयानें.
राया! मग दुर्योधनराजा ही युक्त होय वरयानें[5]. १९
पुनरपि गांठूनि करी भीमाला कर्ण, कौरवा[6]! रण गा!
सर्वासुरराज बळी जेंवि चतुर्दंतगौरवारणगा[7]. २०
वृद्ध म्हणे, 'भग्न करी भीम बळें, करुनि संगरा, ज्याला,
त्यावरि जाया झाला कैसा उत्साह अंगराज्याला! २१
ज्याच्या भयें न लागे धर्माचें पळ हि पातया पातें,
तो कर्ण भग्न जाला, केला लघु नहुषपात या पातें. २२
भीष्मद्रोणभयाधिक ज्याचें भय मानितो अजातारी,
त्या भीमशक्ति भंगी. हरिभीत गजा न कां अजा तारी? २३
जो उपजला सकुंडलकवच, नवचमत्कृतिप्रति प्रसवे,
रसवेत्ता[10], दाता, ज्या ब्राह्मणपदपूजनाविना न सवे[11]; २४
देते परघूकांतें[12], सुहृदब्जांस[13] प्रभाकर[13], दरा[14], जे,
ते सर्व हि ज्या एकें केले, हरुनि प्रभा, करद[15] राजे; २५
त्या वीरवरा कर्णा सर्वसुविद्यादयाकळावासा[16]

---

१ ते युधामन्यु व उत्तमौजा रथावरून प्रथम खाली उडी घालिते, व नंतर त्याच्या रथावरि भयदायक अशी, दुर्योधनाची गदा उडी घाली. २ भयदा गदा—पंत. ३. दानामध्ये. ४. वेगाने—पंत. ५. उत्तम रथाने. ६. धृतराष्ट्रा! ७. चतुर्दंत व गौर अशा हत्तीवर (ऐरावतावर) असलेल्या इंद्राला. ८. कथासंदर्भ आया० उद्योग० अध्याय २ रा पहा. ९. ज्या कर्णाचें. १०. वीररस जाणणारा. ११. सवय. १२. शत्रुरूप घुबडास. १३. मित्ररूप कमलांना सूर्याप्रमाणें असणारे. १४. भया. १५. करभार देणारे, १६ आवास=स्थान.

भीम कसा विक्रमगति रोधक जाला, हया कळांवासा? २६
पुत्रास सखा, आश्रय, सर्वस्व, अभेद्य कर्ण तो कवच;
यश बहु रुचे जयाचें, जैसें अस्पष्टवर्ण तोकवच; २७
नुरविल शेष परांच्या, मथुनि सकळ, सितहयांसकट, कटकीं;
ज्याच्या भरवसियानें केली, न धरुनि भयास, कटकट कीं; २८
त्या कर्णासीं कैसा पुनरपि तो भीमसेन समर करी?
अत्यद्भुत हें, प्रतिभट मर्त्यकरी एक, एक अमरकरी. २९
आधीं च सदय; कळलें बंधुत्व; कथी स्वयें पृथा नों तें?
मग केलें युद्ध कसें? न करावें साधुनें वृथा नातें. ३०
दोघांत कोण विजयी जाला तें सांग, आयकों दे गा!
काहीं काळ सुखें कीं दुःखें संसारिकाय कोंदे गा!' ३१
सूतें म्हणेः-भीम निघे बंधुकडे जावयासि वातगती,
त्याच्या दृष्टिपुढें, परशक्ति न हरिच्या जशा शिवा, तगती. ३२
धावुनि कर्ण म्हणे, 'रे! दावु नये पृष्ठ संगरोपरतें.
परतें: रणीं च मरणावधि, जन्हि खातील अंग रोपें रतें. ३३
तुजसी युद्ध घडो, हें स्वप्नीं हि न चिंतिलें परानीं कीं,
तो तूं भीमा! मजला पृष्ठ कसें दाविसी परानीकीं? ३४
सर्वत्र जीवितमाधिक यश चि सुखास्पद, न भाउ: परतें रे!
रणनिजधर्मापासुनि न, मळाया वदनभा, उपरतें, रे! ३५
शत्रूंसि पाठ दाविसि, हें तुज कुंतीसुतासि अनुचित रे!
क्षत्रिय लब्धजय चि कीं खरतरपरशरविशीर्णतनु चि तरे.' ३६
भीम प्राण हराया अपकारें, तापसा, परतें;

१. मोकळ्या घोड्याच्या पायांना बांधतात त्या मायबदासारखा २. श्वेताश्व अर्जुनासह ३. प्रतिपक्षी योद्धा. ४. देवाचा हत्ती ५ वाक्यालंकार-**पंत.** ६. संसारी जनाचा देह. ७. संजय ८. कोल्ह्या ९ युद्धापासून पराङ्मुख होऊन [त्वां] पाठ दाखवू नये. १०. बाण. ११. शत्रुसैन्यांत. १२. अत्यंत तीक्ष्ण अशा शत्रूच्या बाणांनीं गलित १३. ज्वर-**पंत.**

विनविति गमे, करुनि त्या आत्रेयां तापसा पसा, पर ते. ३७
मृदुपूर्व युद्ध रविसुत, भीम करी क्रोधपूर्व, गा राज्या!
कांपविती इषु त्यांच्या बहु; थोडे त्या, शुचींत गारा ज्या. ३८
भीमातें आच्छादिति वृषशर, जे पक्षिपतिसम रयज्ञ.
यां दोघांचा, बहु दे नारदनयनांसि रति, समरयज्ञ. ३९
कर्ण करी स्मित, तेणें भीमाला बहुत राग ये रचितें.
हास्य चि बहु ताप, न विष; मानधन न साहतात, येर चि, तें.
जन्हि होय भीम, जैसा बहु पुष्पित पळस लालभडक वनीं,
कठिनीं हि रणीं न पडे त्या, गुरुभक्तासि जेंवि, जड, कवनीं. ४१
तें भीमवपु विनाशर, शल्यवपु जसें विनाशलल, नाहीं.
केला इषुनीं त्याचा न शुकाचा जेंवि, नाश, ललनाहीं. ४२
भीमें आठविला स्त्रीवस्त्रहरण हा निकार भारी हो!
कर्ण हि, मुख्यत्वें जो करणारा हानि, कारभारी हो. ४३
केला पुन्हां, मथुनि धनु हय सारथि, तो रणस्थ विरथ कवी.
वाटे घननरवसमरीं, कपि, रोधुनि तोरणें, स्थविर थकवी. ४४
अन्यरथीं क्षिप्र चढे, मोह प्रकट न करूनि, आधिरथी,
कीं होवूत न विकळ स्वव्यामोहें, धरूनि आधि, रथी. ४५
कर्ण चि धन्य, न होता अन्य तसा मानव, क्षम रणातें.
देतें कां न क्षतशतचित तितउसमान वक्ष मरणातें? ४६

१. अञ्जलिं कृत्वा क्षुब्ध दुर्वाससम प्रार्थयन् इव भीमप्रेक्षकाः कौरवा अभवन्—**पंत.** (हात जोडून क्षुब्ध अशा दुर्वासाला च जणू प्रार्थना करीत आहेत असे भीमाला पाहणारे कौरव भासले). २. बाण (येथें 'इषु' शब्द स्त्रीलिंगी आहे). ३. आषाढमहिन्यात. ४. कर्णाचे बाण. ५. गरुडतुल्य. ६. शरावाचून. ७ सायाळ—**पंत.**, ८. कंटकावाचून., ९. अपकार, १०. मेघनाद इंद्रजिताच्या युद्धां. ११. वृद्ध वानर. (मारुती). १२ बहिर्द्वार—**पंत.** १३. अधिरथनामक सारथ्याचा मानलेला पुत्र. (कर्ण). १४. आपल्या मूर्छेनें १५. शेंकडों जखमांनी व्याप्त. १६. चाळणी—**पंत.** (चाळणीसारखें).

कर्णपराभव म्हणवी, येउनि कानास, 'हाय !' हा, निबरा.
रोदन वृथा खरें परि, साहेल कसी सहायहानि वरा? ४७
मोहें वाहुनि हृदयीं चिंतेतें, वृद्ध, जेंवि सांगेतें,
पुनरपि तद्वृत्त पुसेः परिसा संजय तयासि सांगे, तें. ४८
कर्ण पुन्हां क्रोधानें धावे तें देखतां, असें बहुत
वदले तावकें, 'पावकवदनीं झाला चि भीमसेन हुत.' ४९
हय वृषहयांत मिसळीं, जे वर्णे स्पष्ट आसविलः याला
देखुनि तव विजयाची पावे सारी च आस विलयाला. ५०
अपकार तुम्हीं केले जे जे, त्यांतें स्मरोनि तो खवळे.
कर्णदवीं घन चि, गमे, द्याया श्रितचातकांसि तोख, वळे. ५१
एकें मुखें किति करूं अत्यद्भुत युद्धयक्षवर्णन गा !?
वाटे प्रवर्तला तो भेदाया मूर्तवज्र कर्णनगा. ५२
तोडुनि धनु कर्णाची शक्ति हि भंगी, जसी च मूठ कवीः
कीं जेंवि मथुनि मन, मुनि विघ्नांची दारुणा चमू ठकवी. ५३
भेदी भीम शरानीं बहु शीघ्र परा, शरासनादानीं.
भिवविति वृषा न ते, निशिचरें जेंवि पराशरास, नादानीं. ५४
करिती ते, वृषभगजव्याघ्रहरिशरभसुरासुरसम, रणा.
भ्रमरस तसा न गणूं दे, वीररस चि सुरासुरस, मरणा. ५५
भीमें पुनरपि कार्मुक तोडुनि वधिले सुशंखधवलहरीः
नवल हरि करिः प्रसवे बहुत तदानंदसिंधु नव लहरी. ५६
भ्रात्यासि म्हणे कुरुपति, 'तूवरक पिटोनि दूर लाव कसा.'
दुर्जय धांवे, व्हाया श्येनापासूनि चूर लावकसा. ५७

१. म्हानाऱ्या धृतराष्ट्रास. २. शस्त्रविशेष (बचा) ३. त्वत्पक्षीय. ४. अग्नीच्या मुखीं ५ अस्वलामारखे काळे ६ कर्णरूप पवनास ७ मृत्युदायक मन्त्रप्रयोग. ८. कर्णास–पंत. ९ नवचापग्रहणे–पंत. १०, राक्षस. ११. भीम-कर्ण वृषभादिकासारखे युद्ध करिती १२. सुंदर शंखासारखे पांढरे घोडे. १३. कृष्ण. १४. मिशा नसलेला, खाड असा भीम. १५ धार्तराष्ट्र–पंत.

शरपातदेश सोडुनि, सेना होती उगी च बाहेरी.
जरि जाय एकला अरिवरि दुर्जय, तरि उगी च बा! हेरी. ५८
लागे स्वर्गफलद शर भीमक्षेत्रीं सुधींट पेरया.
यश साधाया, घालुनि अंजन नेत्रीं, सुधी टपे राया! ५९
सातानीं मग, आधीं भीम उरीं ताडिला नवशरानीं.
नासाकेश उपडितां गज होय हरीस कां न वश रानीं? ६०
तो साश्वसूत दुर्जय वधिला तत्काळ न करितां गलबा.
जाणों भीम म्हणे, 'घे स्वर्ग, त्यागुनि कुसंग हा, चल बा!' ६१
रडत चि, दुर्जय कर्णें त्या समरमखांत घातला उजवा.
मौनें म्हणे कुमार, 'व्यर्थ नयन सुजवितां, सुखें सुजवा.' ६२
कर्णें गणिले न विशिख भीमाचे लागले कचाकच ते.
न च, तेजस्विज नसतां, पचतेः तदवयव खळखळां खचते. ६३
स्थविर म्हणे, 'हा! कर्णीं बळ बहु, परि पांडवांपुढें न चले.
अंगार सर्वदुर्जर, तदपि चकोरांस ते सुखें पचले.' ६४
सूत म्हणेः—होय पुन्हां कर्ण कलहरत, चढोनि नवयानीं.
आचार्य चि ते, कीं रणसेव दाखविला सुरांसि नव यानीं. ६५
कर्णाचे हय च्यारी मारी खवळोन, तो गदाघातें.
भीमबळातें वारूं न शके तो, जेंवि भोगदाघातें. ६६
केतु छेदुनि सूत हि वधिला. अत्युग्र तेज राया! तें.
वृष. मंदोत्साह गमे. आली 'परिभूति'ने जरा यातें. ६७
राहे कोदंडबळें द्रो, दंडबळें उभा जसा जीर्ण:
तेजस्वी न च वांके. स्वीकारिल केसरी कसा जैर्म? ६८
भूप म्हणे, 'रे दुर्मुख! ध्याया कर्णासि अभय बा! धावें.

१ बाणाच्या आटोक्यातील प्रदेश. २. घोडे व सारथी यांसह. ३. दुर्जय हा मृत, अर्थात त्याचें मौन. च म्हणाले. ४ वीरपुत्र. ५. धृतराष्ट्र. ६. निखार. ७. सर्वांना पचविण्याला कठिण. ८. चकोरपक्ष्याचें भक्ष्य निखार आहेत, असा प्राचीन-कविसंकेत आहे. ९. धनुर्वेदगुरु. १०. रणयज्ञ. ११. कृतकर्माचें फळ देणाऱ्या पातकानें. १२. पराभवरूप जरा (वार्धक्य). १३. वृद्ध. १४. खोगीर.

आपण देखत असतां अरिचें स्वसख्यासि, न भय बाधावें. ६९
केला कीं कर्ण विरथ; चापीं गुण, आधिरथि[1] रथीं, चढवीं.
तो शर[2] जसा प्रतापें त्या[3], या जलधीस[4] तूं हि, जा, कढवीं.' ७०
गेला वाराया जो दुर्मुख देखुनि समक्ष याला हो !
प्रेरी शर भीम, म्हणे, 'सत्वर हा ही यमक्षया[6] लाहो.' ७१
वाराया गेला तों आपण चि न लागतां हि पळ, वारे.
जाणों शरां म्हणे धनु, 'कार्य पुढें; नीट हात वळवा रे !' ७२
दुर्मुखरथ सांपडला विरथा कर्णासि आयता राया !
दैवत्यक्तासि शके न सखा न पिता न माय ताराया. ७३
राधेयाला न धरे, होतां दुर्मुख परासु, रोदन हो !
स्नेहगुण असा चि: कसा मोहद मज्जनपरा सुरोद न हो? ७४
नांदे सुखें सदोदित संसारीं तो चि, जो अनय न करी.
न निघे, इतर जन, बुडे व्यसनीं, पंकीं जसा अनयन करी. ७५
करि साश्रु दुर्मुखाच्या, तो कर्ण कवि प्रदक्षिणा, देहा.
समरीं भीम गमे श्रुतिगोतर्णकविप्र[10][11] दक्षिणा दे हा[12]. ७६
रडतां प्रहार केले होते ते सर्व उगविले तिपट.
निपट प्रखरशरांही वाटे चित्तांत पाडिला विपट[13]. ७७
सव्यभुजीं[14] भीमाच्या कर्णें नाराच अर्पिले चवदा.
चव दाखउनि वदान्यें[15] स्वरसें[16] ते अतिथि[17] तर्पिले च वदा. ७८

१. कर्ण. २. परशुरामाचा शर. ३. त्या पश्चिमसमुद्रास. ( एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करून, तिचें ब्राह्मणास दान केल्यानंतर आपणास राहण्यासाठीं रामानें पश्चिमसमुद्राजवळ जागा मागितली; परंतु त्यानें ती देईना; तेव्हां रामानें त्यावर एक बाण सोडून त्याला मागें हटविलें व जागा मिळविली, ही कथा येथें अनुसंधेय आहे ). ४. भीमरूप जलधीस. ५. जो (?). ६. यमसदनास. ७ निवारण होई, मरे. ८ सुरासमुद्र. ९. अंधळा हत्ती. १०. वेदरूपी धाईचा वत्स च असा ब्राह्मण. ११ भीमःसुपात्र महावदान्य.कर्णः –पंत. ( भीम हा सत्पात्र ब्राह्मण व कर्ण हा महान दाता ). १२. कर्ण–पंत. १३. विपट(?). १४. डाव्या बाहूवर. १५. दानशूर अशा ( भीमानें ). १६. स्वरक्तें. १७. बाणरूपी अतिथि.

भीम न चळला, अन्हि हंत खळ खळखळ विपुळ भुज वमे रुधिर.
गमलें त्यजिता, शिरतां रविसुतनाराच सुजव[3], मेरु धिरें. ७९
भेदी भीम[4] तिहीं च क्रोधभरें त्या वृषास[5] रोमांमीं.
जाणों, म्हणती[6] ते हय त्या डोहीं, 'द्रुत तृषा सरो पार्मी.' ८०
करिती तद्वैर्यातें ते, कामक्रोधलोभसे, नाहीं.
वृष निरखिला, हरिनखक्षतगजसा नष्टशोभ, सेनाहीं. ८१
ते सत्य सर्प, न विशिख: कर्ण हि न, तद्वीर्यसदनवारुळ तो.
कीं माणिक्यसर, जयश्रीवरणीं, शरगळां नवा रुळतो. ८२
बहुरक्त दिसे खेळुनि होम्य जसा काय बा ! गुलालातें.
पळतां कर्ण, स्मरलें, भिवुनि पळे बाळ बागुलाला, तें. ८३
उच्चैःश्रवःस्वसेसीं, भी त्यागुनि, न रमते जवन वाजी.
प्रकटिति, कशाप्रतोदांवांचून चि, परम ते जव नवा जी! ८४
तृप्ति वरि सदुत्कर्षे विहितजयस्वान नारद नवि च: कीं;
ब्रह्मरस हि म्हणतो 'हरिजनसुयशा' स्वानना, 'रद न विचर्की.'
कर्ण पळे भीमभयें, जैसा राक्षस परशरभयानें.
तें आपणा हरि करुनि दाखविलें बा! परा शरभ, यानें. ८६
भासे भीम भयंकर बहु, जैसा देव अंधकाराती.
जे[16] भीत, भंगवेळा जी कीं ते स्पष्ट अंध कारा ती. ८७

१. घायाळ. २. कर्णाचे बाण. ३. नाराचविशेषणम-**पंत.** वेगवान् असे. ४. धीर. ५ तिहीं च रोमांमीं इत्यन्वय.-**पंत.** ६. ते बाण हे च कर्णाचे घोडे. ७ लवकर. ८. त्या बाणरूपी सर्पांचे वारुळ. ९. रक्तधारामुत्प्रेक्षते-**पंत.** ( बाणांना लागलेल्या रक्तप्रवाहावर ही उत्प्रेक्षा आहे ). माणकाचा हार. १०. जयलक्ष्मीचे स्वयंवरप्रसंगीं. ११. इंद्राचा अश्व उच्चैःश्रवा, त्याच्या बहिणीशीं. १२. चाबक व एक प्रकारचें टोंचण्याचें शस्त्र. १३. केला आहे जयध्वनि ज्यानें असा नारद. १४. ब्रह्मानंद. १५. कर्णानें. १६. कवि म्हणतात, जे लोक भ्याले ते व जी पराजयाची वेळ ती अनुक्रमें अंध व कारागृह असें स्पष्ट वाटतें.

कृष्ण म्हणे, "बहु देतो दुर्योधन परममंद राग मला.
सांगे नित्य, 'स्वयशोहर कर्ण असेल मंदरा[1] गमला. ८८
दिधलें, देइल हि यशोमृत, परबळजलधि मथुनि, अतिबळ हा.
कळहा करितां मजसीं भंग चि पावेल सामर[2] हि बळहा.' ८९
लज्जाहानि न जाली त्या[3] मुग्धा[3], मज हि मुग्धताताः कीं,
म्यां कल्पिली प्रबळता अल्पबळीं, जेंवि दुग्धता ताकीं. ९०
जयभीमवधाविषयीं[4] कर्ण-सुयोधन करीत बकबक[5] रे!
कैसे करितील तिमिंग्रास[6] दहनमेषभंग बक वकरे[7]?" ९१
सूत म्हणे-धृतराष्ट्रा! बा! कारण तूं चि या विनाशाला.
शून्या होत्या न तुझ्या, सच्छळपरमानयाविना[8], शाला. ९२
कपटद्यूतादि कुमत, गुरुसुमतसम प्रभावि[9], लेंकाचें,
त्वां, पक्क हि शांतनवव्यासविदुरवचन, भाविलें, कांचें. ९३
जाले भीष्मद्रोणव्यासविदुरसदुपदेश तुज कुचले.
कर्णशकुनिदुःशासनदुर्योधनमंत्र[10] अमृतसे रुचले. ९४
उरलें हि घालिसी बा! काळमुखीं स्वकुळः घातलें कांहीं.
कां देसी दोष परा? त्वां हा केला, न घात लेंकांहीं. ९५
स्वयशोरक्षण चि करिति, बहु न तुझे[11] अंगरक्षण, नयज्ञः[11]
कीं तत्काळ चि देतो सङ्गतितें संगरक्षण[12], न यज्ञ. ९६
भंग, परि न समितितें[13] कर्ण, सतीतें जसा न विट, लाजेः
क्षणभरि म्हणोत यालों ते जन, म्हणतील, 'राहु विटला[14],' जे.
कर्णपराभवकोपें भीमावरि धांवले तुजे सुत ते,
दुर्धर, दुर्दम, दुःसह दुर्मर्षण, जय हि, जे मदें उतते[15]. ९८

१. मंदरपर्वताला. २ देवांमहवर्तमान इंद्र. ३ त्या मूर्ख दुर्योधनाला ४. अर्जुन व भीम यांच्या वधाविषयां. ५ बडबड ६. तिमिंगिलनामक महामत्स्याचा ग्रास ७. एक विशिष्ट बकऱ्यांची जात. ८ सच्छल हा मोठा अन्याय, तो केल्यावाचून. ९. प्रभावशाली. १०. मसलत. ११. नीतिज्ञ असे तुझे (द्रोणकर्णादि) १२. युद्धमहोत्सव. १३. युद्धातें. १४. कंटाळला. १५. उन्मत्त झालेले.

भीमें त्या पांचांचे केले तत्काळ पांच विलय महा.
कर्ण म्हणे, 'आयुविना याचा रिपु कोण वांचविल? यम हा.
छेदी धनु हय सारथि, मारी, खंडी पुन्हां हि चापातें.
भीम करी कर्णातें विरथ, कथूं कर्म काय बापा! तें? १००
भासे कर्ण क्षितिवरि झाला, सोडूनि गगन रवि पत्ति[1].
आल्या नसतां भीतो; मग न गणी, सत्वनग[2] नर, विपत्ती. १०१
कर्ण गदा भिरकावी, क्रोधभरें चाउनीं रदनवासा[3].
तीतें वारुनि, वर्षे[4] विजयाचा भाउ नीरद[5] नवासा. १०२
नुरवि[6], करुनि परकवचा अंगप तितउ, पळसमय[7] मनिं भानें[8].
भीमानें शर गणिले अंगपतित उपळसम, यमनिभानें[9]. १०३
कवच शतच्छिद्र करुनि, दक्षिणभुज हि व्रणोत्थशतधार[10],
केला कर्ण शिखरिसख[11] भीमें, निजविशिखनिकर शतधार[12]. १०४
पुनरपि होय पराङ्मुख वृष, होतां शक्ति बाहुची शिथिला.
भीमाला मानवली[13] जनतां, जसि रामबाहुला मिथिला. १०५
ज्येष्ठाज्ञेनें धांवति, रक्षाया कर्ण, चित्र उपचित्र
चित्राक्ष चित्रवर्मा चित्रायुधः करिति ते रण हि चित्र. १०६
सर्व हि वधिले भीमें, न करुनि बहु युद्ध, गलबला कांहीं.
आम्हीं[14] विलोकिला तो, गरुड जसा रुद्धगल बलाकांहीं[15]. १०७
वृष बहु रडे, हळहळे, होय विदुरसूक्तिची च आठवण.

१ पादचारी २. धैर्याचा पवन च असा. ३ दांतांच्या आवरणाला–ओठाला. ४. बाणवृष्टि करी. ५. मेघ. ६ चालवी–**पंत.** ७ पळभर ८ प्रेक्षकांच्या–**पंत.** ९ यमसमें भीमें देहपतितकर्णशर क्षुद्र पाषाणसे मानिले, धैर्यकरून–**पंत.** १० क्षतांनीं उत्पन्न झालेल्या शतशः रक्तधारा ज्यामध्यें असा ११ पवनाचा मित्र च अशा. (पर्वतासमान) १२ वज्र–**पंत.** १३ रामसमहि मान देता आला. १४. संजयादिकांनीं १५. गळ्यासोंवतीं बगळ्यांनी वेढा दिला आहे ज्याच्या असा गरुड.

हें चि चुकाया घेती स्वांगीं सष्टांगत करुनि आठ वर्णे[३]. १०८
बसुनि नवरथीं वृष करि, जिंकाया अरिस, जो निकर कांहीं,
वाटे वर्षे घन गोवर्धनगिरिवरि सजोनि करकांहीं. १०९
व्याकुळ करी विदारुनि कर्णा रिपुनाशकोविदा, राया!
तें प्रभु म्हणे, ' अस्त चि सुयोधनहृदया शको विदाराया.' ११०
कृष्णार्जुन-सात्यकि बहु मानवले भीमसेनबाहूंतें.
त्यांचें आम्हां पाहूं तेज सहायां हि दे न बाहूं तें. १११
प्रेतें कुमार विलोकुनि तम करी कोपशोक राधेया,
तो धात्रीस म्हणे, ' कां वाढविलें, श्रम करूनि राधे! या?'
मग आपणा म्हणे, ' 'धिक्! कर्ण! त्वामनपहृतनरवराधे!'
दाइस म्हणे, ' पृथावत् त्यजितां तुज लागता न रेव, राधे!'
गोंठी सुरुचि वृषविशिखतति[१०] भीमा परमदारुणास्तनगा[११],
'धाया श्रीकृष्णाला जेंवि बकी परमदारुणा स्तन गा! ११४
दुःसह भीम कुरुबळीं होय, जसा दहन तरकंटुन[१२] रानीं.
गणिलें त्या समयाहुनि हळहळ[१३] ही न बहुतर कटु नगानीं. ११५
रामाची शक्ति जसी, बा! भीमाची हि शक्ति चवकळ[१४] ती.
वीररसार्त्ती, श्रवणें थोडीं, नेत्रें उदंड, चव कळती. ११६
युयुधान उत्तमौजा जिष्णु युधामन्यु कृष्ण हे तिकडे,
वदले, ' कर्ण किति? कनकगिरिचे भेदील भीमहेति[१५] कडे.'

१ हें पश्चात्तापदुःख. २. साधम नम्र असे लोक. ३. ललाटवक्ष करजानु-चरणेषु किणा नमस्कारघालाना भवन्ति हि—पंत. कपाळ, हात, ऊर, गुडघे व पावले अशा अष्टांगीं नेहमी नमस्कार घालणारांना वण पडतात. ४ गारानी. ५. अन्वय—त्याचे (त्या बाहूंचे) तेज आम्हा सहाया हि पाहूं [ किंवा ] बाहू न दे. ६. मृत ७. दाईस. ( राधेस ). ८. नाशें हरण केली दुर्योधनाची मानसव्यथा ज्याने अशा नृते. ९. वाल. ( लोकाचे दूषण ). १०. कर्णशराचा समूह. ११. शत्रुगव-रूप अरुणास अस्ताचलासारख्या अशा भीमाला. १२. आवेशाने पेटून. १३ या नापाचे विष. १४. पुष्कळ १५. भीमाचे शस्त्र (गदा ).

भूरिश्रवा गुरुतनय कृप हे तों सुज्ञ, मानवावे[1] च.
कवि म्हणति 'वाणि ! वर्णुनि देवा कीं सुज्ञ मानवा, वेचें.'[2] ११८
समयीं गुण आणुनियां, शब्दें ही सुयश साधु साधुनि घे.
हें त्रित्र, जयद्रथकुरुपतिवदनांतूनि 'साधु साधु !' निघे. ११९
भीमशराच्छादित रविसुत झाला जेधवां दिसेनासा,
भ्याला कुरुपति; जाणों त्याची त्याला न ती दिसे नासा[3]. १२०
भूप म्हणे, 'धांवा रे ! म्हणतां काकांसि काय पायस खा ?
मागें ठेविल, माझा[4] न च रक्षाया स्वकाय, पाय, सखा.' १२१
गेले अग्रजवचनें धरुनि मनीं लाज, सात[5] वाराया,
ते तोयबिंदु जाले; तो, तापविला जसा तवा, राया ! १२२
शत्रुंजयादि तव सुत झाले, यापरिस साजिरे[6] नाकीं.
जो हरिभाग, वृकांला तो भक्ष्य हि, परि, ससा, जिरेना कीं.
न विकर्णांतरपातें[7] रणरंगीं भीमसेन, गहिवरता[8].
न गदी, जगदीश्वरसा, गजवजता, पडलिया नग हि घरता.
भीम म्हणे, 'अर्पावें सर्वस्व तुला, न सायक, विकर्णा !
कीं वृत्ति तुझी रुचली बहु, रसिका जेंवि साय, कविकर्णा.
योग्य नव्हे प्रतिज्ञा[9], गुर्वाज्ञा जेंवि भार्गवा[10], त्यागा.
असुख रची खळसंगति, जैसी कुग्राममार्गवाट्या[11] गा ! १२६
सोडावी च कुसंगति सर्वार्थदकाय[12] पाळणारानीं.
स्वर्गपरें पुत्राचा बांधावा काय पाळणा रानीं ? १२७

१. याचा मान अवश्य ठेवावा. २. कामा लाग. ३. नासिका. (मृत्यु समीप आलेल्याला त्याचें नासिकाग्र दिसत नाहीं, अशी समजूत आहे) ४. माझा मित्र कर्ण. ५. सात दुर्योधनबंधु. ६. शोभायमान. ७. विकर्ण यानें वस्त्रहरणप्रसंगीं द्रौपदीचा कैवार घेतलेला होता, यामुळें त्याच्या मरणाचें भीमाला दुःख झालें, असा भाव. ८. गडबडता. ९. 'मी सर्व कौरवांस मारीन' अशी भीमाची प्रतिज्ञा होती. १०. परशुरामास. (परशुरामानें आपल्या मातेचा वध करण्याची पित्याची आज्ञा मान्य केली, वगैरे कथा आहे). ११. [ग्राममार्गांतील] बाहुहुल-पंत. १२. सर्व पुरुषार्थ देणारा देह.

साधु बिभीषण कीं तूं, जर्‍हि खळसंसर्ग करुनि मळले शें,
स्पष्ट तुम्हां दोघांस स्पर्श न केला कुसंगमळलेशें. १२८
होतासि सखा तूं त्या पुण्यश्लोका, अजा मिळाल्याला.
दोघांस हि लाभ, प्रभु, देउनि, सद्यश, अजामिळा, त्यांला.'
ऐसें शोचुनि, पुनरपि सिंहापरि होय गर्जना करिता.
जाला, रणोत्सवीं त्या, वृक्षप्रासादवर्ज्य नाक रिता. १३०
धर्मास कळे, नेला भीमें वृषगर्व सकळ विलयाला.
तो सिंहनाद कळवी स्वर्गा जय: केंवि न कळविल याला?
इकड हि हृष्ट धृष्टद्युम्नादि व्योम भरिति गजरानीं;
जैसे यूथपतीच्या विजयोत्कर्षैंकरूनि गज रानीं. १३२
व्यूहद्वारीं देती, जिंकाया गुरुसि, वीर तरमुंडी:
न धरिति तिळ हि तनुपतनभय, जेंवि विरक्त धीरतर मुंडी.
जर्‍हि दिव्यभोगयोग्या, स्वर्गीं पावति सुयोध, नव देहा,
तर्‍हिं एकोनदशनमितसोदरमरणें सुयोधन वदे 'हा!' १३४
स्मरलें सुयोधनातें जें जें कांहीं कनिष्ठतात वदे.
राजा! हें फळ तुजला भीम न, ओभेकनिष्ठता तव, दे. १३५
एक पुन्हां, न पृथेला गाय असी, बा! सुरप्रसू नाहीं.
[11]जें झांकिले शर्राहीं आधीं, मग भासुरें प्रसूनाहीं. १३६
[13]मोहे, भीमशरांच्या, सर्वत्र हि विद्धकाय होय, शतें,
तर्‍हि विमुख नव्हे. गातिल न सकळ सुरसिद्ध काय हो! यश तें?
पडलें क्षितिवरि उडुसें भीमशरें कर्णकुंडल, हरी तें.
वृषमुख गमे जलधिच्या, सांपडलें अग्निकुंड, लहरींतें. १३८

१ आणि २ बिभीषणवत–**पंत.** ३ नारायण.–**पंत.** ४ परिशिष्ट पहा. ५. वृक्ष आणि प्रासाद यावाचून. ६. स्वर्ग रिकामा झाला. (सर्व देव युद्ध पहावयास पृथ्वीवर आले) ७ मुसांडी ८. दात बत्तीस आहेत, त्यांत एक उणा म्हणजे एकतीस, इतक्या बधूंच्या मरणामुळे. ९ विदुर १०. लोभावरील अत्यनासक्ति. ११. पृथापुत्र. १२. तेजस्वी–टवटवीत अशा पुष्पांनी. १३. छिन्नदेह. १४. नक्षत्रासारखें.

पाडूनि एक कुंडल, मग दश नाराच हाणिले अलिकीं;
ते शोभले सरोजें, पाजाया स्वमधु, आणिले अलि कीं. १३९
होउनि मुहूर्त मूर्छित कर्ण उठे, तन्मनांत'ही राग.
तो पद्मरागनगसा गमला रक्तार्द्र कठिन हीरांग. १४०
केले रोमांचित सुरनर कर्णें अमितबाणसंधानें.
न गणुनि तें, तत्कार्मुक केलें चि छिन्न सत्यसंधानें. १४१
वृष घे अन्य धनु, म्हणे, 'शवपूर्णा करिल बंधु समुदि रसा.'
क्रोधें वर्षोनि भरूं पाहे भीमास, अंधुस मुदिरसा. १४२
मोटें संकट आलें होतें, परि, म्हणति जों नरपँ, 'टळतें,'
तों जलदपटलसें त्या वातसुतें उडविलें शरपटळ तें. १४३
त्यांचे तूर्ण उघडले, जाणों उग्राहिगर्भपेटारे.
नारद म्हणे, 'भले, हूं! जाळा दर्गदोषदर्भ, पेटा रे!.' १४४
पवनतपनसुत गमले शक्र-प्रह्लाद, राम-रावण वा.
वाटे गगनीं तच्छरसंघर्षज दहन प्रामरां वणवा. १४५
शरपटें असे प्रकटिती कीं, रवि न दिसे न वा पवन वाहे.
एकाहुनि एक अधिक करिति चमत्कार वा! नवनवा हे.
त्यां वृपवृकोदरांवरि दिव्यकुसुमवर्ष लेखे रचिती जी!
मुनि आशी बहु, थोडी श्री, पुत्री हर्पलें खगचिती जी. १४७
यत्न न चाले म्हणुनि, प्रकट करी कर्ण अस्त्रमायेतें;
भीमपराभव इच्छी, चित्तीं पसरूनि वस्त्र मायेतें. १४८
चुरिले वृपविशिखानीं वायुसुताचे धनुष्य-शर-भाते-
जाले मल्लशरभ, जन्हि पाहिले हरि, त्या मनुष्यशरभा त.१४९

१ ललाटीं. २. भंग. ३ हिऱ्याचा पवन ४. असंख्य बाण जोडून. ५. भीम. ६. भानद अशा (?). ७. पृथ्वी ८ कपाम-पंत. ९. मेघासारखा १०. राजे-पंत ११. भाते. १२. उग्र सर्पांनी भरलेले पेटारे. १३. प्रेक्षकांचे-पंत. प्रेक्षकांचा दृष्ट हे च दर्भ. १४. भीम व कर्ण १५ देव. १६. ममता विसरून. १७. भीम हा च कोणी शरभ, त्याला. १८. कर्णाचे बाण.

हय मारुनि, तत्सूत हि मर्मी हाणूनि बाण पांच कसा
उतरे, म्हणुनि म्हणे वृष जाणों त्या, 'जा पळोनि; वांच कसा.'
सूत युधामन्युरथीं चढला सोडूनि पवनतनयातें;
अन्हि होय विरथ विक्षत, होवूं दे धैर्य[1] अवनत न यातें[2]. १५१
भीमें झुगारिली रथशक्ति[3], प्रकटावया ठळक लीला.
अशनी[4] च मानिलें, बहुजननयनाहीं, नभीं झळकलीला. १५२
खंडी तिला, नव्हे तो वृष, नागीला जसा, वश, शिखंडी[5];
कीं रतिपतिच्या[6] इषुला लीलेनें जेंवि देवें शशिखंडी[7]. १५३
तों खड्गचर्म घेउनि युद्धासि त्वत्कुमारकाळ[8] सजे.
ते धन्य पुरुष, धर्मीं नेणति आयास भीति आळस जे. १५४
तोडुनि चर्म, शरगणाकरवीं तो[9] प्रबळबाहु घेरविला.
वाटे तेव्हां जैसा गांठूनि मुखांत राहु घे रविला. १५५
छेदी वृषचापातें, भिरकावुनि परम भीम करवाळा[10];
राया! रविच्या हिं म्हणे ओष्ठांला विजयिभीमकर, 'वाळो[11].'
हास्य करी कर्ण, बहुत शर वर्षे कार्मुक मग नवीनें,'
आक्रमिलें भीमें, विषदृगाहि[12] धराया जसें, गगन, वीनें[13]. १५७
राधेय रथोपस्थीं[14], भीम नभीं देखतां, दडाला जी!
हें तीं च भीति, गरुडापासुनि त्या कालिया जडाला जी. १५८
ध्वज तरु[15], भीम शिखी, वृष मूलबिलनिलीनसर्पसा[16], राया!
वांटे प्रवर्तला तो मारुति घननाददर्प साराया. १५९
कर्णध्वजीं विलोकुनि, बहु आशीर्वृष्टि करिति सुर भीमीं.
सत्पुरुषकथा अद्भुत रसदा; म्हणतों इला चि 'सुरभी[17]' मीं.

---

१. नम्र. २. भीमातें—**पंत.** ३. रथांतून फेकावयाची शक्ति. ४. वीज. ५. मोर. ६. मदनाच्या. ७. चंद्रमौली शंकर. ८. तुझ्या पुत्राचा मृत्यु च असा. ९. कर्ण. १०. खड्गा. ११. शुष्क व्हा. १२. चक्षुर्विष सर्प. १३. गरुडानें. १४. रथाच्या मध्यभागीं. १५. ध्वजरूप वृक्षावर असणारा भीम. हा च मोर. १६. झाडाखालीं बिळामध्ये दडून राहिलेला सर्प च असा कर्ण. १७. कामधेनु.

'वा ! साधु साधु !' वदले, केवळ, तद्भंगकाम जे पर, ते.
बहुधा स्वानुजभागस्मृति वारी, म्हणुनि न वधितां परते. १६१
क्षितिवरि येतां, झांकी शरपटळें कर्ण पुनरपि तयातें.
रवितें हि लोपवी हो ! सुगुणगणें जेंवि सुनर पितयातें. १६२
विरथ विशस्त्र वृकोदर चुकवाया कर्णबाणपात रणीं
विजयहतगजांत शिरे, गगनीं जलदांत जेंवि वा ! तरणी. १६३
अघटित हि करायाचें जें कपिला, जें कळे वराहा, तें
वाटे, जाणे भीम हि, कीं उचली गजकळेवरा हातें ! १६४
त्या गजकळेवरातें कर्ण छेदुनि चहूंकडे विखरी.
वाटे पविप्रहारें केला विध्वस्त वासवें शिखरी. १६५
रोधिति वृषशरपटळें भीमबळा, जेंवि यामुना गांगें.
तरि वा ! अगारिली जीं, विच्छिन्नें काय तीं च नागांगें. १६६
तें चि अगारी, जें ये रथचक्र तुरंगगजकुणप हातां.
रोमांचित होय अरि हि, जो भीमीं सत्ववर गुण पहातां. १६७
तें न कर्णी पावे, पापार्णी जेंवि, भंग, ढकूळ.
वृष मत्तेभ, शर रदन, भीमवपु गमे तयापुढें कूळ. १६८
मग भीम क्रोधभरें चाउनियां दांतें ओठ, मूठ वळी.
चित्तांत म्हणे, 'घालूं मस्तवृषीं आजि काळ मूठ-वळी.' १६९

१ त्याच्या पराभवाची इच्छा करणारे २ कर्ण हा आपल्या भावांचा—अर्जुनाचा—भाग आहे अशी आठवण ३ अर्जुनानें मारिलेल्या हत्तींत ४ मारुतीला ५ आदिवराहाला ६ हत्तीच्या प्रेताला ७ पवन ८ यमुनाजळास ९ गंगाजळें. ('जल' हा शब्द अनेकवचनी वापरण्याचा संस्कृत संप्रदाय आहे. 'गंगाजल यमुनाजलास गांजतें,' या विधानाची सत्यता प्रयागास या उभयनद्यांच्या संगमावर दिसून येते) १० गजशरीरें ११ कर्ण हा मदोन्मत्त हत्ती १२ बाण हाच दांत १३ नदीतीर १४ [कर्णरूपी] माजलेल्या बैलावर १५ मूठ आणि वळी म्हणजे बैलाच्या पाठीवर त्याच्या रक्षणाकरितां खोगिरासारखें घालितात ते. * पंत यमकपूर्तीसाठीं इच्छेनुसार निष्कारण अनुस्वार देतात

तों स्मरला अर्जुनपण, आटोपी म्हणुनि भीम हातीतें.
प्रबळ हि कुपित हि सुपुरुष धर्मातें, द्विरद भी महातातें. १७०
कर्ण हि कुंतीवचनें स्मरलें म्हणवुनि वधी न भावातें.
त्यजिलें सर्वस्व हि, परि न पळ हि सत्या बुधें, नभा वातें. १७१
जवळि भिडोनि कुरुपते! डिवची भीमासि कर्ण कोदंडें.
सद्वाजिस प्रतोदें, कीं केला स्पर्श अहिस तो दंडें. १७२
कृष्ण करिरदासि तस्या, घे त्या चापास भीम हिसकून.
तेणें कर्णासि शिरीं हाणी, न वधी, वधास हि सकून. १७३
वाटे महातरंगें करुनि थडक अर्णवासि अर्णव दे.
साहुनि धनुःप्रहार, स्मित करुनि, वृकोदरासि कर्ण वदेः- १७४
'तूवरका! औदरिका! टाकुनि आलासि कां महानस रे!
खाडा! अणिखांत सरो दुसरा, वीरांत, काम हा, न सरे.
बहुअशनसूदताडनपंडित, तूं रणमखीं न कोविद रे!
भीरु जयश्रीस तसें, कन्येला वर जसे, नको, विदुरे. १७६
मजसीं भिडसी खाडा! सिंहासी जेंवि विप्रताप ससा.
बाळा! तपोवनाश्रित हो तूं रणभीरु, विप्र तापससा. १७७
किंवा हो अर्जुनाश्रित. तो चि तुजें करिल आजि अस्वन.
मूढा!, मृगें शिरावें मृगराजवनीं. त्यजूनि न स्ववन.' १७८
भीम म्हणे, "राधेया! जरि हि असकृत भंगिलें तुला आजि,
निर्लज्जा! तरि म्हणसी, 'मज ठावी, काय तुज मुला! आजी?'
ये रे! भुजयुद्ध करूं. हो जैसा बकहिडिंबकीचकसा.
असतां असु "त्रिदोषी, जेंवि, बडबड त्यजील नीच कसा?"

---

१. हस्ती २ कुवलयापीडनामक गजाच्या दंतास ३ खादाड ४ खादाडा! ५ स्वयंपाकघर ६ अन्य-भलतें काम—**पंत.** ७ जयकाम करणाराचा, वीरांत सफळ होत नाहीं—**पंत.** ८. पाककर्ता—**पंत.** ( पुष्कळ खाणें व आचाऱ्यांना शासन करणें यांत पंडित ). ९ विदुर. १०. अर्जुनाश्रित. ११ प्राणरक्षण १२ वारंवार १३. युद्ध १४. ज्यास त्रिदोष झाला आहे असा.

भीमाचें मत जाणुनि राहे राधेय मूकसा उगला,
कीं भुजयुद्धोत्साहें बहु अकुलज धनमदें तसा फुगला. १८१
तों प्रभु म्हणे, 'सख्या! हूं! कांहीं इकडे हि शर उडीव कसा.
विरथीं वृकोदरीं तो घालितसे वृष, झषीं उडी बकसा.' १८२
प्रेरी अतित्वरेनें प्रभु पार्था, पार्थ ही शरसमूहा;
कर्ण हि सूता, सूत हि अश्वांतें; तें म्हणे कुरुचमू 'हा!' १८३
सात्यकिरथीं वृकोदर चढला, राधासुतापसरणीं हो!
म्हणति, 'यशस्वी' या, कीं, मथितविराधा, सुतापस, 'रणीं हो.'
जो शक्रें हि परांचा नाशाया मद, बलाविला पार्थ,
तो नाराच प्रेषी कर्णावरि, तदबलाविलापार्थ. १८५
त्यातें खंडुनि, गुरुसुत वारी बाधा, जसी अहिमगु रुजा,
विकळ करुनि, पळवी तें मित्र प्रभुचें महामहिम गुरुजा. १८६



# अध्याय तेरांवा.

सात्यकि आला पाहुनि, देव बहु महत्व देत नांवाशीं.
हें किति? यास भुजाधिक, जे वाहति कौशिकेतना, वाजी. १
'पार्था! सख्या! तुझा प्रियशिष्य सखा पातला, पहा यातें.
या कुरुबळवेगांत, तूं, कीं क्षम एक हा, सहायातें. २
शिरतो पारावारीं परि कैंचा वेग बा! असा मकरा?

१ मत्स्यां २ बक्रयंथ्रमेदा द्रष्टव्य.–**पंत.** ३ कण पळाला तेव्हा. ४ नागपाश. आरामाशि 'यशस्वी हो रणीं' असें जसें सुतापस म्हणत होते, तस च आता भक्त हो भीमास म्हणतात–**पंत.** ५ विराधराक्षस मारला ज्यानें त्या, रामास. ६. रुद्रप्रसादानंतर स्वर्गाप्रति–**पंत.** ७ सूर्य–**पंत.** नाहींत ५८ किरण ज्याचे तो. ८. राम. ९ मोठी योग्यता ज्याची अशा. १० अश्वत्थाम्याला. ११. वर्णन करी. १२. कपिध्वज अर्जुनाला. १३. सागरांत.

आजि कळेल चि भावि स्वक्षय, दुर्योधना असामकरा.' ३
श्वेताश्व म्हणे, "प्रभुजी! कांपति चळचळ अरी पहाते ज्या,
तो सात्यकिवरि उठला की हो! भूरिश्रवा महातेजा. ४
जाला युयुधान परिश्रांत, न भूरिश्रवाः समरयांसीं
समबळसाहित्यांसीं गांठि बरीः विषम बा! समर यांसीं ५
सिंधु तरुनि, न बुडो हा, खाउनि या गोष्पदी गटकळोलाः
बा! बहु करीत आले त्वन्नामपदाश्रयें गट कळीला. ६
त्वत्करुणामृतपूरीं सर्व सुखें प्रणतयाद वागावें.
केवळ न सात्यकिमुखा 'अजित', असें म्हणत यादवा गावें."
तों तो कौरव्य म्हणे, 'मृग, होउनि सिंहदृष्टिविषय, मरे.
तसि माधवा! मदग्गितिः की मामकतेज, बाण विष, यम रे! ८
तुज पडुनि कुरुपतिदृग्दुर्गादेवीपुढें चि कापीन
होईल सुप्रसन्नाः की तूं आहेसि बहु निका पीन. ९
करे, जा, वराप्सरांसीं, अर्पुनि सन्मार्गणा शिर, विलास.
लाजो, रडो युधिष्ठिर, जेणें व्यूहांत तूं शिरविलासः १०
निःसंशय धर्मार्जुनकृष्ण समर सोडितील शोकानेः
स्पष्ट निरुत्साह सकळ होइल, हे आयकेल जो कानें.' ११
हांसुनि शैनेय म्हणे, 'कौरव्या! यम हि भय न शिवविल यां.
न करुनि निरायुध रणीं, नेइल न ज्वलननयनशिव विलया.
कोणासि भिवविता? हो! हा यादव अजितदास, कळलें की?
जेव्हां होय भजक, दे भाग्य पिता अजि! सदा सकळ लेंकीं. १२

---

१ सात्यका २ ज्याचा वेग, बळ व साहित्य समसमान आहे अशांशीं ३. शरणागतरूप जलचर प्राणी ४ अन्वय—सात्यकिमुखा यादवा केवळ ('विना-कारण) 'अजित' असें म्हणत न गावें ५. भूरिश्रवा ६ सात्यके' ७. माझें तेज ८ दुर्योधनाच्या दृष्टिरूप दुर्गादेवीपुढें ९. खरोखर चांगला पुष्ट. १० या मला—**पंत.** ११ कृष्णभक्त. १२ भजका पुत्रा पिता भाग्य अर्पितो तसे दासा अजितत्व देव, देवप्रसादें देतसे च मी हि अजित, असा अर्थ—**पंत.**

मज तव गर्जित, शारद्घनगर्जितसें चि, हांसवीतें, हो!
या गर्जनेसि होइल फळ, तरि पय कां न कांसवीतें हो? १४
रे कौरवाधमा! तुज वधिल्यावांचून मीं न परतेन;
होते जे जे झाले शैनेयेषुबकमीन पर, ते, न.' १५
पण तो, तेणें हा बोलुनि बहु तीक्ष्ण वचन, कोपविला.
साहेल कोण हो!? अतिकठिना ही, तीक्ष्णवच्च नको, पविला.
भिडले अत्यावेशें ते सात्यकि-सोमदत्ति बहुत रणीं;
तच्छरनिकरें केला छन्न, तसा, राहुनें न बहु, तरणी. १७
विरथ, निरायुध होउनि शुद्ध नियुद्धीं प्रवर्तले मग ते.
जरि नसते धर्मज्ञ ब्रह्मज्ञ कुलीन, कां न डगमगते? १८
कृष्ण म्हणे, 'श्रांत दिसे सात्यकि, कौरव्य नागविल याला;
पार्था! पत्रिपतिपुढें पावना काय नाग विलयाला? १९
रक्षावा व्यसनी त्वां, माधव आला तुज्या चि कार्याला,
स्वजनपरित्राणाहुनि अन्य व्रत मत नसे चि आर्याला.' २०
अर्जुन म्हणे, 'गमे मज, देतां मत्तेभ यूथपा टकरा;
प्रभुजी! सात्यकिरक्षण संकट मोटें; तुम्हीं च वाट करा.' २१
कृष्णार्जुन वदति असें, तों, त्यांचा, करुनि बाहुसमर, गडी,
विधुसम मृदु होय; तया कौरव्य क्रूर राहुसम रगडी. २२
आपटिला भूपृष्ठीं; केश धरुनि ओढिला; जना गमला
वधिला चि; भूरिदक्षिण तार्क्ष्य, क्षण, वृष्णिवीर नाग मला. २३
ईश्वरवरलाभ जया, तो काळावरि करील सत्तेत,
कीं सोमदत्ति हाणी त्या सात्यकिच्या उरांत लत्तेतें. २४

१. कामवानें दूध कां देऊं नये? २. सात्यकीचे बाणरूप बकांना भान. ३ मेलें, असा अर्थ–पंत. ४ आच्छादित ५ बाहुयुद्धां (कुस्तीत) ६. गरुडापुढें. ७. कळपाच्या पुढाऱ्याला. ८. भूरिश्रवा ९ गैरूट १० यादववीर–सात्यकि. ११. मूळपाठ–सात्यकिवक्षस्थळीं हि.

कृष्ण म्हणे, 'मजपासुनि जें शासन होय कालियाहीतें,
जालें त्वन्नाथवरें यापासुनि, देवि कालि ! याही तें.' २५

पाहे असिनें सात्यकिमस्तक खंडावयासि जों सुकवी,
भ्रमवी कुलालचक्रापरि शिर चिर, खड्गपात तो चुकवी. २६

तों प्रभु म्हणे, 'अरे रे ! श्वेताश्वा ! वीरनायका ! पावें,
बा ! त्वत्समक्ष अरिनें सात्यकिशिर आजि काय कापावें ?'

अर्जुन शलाग्रजातें चिंतुनि चित्तांत मानवे शतदा.
तद्दक्षिणभुज खंडी. 'हा !' म्हणती सर्व मानवेश तदा. २८

केवळ जडली होती जन्हि दृष्टि जयंद्रथीं, तन्हि सुजातें
पार्थें प्रिय सोडविला, तोडुनि त्या भूरिदक्षिणभुजातें. २९

सांगद सखड्ग तो कपिकेतुशरच्छिन्न वीरभुज, गमला
सहसा खगपतिखंडितभोग तदाननविमुक्त भुजग मला. ३०

सोडुनि सात्यकिस म्हणे कौरव, 'रे पांडुपुत्र ! कपिकेतो !
धर्म कृपादिगुरुकथित हा कीं अन्योक्त, जीर्ण न पिके तो ?

यादवसहवासें तूं जालासि तसाचि; कर्म हें, स्वमतें
तुजला नसेल सुचलें; रुचलें बहुधा कुकार्य कृष्णमतें. ३२

अन्यासीं रण करितां, माझा भुज खंडिला कसा सहसा ?
धर्मासि काय कथिसिल, शास्त्रें बुडवूनि गुरुयशांसह सा !'

जें श्रितरक्षणदक्षप्रभुसखनरवीरकर्म, निंदी तें.

१ मरिश्रवा–पंत. (मरिश्रव्याचा शल नावाचा कनिष्ठ बंधु होता). २. प्रशमा करी ३ कुलीन अशा पार्थानें ४ बाहुभूषणासह असा. ५ वीर सात्यकी. ६. गरुडानें फोडला आहे फणा ज्याचा असा भुजग ७. भूरिश्रवा ८ हा कृपादिगुरुकथित धर्म, कीं तो जीर्ण न पिके (फलद्रूप होत नाहीं) [ अतएव ] अन्योक्त? ९. मोठ्या यशासह सहा शास्त्रें. (सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा आणि वेदांत). १०. आश्रितांच्या रक्षणाविषयीं दक्ष जो प्रभु, त्याचा सखा जो अर्जुन, त्याचें शूरकर्म.

जननीतितें भजे, सुरवल्लीतें त्यजुनि जेंवि सिंदीतें. ३४
पार्थ म्हणे, 'कौरव्या ! वृद्धपणीं स्पष्ट बुद्धि मंदावे.
कुलजांहीं जीर्णपुरुष ते, पुण्ययशोर्थ मात्र वंदावे. ३५
भगवन्मतासि, भगवन्मतनिष्ठा मज हि लाविसी बोल;
जो लक्षसुक्षमान्य, श्रितरक्षणधर्म मानिसी फोल ? ३६
माजा साक्षाद्दक्षिणभुज सात्यकि, हा कसा न रक्षावा ?
समरीं सहाय जो जन, तो प्राणांहूनि अधिक लक्षावा. ३७
त्वां आत्मा निंदावा, कीं जो असमर्थ भुज हि राखाया:
योग्य श्रितावनाक्षम, कीं परमासाध्य रुज हिरा खाया. ३८
स्वभुजावन जड ज्याला, श्रितरक्षण करिल काय तो काचा ?
तो धन्य, जया आश्रित उत्संगावरिल काय तोकाचा.' ३९
कौरव्य न दे उत्तर, जाणों पार्थोक्त नायके कांहीं.
त्याचा नरोक्तिहीं मद, सर्पाचा जेंवि, जाय, केकांहीं. ४०
करुनि शरासन, मग तो होय प्रायोपविष्ट, मौन धरी.
योगबळें विधिलोकाप्रति जाया उपनिषद्विचार करी. ४१
कुरुनीं केली कृष्णार्जुननिंदा फार; न कथवे गा ! ती,
ज्यांला देवर्षींचे, कामाद्यरिमीनबक थवे गाती. ४२
लेश विषाद न दे कुरुकृतनिंदांगारवर्ष वीरा यां.
त्या भूरिदक्षिणास हि न कुरुकृत स्तवन हर्षवी, राया ! ४३

१. सामान्य जनाच्या रानाला २ आश्रितांचें रक्षण करण्याविषयीं असमर्थ ३ रोग ४ मांडीवरील लहान मुलाचें शरीर. ५ कवीनें ही आर्या, ह्या स्थळीं प्रथम लिहिलेली पुढील आर्या हरताळून, पोथीच्या समासात लिहिली आहे. थोड्याशा फरफारानें पुढें ४८ व्या स्थळीं ही च आर्या आहे'

ऐसें बहु पार्थ वदे, तें ऐकुनि तो शिरें महितें
जिष्णुकडे वामभुजें उडवी भुज, पक्षिपति जसा अहितें.४०

६. मरणाचा निश्चय करून उपवासी बसलेला ७ कामादि महा शत्रुरूपी मत्स्यांना बक (महारक). ८. कौरवकृत निंदारूप निखाऱ्यांची वृष्टि. ९. अर्जुनास–**पंत.**

पार्थ म्हणे, 'कौरव्या ! जें मद्व्रत लेश ही नसे मळलें,
सर्वांसि विदित असतां, तुज एकास चि कसें नसे कळलें ? ४४
जो, माज्या शरविषयीं असतां, प्रबळ हि, धरील हननाशा,
न शकावा चि कधीं तो शत्रु, कराया मदीयजननाशा. ४५
खड्गें सात्यकिमस्तकखंडन करितां, तुझा भुजच्छेद
हा जरि अधर्म म्हणतां, या कर्में बहुत पावतां खेद: ४६
विरथ विशस्त्र सुभद्रासुत, तुमचें धर्मतोक सामान्य,
केला तुम्हीं तशाचा वध कीं हो ! धर्म तो कसा मान्य ?' ४७
ऐसें जिष्णु वदे, तें ऐकुनि तो स्पर्शला शिरें महितें:
उडवी तयाकडे भुज वामभुजें, पक्षिपति जसा अहितें. ४८
किमपि न वदतां, प्रेमें कृष्णसख म्हणे तया अगाधाला,
"पाहुनि तुला मदात्मा. ऐसा न सुराश्रया अगा, धाला. ४९
धर्मीं भीमीं नकुळीं सहदेवीं प्रीतिरीति परमा जी,
ती चि तुझा ठायीं वा ! आहे: मति, तुज म्हणे न 'पर,' माजी.
तूं माज्या कृष्णाच्या आज्ञेनें पुण्यलोक पाव कसा.
हो सुगतिपात्र शिबिसा तेजस्वी सूर्यचंद्रपावकसा." ५१
प्रभु हि म्हणे, 'कौरव्या ! घे, देतों सुवर, वरदवर, गा ! मी:
साधो ! वैकुंठाप्रति जा हो मत्तुल्य पक्षिवरगामी.' ५२
साधु म्हणति, "हा घनसा दाता सततान्गिहोत्रयाजी: या
निजलोकीं अवलोकुनि चतुरानन हो म्हणेल, 'या जी ! या.'"
इतुक्यांत सासि सात्यकि धांवे, कापावया शिर तयाचें.
ब्रह्मी गुरुप्रसादें, न पुन्हां तापावया शिरतयाचें. ५४

१ बाणाच्या आटाक्यांत २ माझ्या लोकांच्या नाशास ३ त्यानें नमि-लेलें टोंक टेकलें. ४ तुटलेला उजवा हात ५ मेरु-पंत. ६ गरुडावरून जाणारा ७. भूरिश्रव्यास ८ सत्रागसह ९. गुरुप्रसादें ब्रह्मी शिरतयाचें (शिरणाऱ्याचें) तयाचें (भूरिश्रव्याचें) शिर पुन्हा न तापावया, कापावया १० अन्वय

वारी कृष्ण धनंजय भीम, तरि क्रूर तो तयास वधी.
सात्यकिधी त्या वीरीं तैसी, वृत्री जसी च वासवधी. ५५
वारित होते कर्ण-द्रौणि-जयद्रथ-कृपादि हीकांहीं;
परि तो त्यजिता झाला न शलाग्रजवधदुराग्रहा कांही. ५६
जरि सर्व म्हणत होते, 'रे युयुधाना! नको नको, परतें,'
हरिलें चि भूरिदक्षिणशिर, वारण ऐकिलें न कोपरतें. ५७
सात्यकि विश्वमुखें त्या कर्मकळंकें उदंड निंदुनि घे.
संकोचांतुनि बाहिर बहुधा तपासुनी च इंदु निघे. ५८
जो सात्यकि, हतयूथपहरिसा अत्युग्र, पूर्ण उत्साहें
कुरुवीरांसि म्हणे, "विष पीतां, करितां मदीय कुत्सा, हें. ५९
धर्मकथा धार्मिकसे कथितां न विचारितां हि अन्या, 'या
न वधावा, न वधावा,' म्हणतां आपण करूनि अन्याया. ६०
जेव्हां केलें विरथविशस्त्रसुभद्राकुमारवधकर्म,
तेव्हां गेला होता, सोडुनि कोठें तुम्हांसि हा धर्म? ६१
जो मज पाडुनि समरीं, हाणिल माझ्या उरांत लात अरी,
तन्मथन मत्प्रतिज्ञाः ती म्यां केली, वधूनि यासि, खरी. ६२
'जें कर्म अमित्रांला पीडाकर होय, सर्व तें कार्य,'
रामायणांत वदला, म्हणती कवि आद्य ज्यासि तो आर्य." ६३
ऐसें सात्यकि बोले; उत्तर इकडील कुणी हीं न करी.
वाटे, जालें, परिसुनि हरिगर्जित, शक्तिवर्णहीन करी. ६४
खलदुर्जय, बलजलधि, छलरहिताचार, जलदसा दाता,
नलसम शुचि, शलपूर्वज, हलभृदनुजलोक पावला, ताता! ६५

१ सात्यकि. २ क्रोधाधीन असतां. ३ चंद्र (आपण एकटा च कलंकी म्हणून आजवर चंद्र लाजत असे, तो आतां दुसरा कलंकी-पापी सात्यकी साहाय्य मिळाल्यानें संकोचमुक्त झाला, हा भाव). ४ अवश्य कर्तव्य. ५ सिंहगर्जना. ६ शलाचा वडील भाऊ. ७ बलरामाच्या धाकट्या भावाचा कृष्णाचा लोक-विष्णुलोक. ८ हे धृतराष्ट्रा!

शिनिनें स्वयंवरीं जें श्रीवसुदेवार्थ देवकी हरिली,
तें बहुत सोमदत्तें आत्मपरिभवव्यथा मनीं धरिली. ६६
बहु, वीरमंडळीं यश, जिंकुनि त्या युद्धसत्वरा, शिनि घे;
श्रीरुद्रासि शरण तो विजयार्थी, शुद्धसत्वराशि, निघे. ६७
विचकूं न दे चि, इतरां दात्यांपरि, जो दयालु देव, रद,
तो आशुतोष, दर्शन देउनि, 'वद वर,' असें वदे वरद. ६८
तो सोमदत्त नमुनि, स्तवुनि प्रेमें परोपरि, भवातें,
मागे, 'शिनिपुत्राच्या, मत्पुत्र रणीं करो, परिभवातें. ६९
मत्सुतकरें वरावें, वरिलें जें काय हो! यश, शिनिकरें.
नाशे तव प्रसादें ताप न, नाहीं च होय, शशिनिकरें.' ७०
प्रभु 'एवमस्तु' ऐसें बोलुनि, दे प्रार्थिला वर प्रणता.
हें किति? देता, जरि तो, 'बळ काळपराभवार्थ द्या,' म्हणता.
शिनिनें जैसा परिभव केला होता रणीं स्वताताचा.
तैसा चि भूरिदक्षिण करि, ईशवरें, तदंगजाताचा. ७२
यास्तव सात्यकि भंगे; कीं जाया तदरिखेद हर पावे;
हातरि, तयापुढें तो शत्रूंचे सर्व वेद हरपावे! ७३
ब्रह्मद्रव्य, ज्ञातिद्रव्य, गुरुद्रव्य रक्षिति, न हरिती;
ब्रह्मण्य, सत्यवादी, दीनजनीं तातसे दया करिती. ७४
बहु शांत, दांत, दाते, अविकत्थन, धर्मनीतिनिष्ठ तसे,
सत्पुरुष ते चि यादव, ज्यांपाशीं जय सदैव तिष्ठतसे. ७५

१ हा सात्यकीचा पूर्वज. कवीनें हा चरण, येथें प्रथम रचून लिहिलेला पुढील चरण हरताळून, पोथीच्या समासांत लिहिला आहे

**जेव्हां स्वयंवरीं वसुदेवें स्त्रीरत्न देवकी हरिली,**

२. हा भूरिश्रव्याचा पिता. ३. युद्धचपला. ४. [साक्षात्] चंद्रसमूह च, अशा तुझ्या प्रसादानें. ५ असें असो. ६. त्याच्या (शिनीच्या) संततीचा. ७. सात्यकीच्या शत्रूचा मनःसंताप. ८. सात्यकीपुढें. ९. वेद–धनुर्वेदपांडित्य व्यर्थ व्हावें. १०. आत्मस्तुति न करणारे.

अजितपदाश्रित सर्व हि यादव, अजित चि सुरासुरजना कीं;
गाती यांसि, सजुनि बहु मधुररव नवे नवे मुरज[1], नाकीं. ७६
त्यांसीं कैसा लाऊं दिधला त्वां पुत्रवत्सले! दावा?
काय म्हणों? वृषदुर्वहहस्तिभरें[2] केंवि वत्स लादावा? ७७

---

## अध्याय चौदावा.

असि यूपकेतुची[3] गति होय; मग म्हणे सिताश्व, 'देवा! हूं!'
श्रीरुद्रचरणकमळीं शीघ्र जयद्रथशिरोब्ज दे वाहूं. १
थोडा उरला वासर, बा! सरसिजलोचना! तुरग हाकीं,
मारावा चि खळ; अनुपकारज्ञ, खराखुरा उरगे हा कीं. २
बा! केव्हां ही झालें यामागें जें मुधा न दासाचें,
तें आज हि प्रतिज्ञावच हो चि, दयासुधानदा! साचें. ३
तो भक्तवत्सल प्रभु तीं पार्थाची मनांत मात लिही;
रथ चालवी त्वरित; तें पाहुनि लाजे जनांत मातलि हीं. ४
कुरुवीर धांवले बहु, येतां नररथ जयद्रथाजवळ.
कुरुपति कर्णासि म्हणे, "न परमुखीं सिंधुराज हो कवळ. ५
प्रकट करीं बळ, चिंतित होतों बहु दिवस या समरसमया.
सुकवि म्हणोत, 'महाद्भुत, ठावा नाहीं च यासम, रस मया.'
हा पण कीं, अस्तासि न रवि जातां, सिंधुराज मरावा.
अल्पावशिष्ट वासर वेंचे तों मात्र पार्थ वारावा. ७
असतां वृथा प्रतिज्ञा, पावेल श्वेतवाह विलयाला.
ज्वलनीं शिरतां सत्यत्राणा, कवि कोण राहविल याला? ८

१. मृदंग २ मोठ्या बैलाला हि वाहण्यास अशक्य अशा हत्तीएवढ्या ओझ्यानें. ३. भूरिश्रव्याची. ४. कृतघ्न. ५. सर्प. ६. व्यर्थ, खोटें. ७. पार्थाचें तें भाषण–प्रतिज्ञा–केल्याप्रमाणें पक्केपणीं मनांत धरा. ८. रुद्रसारथी. ९. मयासुराला हि.

होतील बंधुशोकें धर्म-पवनपुत्र बुद्धिबळहीन;
जळहीन मीनसे ते चवघे ही वांचतील पळ ही न. ९
पावेल हरि हि, तापापासुनि बहु जेंवि आज्यप[1] दराला,[2]
एवं सुखें चि येइल निष्कंटक सर्व राज्य पदराला. १०
शल्यकृपद्रौणिसहिंत करिशिल तूं स्पष्ट रत्नसानुजया.[3]
सेना[4] तव साहित्या योजिन मी करुनि यत्न, सानुज या." ११
कर्ण म्हणे, "कुरुराजा! मज गमला भीम अहिमकरसा[5] च.
त्याचे सायक नायक उग्रांचे क्रुद्ध अहि मकर साच. १२
अमरांतें ही, मर्म छेदुनि, म्हणतिल, 'करूनि आ, वांका.'
बहु विकळ मी: असावें म्हणुन चि आहें धरूनि आवांका. १३
मज बळ न, चाळवाया निजकरपाद, क्षताकुला,[6] लेश.
भीमा मी, दाखविना विधिसि जसा दक्षता कुलालेश.[7] १४
परि समयीं न चुकावें म्हणुनि, यथाशक्ति करिल संगर हा.
दैवीं जय प्रतिष्ठित आहे, तूं धरुनि धैर्यसंग रहा. १५
मी युद्ध करित असतां सेधव न धनंजयासि गांवेल.[8]
अभिमुख वात वहातां, तरुला व्यापील काय गा! वेल?" १६
ऐसें जों कुरुपतिसीं, उत्साह बळें[9] धरूनि कर्ण वदे,
नर शरजाळें मथि त्यां बहु, गरळें जेंवि ताप अर्णव दे. १७
छेदी पार्थ तडतड द्विरदांचे, कुरुबळीं शिरोनि, कर.[10]
झांकी क्षितिला, विखरुनि वीरधनुर्बाणभुजशिरोनिकर.[11] १८
किंबहुना, बहु शोणितपूरीं योधवळ* वाहवी, राया!
तेव्हां सुरर्षि वदले, 'सद्यश यो[12] धवळवाहवीरा[13]'या.' १९

१ तूप पिणारा २ भयाला ३ मेरुजयाला. ४ त्या सेना इत्यन्वय—**पंत.** ५. मर्यासारखा (तेजस्वी) ६ जखमा झाल्यामुळें व्याकुळ झालेल्या, मला. ७ श्रेष्ठ कुंभार, ८ सापडेल—**पंत.** ९ खोटा च उत्साह धरून १० हत्तींच्या सोंडा ११ वीरांची धनुष्यें, बाण, हात आणि मस्तकें यांचा समुदाय. १२. देवो १३ अर्जुनवीराला * योधबळ

कुरुकटक जलदपटल चि: शिरतां अर्जुनसमीर वितुळे तें;
ने नृप ऋक्षतुळेतें, पावे तो विक्रमी रवितुळेतें. २०
जेंवि क्षम लीलेनें, सर्व परमदा, पिनाक, साराया;
नरचाप तसा चि परां, उग्र परम, दापिना कसा राया!? २१
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रौणि शल्य हे मानी
पार्थी बहु शस्त्रांनीं वर्षति, पात्रीं जसे चि हेमानीं. २२
विजयासि बाण हाणिति ते सर्व हि एकदा चि कडकडुनीं:
गमलें अमृतरसातें, केली जिंकावया निकड कडुनीं. २३
करितां, प्रसन्न व्हाया जो, सादर नारदादि भक्त पंसे.
त्या प्रभुच्या ही मर्मी हाणिति शर, दशमुखादि रक्तपसे. २४
परशरशतें त्यजि न धृति विजय, सुयति जेंवि अंतरायशतें.
रामयशासीं तुळितां, न धरी तिळमात्र अंतर, यश तें. २५
दुर्योधन दुःशासन शल्य कृप द्रौणि भंगतां, क्रुद्ध
कर्ण पुढें होय, करी अत्यद्भुत शक्रसूनुसीं युद्ध. २६
सात्यकिचे, भीमाचे, पार्थुनि वित्रास, 'हाय!' होत, रणीं
म्हणती, 'वाटे, झाला प्रियसुतमित्रा सहाय हा तरणी.' २७
पार्थ न साहे जे: वृष कृष्णा, क्षत करूनि, होय अधिक रणीं,
वेदांती परविरचित दूषणपांडित्य जेंवि अधिकरणीं. २८
शरजाळासह सहसा पाडी तोडूनि पार्थ तो धनुतें.
तो सज्य दुजें केलें निमिषार्धे त्या समस्तयोधनुतें. २९
कर्णे शरवृष्टि पुन्हीं केली: तिस विसकटूनि, माराया,

१ नक्षत्राच्या तुलनेला. २ अंतक. ३ शिवचाप. ४ सुपात्रीं. ५ सुवर्णाला. ६ कडकडून. ७ असुरांला. ८ राक्षसांप्रमाणें. ९ विघ्नशतें. १० भेद. ११ प्रियपुत्राच्या (कर्णाच्या) मित्राला (जयद्रथाला). १२ विषयविन्यास, तद्विषयक संशय, पूर्वपक्ष, उत्तरपक्ष व सिद्धांत (निर्णय) या पांच अंगांच्या अनुरोधानें जें एका विषयाचें प्रतिपादन त्यास अधिकरण असें म्हणतात. १३ सर्व योध्यांनीं स्तविलेला जो कर्ण त्यानें

पविसम सायक सोडी, रचितनिर्लिप्तार्थ[1] पार्थ बा! राया! ३०
जों हांसत पार्थ म्हणे, 'अर्पुनियां[2] यास अंग, पावन हो.'
छेदुनि दुर्वार शरीं, द्रौणि करी क्षिप्र अंगपावन[3], हो! ३१
केला पार्थ वृषें, वृष पार्थें, शतदा शरीं दिसेनासा.
साध्वस[4] न धरिति; जाणों साग्रा, दोघांस ही, दिसे नासा[5].३२
तों स्वभटांसि नृप म्हणे, 'वृष विजया न वधितां न परतेल;
साहित्य कराः दीप चि हरि तम, त्या पाहिजे च पर[6] तेल.' ३३
मग नगभित्सुत[7], मारुनि हरि[8]-सारथि, कर्णकीर्तिला मळवी;
त्यातें अश्वत्थामा सत्वर वाहोनि निजरथीं पळवी. ३४
गुरुसुत कृप मद्रप वृषसेन[9] झटति, पार्थशर सहातें[10] रणीं.
इच्छिति सर्व असें कीं, 'अस्तंगत होउ शीघ्र हा तरणी.' ३५
सिंधुपतीच्या, जावूं न च द्यावा पार्थ हा, निकट कांहीं.
तुमच्या, असा चि निश्चय केला, साहोनि हानि, कटकांहीं.३६
बहु वर्षतां परांस न नर मानी, जेंवि न नग मेघांस;
भासे धनंजय धनंजय[11] चि, सकळ शत्रुजन गमे घांस[12]. ३७
गमलें, धांगें करितो रतिरमणक्षयकराक्ष[13] समरा या;
कीं श्रीमद्रामातें वेढुनि झटतात राक्षस मराया. ३८
हयगजभटांसि नरशरअहि द्याया मृत्यु रोडका डसले.
मृगहृदयीं हरिवरसा, कुरुपमनीं फार तो कडाड[14] सले. ३९
गरुडें गांढाचा, अहि, गरुदनिळें[15] जेंवि जलधि उडवूनीं,
बा! गांठिला जयद्रथ तेंवि नरें बहुत सैन्य बुडवूनीं. ४०

१. दव-पंत. साधला आहे देवाचा कार्यभाग जेणे, तो. २. बाणास-पंत. ३ कर्णाचे रक्षण. ४ भय ५ नासाग्रदर्शने, सद्योमरणभयं न भवतीत्यर्थ.-पंत. ६ परतु ७ इंद्रपुत्र अर्जुन ८ घोडे. ९ कर्णपुत्र. १०. सहन करीत. ११ अर्जुन हा अग्निच १२. गवत १३. मदनमारक नेत्र ज्याचे तो शिव. १४ कडकडाट १५. पखांच्या वाऱ्यानें.

कपिवरि एक, हयांवरि वसु[1], हरिवरि तीन, अर्जुनावरि सा,
शर योजी सैंधव विगतायु, शरभहंतुकाम[2] तो हरिसा. ४१
[3]ते छेदुनि पार्थें क्षततनु केला, बाण साठ सोडूनीं.
तत्काळ पाडिले शरयुग्में तत्सूतकेतु तोडूनीं. ४२
तों प्रभु म्हणे, "सख्या! हा व्याघ्रीच्या जोंवि सार्थ थानीचा.
वधिसिल कसा, न करितां भग्न रणीं प्रथम सा रथां, नीचा?
तुज थोड्या तरि व्हाया जिंकाया सा रथांसि सा घटिका;
थोडा उरला वासर. सन्मान्या! पण तुजा न हो लटिका. ४४
सैंधव, आजि कसा तरि तुजकरवीं, पाहिजे चि मारविला.
यास्तव मी, योगें तम निर्मुनियां, झाकितों चि या रविला. ४५
वाटेल; सैंधवासह सर्वांस हि, 'सूर्य सत्य मावळला.
चुकला, मुकला अर्जुन; भलते शोकज्वरांत चावळला.' ४६
चुकलें मरण म्हणुनि, बहु हर्षेल, न आपणासि रक्षील.'
हांसेल, म्हणेल, 'भलें झालें, पार्थासि वह्नि भक्षील.' ४७
त्या रंध्रींच अधमशिर उडवीं, शंका धरूं नको कांहीं,
करितां हि शोक, विरहज्वरभय चित्तीं धरून, कोकांहीं." ४८
पार्थ 'अवश्य' म्हणे. प्रभु झांकी, निर्मुनि महातमा, रवितें.
अरिस, नरकुंजरीं हरितेज चि होउनि महान, मारवितें. ४९
करुनि तमें तरणीतें, पुरवाया श्रितमनोरथा, पिहितें,

१ ८–पंत. (हा ८ चा आकडा मूळांत 'वसु' या पदापुढें चुकलेला आहे). २ शरभाला मारण्याची इच्छा करणारा ३ जयद्रथशर–पंत. ४ सधव–पंत. ५ तीन बाणांनीं ६ व्याघ्रिणीच्या स्तनातील दुध ७ दुर्योधनादि महा रथ्यांना ८. सूधवाम–पंत. ९. योगबळानें. १० सर्वाला. ११ चक्रवाकपक्ष्यांनीं (मी योगमायेनें अंधकार पाडल्यावर, सूर्यास्त झाला असें वाटून, विरहज्वरभयानें चक्रवाकपक्षी दुःख करूं लागतील, पण खरोखरी च सूर्यास्त झाला अशी भलती च शंका तूं मनांत आणूं नको). १२. अर्जुनरूप गजावर. १३. आच्छादित–पंत.

यद्यपि दुर्घट होतें, प्रभु लीलेनें करी तथापि हित. ५०
बहु जोडिलें सुयशधन, ऐसा हा भरुनि हाट कपटाचा,
महिमा सहस्रवदना हि न वदवे, दिव्यहाटकपटाचा. ५१
तरणि न दिसतां, लावी सकळ कटक, तो हि, दृष्टि गगनीं च.
त्या आपणाहुनि बहुत, हर्षभरें, होय मेरुनग, नीच. ५२
देव म्हणे, 'सिततुरगा! देखतसे सिंधुपाल तो खांत.
तन्मस्तक खंडुनि, मज, बा! लक्ष्मणसा चि, घाल तोखांत.'
ग्रामस्मरहरवर नर, खरतर शरवृष्टि करुनि, कुरुसैन्य
मारी, सुदृर सारी चापबळें, अचळकुळ जसें वन्य. ५४
आनाभि बुडति चक्रें ऐसें क्षितिवरि पळांत पळ सांचे;
वाटे खरें विखरिलें रणरंगीं पुष्पराशि पळसांचे. ५५
शौरिसख करी सहसा द्रौणि कृपाचार्य गाढ विद्ध रणीं;
बहु कांपवी पतद्रजवृंदभरें पार्थ गाढवित धरणी. ५६
वृषवृषसेनधनुष्यें खंडी, भ्रमवी सुयोधनमनातें,
मद्रपसूतासि वधी; करिति भयें बहु सुयोध नमनातें. ५७
शरवर्षे रथरक्षक सकळ, विकळ करुनि, पळविले, वधिले;
कार्यार्थ सुचों न दिलें त्या वध्यजयद्रथा मनांमधिलें. ५८
मग घे शर, जो होता अर्चित, दुःसह अरीस, भात्यांत,
वज्रास्त्रें मंत्रुनि, बहु आणी पहिल्यापरीस भा त्यांत. ५९
देव म्हणे, "ऐक, असी जाली, हा जन्मतां, नभोवाणीः-
'हें सुतरत्न निजकुळा वृद्धिप्रद, जेंवि वारिजा पाणी. ६०

१ बाजार २ दिव्य सुवणासारखें पिवळे वस्त्र ज्याचें त्या श्रीकृष्णाचा. ३ त्या जयद्रथाला ४ आकाशात ५ रामावतारी इंद्रजिताचा वध करून लक्ष्मणानें मला आनंदात लोटलें त्याप्रमाणे. ६. पवतसमुदाय. ७ वेनराजाचा पुत्र पृथुराजा (यानें शिवप्रसादानें पवत खणून टाकून पृथ्वी सम केली, या कथेकडे येथे कवीचें लक्ष्य आहे) ८. कण्यापर्यंत ९ मांस १०. दूट. ११. पतन पावणाऱ्या गजसमुहाच्या भारानें. १२. महाशस्त्रांनीं. १३. पूजित. १४. तेज.

होईल शूर मानी, बहु संपत्ति प्रसिद्धि जोडील;
परि समरांत अलक्षित अरि याच्या मस्तकासि तोडील.’ ६१
सुतशोक जसा, न तसा दुःसह संताप, भो सखे! द्व दे,
याचा पिता बृहद्रथ, ऐसें, होवूनि तो सखेद, वदेः- ६२
‘क्षितिवरि जयद्रथाचें पाडिल मस्तकसरोज जो जन, हो!
शतधा त्याचें हि फुटो मस्तक, तो श्वापदांसि भोजन हो.’ ६३
जपतो, तपतो तप तो, कीं निजवाचा कधी न हो वंध्या.
संप्रति समंतपंचकदेशाबाहेर करितसे संध्या. ६४
याचें मस्तक याच्या जबकोत्संगीं हळू च पाडावें;
कंदुकसें गगनपथीं वरिचेवरि शरकरें चि ताडावें.” ६५
अर्जुन म्हणे, ‘बहु बरें.’ गांडीवगुणीं सुबाण तो जोडी,
सोडी सणणणणणणण, वध्यजयद्रथशिरोंबुरुह तोडी. ६६
नेलें करें कमळसें, शरनिकरें सांवरूनियां शिर तें,
अंकीं च उतरिलें, वा! हित चि अहित, दैव जधवां फिरतें. ६७
बसोनि करित होता जप, तुमच्या स्वस्थचित्त तो व्याही.
प्रभुयश किति वर्णिल कवि? करु आर्या लक्षकोटि, वोव्याही.
अंकीं काय गुरु असें म्हणुनि पहावें, परंतु मन भुललें;
उठतां जप करुनि, पडे क्षितिवरि सुतशीर्षः तोच्छिर हि उललें.
प्रभुनें यापरि तुमचा जांवाई आणि खपविला व्याही.
भगवत्क्षोभें नवकुश शमविल गरुडा हि; न पवि लावेया ही.
ब्रह्मादि सर्व भूतें, तें पाहुनि, अतुळविस्मयाब्धींत.
करिती बहु नर हरिनुति, तद्ध्यान चि भक्त दृढ मनीं धरिती.
अक्षौहिणी खपविल्या या युद्धीं श्वेतवाहनें आठ,

१ अर्वाचिन. २. हे मित्रा अर्जुना ३ कुरुक्षेत्रासमीपचा एक तीर्थप्रदेश ४ बापाचे मांडीवर ५ चेंडूमारखें ६ जट ७ विदीर्ण झालें, शतधा फुटलें. (गीति ६३ वी पहावी) ८. कोमल दर्भ ९. वज्र १० लावायेक्याम

कार्मुकवेद, हरिहरस्तवराज हि रा[1]जया ! जयां पाठ. ७२
मग जगदीश सुहृत्तम पुरुषोत्तम त्या तमासि आटोपी.
हा टोपी घालिल[2] जलनिधिस हि; मशका म्हणेल, 'आटो, पी.'
दिनमणि दिसतां देवक्यात्मजमाया[3] असें तयां उमजे.
कपटें जिंकोनि, करित होते वृद्धांसमक्ष ही धुम[4] जे. ७४
केलें तव तनयानीं, पाहुनि सैंधव परासु, रोदन हो !
भ्रमद कविमतें स्नेह चि; ऐसा सेवनपरा सुरोद[6] न हो. ७५
श्रीकृष्णें प्रथम, मग श्वेताश्वें, शंखराज वाजविला.
भीमाच्या सिंहरवें कल्पांतपयोदनाद[7] लाजविला. ७६
त्या नादें धर्माला, विजयें अरि मर्दिला, असें कळलें;
टळलें दुस्तर संकट, कृष्णपदध्यान जयफळें फळलें. ७७
हीनूनि जयोन्मत्त, द्रोणासि न वचकती च, भट कांहीं:
हर्षें बहुविध वाद्यें वाजविलीं धर्मराजकटकांहीं. ७८
'गुरु मारावा चि' म्हणति पांचाळप्रमुख[8] सकळ वीरमणी:
उत्साहशक्ति योधा श्रम, भर्त्यां जेंवि, न कळवी, रमणी. ७९
अस्तातें रवि जातां, जगदेकयथार्थसंध[9] सितवाजी
निजविजयश्रीस हरी, सांपडली पथ चुकोनि कितवा जी. ८०

## अध्याय पंधरावा.

बहु शर तर्पति कृप, गुरुसुत, घालुनि शक्रसूनुला मध्यें,
ज्याच्या धनुला झालीं, दैत्यांचीं उद्धतें बळें, वध्यें. १
चित्तीं पार्थ म्हणे, 'कृप गुरु, गुरुसुत हा हि गुरु असामान्य;
निष्ठुर कैसें व्हावें ? द्रोणेतर जन, नसे असा मान्य.' २

१. हे धृतराष्ट्रा! २. ज्या अर्जुनाला ३. कृष्णमाया ४. स्वैरव्यवहार—**पंत.** ५. कौरव. ६. मद्यसागर. ७. प्रलयकालच्या मेघाचा गडगडाट. ८. द्रुपदादि ९. जगतामधील एक च सत्यप्रतिज्ञ असा अर्जुन.

शर मंदवेग, तो गुरुवत्सळ, रक्षावया स्वयश, हाणी.
परि तन्मति गडबडली, स्त्री बहु कार्यांत जेंवि न शहाणी. ३
त्या विप्रयुगीं न पडति, जन्हि पार्थप्रहित मंद रोप, रितें;
गावाविति, अमृतरुचिशुचि गुणवश यश, मेरुमंदरोपरि, तें. ४
पार्थशरातें कृप कृपणसम, समयज्ञ हि, करून आ, रडला;
पडला मूर्छित; जैसा बहु, बाळ व्याळदष्ट, आरडला. ५
वाटेल तत्तनुपुढें, बहु कांटे काय काढिले पेणसें!
आलें कृपासि, पन्नगपाशीं रघुनायका ढिलेपणसें. ६
मेला चि असें मानुनि, सूतें रथ तूर्ण काढिला मागें.
केला गुरुशोक प्रभुपाशीं त्या अर्जुनें महाभागें. ७
'गुरु, माय, बाप, ईश्वरः तरले गुरुची च धरुनि नर कास.
मजसम मीं च कृतघ्न; प्रभुजी! पावेन मरुनि नरकास. ८
स्मरतां, कृपगुरु, घालिल मज बहु, अभिमन्युपरिस, शोकांत.
ज्याला गुरुचा वध मत, अधमतम असा नसेल लोकांत.' ९
करितां विलाप, दाटे, वाष्पाच्या, पार्थकंठ, वेगानें:
कीं गुरुशोकीं सुजना स्वर्गीं हि न काळ कंठवे गानें. १०
तों चि जयद्रथमथनव्यथितहृदय कर्ण धांवला कोपें.
सात्यकि होय पुढें हो! पार्थ म्हणे, "यास हें नव्हे सोपें. ११
रथ चालिव, वालिवधाद्यतुलायशा! यादवास राखावें.
सुरभी म्हणेल काय, 'व्याघ्रें स्वसमक्ष वासरा खावें?'" १२
देव म्हणे, 'वत्स गमे प्रेमें, परि हा निका महर्षभ!

१ कृप-**पंत.** कृपचित्त. २ कृप व अश्वत्थामा या उभयतांवर अर्जुनानें सोडलेले बाण जरी सौम्य होते तरी त्यांनी त्यांना घायाळ केलें च. ३. चंद्र-**पंत.** चंद्रकांतीसारखें शुभ्र ४ धनुष्याच्या दोरीच्या अधीन (पक्षीं) अर्जुनाच्या गुणांना वश असें (तें बाण) ५ फणमानें ६ रामाला (इंद्रजितयुद्धप्रसंगीं). ७ [रामावतारीं] वालिवधादि अनुपम यश मिळविलेल्या कृष्णा! ८. सात्यकीस. ९. सात्यकी १०. [मोठा] वृषभ-**पंत.**

समयीं गुरुभक्तमनीं दुर्धर अरिहानिकाम हर्ष भरे[1]. १३
एक चि सात्यकि आहे कर्णाच्या परिभवास पर्याप्त[2];
करिती साहित्य तुजे चक्रत्राते हि वीरवर्याप्त[3]. १४
घालिन गांठि, करूं दे आधीं हरिदत्तशक्तिचा वेंच.
व्याघ्री, नागी, कृत्या, तसि अरिला शक्रशक्ति चावे च. १५
शक्ति दिली, देवूं दे; न सुतवधें अयश अर्जु नाकेश[6].
सर्वस्व बुडो, न तुजा एक हि हो वक्र, अर्जुना ! केश. १६
स्वच्छगुणा ! तूं ठावुक अससी सुरनायका पुरारीस.
प्राकृत जाणेल कसा? बा! जाणे काय कापुरा रीस?. १७
घालिन गांठि वृषासीं, त्याच्या येतां चि समय मरणाचा.
मग चिंता कां? घेइल पथकर जरि दाससम यम रणाचा.' १८
सात्यकिला विरथ करिल यूपध्वज, हें भविष्य जाणोनि,
प्रभु, कल्पविला दे निजरथ, दूरिल दरस्वें चि आणोनीं. १९
त्या अजितरथीं सात्यकि, शक्ररथीं रामभद्रसा, वेधे;
कर्णा भवते बहु शत, अहिभवतें जेंवि गरुड, कावे धे. २०
रक्तें न्हाले, झाले योग्य सखे पुष्पिता पलाशनगा.
गंधर्व म्हणति, 'एका राघव, एका म्हणा 'पलाशन,' गा! २१
वृषसात्यकिरणसमयीं प्रेक्षकनिकरीं न देहभान वसे.
दानवसेनापतिसे गमले कीं देवसे, न मानवसे. २२
विरथ करूनि पळों दे वृष, न करी नैकबाणविद्धांत.
मुख्य धनुर्धर कृष्णार्जुन सात्यकि, हा चि होय सिद्धांत. २३

---

१. भरतो, वाढवितो २. पुरेसा. ३. वीरश्रेष्ठ असे सुहृत. ४. इंद्राने दिलेल्या शक्तीचा. ५. व्यय. ६ सपाद–**पंत.** ७. शकरास ८. आस्वल. ९. पत्कर. १०. कर्ण. ११. तयार करविलेला आपला रथ. १२. शंखध्वनीने. १३. कृष्णाच्या रथावर. १४. स्थिरत्या (?). १५ फुललेल्या पळसाच्या वृक्षास. १६. राक्षस–रावण. १७. बहुशरविद्धस्यापि नान्तमकरोदिति–**पंत.** सात्यकीने कर्णाला अनेक बाणानी विद्ध केले, तथापि त्याचा अंत केला नाहीं.

भीमार्जुनभाग म्हणुनि तवसुतराधेय मारिले नाहीं.
लीलेनें चि निवटिता, दुर्घट नव्हतें च माधवा कांहीं. २४
भूपरथीं जावुनि वृष सोडी अत्युष्ण दीर्घ सुसकारे;
हळु चि म्हणे, 'हा दैवा! कां केलों, तपनसुत हि फुसका रे!?'
कृतवर्मा, गुरुनंदन, इतर महारथ हि भांडले सर्व.
परि एकें चि धनुष्यें त्यांचा सारा हि सारिला गर्व. २६
सात्यकि कुरुकटकांचा, पवन घनांचा तसा, करि भर्णाण.
पुसतां, कसे सुत असे? आपण चि 'कृपा' पुढें तरि म्हणा 'णः'
तों दारुकानुजानें सिद्ध करुनि आणिला सुरथ, राज्या!
प्रभुनें तो केला त्या, योग्य, न शक्रादि हीं सुर थरा ज्या. २८
माधव चढे नवरथीं, आज्ञा दे दारुकास मातलिला.
जेंवि श्रीराम, मथुनि खचरचमूला उदंड मातलिला. २९
सात्यक्यवनयशाचा पांघुरवी देव दारुका सेला.
प्रभु केंवि न? तारी जड ही लाउनि देवदारु कासेला. ३०
तैसा चि कर्ण हि बसे विधिवत्कल्पितरथीं विमानसमीं.
'जाले विमनस्क सकळ तत्वज्ञ हि, जाहलों विमानस मी. ३१
'भीमें वधिले दुर्मुखमुख तव सुत एकतीस म्यां कथिले.
भगदत्तभीष्ममुख बहुशत विजयें, सात्वतें, रणीं मथिले. ३२
या बहुलक्षजनाला, बा! हेतु तुझा चि अपनय, मरीया.
बहु काम, कोप, लोभ चि खर; न प्रळयाग्नि, तपन, यम, राया!

---

१. तुझा पुत्र दुर्योधन आणि कर्ण २. सात्यकीला. ३. दुर्बल ४ नाश. ५ कृपण दीन जालें—**पंत.** (या पंताच्या टीपेनें हि या आर्येचा अर्थ लागला नाहीं). ६ कृष्णसारथी जो दारुक त्याच्या बंधनें ७ सात्यकी—**पंत.** ८. ठिकाणीं, अढळी, पदीं—**पंत.** ९. राक्षससैन्याला. १०. अत्यन्त उन्मत्त झालेलीला. ११. सात्यकीच्या रक्षणाचे यशाचा १२. काष्ठविशेष. १३. विमानसदृश अशा यथाशास्त्र तयार केलेल्या रथीं. १४ संजय १५. दुर्मुखादि. १६. सात्यकीनें १७. प्रखर, उग्र.

अनुजाला भीम म्हणे, " विरथ करुनि गांजिलें मला कर्णे.
तें म्यां चि साहिलें बा! आइकता न च दुजा भला कर्णे. ३४
'तूवरका![1]' 'औदरिका![2]' 'मूढा!' 'संग्रामकातरा![3]' 'बाळा!'
ऐसें पुनःपुन्हां मज वृष वदला, अर्जुना! असत्काळा![4] ३५
'ऐसें म्हणेल त्यातें मारावें तत्क्षणीं, न सोसावें,'
हें त्वां चि मत्प्रतिज्ञावच, दीनापत्यसें[5] चि, पोसावें. ३६
जसि आपुली, तसि बुडों दे बुध पंकांत गाय न, पराची;
गानपटु सखा समयीं सांवरितो तान गायनपराची." ३७
नेला वृषाकडे रथ, कथितां अवमान हा निज गदीशें[6];
सोसावी स्वजनाची कैसी नव मानहानि जगदीशें? ३८
पार्थ म्हणे, 'ऐक वृषा! जय अपजय वासवीं हि आढळला;
नहुषमहाराज मदें इंद्रपदाहुनि न काय गा! ढळला? ३९
आतां च कीं न वधितां सात्यकिनें सोडिलासि, हा नीच्या![7]
सत्वर पावसिल फळा, केल्या सत्कुलजमानहानीच्या. ४०
बहुदा विरथ करुनि तुज, भीम न कांहीं च बोलिला खोटें;
जो टेंक धरुनि भिडला, ज्याचें यश वीरमंडळीं मोटें. ४१
करुनि यदृच्छेनें त्या आर्यातें एकदा विरथ, अकुळा!
उपहासिलें कसें त्वां? हांसावें काय बब्बुळें[8] बकुळा? ४२
वधिला सौभद्र तुम्हीं बहुताहीं मत्तकरिसमानाहीं[9].
कर्में सुदुर्जरें खरगररसपानाहिपरिस[10] माना हीं. ४३
केले जेणें वैरी, व्याघ्रें विपिनीं विशाळ वृषसे, नें[11];
तो अभिमन्यु जसा प्रिय मज, तुज जो प्रिय तसा चि वृषसेन.
कथितों यथार्थ, करितों शपथ, स्पर्शोनि आयुधा, त्यातें[12]

१. खादाड! २. खादाडा! ३. संग्रामभीरो! ४. दुष्टनाशका! ५. निराश्रित मुलासारखें. ६. गदाधरांमध्यें श्रेष्ठ अशा भीमानें. ७. हीनकुलोत्पन्ना! ८. बाभळीनें. ९. मदोन्मत्त हत्तीसारख्या अशा तुम्हीं. १०. प्रखरविषरसाच्या पानापेक्षां पचण्यास अत्यंत कठिण. ११. नाहींतसे केले. १२. वृषसेनातें.

वधिन, भुजपुढें, दुर्मिळ यश देतां, नव हि आयु, धात्यातें.[1]
आधीं सुतशोकास्य[2] प्रेक्षीं, मग दूर काय कालास्य?
करितील शिवा,[3] चुंबुनि तुजभवत्या, जेंवि बायका, लास्य.[4] ४६
उरकुनि घे कार्य, उचित ठेवाया न वृषसेनजनका, जें.
आमरण कष्ट न सुटति; बहु परवश न वृषसे[5] न जन कांजें.'
प्रकटे महाप्रतिज्ञा सर्वत्र हि कुरुबळांत झटकरि ती.
भट करिती 'हा! हा!' कीं न करिल तिस देवदैत्यकटक रिती.
रवि मावळला; वाटे गेला देशांतरीं धरुनि शोक!
कोक[6] वरडति; न रडतिल तेजस्व्याश्रयलयीं[7] कवण लोक? ४९
जें सुख सुखमूर्ति[8] वरी, देउनि विजयासि सुपरिरंभातें,[9]
न च वरिती शतवत्सर, शुक वश जाल्या हि उपरि, रंभा तें.
भगवान् म्हणे, 'प्रिय सख्या! जीतें तरलासि तूं, प्रतिज्ञा ती
इतराला न तरवती; झाले गतगर्व संप्रति ज्ञाती. ५१
मोटीं मोटीं हि बळें लवतिल तुजला न कां बळेशाला?
जन्हि लांब रुंद बळकट, होतिल सम काय कांबळे शाला? ५२
मज तों तसा दिसेना, जो एकाकी धसेल या कटकीं;
त्वत्तुल्य, त्वदधिक ही बहु मेळविले सुयोधनें भट कीं. ५३
हें कर्म कराया जरि शक्राचें सैन्य एक कट करितें,
होतें, भिडतां यांसीं, सर्पांसीं जेंवि भेककटक,[10] रितें. ५४
हें भुजयुग कुतुक करिल आणिक हि, पावेल कर्ण विलयाला।
भाट करुनि मज; याचा जय, याहुनि अधिक वर्णविल याला.[11]'

१. ब्रह्मयातें (ब्रह्मदेव जर दुर्मिळ यश आणि नवीन आयुष्य त्या वृषसेनाला देईल तर त्याली हि मारीन, हा भाव). २. पुत्राचें शोकयुक्त मुख. ३. कोल्ह्या. ४. नृत्य. ५. लोक कामानिमित्त वृषभासारखे अत्यंत पराधीन होत नाहींत असें नाहीं. ६. चक्रवाकपक्षी. ७. तेजस्वीच्या आश्रयाचा अंत झाला असतां. ८. सुखाची केवळ मूर्ति च असा श्रीकृष्ण. ९. उत्कृष्ट आलिंगनातें. १०. मंडूकसैन्य. ११. अर्जुनाला.

पार्थ म्हणे, ' न विसरवे पळ तव पद[१]नीरजाप्रति, ज्ञात्या !
देवा ! सफळा करितें[२] हें, करिती धीर ज्या प्रतिज्ञा, त्या. ५६
केला धन्य त्रिजगीं तुझिया, हा वासवि, प्रसादानें.
संतानें, जन्मसु[३]दुर्गतिचा आवास, विप्रसा, दानें. ५७
तूं ज्यांचा नाथ तयां जरि जय, तरि काय नवल ? वणव्याला
प्याला, त्या अरिजीवन किति ? सागरें[४] काय नव लवण व्याला ?
जे त्वच्चरणाश्रित ते गरुड चि, शमनकरवाल[५] कालाहीं.
शिर दूर, वळें त्यांच्या, लाविल यम न कर, वाळकाला[६] हीं.
जाले कृतार्थ, तरले, अगणित या पादपल्लवध्यानें.
व्यर्थ फुगविले, न गणुनि तुज जगदीशासि, गल्ल, वध्यानें.[८] ६०
शतकोटि मेळविल जरि शतकोटिकर[९] हि सुयोध नय, धरणी
वरिल चि तव प्रसादें धर्मा; होइल सुयोधनवध रणी. ६१
जय हि, प्रभाव हि तुझा; प्रेष्यां[१०] दीनांस मानदा ! मानें
गौरविसि. घेतलें त्वां बांधुनि दीनासमान दामानें.[११]' ६२
प्रभु हास्य करुनि, हरुनि श्रिततापा, परतवी रथा, राया !
न शकति जयापुढें खळसंगति पापरत वीर थाराया. ६३
समराजिरांत हरि; करि; नरवर, बहु लक्ष मारिले होते
जेणें, त्यासि मुकुंदें दाखविले सर्व तारिले, हो ! ते. ६४
स्वकटकसमीप जाउनि जगदीशें पांचजन्य वाजविला.
आज विलापें राया ! त्वां शोक, तसा चि हर्ष माजविला. ६५

१. पदकमल २. कल्पवृक्षाने. ३ जन्मदरिद्र—**पंत.** ४. यथा सागरात्सहज मव-रसाधिकरस लवण तथा त्वत्तोपि भक्तरक्षणलक्षणचरित साहजिकम—**पंत.** (ज्याप्रमाणे समुद्रातून सर्व रसापेक्षा श्रेष्ठ असे मीठ साहजिक उत्पन्न होते, त्याप्रमाणे तुझ्यापासून भक्ताचे रक्षणस्वरूप चरित्र साहजिक उत्पन्न होते). ५. यमाचा खड्ग हा च कृष्णसर्प. ६. शिर तो बहु दुर्लभ, परतु—**पंत.** ७. काकडीला. ८. वधार्ह दुर्योधनाने. ९. इंद्र—**पंत.** १०. सेवकास. ११. दाव्याने.

धर्म धणी, ब्रह्माच्या बहु घे, घालुनि उडी, सुखेंवेची,[1]
यज्ज्ञानार्थ[2] महाजन सर्वस्वासह कुडी[3] सुखें वेची. ६६
धर्में दोघे कृष्ण प्रेमें आलिंगिले, जसे तातें;[4]
तत्स्पर्श तन्मनातें बहु सुखवी, जेंवि मेघ सेतातें. ६७
आनंदाश्रुपरिप्लुत होय प्रभुचें, पुसी, वदन, पदरें.
जेणें रमाधराहुनि शबरीची मानिलीं मधुर बदरें. ६८
मग तें पुसिलें, ज्यातें देखुनि शतदा वदे अचळकन्या,[5]
'पाहे हें पुत्रमुख स्त्री जी, सर्व स्त्रियांत ती धन्या.' ६९
प्रभुसि म्हणे, "वधिला कीं अधम, नराकार पाप रासभ जो?.
व्हाया कृतघ्न, विसरुनि तुज न स्वप्नीं हि हा[6] परास भजो. ७०
एणें चि सिद्धि कळली: जाणति एकें हि, वायका, शीतें.
सद्यः परमार्थद हे पाय न लाजविति काय काशीतें? ७१
बा! बाळमीन येतां, 'छायेंत सुखें' म्हणेल बक 'राहो,'
देइल पाय हरिशिरीं, होतां तुमचा प्रसादें, बकरा, हो! ७२
स्वपदीं पांडव बसतिल, करुनि अरीतें परासु, वासवसे.
शिशुपशुहित हा लोकीं पदपद्माचा बरा सुवास वसे. ७३
शक्र हि जयद्रथमतें,[7] आजि असा पण करूनि, न खपविता.
वरिली तव दृक्पातें, वरिते जाले[8] हे हि नख, पविता."[9] ७४
कृष्ण म्हणे, 'धर्मा! तूं सिद्ध कपिलसा चि, करुनि सुतपातें.
क्षोभविलासि खळानीं स्वांतार्थें[10] प्राणतुल्यसुतपातें.[11] ७५
तुझिया, वधिला; सैंधव बहु अपराधी म्हणोन, कोपानें.
सत्पुरुषलंघनें मीं कां गरळाचीं, म्हणों नको, पानें? ७६
त्वत्क्षोभा साहेसें कैंचें सामर्थ्य सैंधवीं अल्पीं?

---

१. उत्तम आलिंगनाची. २. ज्या ब्रह्माच्या ज्ञानार्थ. ३. देह. ४. पार्वता–**पंत.** ५. कुंती–**पंत.** ६ धर्म–**पंत.** ७. जयद्रथमथने–**पंत.** ८. सिक्थें, ओदनपाक–**पंत.** ९. प्लवगजगद्धितकर्ता भगवान–**पंत.** १०. आपल्या नाशार्थ. ११. प्राणासारख्या (आवडत्या) अभिमन्यूच्या वधानें.

[1]कल्पीं रविसा, पडला, इच्छामरण हि नदीज [2]शरतल्पीं. ७७
करिल क्षोभ तुझा, बा धर्मा! उरल्या हि खळजना, [3]भसित.
हें न चुकेल चि, होइल जन्हि शिव [4]घननीळ, [5]जळजनाभ [6]सित.'
तों नमिति भीम सात्यकि; त्या दोघां, जेंवि [7]नर्मदा यादां,
प्रभुँची पदयुगली दे, कीं जैसी माय, [8]शर्म, [9]दायादां. ७९
तातापरि धर्मप्रभु बहु त्यां [10]क्षतविग्रहांसि कुरवाळी;
बोले सत्य, मनोहर, साधु, न अमधुर, जसा न[11]कुरवाळी. ८०
'आले कुरुबळजलधिस्थ यशोमौक्तिक हरूनि, हे मकर.
भुज हो! वेष्टावे, धनरुचिनीं जैसे [12]वदान्य हेमकरें.' ८१
ऐसें प्रेमें गद्गद बोलत, आलिंगिले सुचिर दोघे.
कटे, [13]भुजंग, [14]भोगें वेष्टुनि [15]त्यां चंदनांसि, सुख, [13]तो; घे. ८२
यश भीममाधवांचें वर्णी; घे धर्म भाटपण साचें;
प्रकटी आंग तयाचें तें, कंटक जेंवि दाट पणसाचें. ८३
मुक्त अजगरापासुनि केला कृष्णें चि तो जसा नंद,
धर्म हि, महाधिपासुनि सोडवितां, होय साप्त सानंद. ८४
रडला कुरुराज; गळां अभिमानें शोक घोर पडला हो!
कोण म्हणेल चतुर नर, "मकररणीं विजय घोरपड लाहो?'
'हाय!' म्हणत दुर्योधन जाय द्रोणाकडे, म्हणे, 'गुरुजी!
पार्थे खरी प्रतिज्ञा केली कीं आजि ती तसी [16]गुरु जी. ८६
अक्षौहिणी सितहयें नेल्या कीं सात आठ विलयाला.
हे क्षिति, जो म्या केला हा बहुजनघात, आठविल याला. ८७

१. कल्पकाळच्या. २. बाणशय्येवर. ३. भस्म-पंत. ४. मेघासारखा काळा. ५. कमलनाभ, कृष्ण. ६. श्वेत, पाढरा. ७. धर्म-पंत. ८. सुख. ९. पुत्रास. १०. जखमा झाल्या आहेत शरीरावर ज्याच्या. ११. प्रकृत्या अमधुररव भ्रमर जसा नाही तसा च साधु-पंत.' १२. सुवर्णांनीं युक्त दांत ज्यांचे असे दाते जन. १३. तो धर्मरूप सर्प. १४. देहें. १५. त्या भीम सात्यकिरूप चंदनांसि. १६. मोठी.

सुस्तव[1]भाजन हा जन, दुःसह धिक्कार यास; हा[2] वेना
मारी क्षणांत, कीं उपहासा हिक्कारयां[3] सहावेना. ८८
केला शरतल्पांगीकार बळें काळदुर्जयें भीष्में.
परिभव वरिला त्वां ही, परसेनासिंधुजीवनग्रीष्में[4]. ८९
जरि न करितां उपेक्षा, माजी सर्वस्वहानि कां होती?
साधूंस मता समता; सत्कीर्ति उपेक्षिलीत कां हो! ती? ९०
प्रिय पार्थ; न मीं; देतां परिभव निंदा[5] कशास हा? याला
द्या मरणाज्ञा; अनुचित सुकुलज[6] निंदा कशा[7] सहायाला.' ९१
द्रोण म्हणे, "वागिषुनीं[8] कां मातें पीडितोसि विंधून?
वदलों प्रथम चि, 'अर्जुन दुर्जय; दुस्तर, नव्हे चि सिंधून.' ९२
करुनि निमित्त शिखंडी, भीष्ममहाराज अर्जुनें माथिला.
या कर्में उमजावें, कीं पार्थ अजय्य मज, खरा कथिला. ९३
जें देवदनुजदुर्जय देवव्रतदेव पावला पतन,
कळलें, सर्व बुडालों, न करिल ईश्वर हि आपणा जतन. ९४
संप्रति जाले पविरविसम[9] समरीं पार्थबाण ते फांसे,
ज्यां सेवटवरि हि शकुनिमामा ढाळूनि, खदखदा हांसे. ९५
त्वां कां न ऐकिलें, जें विदुर वदे सूक्त, 'अनय न करा,' तें?
तो च्युत[10] चि, डोळसाऱ्या जो झिडकारील, अनयन, करांतें.
भरतसभेंत[11] सती त्वां आणविली, करुनि हानि रीतीची;
वृद्धांसमक्ष फरफर फेडविलि, दुराग्रहा! निरी तीची. ९७
त्याचें फळ हें. 'केलें न सुटे,' म्हणती सुरर्षिमुख सुकवी.
असतें प्रथम सुविकसित, परि बहु, केला[12] अधर्म मुख सुकवी.
जे नित्य पुत्र धर्मी रत, त्यांचा द्रोह करिल बा[13] कोण?

---

१. उत्तम स्तुतीचें पात्र. २. ह्या धिक्कार. ३. उचकीच्या वेगाला. ४. शत्रुसेनारूप सिंधूदकाला शोषविणाऱ्या ग्रीष्मऋतूप्रमाणे तीक्ष्ण जो तू, त्या त् हि. ५. मूळपाठ—**तिन्दा.** ६. नर हय हि—**पंत.** ७. चाबूक. ८. वाग्बाणानी. ९. वज्र आणि सूर्य यांसारखे. १०. पतित. ११. भरतवंशीयाच्या सभेत. १२. केलेला. १३. बापा.

'ब्राह्मण आपण,' ऐसें बोलोनि दहांत, जो नव्हे द्रोण. ९९
होता अश्वत्थामा, कृप, मद्रप, तूं, तुझा सखा कर्ण,
म्हणसि 'उडविलें पार्थें शिर, वातें जेंवि वाळलें पर्ण.' १००
मानी कीं तूं श्रितवध कथितां आम्हांस, कां न लाजसि रे!
घृतीं च कसी, द्यावा विदुरसदुक्तीस कान, लाज सिरे? १०१
असतां सजीव, सायुध, सन्निध, सोत्साह, शूर, सावध, रे!
राव धरेश्वर बहुशत, केला एकें चि बा! कसा वध रे!? १०२
[1]ज्यापासुनि कनकध्वज रविभीष्माचा न कुरुबळीं [2]झळके,
जळके नगसे झालों आम्हीं अपकीर्तिकज्जळें मळके. १०३
भीष्मामागें न दिसे मज कोण्हीं, जो तरेल उर्वरितें.
हीं [3]गंधर्वपुरेंसीं दिसतीं कटकें, उगीं च [4]उर्वरितें. १०४
[5]कुरुबळकळेवराचा परिपाळक भीष्म तो खरा जीव.
रविदर्शनें चि पावे, तपता हि ग्रीष्म, तोख [6]राजीव. १०५
स्मरतो मज क्षणक्षण धृष्टद्युम्न, स्वमृत्युचा हेतु.
जलधिविलंघनसाधन, कपिकृत हि, न काय जाहला, [7]सेतु?
त्यास हि [8]कंटक हि गमे अतिदुःसह, न करवाळ वीरा ज्या;
जसि वंतळवी, [9]दवशिखा तसि न [10]तरुप्रकर वाळवी, राज्या!
तूं ही व्याकुळ करिसी मज, हृदयीं शब्दबाण हाणोनि.
यास्तव नृपा! प्रतिज्ञा करितों मीं, ऐक सत्य जाणोनि. १०८
मारुनि [11]पांचाळ सकळ, मीं क्रव्यादांसि मांस वाढीन.
करिन खरें स्ववच, कवच हें आंगांतुनि तरी च काढीन. १०९
मज न मत, अरिवधें यश, अश्वत्थामा, न साधुनि करानें.
हित म्हणुनि, जडा हि दिला अश्वत्था मान साधुनिकरानें. ११०
पुत्राला कळवावा त्वां माझा [12]भाव हा निरोपानीं,

१. जेव्हापासून. २. महाशत्रते. ३. ढगावर दिसणारी भ्रांतिमूलक नगरें. ४. उरलेली. ५. कुरुसैन्यरूप शरीराचा. ६. कमळ. ७. मूलपाठ-सूची. ८. कांटक-विशेष. ९. वणव्याच्या ज्वाळा. १०. वृक्षसमूह. ११. द्रुपदादि. १२. अभिप्राय.

कीं सर्व सोमकांची स्पष्ट करावी च हानि रोपानीं. १११
ब्राह्मण बहु मानावे, तुज वारंवार हा चि उपदेश.
कीं ब्रह्मक्षोभें अहि जाला, जो नहुष नाकेसुपदेश. ११२
हा जातों, हरिशील प्रकटुनि, घाया परां शशकशील.
जा तूं हि, कराया जरि पांडुसुतांचा विनाश शकशील." ११३
गेला पांडवसृंजयवीरांचें सर्व तेज हरित रणीं.
द्रोण परबळांत गमे, मृगकुळतिमिरांत जेंवि हरितरणी. ११४

---

# अध्याय सोळावा.

कुरुपति कर्णासि असें, होउनि सैंधववधें सखेद, वदे,
'देतो ताप परिभव, द्विरदा वेढुनि जसा, सखे! दव दे. १
केला जयद्रथाचा, कृष्णसहायें बळें चि घात पहा.
जाला दुःसह अर्जुनः शरदर्काचा प्रताप आतप हा. २
हांसतिल सर्व तरि, जरि, सोसुनि हा दाह, वेंचुना कायः
नाकास लाविला, तो मानधना साहवे चुना काय? ३
गुरुनें चि घात केला, व्यूहीं प्रियशिष्य पार्थ शिरकविला.
हें काय बरें? असतें वंच, न तसें रक्षणार्ह शिर कविला. ४
गुरु अभय सैंधवा दे, द्वारव्यूहीं तदंतकाला हीं.
सदनीं शिरल्यावरि, कां रोंखिल मर्मी न दंत कालाही? ५
सैंधव पार्था पावुनि, जेंवि दनुज पाकशासना, शमला.
जावूं देतों, याचा तापविता बा! कशास नाश मला?' ६
कर्ण म्हणे, "न वद असें; करिती आचार्यजनककुत्सा जे,
त्यांसचि 'पशु' म्हणति कवि,न जहि पुच्छविषाणघनककुत साजे.

१. पांचाळाची. २. स्वर्गाधिपति. ३. सिंहाचा स्वभाव. ४. सशाचा स्वभाव. ५. पांचाळ. ६. हरिणकुलरूप अंधकारांत. ७. सिंहरूपी सूर्य. ८. हत्तीला. देह. १०. इंद्रास. ११. गुरु आणि पिता यांची निंदा. १२. मोठे वशिंड.

बापा ! प्रवर्तलासि, स्वाहित जाणोनि, कां गरा खाया ?
वृद्ध यथाशक्ति समर करितो; नेणे चि आंग राखाया. ८
सामर्थ्यें न विलंघिल कां वृद्धां[1] वाडवां युवा राया !?
वेगीं टिकेल कैसें, मोटें ही झाड वायु वाराया ? ९
अत्यद्भुत रथ, सारथि, चाप, ध्वज, तूणें[2], कवच, अधिकरणीं[3],
ज्या साहित्य असें, त्या पार्था न म्हणेल कवण अधिक रणीं ?
वृद्ध द्रोण ब्राह्मण, वाराया अर्जुनासि अक्षम हा;
आतां कैंचें तें बळ, तरुणपणीं जरि हि युद्धदक्ष महा ? ११
सुकरोन्मूलन[4] होइल पहिल्यापरि काय नग, जरा ज्याला ?
किंबहुना, सांवरवे पहिल्यापरि काय[6] न गजराज्याला. १२
जालें अनुकूळ परां, देतें जय, संकटांत वागवितें;
भागवितें आम्हांला स्पष्ट, प्रतिकूळ दैव, नागवितें. १३
बळ भंगे, भंगाया पटु जें सर्वांसि, वासविसकट तें;
जैसें करिकुळ, येतां गंधद्विपदानवास[7], विसकटतें. १४
अनुकूळ दैव असतां, न समर्थ, करावयासि हानि, यम;
होतां तें प्रतिकूळ, प्रबळ हि दुर्बळ चि होय हा नियम. १५
अहि डसविले, बुडविला भीम, दिलें उग्र विष, मरायातें;
जतुगृहदाह द्यूत हि जालें दैवें चि विषम राया ! तें. १६
दृढ चित्त करुनि तूं निज, रणधर्मप्रवण हो मरायास.
याहुनि दुसरा, सुफलद आवश्यक, कवण होम रायास ?" १७
मित्राच्या उपदेशें, सोदरसैंधववधें[8], दुरभिमानी
होय मराया सिद्ध; स्वासाधुप्रकृतिला[9] सुरभि[10] मानी. १८
पांडवसेनांसि मथी कुरुपति, सर्व प्रजांसि अंतकसा.
अभिमानी आप्तांचा, साहेल, असोनि शक्ति, अंत कसा ? १९

---

१. वृद्ध ब्राह्मणास. २. भाता. ३. स्थानी—पंत. ४. उपटावयास सुलभ. ५. वृक्ष. ६. देह. ७. मत्त हत्तींच्या मदाचा वास. ८. बंधु आणि जयद्रथ यांच्या वधानें. ९. आपल्या दुष्ट प्रकृतीला. १०. उत्कृष्ट.

भीम, घटोत्कच, सात्यकि, धर्म, यम[1], द्रौपदेय ताडून,
केले विद्ध सपुत्र द्रुपदविराटादि वीर झाडून. २०
कुरुपतिबाणत्रासें[2] मोटे मोटे हि वीर कचकेरती;
सेना कांपे, यांचा[3] धरुनि, प्रभुचा[4] जसा च, वचक रती. २१
धांवे धर्म, क्रोधें लक्षुनि दुर्योधनास कुपितातें;
घाया तुज, जें पावे घननादाचा[5] कुलघ्न कुपिता, तें[6]. २२
न गणिति, सुरासुरांचे[7], भद्रासनकाम, इंद्रसे, नातें.
ध्वज धनु खंडुनि, ताडी भाळीं कुरुराज इंद्रसेनातें[8]. २३
भीमाग्रज, सज्ज करुनि नव चाप, 'हतोऽसि,'[10] म्हणुनि शर सोडी.
तो डीनपटु[11] भुजगसा, तोडी कुरुराजकवच, उर फोडी. २४
मूर्छा जसी च सहसा जाली मोटी तसी च हाक रणीं.
मेला दुष्ट दुरात्मा; करिता जाला असी च हा करणी. २५
तों गुरु धांवे, परिसुनि पांचाळांच्या रणांत, हाकेला.
चित्तीं म्हणे, 'वधें तरि नुत[12] किंनरचारणांत[13] हा[14] केला.' २६
येतां चि द्रोण, उठे दुर्योधन सुप्तसर्पसा हरिसा.
परि सार्थक काय ? कसे वांचों देतील, पोषिले अरि[15] सा ? २७
तों 'तिष्ठ, तिष्ठ'[16], ऐसें म्हणत, रण त्वमीं करावया धावे.
पांचाळ सकळ उठले, कीं, धर्मा शत्रुशरें न बाधावे. २८
पांचाळांवरि सहसा सरसावे द्रोण, कुरुप राखाया;
कीं गुरु समक्ष असतां, काळ हि न शकेल गुरुपरा[17] खाया. २९
उठली आचार्यावरि सारी ही एकदा चि अरिसेना.

१. नकुळसहदेव. २. कुरुपतिचा-**पंत.** ३. शंकराचा. ४. मदनस्त्री. ५. इंद्रजिताचा कुलनाशक व वाईट पिता रावण. ६. पुत्रमरणदुःख. ७ देवदैत्यांच्या अधिपतीसारखे ते राज्यपदाची इच्छा करणारे धर्म-दुर्योधन. ८. युधिष्ठिराचें-**पंत.** ९ युधिष्ठिरसारथि-**पंत.** १०. तू मेलास (असें). ११. उडाला-**पंत.** उड्डानकुशल. १२. स्तुत-**पंत.** १३ देवयोनिविशेषांत. १४. दुर्योधन-**पंत.** १५. षड्रिपु. १६. उभा रहा. १७ गुरुभक्ताला.

हरिसे नाद करिति ते; कोणीं हि परस्परोक्त परिसेना. ३०
रात्रौ दाटे, वाटे लयकाळाचा चि, अंधकार, गडी;
बहु पांचाळसमूहा द्रोण, जसा रुद्र अंधका, रगडी. ३१
भूषामणिशस्त्रद्युति घनतिमिरीं ही करी लखलखाट;
म्हणुनि गमे, होउनि गतमद, चिंतेची धरील खल खाट. ३२
द्रोणाच्या सारथिला मारी, शरवृष्टि करुनि, शिबिराजा;
यातें आचार्य म्हणे, 'स्वर्गास चि जा; पुन्हां न शिबिरा जा.'
कालिंगभूपनंदन धांवे, कीं भीम होय तातारी.
तद्बळ तयापुढें किति? अशनिपुढें काय कोयता तारी? ३४
स्यंदन सोडुनि, धावुनि, त्या कालिंगासि मुष्टिनें चि वधी;
कर्णानुज ही मर्दुनि, तो, बहु, खळकाळ तोषवी शिवधी. ३५
कर्णें झुगारिली, जी, शक्ति खरत्वें सखी च अशनीची;
की आगस्कृद्रक्षक तक्षककन्या च, दृष्टि च शनीची. ३६
ती च धरुनि भीमें त्या कर्णावरि टाकिली महावेगा;
फिरली कृत्या च गमे: कर्णास न तीकडे पहावे गा! ३७
खंडी नयरीतीतें, होउनि जो काय वश कुनीतीतें,
स्वसहाय वृषहितार्थी तो कां खंडील न शकुनी तीतें? ३८
स्वरथीं बैसोनि पुन्हां, आम्हांवरि भीम धांवला हरिसा.
त्यावरि कुमार उठले तेव्हांचें वृत्त सांगतों, परिसा. ३९
आच्छादित होते शरपटळें, ठाकुनि समक्ष, यातें हो!
तों पाठविले दुर्मद हय, सारथिसह, यमक्षयातें हो! ४०
दुष्कर्णरथीं दुर्मद बैसे, दोघे कृती, परि लघ्वायू.,
भीम तसें चि परांचें मथन, घनांचें जसें करिल वायु. ४१

१ एकमेकाचे बोलणे. २. अलंकारांतील रत्ने आणि शस्त्रे यांचे तेज. ३. मणिशस्त्रप्रभेने महांधकार जर्जर जेव्हा झाला तेव्हा अद्भुत हे; यास्तव दुर्योधन-नाश होईल-**पंत.** ४. पित्याचा शत्रु. ५. शत्रु-कोकणात ख्यात-**पंत.** ६. तीक्ष्णत्वे. ७. अपराधकर्त्यांस शिक्षा करणारी. ८. यमगृहाते. ९. अल्पायुषी.

धरणींत बुडविला रथ त्यांचा भीमें पदप्रहारें च.
ते मुष्टिनें चि वधिले; उतरिल शतमन्युचा हि हा रेंच. ४२
होते वृष गुरुसुत नृप कृप बाल्हिक सोमदत्त साक्षी बा!
सम दिसतो, परि तेजें भीम परा असम, दत्तसा क्षीबां. ४३
पंळ काढिला चि, तुमच्या, पाहुनि तें कर्म तडक, लेंकांहीं;
गमला रुद्र वृकोदर; धाकें काळीज तडकलें कांहीं. ४४
द्रुपद-विराट-युधिष्ठिर पूजिति होऊनि मुदित भीमातें,
त्या अंधकासुरवधीं विधि-वासव-विष्णु जेंवि भीमातें. ४५
सद्रोण कुमार पुन्हां वेष्टिति कोपें वृकोदरा अरिला,
जैसे निजयूथपयुत मदमत्त द्विप वधावया हरिला. ४६
सात्यकिस सोमदत्त क्रोधें दापुनि, म्हणे, 'अरे मत्ता!
प्रायगँता न असिलता त्वां, धर्माला चि मारिली लत्ता. ४७
मीं आजि तव शिरातें, विसराया तनयहानि, कापीन,
केलों त्वां गृध्रोचित देह करुनि अनय हा निका पीन. ४८
जरि जिष्णु न रक्षिल, तुज मीं मारीन चि रणांत अधमातें;
त्वत्कृत अधर्म जैसा तापद, तैसा न पुत्रवध मातें.' ४९
सात्वत म्हणे, 'यदुकुळीं अरिपासुनि कोण सांग गा! भ्याला?
यादवशक्ति पराला, कदलीच्या जेंवि सांग गाभ्याला. ५०
तुज चि सपुत्रास रणीं दाखवितों आजि मीं विनाशपथ.
अनुचित कृष्णपदशपथ; परि न ठसे प्राकृता विना शपथ. ५१
तंडायाची च तुला युद्धांत असेल जरि सवे, तंड.
परि मज दिसतोसि तसा कौरव्या! जेंवि हरिस वेतंड.' ५२
रक्षिति बहु बळ घेऊनि दुर्योधन शकुनि सोमदत्तातें;

१. इंद्राचा. २. गर्व. ३ आत्रेय–**पंत.** ४. मद्यपास–**पंत.** ५. शिवातें. ६. आपल्या कळपाच्या मुख्यासहित असे. ७. मरणाच्या इच्छेने निश्चल राहिलेल्या (भूरिश्रव्यास). ८. भूरिश्रवावध. * यथाकन्यास अन्वय जाणावा–**पंत.** ९. शस्त्र विशेष. १०. गज–**पंत.**

रक्षी धृष्टद्युम्न हि सात्यकितें परमयुद्धमत्तातें. ५३
प्रथम नवशराहीं तो सात्यकिला सोमदत्त बा! वेधी;
कौरव्याची सात्वतनवबाणांहीं च मोह पावे धी. ५४
तो सोमदत्त, मूर्छित पडतां चि, पळांत पळविला सूतें.
सात्यकिवरि गुरु धावे, बहु चळचळ कांपवीत रणभूतें. ५५
द्रोणावरि धर्म उठे, घेउनि अमित स्वकार्यघटक बळ;
तेव्हां गुरुशर[1]गणघटकर्णें गिळिले अनेक[2] भटकबळ. ५६
पडली दृष्टि जयांवरि त्या कौरवसर्वसैन्यपाळाची,
पडली च उडी त्यांवरि तद्बाणगणासमेत काळाची. ५७
केले द्रोणें बहु भट, गरुडानें नेकसर्पसे, नाहीं.
स्वीकारिलें पलायन, धर्माच्या, त्यजुनि दर्प, सेनाहीं. ५८
पार्थ म्हणे, "पळत्यांतुनि ने माजा क्षिप्र हा रथ, बकारे[3]!
म्हण 'करितों गुरुसि, तुम्हां ठेवुनि साक्षी, प्रहार, थबका,' रे!"
विजयोक्तें विजयाचा रथ चालविला जसा विशोकानें[5],
भीमोक्तें भीमाचा चालविला रथ तसा विशोकानें[6]. ६०
सेना सर्व मिळाल्या धावुनि, अत्यंत शीघ्र दोघांतें,
जैशा तटिनी[7] गंगायमुनांच्या श्रावणांत ओघांतें. ६१
उत्तरपार्श्वीं भीमें, दक्षिणपार्श्वीं[8] सुधांशुसितवाहें[9],
कुरुकटक घेतलें, बा! दावयुग[10] गजा तसें चि कितवा हें. ६२
कुरुसेनेतें ग्रासिति ते दोघे, दाव जेंवि अटवीतें[11];
किंवा श्रीमद्गीतासप्तशतीमंत्रपाठ सत्वीतें. ६३
धांवे प्राय[12]गतवधप्रकुपित गुरुपुत्र सात्वतावरि; तों

१ द्रोणशरसमूहरूपी कुंभकर्णानें. २. योद्धे हि च ग्राम. ३. भीमा! ४. नरितस्वयळासि धीर दे–**पंत.** ५. शोकरहित कृष्णानें ६. या नावाच्या सारथ्यानें. ७. नद्या. ८. डाव्या बाजूस. ९. चंद्रासारखे शुभ्र घोडे ज्याचे अशा अर्जुनानें. १०. दोहो बाजूंचा अग्नि. ११. अरण्यातें. १२. प्रायोपवेशनास बसलेल्या भूरिश्रव्याच्या वधामुळे रागावलेला.

त्यावरि उठे घटोत्कचखचर, म्हणे, ‘ यासि आननीं भरितों.’
अक्षौहिणिमित तद्भट, लोपविते प्रलयनीरदरवा[1] जे,
दरवाजे काळाचे, बा! अरिचा ज्यांपुढें ब दर वाजे; ६५
लोहमय अष्टचक्र त्रिशन्नल्वप्रमाण[2] रथ मोटा,
जो ऋक्षचर्मपरिवृत[3], ज्यांत नसे शस्त्रसंग्रहीं तोटा; ६६
त्याचे वाहक गजसे, परि जातीनें नव्हेत गज, वाजी,
क्षण ज्यांपुढें, गगनमणिरथतुरगांच्या, नव्हे तग, जवा, जी!
एवं भयंकररथीं पाहुनि रात्रौ रणांत उग्रास,
भ्याले कौरव; गमले ते त्या काळापुढील सुग्रास. ६८
कटकीं होते वाजी, वारण, जे काय बहु मदें उतले,
ते त्यापुढें न तगले; हगले तो काळ गर्जतां मुतले. ६९
द्रौणि, घटोत्कच दोघे न धरिति ते युद्धसमरस[4] त्रास;
आरंभिति, जोडाया यश लोकीं शुद्ध, समरसत्रास. ७०
संध्याधिकबळ[5] राक्षस ते, जैसे धूमयोनि[6] करकांहीं[7]
बहु वर्षले शिळांहीं; बा! वदवेना चि तो निकर कांहीं. ७१
केलें पलायन, मनीं धरिला संकोच न तव तनयांहीं.
संपादिलें न नाकीं, होउनि धर्मास्ति नत, वतन यांहीं. ७२
किंबहुना, कर्ण हि त्या खचरत्रासें पलायन करी हो!
गंधद्विपगंधानें[8] भंगे चि महाबलायनकरी[9] हो! ७३
त्या राक्षसांसि एक द्रौणि न भी, होय रामसा मान्य;
केलें घटोत्कचतनयमर्दन, हें काय काम सामान्य? ७४
तो अंजनपर्वाभिध[10] बा! अन्य तसा न वीर मर्त्यांधी;

---

१. प्रलयकाळच्या मेघगर्जनेस. २. चारशे हात लांबीचे प्रमाणाचा. ३. अस्वलाच्या कातड्यानें वेष्टिलेला. ४. ज्यांना युद्धाची आवड सारखी च आहे असे (द्रौणि आणि घटोत्कच). ५. प्रदोषकाळीं ज्यांना बळ अधिक असे राक्षस. ६. मेघ—पंत. ७. गाराही. ८. मत्त हत्तीच्या वासानें ९. मोठ्या बळाचे स्थान च असा हत्ती. १०. घटोत्कचपुत्राचे नाव.

योधीं तद्वधकीर्ति न, जेंवि समुद्रीं नवी रमा यावी. ७५
अंजनपर्वा याचा, घननाद जसा दशाननाचा, हो!
द्रौणिस भीमसुत[1] म्हणे, "जोडुनि शिशुवधयशा, न नाचा, हो!
जाला चि आजि वृद्धा त्या द्रोणा ब्राह्मणासि शोकद[2] हा,
या[3] गुरुधर्महितकरा परि म्हणतिल 'धन्य धन्य!' लोक दहा."
द्रौणि म्हणे, 'वत्सा! जा, इतरांसीं अमरविक्रमा! भीड[4];
पुत्रें पिता कदापि न पीडावा, सोडुनि क्षमा भीड. ७८
न तुझा ठायीं माजा रोष, असे सर्वदा हि अनुराग.
परि येतां तापवितो, व्यापुनि बाहेर आंत तनु, राग. ७९
नसतो विवेक काहीं; बा! घडतो आत्मघात ही कुपिता[5].
सुपिता हि क्रोधाच्या आवेशें करुनि होतसे कुपिता.' ८०
रात्रिचर म्हणे, "द्रौणे! न पृथग्जनसा रणांत कातर हा[6];
भीमसुत म्हणायाचा शक्रा हि, 'उगा च कीर्ति गात रहा.' ८१
जे समरीं अनिवर्ती पांडव, त्यांचा कुमार हा वढिल;
आणिल मनांत तरि, यमकासरचर्में[7] स्वदुंदुभी मढिल. ८२
असता तरि म्हणता, मज[8] पाहुनि रक्षोधिपासि, रावण, 'हा
घटकर्णाच्या करिता, निजचरणप्रणमनें[9], शिरा[10] वण, हा!' ८३
कठिन रणश्रद्धाव्रत हें सत्य, मनांत चिंतित उजीव[11].
जाणो आयुष्यातें सलिल, शरीरा निजा तितउ[12], जीव." ८४
दापी असें, दरवडा सार्थाच्या[13] जेंवि अक्षमा[14] त्रात्या.
सोडी ज्या ज्या बाणा, छेदी च द्रौणि अक्षमात्रा[15] त्या. ८५
होउनि गुप्त घटोत्कच, मायेनें होय तो खरा शिखरी[16].

१. घटोत्कच. २. अश्वत्थामा. ३. अजनपर्व्यास. ४. गाठ घाल. ५. क्रोधयुक्ताला. ६. मी घटोत्कच. ७. महिष-गंत. यमाच्या रेड्याच्या कातड्याने. ८. मला राक्षसश्रेष्ठाला. ९. आपल्या पायाचें वदन करावयास लावून. १०. घट्टा. ११. उजळ कर, ताजें कर (?). १२. चाळण. १३. वणिकसमूहाच्या. १४. असमर्थ अशा रक्षकाला. १५ फाड्यासारख्या अर्थात् लहान बाणांला १६. पर्वत.

वाटे निजोक्ति करितो, द्याया स्वजनासि तोखराशि, खरी. ८६

वर्णूं तो कज्जलसख[1] शस्त्रप्रस्रवण[2] काय पर्वत मीं?
त्या अतिभयंकरानें वीर बुडविले पळांत सर्व तमीं. ८७

अतिवर्षीं बल्लवसे[3] बहु आम्हीं आरडों, गरल[4] यातें
नमितें, नेता कुरुबळबाळा[5] तो आर[6] डोंगर लयातें. ८८

भ्याला तो मायानग[7] गुरुनंदनमुक्तशरनिकरपविला;
त्या ब्राह्मणप्रतापज्वलनें खलपलभुगगम करपविला. ८९

मग होय नीलतोयद सोडी असिशूलशरगदाधारा[8].
गेलों शरण गुरुसुता सर्व, जसे, गोप त्या सदाधारा[9]. ९०

तो नीलमेघ, गुरुसुतयोजितवातास्त्रसायकें वितुळे.
सुरभीचिया सायेसीं यममहिषीची हि साय केंवि तुळे? ९१

घटजें सिंधूदरसें, केलें, जीवन हरूनि, कटक, रितें.
नातरि, घटोत्कचाचें तें बळ आम्हां पळांत गट करितें. ९२

जरि शीतसहस्र मथिले, बहु राक्षस धांवले तरि नवे च.
द्रौणि म्हणे, 'न नृपा! भीः मी यांचा निश्चयें करिन वेच.' ९३

कुरुप म्हणे, 'मिरविन या कंठीं तंव कीर्तिरत्नहारा मी.
संप्रति तुझा भुजीं बा! होता पूर्वीं प्रयत्न हा रामीं.' ९४

रामीं सीतासी, दे राहों, धर्मीं हि, न, मही[10], मामा[11] जो,
त्या नृप म्हणे, 'तुजपुढें आहितांचा आजि न महिमा माजो.' ९५

साठ सहस्र स्यंदन निज लक्ष तुरग, मथावया अरि, घे,
रोघ चि पांडवकटकीं, ग्रीष्मीं कक्षांत[12] जेंवि दाव रिघे. ९६

---

१. काजळाचा मित्र (काळाकुळकुळात). २. शस्त्राचा झरा ज्यांतून वाहत आहे असा. ३. इंद्रानें गोकुळावर अतिवृष्टि केली तेव्हां गोपाळ ओरडले तसे. ४. अत्युग्रत्वोक्ति—पंत. ५. कुरुसैन्यरूप बालकाला. ६. अजगर—पंत. ७. वृक्ष—पंत. दुष्टराक्षसरूपी वृक्ष. ८. खड्ग, शूल व गदा या च्या धारा. ९. साधूस आधारभूत असा (श्रीकृष्णाला). १०. पृथ्वी. ११. शकुनि. १२. तृणांत.

[1]षडयुतपत्तिसमेत त्वत्साहित्यासि कर्ण पाठवितों,
आठविन परांचें असुहरण, वसुहरण जसें चि आठवितों. ९७
द्रौणि शराहीं व्याकुळ करितां चि युधिष्ठिरादिमदरींतें,
मारुनि, घ्यावें सद्यश मद्धितनिरतें तुवां चि पदरीं तें. ९८
गेला धर्मवधा, जो हेतु नृपा या [2]इलादिलाभाचा,
जेणें कुबुद्धि कृत्या जी, हे खाया इला दिला भाचा. ९९
राक्षस दशबाणानीं, विकळ करुनि गुरुसुतासि, धनु तोडी;
द्रौणि, नवें धनु घेउनि, त्याला जलदासि वातसा, झोडी. १००
त्रिपुराला रुद्र जसा, खचरबळाला तसा चि तो भाजी;
जी च सुरांत हराची, याची आम्हांत ती च शोभा, जी! १०१
स्वबळविनाशक्षोभें भीमसुतें रुद्रनिर्मिता अशनी
पाठविली द्रौणिप्रति, जी कृत्या [3]दर्शितारिच्या [3]अशनी. १०२
उर्जस्वमदें जीसीं करिल क्षणमात्र ही न वाद शनी,
तें दाहकत्व न दवीं, तक्षकभुजगाचिया न वा [4]दशनीं. १०३
ऐशीतें हि धरी बा! तो द्विजवर, गरुड जेंवि भुजगीतें.
[5]ख्यात जगीं स्वयशाच्या, त्याचे हरबाहु तेंवि, भुज, [5]गीतें. १०४
गुरुपुत्रें खचरावरि ती च अशनि योजिली महावेगा.
फिरल्या कृत्येसि तसें, तीस न त्या राक्षसा पहावे, गा! १०५
घाली उडी तळीं तो राक्षस जों, तों पडे रथावरि ती.
जाली, [6]सगरसुतगणीं कपिलाची दृक् जसें, तसें, करिती. १०६

१. साठ हजार पायदळानीं युक्त २. पृथ्व्यादि लाभाचा. ३. दाखविलेल्या शत्रूच्या भक्षणी. ४. दातात. ५. स्वयशाच्या गीतें जगीं हरबाहु जेंवि ख्यात तेंवि त्याचे ही—**पंत**. ६. सगरराजाने अश्वमेधार्थ सोडलेल्या अश्वाचे इंद्राने हरण केले. तेंव्हा अश्वाच्या शोधार्थ निघालेल्या त्याच्या साठ हजार पुत्रांना कपिलमुनीच्या आश्रमाजवळ तो अश्व दिसला. मुनीने च आपला अश्व आणला अशा समजुतीने ते सगरपुत्र मुनीला मारू लागले असता मुनीने त्याचेकडे रागाने पाहता च ते सर्व भस्म होऊन गेले, अशी कथा आहे.

देखुनि जाणत होते अशनीची ख्याति, [1]लटिकबरि, कवि जे,
ते वदले; 'न सखी तूं ईची होसील, बटिक बरिक,' [2]विजे..
अशनि क्षितींत शिरली, सूताश्वांसह रथीसि जाळून,
धृष्टद्युम्नरथीं तो राक्षस बसला स्वमृत्यु टाळून. १०८
विजयश्री पांचाळा, तैसी च निशाचरा गमे घरची;
कीं ते शरवृष्टीतें, तेंवि उदकवृष्टितें न मेघ रची. १०९
गुरुपुत्रें त्या त्या बहु कांपविले, जेंवि नीरदा वातें.
द्विजबळ परप्रतापा त्या, जैसें होय नीर दावातें. ११०
तेथें बहु बळ घेउनि, सुतसाहित्यासि भीम ये; राज्या!
मुख्या सबळत्वत्सुतहानिः [3]हयमखक्रियां हि [4]येरां, ज्या. १११
गुरुसुत वधी, घटोत्कच भीमार्जुन यांसमक्ष, योतूंतें.
बा! तत्वतः स्वपरबळ, जें पाठविलें [6]यमक्षया तूं तें. ११२
तो विष्णुजिष्णुदेखत खचरा सकळा हि लोळवि प्रखरा,
वाटे निपट खवळला प्रलयाग्नीचा चि लोळ, विप्र खगः ११३
जाणों हर चि म्हणे, 'हूं! घे बहु फटकाळ, कूट हा निकर;
कीं, तें तेंवि खचरबळ, जेंवि निपट काळकूट हानिकर.' ११४
मारुनि रात्रिचरकटक रुधिरनदी खळखळाट वाहविली,
चकपक घटोत्कचाची, मर्मी वेधुनि, मुहूर्त राहविली. ११५
नाराचानीं पांडव धृष्टद्युम्नासमेत सड़कून.
[7]द्रुपदसुतशरभ केला भस्म, दवें जेंवि शलभ धडकून. ११६
मारुनि त्या सुरथाचे बहु सुत शत्रुंजयादि झाडून,
द्रोणात्मजें श्रुताह्वयराजातें हि क्षणांत पाडून, ११७
पुनरपि यमदंडोपम [8]बाणातें परम तूर्ण सोडून,

१. खर्याल्टकी–पंत २. विजेला वदले. ३. अश्वमेधयज्ञादि क्रियां. ४. इतर, गौण. ५. राक्षसांतें. ६. यमगृहास. ७. द्रुपदाचा एक पुत्र जो सुरथ हा च शरभ. ८. जोरानें पट घेऊन. ९. मूळांत 'द्रुपदाचे पुत्र' असें आहे; तेव्हां येथें 'महारथ द्रुपदाचे' असा अर्थ करावा.

मूर्छित रणीं घटोत्कच केला तत्काळ हृदय फोडून. ११८
धृष्टद्युम्न पळवि; करि, पडतां तो शूर, पळ विलापाला;
वात्येनें दवदहनापुढुनि गमे दूर पळविला पाला. ११९
होते युधिष्ठिराच्या कटकीं भीमादि वीर्यसागर जे,
त्यांतें भंगुनि गुरुसुत, मोडुनि मत्तेभ सिंहसा, गरजे. १२०

---

## अध्याय सतरावा.

मारुति-पार्षत-सात्यकि-धर्मादिक वीर विप्रभावातें
मानवले, गृहवृंदीं, बहु, जेंवि कवी रविप्रभावातें. १
जरि सर्वांगीं केले होते गुरुपुत्रशरशतें विद्ध,
तरि धर्म-भीम-सात्वत-पार्षत युद्धासि जाहले सिद्ध. २
पुनरपि बहु युद्ध करी, सात्यकिला सोमदत्त माराया;
कीं फार खवळला सुतशोकें तो, भरतसत्तमा! राया! ३
मागें पद हि न येतां, सात्यकिशर भीमसेनपरिघ सरे.
वसतां उरीं शिरीं ते, धैर्यापासूनि धीर परि वसरे. ४
बाल्हीक वृद्ध, परि बहु मानी: साहेल कां पतन याचें?
कांपे कोपें तों तों, जों जों धरि देह कांप तनयाचें. ५
तो कालवर्षिघनसा सात्यकिवरि तीव्र विशिखवृष्टि करी.
भीमाला हि न मानी जैसा हरिला मदांधदृष्टि करी. ६
शक्तीतें भीमाच्या वज्रसमोरीं हि होय शिरकविता.
ती त्याचें कांपवि, जासि आणुनि नेत्रांसि तोय शिर कविता. ७
वृद्ध हि महाप्रतापी, बा! नव्हता तो मनुष्यदेव ढिला.

---

१. वाहुटळीनें. २. भीम. ३. द्रुपद. ४. ब्राह्मणत्वाला ५. एक गदेसारखें शस्त्र. ६. सोमदत्ताचे. ७. प्रळयकाळीं वर्षाव करणाऱ्या मेघासारखा. ८. वज्रासारख्या कठिण अशा उरांत हि. ९. शक्तिपक्षीं दुःखाश्रु, कवितापक्षीं आनंदाश्रु.

त्या भीमगदेनें चि स्वर्गति, न धरुनि धनुष्य, दे वढिला. ८
मस्तक बाल्हीकमहाराज्याचें पांडुसूनु चेंडु करी.
न करिलें अपत्य मखाकिटिसम, पोषुनि पंकिलें कुचें डुकरी?
तव नागदत्त दृढरथ इत्यादि तनूज धांवले दश, गा!
यश गा तूं, परि गमले ते, त्या भीमाहरीपुढें, शश गा! १०
मेले, ज्या धरुनि, खचरपतिचे त्या, तव कुमार दश, शीला;
लाजविति पृथापुत्र स्वयशें, जैसे उंमारद शशीला. ११
भीमानें तव दशसुत दशबाणानीं च जेंवि बा! वधिले,
पांचानीं पांच शकुनिबंधु हि, जे मत महारथांमधिले. १२
धर्म हि बहु कुरुकटकक्षय करित क्रुद्धकाळसा सुटला.
तुटला मर्यादावधि, कल्पांतीं नीरनिधि जसा फुटला. १३
त्यावरि नृपोक्तिनें गुरु कन्येनें जेंवि काशिराज्याच्या,
पाठविला भीष्मावरि, अभयवर दिला निका शिरा ज्याच्या.
वायव्य अस्त्र, वारुण, याम्य हि, आग्नेय, ऐंद्र, गुरु योजी.
त्या त्यांतें प्रत्यस्त्रें हरुनि म्हणे धर्म, 'अन्य ही यो, जी!' १५
मग सावित्र त्वाष्ट्र प्राजापत्यप्रयोग जो केला,
त्यांतें हि प्रत्यस्त्रें शमवुनि, निष्कंप नृप पुढें ठेला.' १६
ब्रह्मास्त्रातें योजी तों ब्रह्मास्त्रें चि करुनि विप्रभ या,
गर्जे युधिष्ठिरप्रभु, समरीं न धरी च लेश विप्रभया. १७
सैनिकमुख्य स्तविते झाले गुरुतें, तसे चि शिष्यातें;
दे ताप तव सुतांतें तो धर्मोत्कर्ष जेंवि तिष्यातें. १८
गुरु धर्मातें सोडुनि, पांचाळांचें चि बहुत कदन करी;
ते त्यापुढें न मिरविति गर्व, हरिसमक्ष जेंवि मद न करी. १९

---

१. यथा यज्ञवराहो निरुपमस्तथा भीम इत्यर्थः—पंत. २. स्तनपानानें. ३. रावणपुत्रवन्मत्तास्तवपुत्राः पांडवो भीमः श्रीरामवत—पंत. ४. पार्वतांचे दांत. ५. द्रोणाचार्य, परशुराम. ६. धर्मराजाचा उत्कर्ष (पक्षीं) धर्मकृत्याचा उत्कर्ष. ७. कलित—पंत.

जैसें पांचाळकटककदन कलशसंभवें स्वयें केलें,
तैसें चि कौरवांचें बळ भीमें अर्जुनें लया नेलें. २०
भीमार्जुनशरनिकरें, तिमिरें, निद्राभरें हि, मोहातें
पावे, भंगे, तव बळ, मरणत्रासें म्हणे, 'नमो' 'हा!' तें. २१
गुरुनृपवचें हि कुरुबळ, जेंवि पवननुन्न अभ्र मुरडेना,
सेना किति? पतिरक्षाक्षम होतां काय अभ्रमु रडेना? २२
कुरुपति कर्णासि म्हणे, 'नाशीं देतोसि काय गा! यश तें?
घेढिलि चमू परबळें, जेंवि वृकांच्या, वनांत गाय, शतें. २३
दुर्लभयशःप्रद समय हा, न वृथा मित्रवत्सला! जावा.
सन्मैत्रीच्या कासे लागलिया, सुरभिवत्स लाजावा.' २४
कर्ण म्हणे, 'शक्ति असे कृष्णाद्यखिलाबलाविलापार्था.
जिंकिन, रक्षाया जरि येइल वज्री, बलाविलां, पार्था. २५
देतों तुज जय, मारुनि विजयास, अमोघशक्तिनें आजि.
करितो तसी च केली, जासि महिषवधार्थ शक्तिनें आजी. २६
अर्जुन मरतां, होतिल वश्य तुला, दीन होउनि अवश्य,
किंवा पुन्हां वनाला जातिल पांडव जटाधर अवश्य. २७
असतां कर्ण, व्याकुळ कां? स्वस्थ, त्यजुनि तूं विषाद, रहा.
पांडवबळ किति? न धरिलें, पीतां हालाहला विषा दर हा.
मज हरिपुढें टिकेल न, पळ ही, पांचाळवाहिनी कुतरीः
शिरतां, बुडेल, मद्बळजलधींत, समग्र यदुचमू कुतरी. २९
देतों, तुला चि भजतिल, पळ ही पर, मानदा! न वसुधेतें.
बा! पावले, कर्णानि ही कष्टा परमा न दानव, सुधेतें.' ३०
हसुनि कृप म्हणे, "कर्णा! तूं नाथ, म्हणुनि सनाथ हा राजा;

१. द्रोणानें. २. हाय' ३ वाऱ्यानें प्रेरिलेला. ४. या सेनेची कथा काय—**पंत.** ५. ऐरावतस्त्री—**पंत.** ६. वृकाच्या शतें इत्यन्वय.—**पंत.** ७. द्रौपदी आदिकरून सर्व स्त्रियांना विलाप करावयास लावणें हें च जिचें प्रयोजन आहे अशी. ८. युद्ध ९. न वश्या अवश्याः—**पंत.** १०. भय. ११. पांचाळसेना. १२. भग्ननौका.

तव शब्द[1] चि तेजस्वी; तूं यांसि च म्हण, 'करा प्रहारा, जा.'
करिसि असें चि विकत्थन, परि न पराक्रम दिसे, न फल कांहीं
तव निटिलें[2] न विजयलिपि; वरिली पांडवललाट[3]फलकांहीं.
द्वे ते भंगद[4] जाले, पांडुसुतांसीं रणीं समागम जे;
जीभ तुझी नृपतिपुढें, करिती बहु नववधूसमा गमजे. ३३
गंधर्वें प्रभु धरिला, तेव्हां आधीं च कीं पळालास;
तें पाप क्षाळाया, तूं दवदहनीं न कां जळालास? ३४
कर्णा! उगें चि कर्णप्रिय बोल वदों नको च, कीरा![5] हे.
उचित न वीरास, तुझी त्या गोग्रहणीं न कोंचकी[6] राहे. ३५
जर्‍हि कळलें, एका ही पार्थाचें तेज नांवरायाचें,
तर्‍हि 'सर्व वधिन' म्हणसी, बुडविसिल चि तेज, नाव, रायाचें.
शूर भुजानीं क्षत्रिय, शब्दानीं विप्र, पार्थ चापानें,
केवळ मनोरथानीं कर्णा! तूं शूर, न प्रतापानें. ३७
व्यर्थ चि गर्जन करितें तव मुख हें. जेंवि शारदाभ्र महा;
वांटे अनर्थक बहुत, बडबडसी जें विशारदा, भ्रम हा. ३८
अर्जुन वर्जुन, गर्जुन, अर्जुन घे क्षण उगें च थोरपण.
'जिंकिन बृहस्पति,' म्हणुनि करिल चि वाचाट[10] चाट[11] पोर पण[12].
तदधिक कवण, सुखविला हर जेणें, करुनि अतिसमरयंज्ञ.
कैंचा श्रेष्ठ मग खग? त्रिजगीं हि न पक्षिपतिसम रयज्ञ[13]. ४०
त्या कृष्णसारथिपुढें होसिल मूक, न जराक[14] बकशील[15];
कीं गरुडशील तो, तूं सूता! केवळ वराक बकशील." ४१
कर्ण म्हणे, "घन गर्जति समयीं, तैसे चि सर्व योध रणीं
करणी करूनि दाविति; म्हणत्ये 'तें फलद पर्व यो' धरणी.

---

१. आत्मप्रौढी. २. कपाळानें-दैवानें ३. ललाटप्रदेशानीं-दैवानीं. ४. पराजय देणार. ५. पोपटा! ६ पागोटें-**पंत.** ७ विशारदास हा भ्रम वाटतो, जे तू अनर्थक बहु बडबडतोस-**पंत.** ८. ब्राह्मण्यास. ९ संपादन. १०. वाचाळ. ११. चम्हट. १२. प्रतिज्ञा. १३. वेगज्ञ-**पंत.** १४. जरा हि. १५. बडबडशील.

उत्साहें वीराहीं, करुनि विकत्थन, यथेष्ट गर्जावें.
फळ न दिसतां बुधाहीं काय प्रारब्धकर्म[1] वर्जावें? ४३
द्रवतें चि दैव, असतां निश्चय, नसतां मनांत निर्वेद[2].
तूं* द्विज आम्हांत तसा, जैसा वैदिकजनांत निर्वेद. ४४
दैवें न पावले, रणरंगीं, बहुबळ हि, काय नाश तसे?
म्यां पांडव वधिले तरि, यांत तुझें सांग काय नाशतसे? ४५
न वृथा गर्जति शारद्वारिदसे रणमखांत शूरवर,
विप्रा कृपा! पहावें ऐसें दवडूनि दृष्टि दूरवर. ४६
गर्जति पंडित निजबळ समजुनि; तूं वदसि, न समजोनी च.
वीराशयासि वीर चि समजे, नुमजे चि, न सम जो नीच. ४७
मीं 'मारिन कृष्णार्जुन,' ऐसा उत्साह मानसीं धरितों;
म्हणुनि द्विपयूथपवधकामुकहरिसा च गर्जना करितों. ४८
सानुग सकृष्ण पांडव मारुनि, देइन सुयोधना वसुधा.
हें गर्जितफळ पाहें; म्हणतिल माजें, सुयोध[3], नांव सुधा[3]." ४९
गौतम म्हणे, "तुझे हे, न ग्राह्य, मनोरथप्रलाप मला.
गमला कृष्ण प्राकृत, धर्म हि, ज्या, स्पष्ट तो पशु भ्रमला. ५०
कृष्णाश्रितांसि सकळें कल्याणें करुनि दे वशें, समज.
असी म्हणे जयश्री, 'काय वरिलें[4], भरुनि देव शेंस[5], मज?' ५१
श्रीकृष्णार्जुन जेथें, तेथें सादर सदैव जय नांदे;
राजर्षिधर्म विस्मय देवर्षिमहर्षियोगिनयनां दे. ५२
भीम नकुळ सहदेव ख्यात सकळ साधुशूरजनमहित;
यांचे संबंधी हीं शक्रसम द्रुपदमत्स्यपतिसहित. ५३
त्यांतें जिंकाया तूं बहु हुटहुटलासि[6]; योग्य अनय न हा.

१. आरंभिलेले काम. २. कटाळा. ३. सुयोध मन्नामासि सुधा म्हणतील—**पंत.**
४ वरिल काय इत्यन्वयः—**पंत.** ५. कुंकुमाक्षताचा लेप कपाळी करितात ती शेंस.
६. उत्कंठित झालास, हुरळलास. * येथील अर्धवट रचून खोडलेला पाठ—
**आम्हांत विप्र तैसा तं जैसा वैदिकां(तं).**

लावूनि सनयनांसीं स्पर्धा, न म्हणेल काय अनयन 'हा!'?"
कर्ण म्हणे, "जन्हि पांडव दुर्जय, तन्हि शक्रदत्तशक्तीनें
अर्जुन वधिन; न मथिला तो काय तसा[१] हि मत्त शक्तीनें? ५५
त्याविण कृष्ण, युधिष्ठिर, तदनुज, सुसमर्थ हि, तरि पोकळ; तो
न कुरूत्कर्ष तुज रुचे, आशय शब्दें चि हितरिपो[२]! कळतो. ५६
न रणा तूं योग्य, म्हणुनि 'हा केशवसारथे[३]!' रडायास.
काय भिवविसिल, देउनि हाके, शवसार[४] थेरडा[५], यास[६]? ५७
अप्रिय वदसिल पुनरपि तरि, खड्गें करुनि जीभ कापीन.
सुकृत चि[७] हें; कीं, कोण्ही निंदकसा त्रिभुवनांत पापी न. ५८
दैव चि कारण भीष्मप्रमुखमहावीरदेहपतनाचें.
अधमा कृपा! नृपाच्या होउनि अहितस्तवीं, न रत, नाचें." ५९
अश्वत्थामा धावे कर्णावरि दिव्य खड्ग उपसून.
तक्षक जेंवि डसाया मर्मीं, दंष्ट्रा समूल खुपसून. ६०
त्यासि म्हणे, "या सिंहा बोलावे बोल हे तुवां कोल्ह्यां!
मारुतिसि माकडानें दाखविलया स्वांतहेतु वांकोल्या. ६१
वदतां प्रभुपांडवगुण, ईश्वरसम, वेदसम हि मामातें
निंदिसि, सत्पुरुषांचा, दुष्टा! दूषूनि न महिमा, यातें. ६२
केला जयद्रथाचा, जिंकुनि तुज, अर्जुनें, वध मघांसीं.
सन्मान्य तो गणावा दशदशीं, सूत तूं अधम घांसीं. ६३
युद्ध हरासीं केलें, त्वां आयकिलें न काय मत्ता! तें?
तूं मारिसील त्याला, न अतिक्रमिलें जयासि मृत्यु तें? ६४
जें जय[१०] जाणे, त्याचा न शतांश हि तुज कळे वराकास.
घालिसि, भस्म कराया, पार्थशरें, निजकळेवरा, कास. ६५
हित कथिल्या आप्ताची, नीचा! म्हणतोसि 'जीभ कापीन,'

१. महिषासुर–पंत. २. कृपसंबोधन–पंत. ३ अर्जुनशोकयोग्य–पंत. ४. प्रेतवत्. ५. वृद्ध–पंत. ६. या कर्णास–पंत. ७. जिव्हाछेदन. ८. य अश्वत्थाम्याला. ९. कृपाचार्यांतें. १०. माझ्या पित्याने. (द्रोणाने). ११. पार्थ–पंत

तरि वधिन तुला; दे विष विषकामा सुरभिचें हि आपीन. ६६
हा उडवितों, तुजी, मीं, बकऱ्याची जेंवि, शीघ्रतर मुंडी."
ऐसें बोलुनि देता झाला गुरुपुत्र शीघ्र तरमुंडी. ६७
'हां हां' म्हणे सकृप कृप; नृप, कृपण जसें धना तसें, धरि त्या.
कीं गतसारा सरिता तेंवि, पडाव्या स्ववाहिनी न रित्या.' ६८
कर्ण म्हणे, 'सोड नृपा! योग्य चि हा होय शासना, सत्य.
द्विजमदगद शमवु सखा, जोडुनि यां हो! यशास, नासत्य.'
द्रौणि म्हणे, 'कुमति तुला, तैसी आम्हांसि न क्षमा सोडी;
मोडील अर्जुन तुझ्या, दक्षाच्या वीरभद्रसा, खोडी.' ७०
भूप म्हणे, 'गुरुपुत्रा! क्रोध त्यजुनिं प्रसन्न हो; पावें,
सर्वांहीं एकमतें जोडुनि यश, मज तुम्हीं च ओपावें.' ७१
कृप हि विनवितां, होउनि मृदु, कर्णाला म्हणे, 'तुझा गर्व
सर्व श्वेताश्व हरिल, त्या खळरतिजानिचा जसा शर्व.' ७२
द्रौणिकृपांतें जोडुनि कर, जों यत्नें नरेंद्र समजावी,
तों ये युधिष्ठिरचमू, जी लंघुनि सिंधु, कीर्तिसम, जावी. ७३
कर्ण पुढें होय; तया पाहुनि ते वीर म्हणति, 'या कळहा
जो हेतु, नीच दुर्मति दुर्जन दुर्योधनास, तो खळ हा. ७४
मारा, घ्यां, कोठ हा? पाडा तोडूनि, हूं! करा चूर्ण.'
ऐसें गर्जुनि पांडव-सृंजय-पांचाळ धावले तूर्ण. ७५
त्यां सर्वांस हि ताडुनि भग्न करी, जेंवि वात मेघांस.
त्या काळमुखीं पडला पांडवभटसंघ, तो गमे घांस. ७६
अर्जुन धावे कोपें, रोपें त्याच्या हि तो करा ताडी;
नाडी करूनि विकळा, पळभरि गांडीवचाप ही पाडी. ७७
धरि कोप अजितसारथि, वाटे आतां चि रागविल याला.

---

१. कास–पंत. २. निर्जला. ३. आपल्या सेना. ४. अश्वत्थाम्याचा गर्वरूप रोग. ५. कर्ण. ६. अश्विनीकुमार. ७. शिवाच्या जटेपासून उत्पन्न झालेला असुरविशेष. ८. दुष्ट रतिपति मदनाचा. ९. शंकर. १०. अर्जुन.

गरुडातिक्रम करितां पावेल कसा न नाग विलयाला? ७८
जालें तसें चि, राया! केला विरथ क्षणांत तो मानी.
त्यजिला असता चि, करुनि तद्वनपण, शक्रसूर्यसोमानीं. ७९
कर्ण कृपरथीं चढला, पार्थापासूनि फार तो भ्याला;
कीं त्यासि यशाहुनि बहुमत जीवित, जेंवि वित्त लोभ्याला.
धांवे धनंजयावरि दुर्योधन मित्रपरिभवक्षोभें.
तों कृप भाच्यासि म्हणे, 'प्रभुला रक्षूनि सद्यशें शोभें.' ८१
आटोपुनि गुरुपुत्र प्रभुसि म्हणे, "एक भविकवचन, रहा;
विजयापुढें म्हणेल चि आंगीं घालुनि हि पविकवच नर 'हा!'
असतां सजीव मीं, तुज योग्य नव्हे अर्जुनासवें युद्ध.
वारुनि किरीटिला, यश द्याया तुजला चि, जोडितों शुद्ध."
भूप म्हणे, "शक्ति असे, परि न म्हणसि, 'अर्जुनासि मारीन.'
स्नेह मनीं आहे तो न म्हणों दे, म्हणुनि म्हणासि 'वारीन.' ८४
आचार्य पुत्रवत् परिरक्षण करितो रणांत मद्रींचें.
तूं हीं सांडों देसी पुण्ययशोधन बळें चि पद्रींचें. ८५
न कळे, करिसी तूं ममशत्रूपेक्षा रणांत, धर्माच्या
प्रेमें, कीं कृष्णेच्या, कीं मांद्यें अमुच्या चि कर्माच्या. ८६
करित्ये, प्रवाहमिलितः गंगा, मलिनां हि, धौतें, मीना कीं.
सत्संगति श्विना तसि अदितिसखी होउ गौतमी नाकीं." ८७
द्रौणि म्हणे, 'सत्य वदासि, पांडव आम्हांसि फार आवडती.
सन्मति गुरुसि बहुमता, जैसी रामेश्वरासि कावड ती, ८८
त्यांसि द्रोण बहु प्रिय जसा, तसा चि मीं हि कुरुपा! हें
काय प्रेम वदावें? तनु-जीव तसे सुशिष्य-गुरु पाहें. ८९
परि त्याहीं, आम्हीं, त्या प्रेमासि रणांत सोडिलें पाणी.

---

१. कर्णरक्षणाचा पण. २. कुशल-पंत. ३. वज्रासारखे अभेद्य कवच. ४. कमजोरपणानें. ५ शुद्ध. ६. आश्विनाम. ७. द्रोणस्त्री-पंत. ८. गंगेची कावड.

करितों तुझें चि, जैसें करिती, विधिचें चि शासन, प्राणी.
कर्णादि सर्व आम्हीं, नित्य यथाशक्ति, करितसों युद्ध.
काय करावें? दुर्जेय धर्म; त्रिजगीं तसा नसे शुद्ध. ९१
प्रकृतिकुटिल, पापाचळ, खळ तूं; मानिसि तसें चि अन्यासी;
पाहे जडरूप चि जड, तें सर्व ब्रह्मरूप सन्यासी. ९२
शिरतों पांडवकटकीं, शिरला एकार्णवीं जसा कोल.
जातों युद्ध कराया; शत्रुशर बरे, न हे तुझे बोल. ९३
सृंजयपांचालकटक आजि स्वरुधिरनदींत वाहेल,
पाहेल धर्म अश्वत्थाममय सकळ, सचिंत राहेल.' ९४
ऐसें बोलुनि गुरुसुत, गांठुनि पांचाळसोमकांस वदे,
'हूं! वर्षा शस्त्राहीं; घ्यावें सोडूनि सोम, कां सवदे?' ९५
स्वीकारी घनतेला परनिकर द्रोणतनय नगतेला.
कीं शोभाघ्ना अयशा भी सुकुलज, जेंवि जडित नग तेला. ९६
परदलनीं द्रौणि गमे, घननिकरीं निकर तो मरुद्रचितो,
कीं करितो शरदहनीं पांचाळत्रिपुरहोम रुद्र चि तो. ९७
तों धृष्टद्युम्न म्हणे, 'कथिला तुज धर्म काय हा तातें?
दुष्टा! दुर्बळदलनें फळ आलें सांग काय हाता तें? ९८
अससील शूर तरि ये; चापीं शर शीघ्र जोडुनीं भीड.
कविनें कविराजासीं सांगावा वाद, सोडुनीं भीड.' ९९
ऐसें बोलुनि हाणी द्रौणिप्रति अतितरोग्ररोपानीं.
गुरुसुत म्हणे, 'रहा, पदें देववितों मृत्युमार्गसोपानीं.' १००
खरतरवरशरविद्ध द्रुपदसुत म्हणे तयासि, 'हा मूढा!
कासि आयकिली नाहीं, काय मदुत्पत्तिची कथा गूढा? १०१

१. आज्ञा. २. यज्ञवराह—**पंत.** ३. अमृतकर टाकून अन्य पदार्थ न घ्यावे तसे यश टाकून—**पंत.** ४. मेघपणाला. ५. शत्रुसमूह. ६. पर्वतपणाला. ७. जडात्म्याचा अलंकार. ८. स्थान. ९. मृत्यूच्या मार्गावरील जिन्यामध्ये. १०. अत्यंत प्रखर अशा श्रेष्ठ बाणांनीं विद्ध असा धृष्टद्युम्न.

आधीं म्यां द्रोणाला, मग मारावें तुला असें आहे.
हा हेत पित्याचा हे भुज पुरवितिल; न विलंब यां साहे. १०२
धर्मी करिसी द्वेष, प्रेमा दुर्योधनीं खळीं अधर्मी;
त्यजिलें स्वकर्म, ऐशा भ्रष्टाचा कां करूं नको वध मीं?' १०३
अश्वत्थामा कोपे लक्षीकृतकाम[1] रुद्रसा पाहे.
गमले नसतिल लक्ष्मण-घनरवसे[2] कां मरुद्रसोपा[3] हे? १०४
स्नात क्षतजें झाले, आयकिला ही न हा निकर वीरें;
पळसें वरिलि, वरावी कां न, असुनि हीन, हानि, करवीरें?[4]
त्या दोघांतें युद्धीं मानवले अर्जुनादि भट सारे.
सुर वदले, 'दाखवितो रंगांत नटांसि नृत्य नटसा रे!' १०६
एक मुहूर्त महारण झाला, मग मोह तो, जसा बोधें,
क्रोधें केला भग्न, द्रोणाचार्यात्मजें महायोधें. १०७
केला रथिशतकाचा बाणाहीं, एकवेळ विलय, शतें.
तुमच्या कटकीं, ऐसें द्रौणिविना कोण मेळविल यश तें? १०८
वधिलें महारथत्रय मग गुरुपुत्रें शरत्रयें चि रणीं.
द्रौणिशरीं तेज अहितहर, रविच्या तिमिरहर जसें किरणीं.
केला बहु पांचाळक्षय हरिसारथिसमक्ष खवळून;
हतशेष बहु पळाले त्या विरथद्रुपदसूमुज[5] वळून. ११०



## अध्याय अठरावा.

मं धरितिं, भीम-धनंजय, येतां हि द्रोण जवळ, लेखां ते;
गमले विश्वप्रलयीं काळांतक जेंवि खवळले खाते. १

१. मदनावर ज्यानें लक्ष धरलें असा. २. मेघनादसे. ३. मरुद्राजास—इंद्रास—पंत. ४. शोभाहानि त्यांपुढें वीरांवी च—पंत. ५. गणनां, पर्वा.

गमला, शिरतां पांडवसैन्यसमुद्रांत, मत्त मगर मला.
सात्यकिशरदर्शितपथसद्गतिसीं[1] सोमदत्त मग रमला. २
कुरुवृद्धवधक्रोधें बहु कौरवयोध धावले शमनीं[2].
सात्यकि न स्पर्शों दे तदिषु, तसा भीरुभावलेश मना. ३
शक्राचा रुद्र, तसा सात्यकिचा धर्म होय कैवारी.
विघ्नें विघ्नेश्वरसा, कौरवकटकें पळांत कैं[3] वारी. ४
कुरुबळ मथितां, धांवे धर्मावरि तो सुशिष्यनाकद्रु[4].
प्रसवे तच्चापलता बाणगणा, जेंवि दुर्जना कद्रू[5]. ५
धर्म न साहे, समरीं द्रोण स्वध्वजधनुष्य खंडी तें;
तो बाणसहस्रीतें योजी, देवेश[6] जेंवि चंडीतें. ६
त्या बाणसहस्रीनें गुरु केला विकळ, दोन घटिका, हो!
सावध होऊनि म्हणे, 'प्रेमा होइल जनांत लटिका, हो.' ७
योजी अजातरिपुवरि वातास्त्रातें रणांत तो विप्र;
त्याचें स्तंभन[7] धर्म प्रत्यस्त्रें करुनियां करी क्षिप्र. ८
तों कृष्ण म्हणे, 'धर्मा! गुरुसीं रण तूं करूं नको, परत.
जपतो नित्य तुला हा, त्वद्ग्रहणीं पण करून, कोपरत. ९
याचा अंतक धृष्टद्युम्न; उद्यां यासि तो चि मारील.
त्यांवांचुनि यासि रणीं साक्षात् पविपाणि ही न वारील. १०
राजानें राजासीं भांडावें; तदितरास वरजावें.
त्वां हे सेना घेउनि राजाधृतराष्ट्रसूनुवर जावें. ११
भीमार्जुन कौरवबळ वधितिल; यांला सहाय मीं आहें.
परकटक मुखीं भरिलें काळाजगरें, करूंनियां आ, हें.' १२
ऐसें हित सांगे, जो मधुकैटभसंकटीं अजा[8] तारी.
देउनि मान प्रभुला, गेला भीमाकडे अजातारी. १३

१. सात्यकीच्या बाणानीं दाखविलेल्या मार्गातील सद्गतीला. २. मारणार्थ–**पंत**. ३. कित्येक. ४. द्रोण–**पंत**. सच्छिष्याचा कल्पवक्ष च असा. ५ नागमाता–**पंत**. ६. शंकर. ७. अवरोध. ८. ब्रह्मदेवास.

पूर्वी जेंवि सुरचमू भ्याली पाहोनि अंधकां[1], राती
कौरवपांडवसेना भ्रमली पाहोनि अंधकारा ती. १४
दुर्योधनें विनविलें धरिती बहु दीपिका पदातें[2] रणीं
गमलें, दीपमिषें, सुतमित्रार्थ प्रकटला तदा तरणी. १५
नारद-पर्वत[3]वचनें दिग्देवी, अप्सरा, भुजग, यक्ष,
दीप धरिति विद्याधर, गंधर्व, सुरर्षि हीं, बहुत लक्ष. १६
पांडवकटकीं हि धरिति सर्व हि पादात सुजन दीपातें.
कोण न देइल, समयीं असतां, श्रमत्यास, भुज, नदीपातें? १७
दीपक सुगंधतैलें क्षितिगगनतळीं, अनंत पेटविले.
स्वभर[4] उणा करित्यांतें सुमणि अनंतें[5] चि काय भेटविले? १८
प्रतिगज सप्त, प्रतिरथ दश दीप, प्रतिहयास एक रणीं;
ऐसी अंचाट यांची, लोकीं कोण्हांस ही न ये, करणी. १९
व्यूह रचुनि बंधूंतें सांगे, व्हायास यश, सुयोधन हो!
'यत्नें गुरु रक्षा; हा द्रुपदसुताला चि वश सुयोध न हो. २०
धृष्टद्युम्ना गुरुसुत, कर्ण जयां, भस्म करिल रोपानीं;
भीमा मी मर्दिन, मग मारावे शेषशत्रु गोपांनीं[6]. २१
गुरुस चि रक्षा, म्हणजे विजयश्री निश्चयें चि मज वरिल.
रविवरिल घनपटळसें, सर्व हि संकट टळेल मजवरिल.' २२
गुरुचक्रगोप[7] होउनि, कृतवर्मा, शल्य, यत्न हे मानी
करिती बहु; कीं, शोभा सुयशानीं, तीं न रत्नहेमानीं.' २३
धर्म हि, 'गुरुला चि वधा,' ऐसी आज्ञा करूनि सैन्यातें,
धावे आपण हि, यशें जो दे साधारणत्व वैन्यातें[8]. २४
कीं, तो, जाला तुमच्या तनयांचा, विप्र, कारभारी हो!
केले तुम्हीं, धरुनि पथ अनयाचा, विप्रकार[10] भारी हो! २५

---

१. अंधकासुरास. २. पादचारी. ३. ऋषिविशेष. (नारदमित्र). ४. शेष—पंत. ५. अर्जुनास. ६. यादवानीं. ७. द्रोणाचे चक्ररक्षक. ८. पृथूतें. ९. 'गुरुपरि धर्म कसा उठला' असें म्हणाल तरि—पंत. १०. विपरीताचार.

केला धर्म[1] विरथ; कृतवर्म्यानें खंडिलें हि कवच रणीं.
तें सर्व भस्म करिता, परि त्याची बहुत भक्ति तवचरणीं. २६
शक्रें बळसा[2] वधिलीं, सात्यकिनें सोमदत्तसुत भूरि.
त्वां चि करविले स्वपरांकरवीं काळानळांत हुत भूरि[3]. २७
सात्यकिवरि गुरुनंदन धावे; त्यावरि घटोत्कच पलाश.
जाले रक्तस्नात द्विजराक्षस, जेंवि पुष्पित पलाश. २८
मूर्छित केला द्रौणि, प्रथम क्षणदाचरें[4] दशशरानीं.
वदले पर, ' पशु हि बरा; कीं, व्याघ्राच्या, शिरे न शश, रानीं.'
मग सावधान होउनि, गुरुपुत्रानें धृतोग्रकोपानें
मृतसा चि पाडिला तो राक्षस, एका चि तीव्ररोपानें. ३०
मूर्छित होतां राक्षस, तो मागें शीघ्र काढिला सूतें.
कीं पर्वतता घेउनि, देईल चि अशनिता, ढिला सूतें[5]. ३१
भीमें सुयोधनाचें ध्वजकार्मुकखंडन प्रथम केलें.
तच्चापपंचक, लया, कुरुपतिनें मग अनुक्रमें नेलें. ३२
त्यावरि, खंडी त्याच्या शक्तीतें, भूमिप त्रिधा, राज्या !
पविधाराधिक तीव्रा, गमल्या, त्वत्पुत्रपत्रिधारा[6], ज्या. ३३
स्वशिरीं फिरवुनि भिरवुनि रविमंडळ, भीम तो गदा घाली;
कुरुपतिरथीं पडे ती, जेंवि गळां तीव्रभोगदा[7] घाली. ३४
प्रथम उडी घाली क्षितिवरि तव सुत, मग गदा रथावरि ती;
नातरि, हयसूतरथांसह नृपतनु सगरसुतपथा[8] वरिती. ३५
नंदकरथीं, कुरुपति, स्वीकारुनि मानसत्वरा, गेला.
'मेला चि,' सर्व वदले, कीं रुद्रसमानसत्व[9] रागेला. ३६
कर्णें सहदेव विरथ केला, मग खड्ग चर्म ही नाहीं[10]

---

१. धर्में—पंत. २. बळासुरासारखा. ३. पुष्कळ. ४. रात्रिचराने. (राक्षसाने). ५. सुयीतें—पंत. ६. बाणधारा. ७. दुःसह फळ देणारी पापपंक्ति. ८. सगरराजाच्या मार्गास. (स्वर्गपथाते). मागें अ० १६।१०६ वरील टीप पहा. ९. रुद्रासारखा (भयंकर) प्राणी (भीम). १०. नाहींसें केलें—पंत.

तद्यत्नांहीं कष्ट चि मेळविला, जेंवि धर्महीनाहीं. ३७
पूर्वीं जी भीमाची, सहदेवाची हि ती च गति केली,
जन्हि तो परनरकुंजरनिकरीं साक्षान् [1]मृगाधिपतीकेली. ३८
'बाळा! न, विशिष्टांसीं कोणी हि, कधीं हि, करुनि युद्ध, तरे.
'जालासि बहु पृथेच्या लाडें, भावांचिया हि, उद्धत रे! ३९
प्राण चि कुंतीचा तूं; यास्तव केलासि आजि म्यां मुक्त.
जिष्णुकडे जावें त्वां, अथवा कुंतीकडे चि, हें युक्त.' ४०
ऐसें हांसोनि वदे, कुंतीचें वाक्य आठवी, न वधी;
कीं सत्यसंध दाता तो कर्ण महायशा, नव्हे [2]नवधी. ४१
कर्ण शिरे परकटकीं, जैसा जलधींत [3]सुत हिमाद्रीचा.
मग जनमेजयनामकपांचाल्यरथीं च सुत हि माद्रीचा. ४२
सहदेव मनिं म्हणे, 'हा जन तव [4]नुति काय न शिकला? पीडा
ऐसी नसो, असो मृति; पाव प्रणतास, [5]शशिकलापीडा!' ४३
गुरुवरि विराट धांवे, त्यासि रणीं विरथ मद्रपाळ करी,
[6]तदनुजनि शतानीक हि ये, हरिवरि जेंवि चपळ बाळकरी.
त्या हि शतानीकाला, येतां चि रणांत, शल्य तो खपवी.
दे बहु कुरुपतिस, जसा असुरवधें शतमखास, तोख, पवी.
मृतबंधुरथीं बैसे वीरवर विराट, हाक दे, वर्षे.
पर्वत म्हणे, 'न दुर्लभ मोक्ष हि या; काय नाक? [8]देवर्षे!' ४६
कांपे थरथर, सुटतां शल्याचा वज्रसा सुरोप, मही.
बसतां चि उरीं, झाला मूर्छित मत्स्येश तो, सुरोपम ही. ४७
सारथि, तेथुनि मागें त्यासि, म्हणत 'हाय! हाय!' काढी, गा!
शल्य परबळा उडवी, पवन जसा कापसाचिया ढीगा. ४८
शल्याकडे चि रथवर चालविला सर्वखळविलापार्थ,.

---

१. सिंहासारखी क्रीडा करणारा. २. नित्य नवी बुद्धि ज्याची असा, क्षणिकबुद्धि. ३. मैनाक-पर्वत. ४. स्तुति. ५. चंद्रशेखरा शिवा! ६. शल्य. ७. विराटाचा कनिष्ठ बंधु शतानीक. ८. देवासारखा असा हि विराट.

जेणें, स्वसम अजित, या सुयशें, सर्वत्र कळविला पार्थ. ४९
वारिल न प्रळयींचा, पळ ही येवोनि आड, वारा[1]ज्या,
त्यास अलंबुषराक्षस वाराया होय आडवा, राज्या! ५०
विरथ क्षणांत केला, गेला तत्काळ तो पळों शरण.
रुद्र[2]प्रतिवीरासीं करिल तसा काय हो! पळांश[3] रण? ५१
पळउनि पलाश पार्थे, पवनें तरुसे, उदंड, लोळविले.
बोळाविले परलोकीं, बहुतांकरवीं स्वहस्त चोळविले. ५२
नकुळसुतशतानीकें तव नंदन चित्रसेन, जो चुलता,
केला विरथ; न जातां कृतवर्म्या शरण, निश्चयें डुलता. ५३
पाडी वृषसेन, उरीं हाणुनि शर वज्रभासुर, द्रुपदा;
पळवी सूत; म्हणे, 'हा कृष्णा! श्रितवल्लभा! सुरद्रुपदा!' ५४
सोमक[4]चमू पळे घनतिमिरीं ही गमति हित न दीप तिला.
आंधाराला चि भजति, जेंवि असुर शक्रजित नदीपतिला. ५५
दुःशासनें विरथ जों केला प्रतिविंध्य, तों अनुज अवघे
झाले सहाय, कलिजितधर्मा भुज विष्णुचे जसे, चवघे. ५६
शकुनि करी नकुळाला मूर्छित, मग तो नृपा! तव श्याला[6]
पळवी सूत; म्हणे, 'हो थों काळमुखीं न एात वश्याला.[7]' ५७
करिती महारण बळी, शतमख-शंबर-तसे, कृप-शिखंडी.
भैरव[9] वैर वहाती ते, जेंवि महासरीसृप[10] शिखंडी[11]. ५८
कार्मुक[12]कर्तनकुपितें, त्या आचार्यें कृपें, नृपेंद्रहितें,

१. पळाला-पंत. २. शक्राचा प्रतिस्पर्धी जो अर्जुन त्याशी. ३. राक्षस अलंबुष. ४. हा एक पांचाळ राजा. ५. इंद्राच्या वज्राने वृत्रासुराचा वध केल्यानंतर, त्याचें रक्षण करणाऱ्या कालेयनामक दैत्याचा देव वध करू लागले असतां असुर समुद्रांत पळून गेले. पुढे विष्णूच्या मसलतीनें देवांच्या विनंतीवरून अगस्त्य ऋषींनी समुद्राचें प्राशन करून तो रिता केला व मग देवांनी त्या कालेयदैत्याचा वध केला, अशी कथा आहे. ६. मेहुण्याला. ( शकुनीला ). ७. या वश्याला इत्यन्वयः-पंत. ८. शंबरासुर. ९. भयकर. १०. सर्प-पंत. ११. मोर. १२. धनुष्य तोडल्यामुळें रागावलेल्या ( कृपें ).

केला मूढ शिखंडी; युद्ध बहुत मानलें सुरांस हि तें. ५९
तेव्हां इकडिल तिकडिल, झाले बहु, युद्धभूमिवर कडवा;
केलें त्वां मसण कुरुक्षेत्र; असे शुद्ध भूमि वरकड बा! ६०
धृष्टद्युम्न गुरुवरि, द्विरदावरि सिंहसा, उठे रागें.
पांडव, पांचाळ, सकळ रक्षाया त्यासि धांवले मागें. ६१
द्रोणातें रक्षाया सबळ तुझे पुत्र सर्व ही जपले.
खपले ते खपले चि; प्रभुजि! बहु बरे च शेष ही टपले. ६२
सेनासमूह गमले अन्योन्यजिगीषु दोन अर्णवसे.[1]
धृष्टद्युम्नसमीप चि सात्यकि, गुरुच्या समीप कर्ण वसे. ६३
प्रथम चि धृष्टद्युम्ना दे, सोडुनि बाण, विप्र तापातें;
कीं खंडी चापातें, पापातें जाणवि प्रतापातें. ६४
वाटे, 'वधिल चि गुरुला,' जें कोपें सज्ज तो नव धनु करी.
क्षितिसि नखांहीं हरि, जों करिच्या चित्तांत ये न वध, नुकरी.[3]
सोडी घोर शर, तया बहु भ्याले; कुरुषमुखकळा वदले;
'समरे द्रोणायास्तु स्वस्ति!' असें देव दानव हि वदले. ६६
कर्णें द्वादशधा तो केला, जैसा अही नभोगामी,
तें पाहुनि रोमांचित झालों, राया अहीनभोगा! मी. ६७
द्रोण द्रौणि सुयोधन कृतवर्मा शल्य शकुनि हे सारे,
युगपत् ताडिति; म्हणती, 'हूं! मारा दुष्ट सर्प, ठेंसा रे!' ६८
युगपत् सर्वांचीं ही, द्रुपदात्मज, सकवचें उरें भेदी;
आधीं द्रुमसेनाचें मस्तक, मग कर्णकार्मुक, छेदी. ६९
पुच्छाचे हरिस तसें, धनुचें, कर्तन, असह्य कर्णास;
प्राशिल त्यास गमे तो सिंधूच्या जेंवि घटज अर्णास. ७०
सक्रोध योधमणि तो, शीघ्र करुनि सज्य कार्मुका सारें,

१. परस्पराना जिंकण्याची इच्छा करणाऱ्या समुद्रासारखे. २. गुरुघ्न-पंत. ३. उकरीत नाहीं. ४. युद्धांत द्रोणाचें कुशल असो. ५. महाभागा-पंत. ६. एकदम. ७. अगस्त्य. ८. उदकास. ९. वीरश्रेष्ठ. १०. श्रेष्ठ, दृढा-पंत.

धृष्टद्युम्ना अरिवर, करि वरशरवृष्टि वार्मुकासारा. ७१
तों सात्यकि कर्णावरि, वासव बळिवरि जसा, तसा आला;
झाला दारुण रण; सम गमले; कोणास कोणि हि न भ्याला.
अस्त्रें त्वत्पुत्रांचीं, कर्णाचीं हीं, निवारिलीं क्रोधें.
वृषसेन पाडिला, शर हाणोनि उरांत, त्या महायोधें. ७३
सुतशोकतप्त होउनि, सात्यकिसीं कर्ण करि महायुद्ध;
शुद्धयशा वृषसेन हि झाला, तितुक्यांत त्या रणीं, बुद्ध. ७४
सात्यकिला दाखवितां, ते वृष-वृषसेन बाप-लेंक, बळ;
म्हणती, 'काळमुखीं हो रिपुवपु, कीं देह आपलें, कबळ.' ७५
सात्यकिनें सहसा त्या दोघांचे ही सुबाण सोडून,
तत्काळ पाडिले हो! सहहस्तावाप चाप तोडून. ७६
ते सात्यकितें म्हणती, शर सोडुनि, सजुनि चाप नवे, दोघे,
'अभिमन्युचा म्हणे, मग कां 'हाय!' तुझा चि बाप न वदो? घे?'
सात्यकिसीं रण करितां, ऐकुनि गांडीवनाद, कुरुपातें
कर्ण म्हणे, 'हा येतो जय, साधाया स्वकार्य गुरुपातें. ७८
त्या सौभद्रापरि हे सात्यकि पांचाळ वेढिले असती
बहु; आम्हीं देतों या दोघांला आजि यमपुरी वसती. ७९
पार्थास कोंडिले, हे दोघे आम्हीं, असें न समजावें.
तिकडे चि त्यासि समरीं रोधाया, बळ समुद्रसम जावें.' ८०
हें प्रियहितामित्रवचन परिसुनि, नृप शकुनिला म्हणे, 'मामा!
नामा अन्वर्थ करा, शीघ्र उडा, सफळ या करा कामा. ८१
देउं न कां, सांपडतां अमिलें पशु कचीस, मान होमा मीं?
जा वासविवरि; मान्या देवींत शचीसमान हो मामी. ८२

१. वारिदासारखा–**पंत**. २. सावधान–**पंत**. ३. कवळ–ग्रास. ४. धनुष्याची दोरी लागू नये म्हणून केलेले चर्माचें हस्ताच्छादन ( हातमोजा ) त्यासह. ५. आमुचे शर मरायाकारणे घे–**पंत**. ६. अर्जुन–**पंत**. ७. द्रोणपतनाने. ८. सार्थ. (शकुनि म्हणजे पक्षी). ९. का न देवू–**पंत**. १०. दुर्मिळ–**पंत**. ११. कचाटीस.

अयुत गज, अयुत रथ घे, जे साक्षात् सिंह परमहेभाचे;[1]
दुःशासनादिक दिले तुज, समरसहाय परम हे भाचे. ८३
त्या पांडुसुतां, असुरां हरिसा, सोडूनि उग्र शर, भाजीं.
तीं सत्वें[2] कवण यशें ख्यातें होतिल, वशें न शरभा जीं?' ८४
धा बहुमानें फुगला, गेला धावोनि अर्जुनावरि तो,
ज्याचा, सुकृती, मरणा, कीं कुकृती, शत्रु, अर्जुना[3] वरितो. ८५
जाउनि धनंजयावरि, झाले, भट सर्व शलभसे, नाहीं.
कैसा तरी करावा, सिंहाचा भंग कलभसेनाहीं? ८६
शकुनि विरथ होय; बसे, वर्णे[4] जपत ऱ्यारि[5] पुत्रयानीं च.
'भंगिन' म्हणे 'परास,' न जितुनि मर्मांच्या रिपुत्रया[6] नीच.

# अध्याय एकोणिसावा.

*रविच्या, चहुंकडुनि तमें, मंदप्रभ नै, कर, वेढिलो, होतो;
सात्यकि तसा चि कौरवकटकाला न करवे ढिला हो! तो. १
अर्जुन तसा चि सात्यकि, बहु मारुनि, शेष कुरुकटक पळवी.
पळ वीर पुढें न उरे; सर्वांचीं हीं मुखें रणीं मळवी. २
सात्यकिला माराया, खात चि धांवे तुझा तनय शांत;
परि होय विरथ; याचें प्रागल्भ्य तुम्हां अशां अनयदांत. ३
होउनि विरथ, सुयोधन, कृतवर्मरथीं चढे कढे कोपें.
सोपें द्यूत चि; परिभव वीरांचा कठिन संगरीं लोपे. ४
क्रोधाविष्ट सुयोधन वदला राधासुतासि, परिसा तें.
गुरुतें हिं दोष लावी, खापर, बा! परम जीवें परिसातें.. ५
"; वधितां जयें जयद्रथ, समर तुम्हीं च स्वयें प्रवर्तविला;

---

१. शत्रुरूप महागजाचे. २ प्राणी. ३. तृण मुखीं धरितो-मंत. ४. 'पार्थ मरो,' 'पार्थ मरो' असा जप करीति-पंत. ५. काम, क्रोध, लोभ-पंत. ६. अन्यायवर्ती जे त्यांत. * कवीने याप्रमाणे मूळांत अन्वयांक दिले आहेत.

कदन उगें चि पहातां कां स्वोत्साहप्रवाह पर्तविला? ६
शक्त असोनि, निरखितां निजकटककदन, अशक्तसे पैरसे[1].
चाळवितां हि ने[2] बेटा, केले आर्द्रे[3]धनें जसे पैरसे[4]. ७
समयीं सोडावें मज ऐसें तुमच्या मनांत जरि होतें,
'जिंकूं पांडुसुतांतें,' ऐसें वदलां कशास तरि हो! तें? ८
जरि भरवसा न देतां, पडती बुद्धीस भूल काशाला?
येतें तुम्हांसि भाषण बहु नीरस, जेंवि फूल काशाला[5]. ९
जरि ठेवितां कर श्रुतिवरि, करितों वैर हें कशाला हो!?
परिभूति रुचे कवणा? बाळ हि न म्हणेल, 'वपु कशा लाहो[6].'
करणें नसेल माजा त्याग, यश चि बहु गमेल जरि शुद्ध,
तरि व्हा सिद्ध, करा निजशस्त्रास्त्रपरा[7]क्रमानुगुण युद्ध." ११
मौन चि धरिलें; द्यावें उत्तर बा! त्यास काय काय तिहीं?
न दुरुक्ति मनिं धराव्या सुजनाहीं, जेंवि बायका यतिहीं. १२
पांडवकटकीं शिरले क्रोधी गुरु, कर्ण, करिकुळीं हरिसे.
जाले दुःसह सर्वां ते काळ प्रळयपावकांसरिसे. १३
बहु वधिले वीर रणीं, बहुत पळविले कुलीन योध रणीं;
धर्म म्हणे, 'परतावें; जालु, करा माउली न यो, धरणी.' १४
विजय म्हणे, 'श्रीकृष्णा! भ्याला प्रभु धर्मराज कर्णाला;
जेंवि महादृष्टिविष हि अहि, मर्हिवरि देखतां सुपर्णाला[8]. १५
मज हा परिभव दुःसह, लावियला जेंवि पाय सापाला;
ने रथ, मीं यासि वधिन, विषतरुच[9] प्रभुसि कायसा पाला?'
कृष्ण म्हणे, "बा! दीनां माघ हि दे कंप न जितका शीतें,
तितका देतो; यश हा राहो देईल न जितकाशी[10] तें. १६

१. परक्यासारखे. २. पेटत नाहीं. ३. ओल्या काष्ठानें. ४. आगटी. ५ कोशनामक तृणाला. ६. आंगी चाबूक बसो—**पंत.** ७. आपल्या शास्त्रादिकान योग्य असें. ८. गरुडाला. ९. माघमहिना. १०. हा जितकाशी इत्यन्वयः—**पंत** ( जयानें शोभणारा )

तूं एक, कीं घटोत्कच, आम्हांत समर्थ कर्णमदनाशा;
विफळा करो पराशा भीमतनय, जेंवि रुद्र मदनाशा. १८
कीं प्रियसख्या! असे त्यापासीं ती दिव्य शक्ति माधवनीं[1].
कर्ण रणीं कांपवितो बहु मज, वृषभासि जेंवि माघ वनीं. १९
'ने' म्हणसी, काय तुला गमला हा वासुदेव वेडासा?
वाम अकार्यक्षम हीं भुज, भुजगमुखीं न देववे डासा. २०
बा! जें स्वयें करावें, तें सुमहत्कार्य जरि सुतें केलें,
तरि त्यांत सत्यसंधत्व, स्वयश, व्यर्थ काय गा! गेलें?" २१
'वत्सा घटोत्कचा! ये,' ऐसें तो पुष्कराक्ष[2] जों बाहे,
वाहे नरनारायणचरणीं मस्तक, पुढें उभा राहे. २२
'हा आलों; मज आज्ञा काय?' असें राक्षसेंद्र वदला, हो!
कृष्ण म्हणे, 'वत्सा! हो कर्णांतक; धर्म राज्यपद लाहो.' २३
शस्त्रास्त्रराक्षसासुरमायाबलजलधि पुत्र तूं पहिला;
कर्णाद्यरिक्षय करुनि, साधुनि दे निजपित्यांसि या महिला.'
जिष्णु म्हणे, 'सत्पुत्रा! हो गुहसा[3], सूतपुत्र[4] तारकसा[5];
आम्हां तूं ज्येष्ठ; तुझे प्रतिविंध्याद्यनुज पांच तार कसा.' २५
राक्षस म्हणे, "बहु बरें; मारीन रणांगणांत कर्णातें.
सुरवर कवींस म्हणतिल, 'रक्षःकृत कर्णकदन वर्णा तें.'" २६
आज्ञा द्याल तुम्हीं, तरि देइल गुरुला हि हा निधन दास.
रात्रौ मजसीं भिडतां, होईल प्राप्त हानि धनदास[6]." २७
ऐसें वदतां, त्यातें कर्णावरि कृष्ण पाठवी राया!
देती भिवोनि कौरवसेना समरांत पाठ, वीरा या. २८
त्यावरि अलंबुष खचर कुरुराजें धाडिला जटासुरज;
त्यास घटोत्कच मारी; त्या वायुपुढें महाभटासु रज.. २९
कुरुपतिरथीं अलंबुषशिर ठेउनि भीमसूनु पाय नमी;

१. इंद्राची–पंत. २. कमलनयन. (कृष्ण). ३. कार्तिकस्वामीसारखा. ४ कर्ण. ५ तारकासुरासारखा. ६. कबेरास.

विनयें म्हणे, 'पहाया आलों, आणूनि हें उपायन मीं.' ३०
वर्षे दुजा अलायुध रात्रिचर महोपलायुधग्रामा.
पीडी भीमास हि; घननाद जसा खलबलायुधग्रामा. ३१
कृष्णें घटोत्कच रणीं रक्षाया भीमसेन आठविला.
रामें घननादावरि लक्ष्मणसा, तो बळाब्धि पाठविला. ३२
वैद्युतपावक तरुला, तैसा तो त्या अलायुधा कवळी.
लावी बहु, कुरुकटका त्याचें नाशुनि बलायु, धाक बळी. ३३
त्याचें हि शिर तसें चि, त्वत्तनयाच्या रथीं च तो पाडी;
एका कर्णावांचुनि सर्वांचा शौर्यधैर्यमद झाडी. ३४
प्रकटी बहुशत दुस्तर माया तो वीर्यमत्त मायावी.
कुरु म्हणति, 'यापुढें तों न जयश्री देवसत्तमा यावी. ३५
शंबर शंभर हि उणे, वाटे कांहीं च न मय मायावी;
अत्युग्रता कधीं हि न भीमाच्या सूनुसम यमा यावी.' ३६
कौरव कर्णासि म्हणति, 'राक्षस हा स्पष्ट कल्पनटशील;
किति भुजबळें तराया दुस्तरगरसागरासि, झटशील? ३७
नेणे कांहीं च असा मायाशस्त्रास्त्रबळविलास मय.
बा! सेतटील, येणें आम्हां सर्वांसि कळविला, समय. ३८
बहु मारिले, पहा, हा मारिल उरल्या बळा समस्तातें.
केलों अशेष अंध चि आम्हीं, डोळस हि, या तमस्तातें. ३९
तीं ईश्वरें जसी त्या महिषावरि योजिली महाशक्ति.
त्वां या घटोत्कचावरि योजावी वासवी महाशक्ती. ४०
भीम-धनंजय करितिल काय? न ते मानुषाद मारावी.
या वीर वधिल जो, त्या विजयश्री निश्चयें चि बा! यावी.' ४१

१. नजराणा. २. राक्षसविशेष. ३. महापाषाणरूप आयुधसमूहा. ४. शत्रुसैन्याचे आयुष्य जाळणाऱ्या रामास. ५. विद्युत्संबधी अग्नि. ६. शबरासुर. ७. कल्पांतीं नर्तन करणाऱ्या शिवासारिखा. ८. दुस्तर विषसमुद्रास. ९. अंधकाराचा बाप च अशा (काळ्याकुट्ट) घटोत्कचाने. १०. देवी. (पार्वती). ११. मनुष्यभक्षक.

त्या भीताभयदाच्या[1] हे भीतप्रार्थना मना आली;
झाली कल्पलतेची, सद्रीति करूनि कामना, आली. ४२
खचरशतघ्नीनें[2] हय वधिले होते, तशांत सुचवीलें;
तें भगवत्संकल्पें कोपें ही तन्मनास रुचवीलें. ४३
कर्णें शक्तिस, जैसा सुरराजें, घालितां चिं कर, पविला,
गिरिसा गुरु कठिन हि,तो खचर, त्रासें मनांत करपविला.
क्षिप्र पळे, विंध्याकृति[3] होय, भरे भीत खचर तो खांत[4].
तद्धृदयीं शक्ति, शिरे, कौरवबळचित्तवृत्ति तोखांत. ४५
राक्षसवक्ष विदारुनि, मागें नाहीं च शक्ति ती फिरली.
ऊर्ध्वपथें, परमप्रिय तें स्वामीला[5] कथावया, शिरली. ४६
मरतां हि, पांडवप्रिय अद्भुत केलें घटोत्कचें, परिसा.
सन्मस्तक डोलेसें, पितृहित न करील पुत्र तो अरिसा. ४७
पितृहित किमपि न घडलें, धरुनि मनामाजि भाव हा त्रि, रडे.
करुनि बृहद्देह[6] पडे, तें कुरुकटकैकदेश बा! चिरडे. ४८
गुरुशवभारें[7] कौरवसेना अक्षौहिणी च तो खपवी,
तेजस्वी सुत जनका दे जेंवि, हरिस न तेंवि तोख पवी. ४९
शक्र जसा वृत्रघ्नध्वीं सुरसिद्धमहर्षिसाध्यधीराहीं
स्तविला, घटोत्कचवध्यीं कर्ण तसा कौरवादिवीराहीं. ५०
बसुनि नृपरथीं, स्वबळीं गेला, कांपवित कर्ण वसुधेतें,
साधुनि सुकीर्तितें, सुरपति जेंवि मथूनि अर्णव सुधेतें. ५१
दुंदुभिपणवप्रमुखें वाजविती, जे प्रवीण ते, वाद्यें.
श्रित हर्षविले कर्णें, जैसे रामें समस्त देवाद्यें. ५२

---

१. भिणाऱ्यास अभय देणाऱ्या कर्णाच्या. २. राक्षसानें [ फेंकलेल्या ] शक्तीनें. ३. विंध्यपर्वताएवढा देह ज्याचा असा. ४. आकाशांत. ५. इंद्राला ६. प्रचंड देह. ७. [ आपल्या ] प्रचंड प्रेताच्या भारानें.

# अध्याय विसावा.



पांडव, घटोत्कचवधें अति दुस्तरशोकसागरीं पडले.
अभिमन्युवधीं जैसे, सोडुनि धृतिला, तसे चि ते रडले. १
भेटे[1] जयासि, हांसे दिसति नभीं जों मयूख[2] दशनाचे[3];
हरिसा गर्जे, होउनि आनंदाच्या भरासि वश, नाचे. २
निर्धन, निधिच्या, जैसा पावे अत्यंत हर्ष, लाभानें,
वाटे तसा चि भगवान्, त्यजिला, अत्यंत हर्षला, भानें. ३
पार्थ म्हणे, 'गोविंदा! कारण या कोण हर्षहास्याला?
धृतराष्ट्राच्या, व्हावा अस्मच्छोकांत हर्ष हा, स्याला[4].' ४
भगवान् वदे, "प्रियसख्या! शक्ति अमोघा घटोत्कचीं पडली.
बा! कधिं हि न च घडावी जी, सुमहत्कार्यसिद्धि ती घडली. ५
वरकवचकुंडलार्पण[5] करुनि, महाशक्ति जोडिली होती,
अर्जुनजी! न तुम्हांवरि, अल्पाविषयीं च, सोडिली हो! ती. ६
कर्ण निमाला चि, असें जाण सख्या! निश्चयें चि तूं. जरि हा
असता शक्तिकर[6], दुजा अरिहा स्वामी[7] च म्हणविता तरि हा. ७
याच्या आंगीं वसतें कवच, झळकतीं सुकुंडलें कानीं,
तरि हरिलें असतें, धृतराष्ट्राच्या, अमृतकुंड लेंकानीं. ८
शक्र, यम, वरुण, धनपति, जिंकुनि तत्कीर्ति कर्ण वरिता हो!
केला शिवप्रसादें हा, घटजें जेंवि अर्णव, रिता हो! ९
असता सकवचकुंडल, तरि कर्ण, सख्या! जगत्रयीं अमर;
तूं गांडीवें, मीं हि न चक्रें शकतों करावया समर. १०

---

१. [ कृष्ण ] अर्जुनास भेटे. २. किरण–**पंत.** ३. दांताचे. ४. दत्यादिरपि दृष्टः–**पंत.** ( 'श्याल'–मेहुणा ह्या शब्दांतील तालुस्थानच्या 'श्या' च्या ऐवजी दंत्य 'स्या' हि आढळतो ). ५. ह्या कर्ण. ६. शक्ति आहे हातीं ज्याच्या असा. ७. स्कंद–**पंत.**

हृतकवचकुंडलास हि पाहुनि, समरीं भ्रमेल वासवघ्नी.
सत्य शपथ करितों, तो न त्वदितर, जो सुवीर, यास वधी.
जेव्हां चक्र बुडेल[1] श्वभ्रीं, बहु संकटीं वृष[2] पडेल,
होइल असावध, तुला याचा तेव्हां चि बा! वध घडेल. १२
मागध, चैद्य हि, वधिला म्यां योगें, कीं न हो तुज विषाद.
[3]व्यंगुष्ठ करविला म्यां गुरुकरवीं एकलव्य हि निषादें[4]. १३
योगबळें म्यां चि सख्या! आजि अलायुध, घटोत्कच हि वधिले;
पूर्वीं हिडिंबबकमुख बहु, हे गरशर[5] चि काळिजामधिले. १४
दुर्योधनासि मिळते मगधपतिप्रमुखवीरवर जरि ते,
धरिते बळ, रण करिते, अरितेज समस्त सर्वथा हरिते. १५
काळें राहु, गिळाया योजावा, वीरसत्तमा! रविला,
तेंवि वृषावरि योजुनि, म्यां राक्षस वीर्यमत्त मारविला. १६
कर्ण न वधिता तरि, मज मारावा लागता चि हा चक्रें.
कीं ब्रह्ममखद्वेष्टा; वधिला जाता न संगरीं शक्रें[6]. १७
आजिवरि, तुम्हांकरितां म्यां हा राक्षस उपेक्षिला होता;
हो तारक या तुमचें दास्य; रणमखीं हि जाहला होता[7]. १८
धर्मद्वेषिवधाची रक्षिलि नाहीं जरि प्रतिज्ञा ते,
ध्यातिल, गातिल, नमितिल, शमितिलक[8] म मज हरिप्रति ज्ञाते.
न धरीं विषाद, कसविन नाकीं मेले सुयोध नवधामीं[9];
कथिन उपाय वृषवधा तुज, भीमास हि सुयोधनवधा, मीं. २०
पर लब्धलक्ष[10] जाले, हे हरिसे गर्जतात, सितवाहा!
हीं पळताल स्वबळें; चाल, म्हणायास लाव कीर्तवा, 'हा!'[11]" २१
धृतराष्ट्र म्हणे, 'कोण्हीं पुत्राला हित नसे चि सांगाया.

---

१. भूछिद्रामध्यें. २. युक्तीनें. ३. अंगुष्ठहीन. ४. भिल्ल. ५. विषारी बाण. ६. मत्सकल्पें चि शक्तिनें वधिला; न शक्रसामर्थ्यानें, असा अर्थ—**पंत.** ७. युद्ध ही केलें हे ही तारक होऊ—**पंत.** ८. तपस्विश्रेष्ठ. ९. नव्या गृहीं. १०. ज्याना छिद्र प्राप्त झालें आहे असे. ११. दुर्योधनास 'हा!' म्हणाया लाव—**पंत.**

पार्थी शक्तिप्रेरण कथिलें नाहीं तुवां[1] हि कां गा! या! २२
पाचारितां रणमखीं जावें, हें व्रत नव्हे वृथा ज्याचें,
प्रथम चि हटकुनि केलें कां न वृषें भस्म त्या पृथाज्याचें[2] ? २३
साधाया स्वार्थातें, करितो मानूनि जन कपट हितसें.
ईश्वर होउनि लोकीं आचरतो केंवि कनकपट हि तसें ? २४
श्ववराहरणीं[3] जैसा श्वपचालों[4] लाभ निश्चयें आहे,
कृष्ण तसा स्वार्थातें राक्षसराधेयसंगरीं पाहे.' २५
संजय म्हणेः–पृथेच्या, वृष करिता भस्म आज, तनयाला;
लोभी निधिला तैसा, प्रभु करितो बहुत बा! जतन याला. २६
'पार्थी शक्तिविमोक्षण कथिलें नाहीं तुवां हि कां गा! या?'
म्हणतां, तरि कर्णाला, चुकलों नाहीं च मीं हि सांगाया. २७
कर्णासि रात्रि शिबिरीं दुःशासन शकुनि नृप हि विनवीती.
जी जयवधप्रतिज्ञा, सांगावी काय नित्य हि नेवी[5] ती ? २८
कर्ण म्हणे, 'वर[6] देउनि, मग मागें काय मीं कवि सरेन ?
शक्ति उद्यां पार्थावरि टाकीन चि निश्चयें न विसरेन.' २९
न जय वधावा, कृष्ण चि; त्याविण ते सर्व काय पांगूळ.
हें चि बहु सरस अमृत त्यजुनि, रसिक वरिल, काय पां गूळ!
चवघांत करिल अजित ग्रि त्यास, सखित्वें जयास वरिल, हरी;
तो चि अमर, अमृताचा निधि सोडिल ज्या परासुवरि लहरी.
तस्मात् प्रातःकाळीं कृष्ण चि, सोडूनि शक्ति, मारावा.
यूथप वधितां, हरिच्या, कैसें साहेल यूथ, आरावा[7] ? ३२
ऐसा दृढतर निश्चय शिबिरीं व्हावा, जसा जप, दिसवडें[8].

---

१. त्या संजयाने. २. अर्जुनाचे. ३. यथा वराहस्य शुनश्च युध्यतो स्तयोरभावे श्वपचस्य लाभः । मन्ये विद्वन्वासुदेवस्य तद्वद्युद्धे लाभ कर्णहैडिंबयोर्वै ॥ इति मूले–पंत. ( याना अर्थ वरील मूल आर्येंत च आहे. ) कुत्रा आणि डुकर यांच्या युद्धांत. ४. अंत्यजाला. ५. नित्य नवी पार्थवधप्रतिज्ञा कर्ण करी, ती आता काय सांगो–पंत. ६. 'अर्जुनास मारीन' असा–पंत. ७. सिंहगर्जनेला. ८. दररोज.

न, रणीं राहे, पाहे, पारा वारा[1] तसा, सपदि[2] सवड. ३३
वधबुद्धि युद्धकाळीं मोहे चि, न सावधान राहे ती.
कृष्ण हृषीकेश धरूं देईल कसा वधा[3] नरा[3] हेती? ३४
योजी इतर; म्हणे, 'जय अरिदृष्टिपुढें न सर्वथा राहो.'
ऐसें सख्यास रक्षी, प्रभुवर होवूनि सर्व थारा, हो! ३५
ऐसा श्रितरक्षणपटु जो, म्हणतो सेंद्रनाक[4] थारा ज्या,
त्या चक्रधरप्रभुच्या हननाची काय गा! कथा राज्या!? ३६
सात्यकि कृष्णासि म्हणे, 'प्रभुला विज्ञापना असी माजी,
पार्थीं न टाकिली कां शक्ति वृषें, धरि बळा असीमा जी?' ३७
कृष्ण म्हणे, 'शैनेया! म्यां कर्ण भ्रमविला, वृकासुरसा.
भक्ता मीं बहु जपतों, जपतो शतमख जसा सुधासुरसा[5]: ३८
पथकरिलें, चालविलें, आपण हें जतन, यान, राखावें.
त्या उग्रशक्तिनें या कुंतीच्या न तनया नरा खावें. ३९
वसुदेव-देवकी-बलदेवादि तुम्हीं समस्त मत्प्राण;
जाण, प्रिय पार्थ जसा, न तसा कोण्हीं, खरें, तुझी आण. ४०
व्यसनीं, रक्षिन, बुडतां आधीं पार्था; तसा न भक्ता मीं.
या मित्रीं मत्प्रेमा निश्चळ, उपमन्यु जेंवि भवनामीं[6]. ४१
जाला सजीव हा, व्यसु होउनि; लाभासि या नसे जोडा.
मज वाटे प्रद्युम्नप्रत्यागमनप्रहर्ष[7] तो थोडा. ४२
अर्जुन मूर्धा[8]; याच्या नाशें होईल आपुला घात;
बा! तत्काळ घटोत्कच हा म्यां केला परापुढें हात.' ४३

---

१. परिशिष्ट पहा. २. तत्काळ—**पंत.** ३. वधार्थ नराम शस्त्र कसा धरू देईल? —**पंत.** ४. इद्रासह स्वर्ग. ५. परिशिष्ट पहा. ६. शिवनामीं. ७. प्रद्युम्न परत आल्याचा मोठा हर्ष. ( कृष्णपुत्र प्रद्युम्न यास शंबरासुराने चोरून नेलें होते; परतु पुढें त्या शंबरासुरास मारून तो परत आला, वगैरे भागवती कथा येथे अनुसंधेय आहे). ८. अर्जुन हे आपलें मस्तक आहे.

यापरि सात्यकिकेशवसंवाद श्रवण करुनि, समुदा[1] या
सूतासि[2] बोल लावी नृप[3]; निंदी सुतमुखाप्तसमुदाया. ४४
'होतों कृतार्थ, जरि ती गोविंदीं शक्ति सोडिली असती;
गेलों कीं हातींची; सर्वस्वें जेंवि जोडिली असती[4].' ४५
सूत म्हणे:–स्वामींचें जें मत, ऐसें चि आमुचें; परि तें
जालें विफळ; कपाळ, प्रभुजी! तुमचें चि घात हें करितें. ४६
भलत्या[5] कृष्णीं टाकिन शक्ति, असा वृषविचार करि पक्क;
नित्य म्हणे, 'सिंहोऽस्मि, श्वस्त्वं गंतासि कृष्णकरिप[6] क्क?' ४७
योजावें तें समयीं आम्हां कोण्हां न आठवावें हो!
दैव प्रभु[7]; अष्टांगुल जें, त्यासि म्हणेल, 'आठ वावें हो.'[8] ४८
गतशोक कशास? पुरे. होउनि सावध, पुढील परिसा, हो!
गुरुवधवृत्त सुदुःसह, बहु तुमचें हृदय मृदुल परि, साहो. ४९
भीमाला, जयमत्तद्विषिकटकमर्दनासि[9], पाठउनी,
राजा[10] रडे, घटोत्कचकृत बहुसेवोपकार आठउनी. ५०
कृष्ण म्हणे, 'विकळत्वा अनुचित तूं धीर शुद्ध समयज्ञ;
सोडुनि शोक करावा समर; नसे श्रेष्ठ युद्धसम यज्ञ.' ५१
धर्म म्हणे, 'बहु दुःसह सदपत्यवियोग विषम हा देवा!
मज वाटे, न गिळेल चि सदपत्यवियोगविष महादेवा. ५२
वत्सें घटोत्कचें बहु केलें, होउनि वनांत नत, दास्य;
गुरुवत्सळांत[11] खाली जालें या त्रिभुवनांत न तदास्य[12]. ५३
जी सहदेवीं, ती च प्रीति, मुकुंदा! घटोत्कचीं माझी.

१. आनंदित अशा. २. संजयास. ३. धृतराष्ट्र. ४. व्यभिचारिणी. ५ कृष्णावर किंवा अर्जुनावर. ६. [ कर्ण ] नित्य म्हणे, 'हे कृष्णरूप हस्तिश्रेष्ठा' तू उद्यां कोठें जाशील? मी सिंह आहें.' ७. समर्थ. ८. हस्तगत अतिनिकट हि जे वस्तु त्यासि बहु दूर करिते–**पंत.** ९. जयप्राप्तीमुळें उन्मत्त अशा शत्रुसैन्याच्या मर्दनास. १०. धर्मराजा. ११. वडिलांच्या ठायीं प्रीति करणारांत. १२. त्या घटोत्कचाचें तोंड.

बा! जीवदान दिधलें विजयासि, मरोनि सेवटीं आजी. ५४
आम्हीं तुम्हीं हि नव्हतों, अरिनीं अभिमन्यु मारितां जवळ;
जिष्णुसमक्ष कसा हा, जाला, त्या शक्तिच्या मुखीं, कवळ?
अभिमन्युघातकारण ते मुख्य द्रोण-कर्ण सोडून,
काय मिळविलें स्वल्पागस्कृतसैंधवशिरासि[1] तोडून? ५६
न बहु मम प्रिय केलें, मारूनि जयद्रथा अधन्या या;
कर्णाचा कीं गुरुचा, करितां तरि मानता, वध न्याया[2]. ५७
ते हे प्रवर्तले वृष गुरु अहि, शरगर वमून, भाजाया;
कैसें साहों, पाहों? कीं भर्ता मी, चमू न भाजा[3] या? ५८
पाठविला भीम, मथुनि बळ गुरुला हीं रणीं मथिल आजी;
मीं कर्णावरि जातों. तो मृत, कीं हा, तुम्हां कथिल, आजि.'
ऐसें बोलुनि, कोपें कर्णावरि नीट धावला राजा;
मागुनि हरि हरि हांकी; तों झाला प्रकट त्यापुढें आजा. ६०
व्यास म्हणे, 'बा धर्मा! क्रोध सिवार्थीं करूं नको; परंत.
सावध हो; बा! व्यसनीं पडतो, साहस करून, कोपरत. ६१
जरि कर्णार्जुन भिडते तरि समरीं सकळ योजिते शस्त्रें;
परमास्त्रज्ञ धनंजय, राधेयाची निवारिता अस्त्रें. ६२
त्या शक्रशक्तिनें जरि पार्थीं वृष टीकिती, कसें होतें?
व्यसन, तरंडकभंगें[7] होय समुद्रीं जसें, तसें हो! तें. ६३
सर्वस्वांत चुकविला जेणें, तो कां नको पलाशांत?
हें किति? गा! बा, वधितां शतमिततोकां[10], न कोपला शांतें[11].
काळें वधिला राक्षस; ती शक्ति निमित्तमात्र, हें साचें.
भावंड बुद्बुदाचें[12] वपु, अतिनिःसार, मित्र फेंसाचें. ६५

---

१. स्वल्प पातक करणाऱ्या जयद्रथाचें शिरास. २. न्याय्य होता—**पंत.** ३. भार्या. ४. संग्राम—**पंत.** ५. घोडे. ६. व्यास. ७. नारवाच्या भगानें. ८. सर्वस्वाचा नाश. ९. घटोत्कचाचा नाश. १०. शंभर पत्‍नीचा(?) पत्नना. ११. वसिष्ठ—**पंत.** १२. पाण्यावरील बुडबुड्याचें.

विकळत्वें यश, पात्रच्छिद्रें पीयूषसें, न सांडावें;
मांडावें निजधर्मानुष्ठान तुवां; असें चि भांडावें. ६६
पंचम दिवसीं, धर्मा! होइल सकळा हि हे तुझी वसुधा.
लोकत्रयीं बहुमता कीर्ति हि, बहु तृप्तिहेतु, जीवसुधा.[1] ६७
सांगुनि हित, अंतर्हित जाला तो वेदखगनभ[2] व्यास,
ज्याच्या पदरेणुपुढें, पटु द्याया देवनग न, भव्यास. ६८
मग, 'सफळ हो पितृमनोरथ!' पंचमवेदें[3] पाठ वीरा जा*,
ऐसें म्हणोनि, गुरुवरि धृष्टद्युम्नासि पाठवी राजा. ६९
तैसें चि परबळातें विजयाद्यखिलांसि पाठवी, रगडी;
आम्हांकडील हि सकळ, देती न रिपूंसि पाठ, वीर गडी. ७०
रात्रिरण परम दारुण, मेले बहु लक्ष योध यामाजि;
जाली, जरि त्रियामा, तरि अतिघोरा सहस्रयामा, जी.[4] ७१
जाले निद्रांध सकळ भट, न वधिति शत्रु, जवळ राहुनि जे;
अत्यद्भुत तें वाटे, मिळतां हि सुधांशुकवळ, राहु निजे. ७२
पार्थ स्वपरांसि[5] म्हणे, 'स्वस्थ निजावें तुम्हीं, न पेंगावें.
मग यश शशिप्रकाशें[6] जोडावें, जें महातपें[7] गावें.' ७३
त्या अभिमतवरदानें पार्थासि स्वपर सर्व मानवले;
दुष्काळीं क्षुधितांतें जाणों दिधले यथेष्ट कानवले. ७४
अश्वीं, रथीं, गजीं जे जेथें होते तसे चि ते निजले;
क्षतदें, जयसाधुत्वप्राप्तप्रेमाश्रुजळभरें, भिजले. ७५
शोभे बळ, जेंवि लिहीं, चित्रपटीं रंग अर्जुन, चितारी;
व्यसनीं स्वपरांस हि सम तो सभ्रींरंग अर्जुन चि तारी. ७६

---

१. जीवाची सुधा–**पंत.** २. वेदरूप पक्ष्यास आकाशरूप असा. ३. कार्मुकवेद–**पंत.** ४. जी त्रियामा ( रात्र ) जरी त्रियामा ( तीन प्रहर आहेत जीत अशी ) [ तरी ] अतिघोरा [ अतएव ] सहस्रयामा जाली. ५. आपल्या व शत्रूच्या लोकांना. ६. चंद्रोदय झाल्यावर. ७. महातपोजन्ययशोधिकरणजन्यपृश्न–**पंत.** महातपापासून उत्पन्न झालेल्या यशाचे स्थान च अशाचे यश. ८. क्षपादन–**पंत.** *ज्या.

स्त्रीकुचलीन तरुणसे क्षत्रिय गज[1]कुंभलीन ते गमले;
रमले मुहूर्तपरिमित निद्रेसीं सर्व जीव विश्रमले. ७७
मग भगवान् विधु उगवे, पळवी देवूनि कांप तिमिरासी;
खोट्याला, तेजस्वी नांदों देईल कां पति मिरासी[2]? ७८
करिति पुन्हा, सुखवाया शक्रमुखा सृष्टिपा[3], रणारंभा;
पावे, पराक्रमि पुरुष पति पाहुनि, दृष्टिपारणा, रंभा. ७९
चंद्रोदय जाल्यावरि कुरुपति गुरुला म्हणे, " बहु श्रमले
पांडव पांचाळ, रणीं होउनि निद्रांध केवळ भ्रमले. ८०
कैसे निजों दिले बा!? आले होते चि आयते हातीं.
म्हणत चि होतीं शस्त्रें, 'भ्रमतां धरणार राय ते हा,' तीं. ८१
गुरुजि! प्रियार्थ तुमच्या हें आम्हीं साहिलें, गरळ गिळिलें.
स्वापत्याचें नरडें व्याघ्रीनें मात्र, ऐकतों, पिळिलें. ८२
शस्त्रास्त्रज्ञ त्रिजगीं स्पष्ट तुम्हांसम तुम्हीः; तदपि त्यांचें
लंघन सुखें सहातां; कळलें कीं गुरुकडे पद पित्यांचें. ८३
ते, मीं हि, शिष्य तुल्य चि; परि तिकडे प्रेम, न इकडे, कां जी!?
हतभाग्या ये धावुनि, जातां पीयूष[6]नदइकडे, कांजी." ८४
ऐसें द्रोणाला बहु वदला जें काय राय, तें नाकीं
नहुषचरितसें दुःसह जालें; कीं जेंवि शयनें नाकीं. ८५
कांपे द्रोण, म्हणे, 'मीं वृद्ध, तरि तरुणसहस्रसा झटतों.
मजसम कटकीं टिकता न दिसे, भीष्माविना इतर, भट तों.
शक्त्यधिक यत्न करितों, जरि सर्व स्वपरबळ मला गातें;
परि वृद्ध भोरपीसा[7], तूं एक चि मानिसी भ लागातें[8]. ८७
धर्म असा, मारावे अस्त्रें, ज्यां विदित अस्त्र ते; ज्यांतें

---

१. हत्तीच्या गंडस्थलावर लीन झालेले. २ मिरासदार. ३. लोकपालांस.
४. गाडीवादिके-**पंत.** ५. बालकृत स्वल्पघन पिता साहतो; गुरु तों अन्नप्रदादिसर्वपितृश्रेष्ठ-**पंत.** ६. अमृताच्या नदीकडे. ७. एखाद्या म्हाताऱ्या [व हावऱ्या] बहुरूप्यासारखा. ८. लाभाते. (लग्गा)

न विदित, त्यां न वधावें, प्रकटूनि रणांत अस्त्रतेजातें. ८८
पुरि अस्त्रें मीं परबळ जाळिन, काढीन तरि च हें वर्म;
कर्म क्रूर करिन, कीं लेश हि लुब्धाश्रितीं नुरे धर्म. ८९
हें युद्ध काय? रुद्रें हि न नारायणसखा नर थकविला.
रविच्या रथाहुनि उणा तेजें याचा गमे न रथ कविला. ९०
न हरि, न निवातकवच, न षष्टिसहस्र हि हिरण्यपुरवासी
शकले ज्याच्या धनुच्या, सोसाया संगरांत, सुरवासी. ९१
ऐसा बहु तेजस्वी नरमूर्ति न होय कां महाकाल?
पळतां हि त्यापुढें हय न, मग कसे हंतुकाम हाकाल? ९२
गंधर्वगर्व सर्व हि हरुनि, हरी तुमचिया हि बंधातें.
श्रुत राहो, अनुभूत हि न स्मरसी, वीर्यसंपदंधा! तें. ९३
प्रत्यक्ष तव बळक्षय करितो, सर्व हि उदंड जरि झटतों;
भट तों विजय चि, आम्ही जिंकाया ईश्वरापुढें नटतों.' ९४
कुपित नृप म्हणे, 'गुरुजी! पार्थगुणाचें पुरे करा कथन.
करुनि द्विधा बळ करूं आम्ही चवघे चि जिष्णुचें मथन.' ९५
द्रोण म्हणे, "स्वस्ति असो. 'हरिला मारिन' म्हणेल कोण ससा?
तूं धन्य बा! गरुडसा जय, 'त्या खाईन' म्हणसि घोणससा.'
वदसी भलतें चि कसें, जें हास्यावह वदोत बालिश, तें?
एकें काय? पराभव रामाचा न घडता चि बालिशतें. ९७
प्राणाधिक बहुमत जो श्रीकृष्णा गोपतोकपाळाला,
करिल मृषा अमरांच्या, येतां क्षण कोप, तो, कपाळाला. ९८
मूळ अनर्थावें तूं; कां क्षत्रिय निरपराध मारविसी?

---

१. कवच. २. दुष्ट मनुष्याच्या आश्रिताच्या ठिकाणीं. ३. शक्र खाडवदाहीं—पंत. ४. सुवर्णपुरात राहणारे साठ हजार राक्षस. ५. उत्तम शब्दास (टणत्कारास) ६. शिव. ७. मारण्याची इच्छा ज्यास असे. ८. ईश्वरताडव स्वताडवे जिंको पाहावें तसे हें—पंत. ९. एका जातीच्या सापासारखा. १०. गोपांच्या लहान मुलांचे रक्षण करणाऱ्या.

जा, विजयशरें मरतां, भेदुनि जासिल, नराधमा! रविसी.
दुःशासना हि मारिल, तारिल[1] कर्णा हि, त्या हि कितवा, ह्या.
हित वा हानिकर सम सुगतिदा देवा; तसे चि सितवाहा.१००
'मीं, दुःशासन, तिसरा कर्ण, तिघे पांडवांसि माराया
आहों समर्थ; युद्ध चि व्हावें; चिंता नसे चि बा राया!' १०१
ऐसें त्या अंधाला सांगत होतासि सर्वदा; साचें
तें व्हावें, तुज कामक्रोधकपटलोभगर्वदासाचें. १०२
तो पार्थ विशंक पुढें आहे; जा, गांठि घाल बापा! हूं!
कर्तव्य सर्व केलें! कैसें करितोसि युद्ध, बा! पाहूं. १०३
जिष्णुशरें मरण तुज श्लाघ्य चि; सेवक नृपा! करी गोड;
सोड स्वजीविताशा, लोड[2] करी धैर्य, शर गुणीं जोड. १०४
अद्भुत ऐश्वर्य बळें मेळविलें, भोगिलें, दिलें, उरलें;
स्फुरलें बरें रणमरण, यांत तुजें श्रेय सर्व ही पुरलें." १०५
ऐसें वदोनि गेला गुरुहरि परगजघटेकडे[3] नीट;
धीट,[4] द्विधा करुनि बळ, करिति समर, धरुनि जीवितीं वीट.

---

## अध्याय एकविसावा.

नसतां ही शस्त्र, करी चवथ्या यामांत घात लात रणीं[5];
दैवें, स्वपरविवेचन जें, या कामांत घातला तरणी[6]. १
वाटे, स्वकरसहस्रें, करुनि द्रव दिव्यकनक, सांचवितो.

---

१. या ठिकाणीं पहिला पाठ 'मारिल' असा असून तो खोडून 'तारिल' असा केला आहे, परंतु कवीला कोणता अर्थ उद्दिष्ट आहे हें कळत नाहीं. २. टेका. ३. शत्रुरूप गजसमूहाकडे. ४. तुमुलयुद्ध—पंत. ५. रणांगणीं. ६. अंधकार असल्यामुळे आपपर ओळखण्याचें जें काम केवळ दैवाकडून च होत होतें, या कामांत सूर्याची योजना केली; म्हणजे सूर्योदय झाल्यामुळें आपपर ओळखतां येऊं लागलें.

शुचि करि हरुनि तमोमळ, होय, जगदपत्य, जनकसा रवि तो·
संध्याविधि संपादिति, जपती जोडूनि अंजलीला हो!
भट धरिती, क्षण वीक्षण[1] करितां, संफुल्लकंजलीला[2], हो! ३
करि जों परांसि, विजयानुमतें, तो देव सात्वतप[3] सव्य,
करवी, बळें चि दूरुनि हाका मारूनि, भीम अपसव्य. ४
डावलिले[4], भीमाच्या आज्ञेनें, अर्जुनें वृष-द्रोण.
न करिल, समयीं सुज्ञें सूचविलें कर्म, धर्मपर कोण? ५
दीप्तदवा जेंवि, तसे शकले कोण्हीं जया न वाराया.
खवळे, अधिक विकळ करि, शमनेंपरा[5] ज्वर जसा नवा, राया!
दुर्योधन, कर्ण, शकुनि, शस्त्रांच्या शीघ्र वर्षति व्रातें;
तमस्नेहा जळसें, त्या शोभवि शस्त्रवर्ष, तीव्रा, तें. ७
त्यां सर्वांस हि दशदशबाणाहीं तो महातपा[6] वेधी;
[7]भीतिनदींत कुरूंची, बहु मोहातें, वहात, पावे, धी. ८
पार्थ, प्रलयजलदसम, दे वृष्टि करूनि हर्ष तिमिरासी.
पेचक[8], पुनरपि जैसे बहु भरतां ग्राम हर्षति, मिरासी[9]. ९
अकुळीं श्रीविद्याशा, समरीं शरवृष्टि घनरजोवृष्टि[10],
असतां हि, करिति सहसा नाहीं च, तमें भरूनियां, दृष्टी. १०
तें व्यामोहक संगर संसार चि, त्यांत सर्व हि भ्रमला.
भ्रमला न गुरु चि, दूर त्यांतुनि गेला, विरक्तसा गमला. ११
उत्तरदेशीं होता द्रोण, रणांतुनि निघोनि एकिकडे,
बा! त्याकडे न पाहों शकले पर, सर्प जेंवि, केकिकडे. १२
द्रुपद-विराट तयःवरि गेले; तत्तेज परम राया! तें.
द्रोण म्हणे, 'योग्य रणीं हे दोघे वृद्ध पर मरायातें.' १३

१. अवलोकन. २. प्रफुल्लित कमलाची शोभा. ३. यादवपति कृष्ण. ४. डावे घातले. ५. ज्वराच्या तारुण्यावस्थेत शमनपर औषधें देण्यानें अधिक अपाय होतो, असे वैद्यशास्त्र आहे. ६. पार्थ–पंत. ७. भयनदींत वहातें मोहातें पावे–पंत. ८. उलूक–पंत. घबड. ९. वतनदार. १०. दाट धुळीची वृष्टि.

द्रुपदाचे पौत्र तिघे, तीं बाणानीं, पळांत लोळविले;
स्वर्गासि चेदि, केकय, सृंजय वीर क्षणांत बोळविले. १४
वृद्ध तरुणसे झटले, समयीं कर्तव्यर्थकिमपि न विसरले.
द्रोणें शिर हरितां हि, न मागें ते एक पद हि कवि सरले. १५
द्रुपदें धरितां प्रकुपितसिंहातिक्रमणकरकरीशपथ,
क्रोधें धृष्टद्युम्न, द्रोणवधाकारणें, करी शपथ. १६
मग खगपतिगति धावे, पांडवपांचाळवीरसहित, रणीं.
तो धृष्टद्युम्न गमे साक्षान्महिराहु, विप्र महितरणी. १७
कर्ण शकुनि दुर्योधन तदनुज, जे मुख्य मुख्य, ते ज्यातें
रक्षित होते, त्याच्या, कैसे पर साहतील, तेजातें? १८
वध कैंचा? दूरून हि पांचाळां गुरुकडे पहावेना;
तें पळ ही भीमाला हृदयींचें शल्यसें सहावेना. १९
भीम म्हणे 'रे धृष्टद्युम्ना! कळलासि आज पोकळसा.
वचनासि कुलज, न शिरा, स्ववरासि, न, देवता, जपो, कळसा.
पितृसुतमरण कसें तूं, तेजस्वी शिखिसमानें, साहसि, तें?
मरणाधिक दुःख तुज्या, होइल वांचोनि, मानसा, हसितें. २१
तूं मजकडे तरि पहा, जरि तुज त्या अरिकडे पहावेना;
जातों मी च; मला तों सोसूनि स्वजनवध रहावेना.' २२
द्रोणबळांत वृकोदर शिरला होवे बळिबळांत मध्वासा.
तें त्या बहु भी; हरिपदतुळसीच्या; जेंवि सर्व अघ, वासा. २३
धृष्टद्युम्न हि, देहीं ज्वरसा, गुरुकुरुबळांत शिरला हो!
निकट भिडोनि म्हणे, 'असि माजा, मत्तातशत्रुशिर लाहो.'
अपसव्य करुनि, नकुळें तेव्हां कुरुपति रणीं विमुख केला.
सहदेवें दुःशासनसूत, न कळतां, यमालया नेला. २५

१. खवळलेल्या सिंहाचें उल्लंघन करणाऱ्या गजश्रेष्ठाची गति. २. पृथ्वीवरील राहु. ३. पृथ्वीवरील सूर्य. ४. देवळाच्या शिखरावरील टोकास. ५. अग्नीसारखा. ६. द्रोणाकडे

भीमाची, कर्णानें शरनिकरें फिरविली, गदा मागें.
ध्वज मथुनि, सूत मूर्छित करि, कृत्या जेंवि मुरडली रागें. २६
होउनि विरथ, वृकोदर नकुळरथावरि चढे, कढे कोपें.
द्रोणार्जुनरण हि परिस, ज्याचें कथन हि नृपा! नव्हे सोपें. २७
गगनांत आमिषार्थ श्येनांचें युद्ध नरवरा! होतें,
तेंवि म्हणावें तरि, हा दृष्टांतीं शुद्ध न[1] रवः राहो तें. २८
करिवर, हरि, शरभ हि, पशु; अशुचि निशाचरः तसे च दानव हीं;
यांसम हे; यांच्या गुणलिपिसि पुरेल न महीसमान वही. २९
कौरवपांडवकटकें झालीं, जैसीं पटार्पित चित्रें;
गुरुनें जैसीं केलीं कुतुकें, तैसीं च विष्णुच्या मित्रें. ३०
शिष्याला गुरु, गुरुला शिष्य हि, त्या रणमखांत आटेना;
दाके नारदकंठ हि; युद्ध पुरेसें कदापि वाटेना.
शिष्यें निवारिलीं बहु ऐंद्रप्रमुखें हि वाडवेशास्त्रें.
म्हणती, 'सच्छिष्या, तों तिळमात्र उणें न पाडवे,' श
पार्थापुढें न चाले यत्नः परि न सुगुरु तो असुख पावे.
'झालो मी धन्य,' म्हणे, 'यासीं भिडतां रणीं असु खपावे.'
स्वगुरुसि म्हणे, 'यशें तुजसम सुचिर विभो! टिकों.' परम हर्षें.
'पितृमन, लागुनि, दे. प्रियशिशुचा, सुखकोटि, कोंपर, महर्षे!'
'जरि आधणासि आपण कल्पुनि रुद्र द्विधा, करिल समर,
तरि उपमा होय,' असें म्हणती शक्रादि सर्व ही अमर. ३५
सुर-नर करीत होते, मानुनि परमेश्वरासम, स्तवन.
ते चंद्र सूर्य, जागे[3], जलजांचें[3] कटक[4] तें समस्त वन, ३६
मग भगवान् द्रोण करी ब्रह्मास्त्राचा प्रयोग. बा राज्या!
असमर्थ सहायाला, बहु तेजस्वी हि अर्क बारा, ज्या. ३७
लोक गडबडे जैसा निरुदकदेशीं दवानळीं सार्थ[5].

---

१. शब्द-**पंत.** २. ब्राह्मणश्रेष्ठ द्रोणाचार्यांची अस्त्रें. ३. कैरव (श्वेत) कमळ संग्रह-**पंत.** ४. **विश्व** इति वा पाठः-**पंत.** ५. मनुष्यांचा समुदाय.

शमवि ब्रह्मास्त्रें चि ब्रह्मास्त्रातें प्रबुद्धधी पार्थ. ३८
तों दुःशासन धांवे, वाराया द्रुपदराजतनयातें.
त्यास रणीं विमुख करी तो, धर्मन्याय जेंवि अनयातें. ३९
कृतवर्मा एक, तिघे, तव सुत हे, वीर, कोपले चवघे;
दोघे नकुळें, दोघे सहदेवें, त्वरित वारिले अवघे. ४०
पाहुनि, वात नगानीं तैसे भट रोधिले निज यमानीं,
धांवे दुर्योधन, ये मध्यें साधावया विजय, मानी. ४१
हरिवरि हरिसा, उठला कोपें सात्यकि सुयोधनावरि तो.
समयीं दाता हाता, ताता! त्राता सुयोध, नावरितो. ४२
सात्यकिला दुर्योधन पाहुनि हांसे; म्हणे, 'सख्या! सुकवी,
शुक वीतमोह चुकवी भोगा; घटज चि पयोधिला सुकवी. ४३
बाल्यीपासुनि तुज मज, सहवासें परम सुख; कसें गा! तें
सख्य जिरालें? क्षत्राचाराला सुकविमुख कसें गातें?' ४४
शर धरुनि यदु म्हणे, 'कुरुगुरुसदनीं सख्य आमुचें होतें.
तेथें चि स्वस्थ असो; आणावें संगरांत कां हो! तें?' ४५
भूप म्हणे, 'कोठें ती, कोठें ही प्राणघातक, क्रीडा?
दुरतिक्रम काळ; उरे धनलोभें प्रीति नीति न व्रीडा.' ४६
सात्यकि म्हणे, 'कुरुवरा! ऐसा चि क्षत्रधर्म हा क्रूर;
दूर स्नेह त्यागुनि, हाणिति गुरुतें हि संगरीं शूर. ४७
जरि मीं प्रिय तुज, तरि तूं भेदाया शिर, उर, प्रहार करीं.
धरिल, मज वराया, गति, बा! त्वां धरितां क्षुरप्र, हार करीं ४८
जरि वधिसिल या समरीं, तरि मी पावेन सुकृतलोकातें.
मजला न देखवे प्रियमित्रस्वजनप्रणाशशोकातें.' ४९
जालें, प्रेमें भाषण, मग त्यांसीं युद्ध परम कोपानें.
रचिती बहु शरपटळें, जाणों ते, स्वर्गमार्गसोपानें. ५०

---

१. नकुळसहदेवानीं. २. धृतराष्ट्रा!-पंत. ३. गतमोह. ४. यादवः-पंत.
५. सुगति. ६. बाणविशेष.

सात्यकिचें धनु कुरुपति, कुरुपतिचें धन्व[1] सात्यकि, छेदी.
भेदी मर्में, रविसा पाहों ही आपणाकडे नेदी. ५१
भंग भूप, निघे मग सावध होउनि, पुन्हां हि करि लगट.
तों तदवनार्थ धांवे कर्ण, म्हणे, 'शत्रु यासि करिल गट.' ५२
त्यावरि भीम उठे; तों कर्ण तयाच्या शरांसि तोडून
छेदी धनु, सूतातें विकळ करी विशिखजाळ सोडून. ५३
दुःसह गदाप्रहारें, ध्वजकार्मुकसूतकनकरथचक्रें
मर्दुनि, भीमें व्याकुळ केला क्षण कर्ण, बळ जसा शक्रें. ५४
रथ एकचक्र रविचा जैसा शोभे, तसा चि कर्णाचा;
स्वर्णाचों[2] मद नुरवी; होता चि असा प्रकर्ष[3] वर्णाचा. ५५
तों धर्म भटांसि म्हणे, 'लिहिलें न चळे चि आयु धात्यानें.
जेणें हस्तीं धरिलें, सफळ करावें चि, आयुधा, त्यानें. ५६
जे आमुचे प्रिय परम सर्वस्व, प्राण, शिर, अहो भट हो!
ते[4] अडकले अरिबळीं; धावा रे! काय पाहतां? फट हो. ५७
मेलों, कीर्तिधनाचा जरि, करितां सोस, वेचुनां नाकीं.
सोसे कुलजा मृत्यु, न अयशाचा सोसवे चुना नाकीं.' ५८
यों धर्माच्या बोधें गेले पांचाळ-मत्स्य गुरुवरते;
कीं निजधर्मापासुनि मिळती जे जे अभीष्ट गुरु वर, ते. ५९
यम-भीम म्हणति, हाका मारुनि, 'ये, धांव, अर्जुना! क्षिप्र,
त्वां कुरु मर्दावे; मग माराया सांपडेल हा विप्र.' ६०
त्या समयीं द्रोणानें, प्रकट करुनियां महास्त्र, कोपानें
केला बहुशत्रुबळक्षय, पूर्वीं जेंवि रुद्ररोपानें. ६१
गुरुशरनिकर दवानळ, सृंजय-पांचाळ भासले शलभ.
बलभद्रानुजनि[7] म्हणे, "हा सिंह चि, सर्व यापुढें कलभ. ६२

१. धनुष्य. २. सुवर्णाचा. ३. कांतीचें आधिक्य. ४. भीमसात्यकी. ५. मार्ग. ६. क्षीणपुण्य होवू ना—पंत. ७. बळरामाचा धाकटा भाऊ कृष्ण. ८. हत्तीचा छावा.

अति तूर्ण[1] जयाविषयीं योग करा, त्यजुनि धर्म, पांडव हो !
या विप्ररूपदहनीं, तुमचें न समग्र सैन्य खांडव हो. ६३
जों आहे चाप करीं, तों हा ब्राह्मण न आवरायाचा.
जाईल यापुढें बा ! त्या देवांच्या हि, आव, रायाचा. ६४
होइल मनुष्यवध्य द्विजवर, जरि करिल आयुधन्यास[2];
या, जेव्हां सोडिल धनु, सोडिल तेव्हां चि आयु, धन्यास. ६५
जरि तो मरेल अश्वत्थामा, हा तरि च शस्त्र सोडील.
हें न घडतां, शिरें, यां सर्वांचीं ही रणांत तोडील. ६६
'अश्वत्थामा मेला' हें, मिथ्या म्हणुनि 'हाय !' सांगावें.
अनृत बहुमत व्यसनीं; जाया प्रेतत्व, वायसां गावें. ६७
हा चि उपाय, प्राणव्यसनीं, सर्वांसि आजि तारील.
वारील शक्र हि न या; सर्वांस हि संगरांत मारील." ६८
बाल्यापासुनि, बहु गुरुवत्सल, जो गुरुसि तोकसा मान्य,
होइल अर्जुन तादृश[3] घातोपायासि तो; कसा मान्य ?[4] ६९
भीमादि सुखें वळले, म्हणति, 'जयोपाय हा असामान्य,
हितकर न जगीं कोणहीं आम्हां या कृष्णजी असा मान्य.' ७०
कष्टें धर्मा[5] जाला बहु, हिक्कार्तासि लशुनसा, मान्य;
कीं, त्रिजगद्गुरुवरवच जो न करिल, तो चि पशु, न सामान्य.[6]
शत्रुप्रदीप, ज्याच्या लीलाश्वासें चि मालवे शतदा,
तो कदन करित होता, पांडवकटकांत, मालवेश तदा. ७२
तन्नाम 'इंद्रवर्मा,' 'अश्वत्थामा' तदीय नागाचें.[7]
त्याचें भीमें केलें, पक्षिवरें, कदन, जेंवि भोगांचें. ७३
'मेला अश्वत्थामा,' हें ऐकविलें गुरुसि मग, राज्या ![8]
तो भी सुतशोका; कीं न च तरले दशरथादि मगरा ज्या.[9] ७४

---

१. कपटाख्यः–**पंत.** २. शस्त्रत्याग. ३. तशा प्रकारच्या. ४. तं गुरुघातोपाय–**पंत.** ५. उचकीने पीडित झालेल्यास. ६. असामान्य पशु–**पंत.** ७. हत्तीचें. ८. हे धृतराष्ट्रा ! ९. ज्या सुतशोकरूपी मगराला.

श्रवणीं शिरतां प्रथम चि, ती द्रोणा होय शोकदा वार्ता.
सुतवीर्यविचार सखा घन, निववी शीघ्र शोकदावार्ता. ७५
'लटिकी वार्ता,' ऐसा निश्चय चित्तीं करूनि, जो जवळ
भिडला होता द्रौपद, त्याचा पाहे करावया कवळ. ७६
ध्वज, धनु, खंडुनि, मारी तो तत्काळ स्वमृत्युसूतातें.
त्या अहितातें न गणी, हरिसेवक जेंवि काळदूतातें. ७७
दुसरें हि खंडिलें धनु; जें हस्तीं शस्त्र शत्रुनें धरिलें,
तें तें सर्व द्रोणें, दुर्दैवें वस्तुमात्रसें, हरिलें. ७८
धृष्टद्युम्न स्वहय, द्रोणहयांमाजि, होय शिरकविता;
त्यांची मिठी, सकळ बळ कंपित करि, जेंवि तज्ज्ञशिर कविता.
तत्काळ द्रोण प्रभु, ईषा, रथचक्रबंधनें, तोडी;
धृष्टद्युम्न तयावरि, गरगर फिरउनि, महागदा सोडी. ८०
विप्र क्षिप्र गदेतें खंडी, दंडी जसा चि आशेतें.
पसरिति, त्यांच्या विजया कटकें, जैसीं घनासि आ शेतें. ८१
मग खड्ग-चर्म घेउनि यत्न करी श्येनसा चि झडपाया.
वाटे त्यास स्वतनुप्रासादाचा जगांत धड पाया. ८२
रथशक्तिनें परतुरग वधुनि, करि स्वहय मोकळे विप्र;
विप्रतिम द्विषदसितें खंडी वैतस्तिकेषुनीं क्षिप्र. ८३
विरथ विशस्त्र करुनि त्या, द्रुपदसुतवधार्थ बाण जों सोडी,
त्यातें दश विशिखाहीं शिनिपुंगव बहुपराक्रमें तोडी. ८४
तें पाहुनि पार्थ म्हणे, "पीतपटा! परमपूरुषा! पाहें
कर्णद्रोणकृपांत स्वस्थ कसा सात्यकी? नवल बा! हें. ८५
सत्कवि निजवाचेला म्हणतिल, 'बहु मधुर वाणिमैने! या

१ शोकरूप अरण्याग्नीने पीडित अशा द्रोणास. २. स्वमृत्यु जो धृष्टद्युम्न त्याच्या सारथ्याला. ३. धूर. (जू ज्याच्यावर असते तो दांडा). ४. सन्यासी. ५. आपल्या शरीररूप राजवाड्याचा. ६. बळकट. ७. निरुपम. ८. वीत वीत लांबीच्या बाणींनी. ९. सात्यकी. १०. हे वाणिरूप मैने!

रामा, कृष्णा मग गा, आधीं तूं तत्प्रिया चि शैनेया.'" ८६
कर्णद्रोणकृपांत, द्विरदांत विशंक सिंहसा साजे.
लाजविले ते, धन्वी म्हणउनि घेते, जगन्निवासा! जे. ८७
तेज न तव प्रसादें कोणांत हि, सात्यकिस लया नेतें.
येणें दृष्टिसुख दिलें, द्यावें त्वत्पादकिसलयानें तें. ८८
इतुक्यांत सुयोधनमुख, तव सुत कृप, कर्ण, अन्य ही योध
क्रोधमदांध, बहुकडुनि करिती शिनिसूनुचा रणीं रोध. ८९
यम भीम धर्म समरीं बहुत चि शैनेयरक्षणीं जपले.
तपले, परि पर पशु ते यदुपतिपशुपतिपुढें प्रचुर खपले. ९०
वदले सुर दैवासुरसम त्या आयोधना शपथ करुनी,
'न तुम्हीं किमपि मिळविलें, ऐसा हा योधनाश पथकरुनीं.'
धर्म म्हणे, 'क्षत्रिय हो! यत्न करा, कुंभयोनिला वेढा.
जाणा पार्षततिजें गिळिला चि, बुभुक्षितें जसा पेढा.' ९२
आज्ञा होतां चि, सकळ पांचाळप्रमुख वीर बळजळधीं
बुडवाया धांवे, परि तो घटज तसा चि, हा हि निश्चळधी. ९३
गुरु परबळें, वळकरग जेंवि न करिजेल भग्न, हेळ, दीनें.
पीतिमगुणें शुचि कनकरुचि, कीं लज्जेंत मग्न हेळदीनें. ९४
धांवे रणार्थ गुरु, तों तद्वामाक्षि स्फुरे, पडे उलका;
समजुनि म्हणे, 'बरवी सुगति, समर्पूनि जीविता शुल्का.' ९५
योजुनि तो ब्रह्मास्त्र, क्षत्रिय विंशतिसहस्र बा! मारी.
अन्य दशायुत मर्दुनि टाके निःशंक, जेंवि कमारी. ९६

१ तुझ्या चरणपल्लवानें. २ कृष्ण हा च कोणी शंकर, त्यापुढें. ३. देवदैत्यांच्या युद्धासारख्या अशा ४ युद्धास. ५ 'तुमची आण, तसा च हा,' असें परस्पर बोलिले—**पंत.** ६. असुरांनी धर्म—**पंत.** ७ द्रोणाला. ८. कृपीवळें हळधरें बळहळ, कीं कनकदीप्ति हळदीनें कधीं ही भग्न न करिजेल, तेंवि परबळें द्रोण—**पंत.** ९. बळरामाच्या हत्तींतील नागर. १० त्याचा डावा डोळा. ११ मोला. १२. राज्या!—**पंत.**

सुविषण्ण, विरथ, पार्षत परमापद्ग्रस्त पाहिला भीमें,
धावोनि स्वरथीं तो, बा! जेंवि स्कंद, वाहिला, भीमें. ९७
त्या परिभवविकळाला सुस्यंदन, चाप, धीर, दे, हातें
थापटुन पृष्ठदेशीं, कुरवाळुनि, तो सुधीर, देहातें. ९८
'अन्यसुदुर्वह हा गुरुवधभार, शिरीं तुज्या चि आजि असे.
बाहु न तुटतां, व्हावे निर्विण्ण न, आदरूनि आजि, असे.' ९९
घेतां, भीमकृत असा उत्साहविवृद्धिहेतु बोध, मनें,
होय अधिक तेजस्वी; जाणों नररूप वन्हि तो धमनें. १००
द्रुपदसुत गुरुसि गांठुनि, झांकी इषुनीं हुताशविषकटुनीं,
तद्रक्षक शिबि बाल्हिक कौरवकटकें क्षणांत विसकटुनीं. १०१
काळें पाठविला, 'द्विज मारावा' हा निरोप ज्याला, तें
अरिधनु खंडुनि, गुरुनें त्या हि दिली हानि रोपजालातें. १०२
तेव्हां पांचाळांहीं कांहीं मागेंपुढें न पाहून,
गुरु गांठिला चि, जाणुनि रणमरण अधिक जपातपाहून. १०३
घनजालें रवि गगनीं, क्षण नाहींसा चि, लोपला होतो,
गुरु हि तसा चि परशरव्रातें; मग फार कोपला हो! तो. १०४
पर सर्व धैर्यपर्वत, गमला गुरु हरि, तदीय विशिख पवी;
कीं सकळांला लीलालेशें, कुरवाळुनी हि मिशि, खपवी. १०५
वधिले पांचाळ अयुतयुग, सृंजय षट्सहस्र समरांत.
गज अयुत, हय अयुत; तें कर्म करी प्रकट कंप अमरांत. १०६
जे मत्स्य नीर मथिले, गमले ते मर्त्य न, रवि पन्नास.
प्रेमें कां गतिनंवरी न वरील द्रोणशरविपन्नास? १०७

---

१. अत्यत खिन्न. २. ईश्वरे—**पंत.** ३. खिन्न. ४. युद्ध ५. फुकण्याने. ६. अग्नि आणि विष यासारख्या तीक्ष्ण बाणानीं. ७. जेणे तो गुरु झाकिला होता—**पंत.** ८. नाहींसा जाला होता—**पंत.** ९. श्मश्रु—**पंत.** १०. सद्गतिरूप नवरी. ११. वीरहतवीर गतिपात्र; सर्ववीराचार्यें वधिले ते गतिपात्र काय सांगावें?—**पंत.**

क्षत्रविनाशीं द्रोण श्रीभार्गवसा प्रवर्तता, क्षिप्र,
तेथें धाकुनि आले विश्वामित्रादि जे महाविप्र. १०८
भृगु अंगिरा मरीचिप पृश्नि सिकत वालखिल्य हे, राया!
अग्नि पुढें करुनि वदति, कीं शकति मुखाकडे न हेराया. १०९
"बा! हा तव निधनसमय, चाल कसा, ब्रह्मलोकवास करीं.
यावा नित्य कुशांचा, या बाणांचा कधीं न, वास, करीं. ११०
ये उत्तमलोका या; म्हणती 'घात' कवि लोकवासासि.
विनाविति नयनांतें, कीं, 'विप्र न घातक विलोकवा सासि.' १११
त्वां ब्रह्मास्त्रें केले दग्ध अनस्त्रज्ञ नर, न हा धर्म;
शर्म समस्तां जीवां जेणें उचित द्विजासि तें कर्म. ११२
घडला अधर्म; आतां शीघ्र करावा चि आयुधन्यास.
जेणें भूतहित नव्हे, न रुचे तें, पळ हि, आयु धन्यास." ११३
भीमें मुनिवचन परिसुनि, पाहुनि वधसिद्ध रिपु पुरोवर्ती,
द्रोण म्हणे, 'आयूची, सरली च, पुरेल तो पुरो, वर्ती. ११४
सुत मृत कीं न मृत, असें, जावें, धर्मासि तरि पुसायास;
कीं एक सत्यवादी हा; भासे, रिपु हि न रिपुसा यास. ११५
मिळतां त्रिभुवनराज्य हि, अनृत न बोलेल धर्मसुत लेश.
हा सत्यसंध जाणे, जैसा तो सत्यधर्म सुतलेश. ११६
ठावी मज प्रतिज्ञा वत्साची सत्यशी; 'लहानपणीं
बाळांत खेळतां, तिळभरि चळला सत्यशील हा न पणीं.' ११७
गुरु होय, असें योजुनि, जों सिद्ध युधिष्ठिर विचाराया,
जाणे त्रिजगत्साक्षी कृष्ण द्रोणाचिया विचारा या. ११८
'अश्वत्थामा मेला, कीं आहे?' गुरु असें पुसे धर्मा.
तों कृष्ण म्हणे, "'मेला' म्हण. कवि अनृतें हि जोडिती धर्मा.

---

१. पाहण्यास. २. ब्रह्मलोकाला ३. भूलोकासि-पंत. ४. सखड्ग. ५. भयकर. ६. समोर असलेल्या. ७. आयुर्दीप-पंत. ८. वळी-पंत.

दिवसार्ध होय तों जरि युद्ध करिल, वधिल सकळ ही सैन्य.
दैन्यद होइल, कार्मुकतेजें, भूभृत्कुळा, जसा वैन्य." १२०
प्राणात्ययप्रसंगीं अनृत वदावें सुखें, असें आहे,
तुज जीवनदा मेघा, चातकसे, सर्व पसरिती आहे. १२१
आम्हां सर्वांतें गुरुकाळापासूनि, आजि वांचीव;
बहुलक्षजीवजीवनदानामितसुकृतसुवसु सांचीव." १२२
भीम म्हणे, "गुरुवरहरिवचन अहो धर्मराज! परिसा हो!
दुःसह विषसें चि अनृत, हरसा युष्मत्प्रताप परि साहो. १२३
'अश्वत्थामा मेला' हें, मारुनि माळवेंद्रवर्मकरी,
म्यां कथिलें; परि सत्यप्रत्यय मद्वचन तन्मनीं न करी. १२४
त्यजिल गुरु धैर्य धनुसह; तुमचा चि असे तयास विश्वास.
कीं 'धर्म सत्यवादी' हे आहे कीर्ति विदित विश्वास." १२५
वळला प्रभु भीमोक्तें धर्म हि; कीं, अचुक अर्थ तो भावी.
क्षुद्रपदीं लोभ धरा, यन्माति न स्वःपदीं हि लोभावी. १२६
तो धर्मराज, होउनि अनृतभयजलधिनिमग्न, जयसक्त,
'अश्वत्थामा मेला,' व्यक्त म्हणे, 'गज' असें हि अव्यक्त. १२७
रथ, भूवरि चतुरंगुल उच्चकृत, त्या धर्मसूनुचा, चाले;
जाले, ऐसें वदतां, भूस्पृक्; प्राकृतपणासि हय आले. १२८
'अश्वत्थामा मेला,' हें ऐकुनि धर्मवाक्य, तो, कानें,
जीवितनिराश जाला, गुरु, होउनि तप्त पुत्रशोकानें. १२९
'पांडव साधु, तयांचा आपण केवळ कृतघ्न अपराधी;'
ऐसी, त्या, ऋषिवाक्यें झाली, नाहीं च त्यास अपराधी. १३०

१. राजकुळाला (पक्षी) पर्वतकुळाला. २. वेनराजाचा मुलगा पृथु. (यानें पृथ्वीचे नियमन केल्याची कथा आहे) ३. प्राणावरील संकटाचे वेळीं. ४. लक्षावधि प्राण्याना जीवदान केल्याचें अगणित असे पुण्यरूपी द्रव्य. ५. 'वर्म' हें उपपद क्षत्रियाच्या नावापुढे व 'शर्म' हें ब्राह्मणाच्या नावापुढे लावतात ६. स्वर्ग-पंत. ७. चार बोटें. ८. उंच. ९. पृथ्वीस स्पर्श करणारे. १०. अन्य बुद्धि-पंत.

त्या धृष्टद्युम्नास हि पाहुनि उद्विग्न होय परम रणीं.
गेला सन्ना हि सोडुनि तो, जो उत्साहहेतु परमरणीं. १३१
तों पार्षत दिव्य विशिख तक्षकसा जैत्रकार्मुकीं योजी,
'आपण चि गुरुविनाशीं कारण,' तुमच्या मनीं असें यो, जी!
त्याच्या निवारणीं करि यत्न, परि न योग्य राहिलें शस्त्र.
त्या समयीं एक हि बा! कुरुगुरुहृदयांत न स्फुरे अस्त्र. १३३
च्यारि दिवस, एक निशा, पंचमदिवसत्रिभागपर्यंत
पुरले शर, सरले मग, गुरुला कैसा घडेल अर्यंत? १३४
द्रुपदसुतें सोडावा शर, तों गुरुनिकट भीम ये, राज्या!
बोले उक्ति, वदवतिल न कधीं हि तशासमीप येरा, ज्या. १३५
'गुरुजी! क्षत्रक्षय कां होता, जरि न करितां तुम्हीं युद्ध?
शुद्ध स्वधर्म सोडुनि, परधर्मी न प्रवर्तले बुद्ध. १३६
धर्म अहिंसा, त्याचें मूळ ब्राह्मण, तुम्ही च हें कथिलें.
रजतांपुढें कसें जी! मिरवावें तेज आपुलें कथिलें? १३७
करितां काय, ब्राह्मण मुख्य तुम्हीं ब्रह्मवित्तम रणातें?
मेळवितां पुत्राच्या, परिसुनि, काशास वित्त, मरणातें? १३८
परधर्मस्थ तुम्हीं, कां निजधर्मस्था जनांसि बुडवीतां?
जे चरणां शरणागत साष्टांगप्रणत, त्यांसि तुडवीतां? १३९
ज्या एका पुत्रास्तव अर्थ, अनय हीं करूनि, जोडावा,
तो गेला, फळ झालें; आझुनि तरि हा अधर्म सोडावा. १४०
कोणही, सुतादिनाशव्यसनीं, न करूनि अनय, न बुडाला.
दाटुनि अमृतघटाच्या, नुकरिल भवदन्य अनयनें, बुडाला.
ज्याच्या वचनीं धरिती बहु, सर्व हि सुज्ञ लोक, विश्वास,
अनृत वदेल कसा तो, सोडीना व्यर्थ जो कवि श्वास? १४२
त्या धर्माच्या वचनीं तुमचा नाहीं च लेश विश्वास.

१ प्रियपुत्र अश्वत्थामा. २. जयनशील अशा धनुष्यीं ३. शत्रुनाश. ४. तुम्हांस त्या ज्ञान काय सांगावें?–पंत. ५. ब्रह्मज्ञश्रेष्ठ. ६. सच्छिद्र न करिल–पंत.

हें हि अधर्माचें फळ. पाहे स्वसम चि [1]खलेश विश्वास." १४३
एवंविध भीमवचन परिसुनि, सुनिराश जीवितीं होय.
तो [2]यज्ञसेनसुतभयं धनु सोडी, जीवि[3]तास ही तोय. १४४
गुरु मग म्हणे, 'अहो कृप नृप कर्ण! समस्त वीर हो! हा मीं
शस्त्रास्त्रांतें त्यजितों, विटलों अत्यंत जीवितीं, धामीं. १४५
पांडुसुतांपासूनि स्वस्ति तुम्हांकारणें असो; भट हो!
[4]सत्वा [4]मार्कंडेया, दैव, [5]रणैकार्णवांतरीं, वट हो.' १४६
करि, 'हा अश्वत्थामन्! सत्पुत्र!' असें म्हणोनि आक्रोश.
त्या सुतमृति, [6]व्रजा जसि, मोही क्षण, [7]ती पडोनि सा क्रोश.
करुनि परांतें, योजुनि [8]परमास्त्रविदीप्तभल्ल, भस्म, रणीं,
शस्त्रें सोडुनि, झाला निरत श्रीप्राणवल्लभस्मरणीं. १४८
तीं धनु ठेवुनि पार्षत धांवे, घेवूनि असि, वधा त्याच्या.
आलें मनासि, अरिच्या, किंवा, तें [9]कर्म अशिव, धात्याच्या.
[10]कौरवकटकीं 'हा! हा!,' पांडवकटकीं हि होय बहु 'हा! हा!'
'हा! हा!' दशदिग्भागीं, म्हणति, 'वध न योग्य [10]रुक्मवाहा हा.'
निजयोगधारणेनें द्रोणमुनि करी शरीरसन्यास.
त्याचें त्याला किंवा तज्ज्ञांला, तें कळे; न अन्यांस. १५१
[11]ज्योतिर्भूत द्रोण व्योमीं दुसरा [12]द्युदीपसा गमला,
तो ब्रह्मलोकगामी दुष्टां दुर्दर्श; पार्षत भ्रमला. १५२
अश्वत्थामा, अर्जुन, कृष्ण, युधिष्ठिर हि तेज तें पाहे.
आहे प्रसाद [13]मुनिचा; तद्दर्शन म्हणुनि [14]दास हा लाहे. १५३
धावे, [15]न्यस्तायुधशिर कापाया धरुनि मति, कुडी; लाजों;

१. महाखल—**पंत.** २. धृष्टद्युम्नाचे आहे भय ज्याला तो द्रोण. ३. जीविताची आशा सोडी ४. सत्वरूप मार्कंडेयाला. ५. रण हा च कोणीएक समुद्र, त्यांत. ६. गोकुळाला. ७. पूतना—**पंत.** ८. ब्रह्मास्त्ररूप प्रदीप्त बाण. ९. अशिव कर्म—**पंत.** १०. सुवर्णाचा आहे रथ ज्याचा त्या द्रोणाचार्यांस. ११. तेजोरूपी. १२. रवी—**पंत.** १३. व्यासाचा. १४. संजय. १५. शस्त्र टाकून दिलेल्याचे [द्रोणाचे] मस्तक.

नेणे पार्षत, गुरुच्या तो नव्हता स्पर्शला कुडीला जों. १५४
पार्थ, रथावरुनि उडी टाकुनि, धावोनि शीघ्रतर वारी.
तन्हि लाविली च दुष्टें, कंठीं, कच धरुनि शीघ्र, तरवारी. १५५
'न वधावें,' 'न वधावें,' ऐसें म्हणतां हि, तो महापापी
कापी गुरुचें मस्तक; तच्छोक सुरांस ही बहु व्यापी. १५६
तें कौरवांकडे शिर, बहु गर्जुनि पार्षतें उडविलें हो!
यश सर्व बुडविलें हो! गमलें पंकज पदें तुडविलें हो! १५७
भीमप्रलयजलदसा गर्जे पार्षतगळां मिठी घाली.
भ्याली बहु कुरुसेना, शीघ्रपलायनपरायणा झाली. १५८
भीम तसा, जैसा हरि, हरिनें वधितां च्चि कनककशिपु, निवे.
पार्षतचमू म्हणे, 'निजपति च म्हणसि हर्षजनक कशि? पुनिवे!'
दुःशासन कर्ण, शकुनि, कृप, कृतवर्मा, सुयोधन हि, मानी
सर्व हि विरे, नृपा! ज्यापरि परितापें, सुयोध न, हिमानी. १६०
न कळ पडे, सकळ पडे व्यसनीं, पाहे सुयोध न हित रणीं.
जाला गुरुपातमहाभयराहुमुखीं सुयोधन हि तरणी. १६१
सुटतां पळ बळ देवुनि, बा! जो बळजळधि आवरायाचा,
कुरुपगुरुपतन होतां प्रथम च्चि, त्या, जाय आव, रायाचा. १६२
कौरवबळ सकळ पळे; त्यांत तुजा पुत्र ही असामकर.
तों ये अश्वत्थामा वीर, स्रोतोभिमुख जसा मकर. १६३
करुनि, शिखंडिप्रमुखप्रबळभटांसीं, महासमर, सुटला;
स्फुट लाजवुनि परांला आला, तों कुरुबळाब्धि हा फुटला. १६४
कुरुपतिस पुसे, 'कां हो! पळतां, पळत्यांच्चियांचि सांगातें?
ऐशा पलायनाचें, जें काय निमित्त, तूर्ण सांगा तें.' १६५
गुरुशोकें गहिवरला महिवर; लाजे स्वयें कथायास;

---

१. शक्र—पंत. २. हिरण्यकशिपु. ३. त्यापरि हिमानी—हिमसहानि विरत नसेल—पंत. ४. चैन पडेना. ५. गुरुपतनापासून झालेलं भय हा च राहु, त्याच्या मखीं. ६. संधि न करणारी. ७. प्रवाहाकडे तोंड करून. ८. स्पष्ट.

पाहे कृपाकडे; तो सांगे गुरुहानिची कथा यास.. १६६
वृत्त सविस्तर सर्व श्रवण करुनि परशुरामसा खवळे.
कीं मंतु[1]करा, तक्षक सर्प, कराया, डसोनि, राख, वळे. १६७

---

## अध्याय बाविसावा.

द्रौणि म्हणे, "मदधिक जें केलें वात्सल्य नित्य मत्तातें,
रे धर्मा! रे भीमा! कैसा रे! विसरलासि मत्ता! तें? १
गोपीजन ठकवावा, खाया नवनील-साय, कनकपटें;
चालों देइल, मार्जा, शिरतां अवनींत, सायक न कपटें. २
गुरुच्या, सफळ कसा रे! होइल, तव राज्यकाम हा, घातें?
हा मंदा! संपादुनि, इच्छावें राज्य कां, महाघातें[2]? ३
शिव! शिव! कोण कुलज नर, कपटें गुरुच्या करील अहितातें?
पांडव न शिष्य, पाजुनि पय केले पुष्ट, दुष्ट अहि, तातें. ४
[3]परमास्त्ररहस्य नृपा! आहे उपदेशिलें मला तातें!
पांडव काय? भजे[4], स्मरहरनयना तेज जें, अलाता[5] तें? ५
समुपेक्षिलें, ठकविलें, पृतनामहिमानका[6] पित्या; सहसा
त्यां मारावे खळ ते, कृतनाम[7] हि, शान्त कापित्यासह सों[8]. ६
नारायणास्त्र योजुनि, करितों अहितांसि आजि भस्म, रहा[9].
कुतुक पहा; म्हणतिल सुर, 'जग खातो काळ, परम घस्मर[10] हा.'"
ऐसी महाप्रतिज्ञा परिसुनि, कुरुकटक सर्व ही परते.
गर्जे सिंहरवें तों; धर्मादि समस्त वचकले पर ते. ८

---

१. अपराधकर्त्यास. २. महापातकातें. ३. ब्रह्मास्त्राचें गूढ ज्ञान. ४. काकु-**पंत.** (कांकु=विकृतस्वर). ५. कोलीत. ६. भारतसेनायशःख्यापक आनकसा-**पंत.** कुरुसेनायशाची प्रसिद्धि करणाऱ्या नगाऱ्यासारखा. ७. पाठांतर-**कृतनमन.** ८. 'अथवा केलें नाम जिहीं पाडवकृष्ण-**पंत.** ९. पळों नको-**पंत.** १०. हडुभक्षक-**पंत.**

धर्म पुसे विजयातें, 'सर्व पळाले भिवोनि गुरुपातें,
गर्जति कां हे? जाला बा! कोण सहाय वीर कुरुपातें? ९
हा रव कोणाचा, गा! दरदुंदुभिसिंहनाद लोपवितो?
वाटे सहाय त्यांला झाला, धरितो सदैव जो पवि तो.' १०
जिष्णु म्हणे, "पळ पळ परसागर जेणें गमे अनाद रिता,
हा गुरुसुतरव, जैसा भास्कर, तेजोंतरा[1] अनादरिता[2]. ११
कुपित गुरुसुत, सकळपरदारांच्या, आजि हरिल, टिकल्याला.
जें करिवरमदहर, तें साहजिक, न, तेज, हरि, लटिक ल्याला.
अनृत सुतमरण सांगुनि, गुरुकरवीं त्वां धनुष्य सोडविलें.
पार्षतकरें, पितृशताधिक गुरुचें शिर रणांत तोडविलें. १३
त्वां वधुनि घेतलें, यश गति व्हाया, कां न देशिकाकरवीं[3]?
जरि हंसकाक सत्यानृत, तरि तूं कान देसि काकरवीं[4]. १४
स्वर्गपद, ब्रह्मपद हि, किंबहुना मोक्षपद हि, सोडावें;
'श्रीगुरुपद चि,' म्हणति कवि, 'सर्वस्वार्पण करूनि, जोडावें.'
राज्यपद अनर्थास्पद; केवळ त्याच्या धरूनि लोभातें,
गुरुपद गमाविलें, कीं गेलें घेऊनि सत्य शोभा, तें. १६
वाळिवधीं रामाचें, द्रोणवधीं हें तुजें अयश, राज्या!;
तो व्यर्थ, असोनि मुखीं, सत्य नरा ज्या नसे, अय[5] शरा ज्या[6].
पक्षांत हळु च शिरली, जेंवि भरतनायका! पिलें शिरतें;
मद्गुरुचें, निष्करुणें वाळुकसें हाय! कापिलें, शिर तें. १८
गुरुघातकासि आतां रक्षीं, सामात्य तूं अजातारी,
न च, पर नरकुंजर जो, त्या हरिपासूनिया, अजा, तारी. १९
बहु वय सरलें, उरलें थोडें; तों काय कर्म ओडवलें?
सिंधु बहु तरुनि, शेषीं, कैसें बा! सत्यउडुप[7] फोडवलें? २०
हा! हा! उपेक्षिला गुरु, या पापें पावलों चि नरका मीं.

---

१. अन्य तेजास. २. तिरस्कार करणारा. ३. गुरु—पंत. ४. काकशब्दी—पंत.
५. लोहाग्र, शल्य. ६. प्रत्यचा, दोरी. ७. सत्यरूप नौका.

बुडतो, सर्व बुडवितो, लोभी, क्रोधी, तसा चि नर कामी." २१
सर्व हि उगे चि होते, ऐसा गुरुशोक अर्जुनें करितां,
वरितां उदासपण बहु, चापलता त्यजुनि मृदुलता धरितां. २२
भीम म्हणे, 'चालविला, वर्षें, संन्यासिधर्म हा, तेरा.
क्षत्रिय धरिति, कराया समरीं ऐसें चि कर्म हातेरा. २३
सर्वस्व हरुनि कपटें, स्त्रीची ही सोडिली निरी हातें.
क्षमिलें खळकृत धर्षण, दुःसह कपिलां अशा निरीहा तें. २४
समय न विलंघिला, तरि जीवन हि हरावया झगडतात.
सुज्ञ हि, उगा चि आम्हांविषयीं झाला खरा दगड, तात. २५
त्वदनुमतें, या हिततमकृष्णानुमतें चि धर्म वर्ततसे.
तऱ्हि खळ अतिदुस्तर हे, तिमिरीं पथ सर्पगर्भगर्तें तसे. २६
सर्व यथाशक्ति रणीं झटतों, विजयार्थ धरुनियां सदसि.
त्यां आम्हां, अतिदुःसह, जेंवि क्षार क्षतीं, असें वदसी. २७
वर्णुनि गुरुसुत, भिवविसि मज खळबळशत भयावहा काय?
आहे गदा सहाय, द्रौणिपुढें धरिल दर न हा काय. २८
व्यसनीं, मद्धृदयातें, ऐसें बोलों नको, विदाराया.
व्यसनीं दुखविसि निष्ठुर कैसें बोलोन कोविदा राया! २९
द्रौणि किति? द्रोणाचळ यो; भस्म चि करिन तो गदाघातें.
भगवत्स्मरणें भगवद्भक्त जसा नरकभोगदाघातें. ३०
त्यजुनि भय, स्वस्थ रहा. म्हणवी धर्मा दत्तासि 'हा!' न, खा
हा नरवासव देइल न, सलोकपमृत्युच्या हि, मान, खा. ३१
भ्यालासि, कृष्ण सारथि असतां, वद सत्य पांडवा खातो,
नर कीं नग पाहेल चि, जरि गिळिल हि सत्यपांड वाखा तो.
पार्षत हि म्हणे, 'होता षट्कर्मीं निरत काय हा नियमें?

१. शस्त्राला. २. कपिलमहामुनीला. ३. निरीच्छ–**पंत.** ४. सर्प आहेत ज्याचे पोटीं असे खळगे. ५. उत्तम खड्ग. ६. भय. ७. जाणत्या! ८. दिव्य–**पंत.** ९. ब्रह्माड–**पंत.**

केली, जेंवि करावी, बहुजीवनिकायकायहानि, यमें. ३३
त्यजुनि स्वधर्म, जाला परधर्माश्रित, अशांत जरि पिकेला,
हा ब्राह्मणब्रुव, ध्रुव धन घेउनि, कौरवां स्वयें विकला. ३४
क्षत्रियधर्म हि उत्तम, परि त्यातें नीट चालवीना कीं;
यन्निष्ठापुरुषातें, स्वर्गश्री नित्य पोलवी नाकीं. ३५
मद्वांधव चि खपविले; इतरांसि नसे चि अवधि लेखाया;
या अधमापरि वाटे त्या घटकर्णें हि न वधिलें खाया. ३६
यावा, कनककशिपुचा जेसा, तैसा चि हा वध, मनातें.
कैंचा द्विज? कैंचा गुरु? दुरित करुनि बुडवितो अधम नातें.
अर्जुनजी! सुकृत नव्हें, अरि अतिदारुण असा वधाना, तें.
खळ सावधान न मरे, तरि मारावें असावधानातें. ३८
केली त्वत्तातें ही, खाया तांबूलकवळ, आ ज्यास,
शरशयनीं न निजविलें काय तुवां, त्या तशा हि आज्यास?
बापाचा परम सखा, जो नृप भगदत्त, बापसा मान्य;
पाळीं पाडुनि कपटें वधिला, तें काय पाप सामान्य? ४०
गेलें काय तुजें, म्यां जरि पितृघातक, हरूनि मद, वधिला?
खळ जो प्रवर्तला जन सकळ वधाया, करूनि मदं वधिला. ४१
भगिनीभाचर्यांकरितां, आवरुनी चाप, राप हा साहे;
द्रुपदसुतभुज स्तवनीं योग्य; न नीचेंच्या परोपहासा, हे. ४२
रामें रावणसा, हा म्यां चि वधावा रणीं, असें होतें,
याजोपयाजमुनिकृत होइल लटिकें तुम्हां कसें हो! तें? ४३
धर्माकडे, मजकडे, नाहीं च अधर्मलेश हा कांहीं.

---

१. वहुत जीवसमुदायाच्या शरीराची हानि. २. वृद्ध. ३ ब्राह्मण म्हणविणारा, निंद्य ब्राह्मण. ४. खरोखर. ५ हाक मारी ६. पाडून ७ भीष्मास. ८. पापण्या. ९. पिता द्रुपद याचा वध करणारा द्रोण. १० मदताला—पंत. ११. नीच शत्रुच्या उपहासाला १२. द्रुपदाकडून यज्ञ करवून, द्रोणाला मारणारा पुत्र तुला होईल असा वर त्याला याजोपयाजऋषींनी दिला होता.

शिष्यद्रोहें मेला, गेला, परतेल काय हाकांहीं?' ४४
पार्षतकृत गुरुदूषण बहुत चि; मज सर्व वर्णवेना तें.
"धिग्धिग्धिक्!' सकळ हि म्हणती त्यास, जसे सर्व वर्ण[1] वेना तें.
अश्रुपरिप्लुतनयनें धृष्टद्युम्नाकडे विजय पाहे.
राहे धर्म अधोमुख, भीम हि; कोण्हास ही न तें साहे. ४६
शैनेय म्हणे, "कैसें वदतो? जाणों नव्हे चि पापीसा!
नाहीं कोणी येथें, याची जिह्वा समूळ कापीसा. ४७
सत्य रसज्ञा म्हणतो, गुरुनिंदा बोलतां, तडकलीला[2];
करितील दर्शनार्थ, प्रियसख हे बोल, तांतड[3] केलीला. ४८
जीभ चिरावी शतधा, शिर हि उलावें खळा! भुज गळावे,
श्वपच[4]गृहाला पथिक द्विजसे, सोडुनि तुला, असु पळावे. ४९
हितशत्रु[5] काममुख हे, 'नरकीं' म्हणती 'अपत्रपा! पड,' सा[6];
पाप डसाया लाविल अहि वृश्चिक; भाजसील पापडसा. ५०
त्वां, [7]सप्त, अवरँ, पर, जे, त्यांतें नरकांत घातलें. कानें[8]
परिसुनि म्हणेल पार्षत[9], 'केला द्रोणें[10] न घात, लेंकानें.' ५१
भीष्में महानुभावें आदरिला तो तसा स्वयें स्वांत[11].
तूं जेंवि कृतघ्न तसें मानी शुद्धास ही तुजें स्वांत[12]. ५२
भीष्मवधीं हि शिखंडी कारण उत्पादिला तुज्या बापें.
कोण तुम्हां द्रुपदसुतांवांचुनि जोडील हीं महापापें? ५३

---

१. ब्राह्मणादि चारी वर्ण. २. गुरुनिंदाविषरससेवने उलती तरि रसज्ञा सत्य असें म्हणतो—**पंत.** ३. कळीला या बोलांच्या भेटीस यावया मोठी तांतड होईल—**पंत.** ४. चांडाळाच्या घराला. ५. जो स्ववश जाला निर्लज्ज त्यास कामक्रोधादि हितशत्रु 'नरकीं पड' म्हणतात, ह्याकरितां नरकीं पडसील; केलें पाप जिव्हेस वृश्चिक सर्प डसवील—**पंत.** ६. पट—**पंत.** ७. अलीकडचे (सात वंशज). ८. परलोकीं हे कर्म—**पंत.** ९. द्रुपद—**पंत.** १०. मारिले, परंतु स्वर्ग दिला; द्रोणें घात न केला; पुत्राने चि अधर्मे नरकीं घालूनि घात केला—**पंत.** ११. आपलें मरण. १२. अंतःकरण.

ब्रह्मघ्ना[1]! जन पाहे तुज, सहसा आजि पाहुनि रवीला.
द्विजराजघ्ना! बहुधा विधिनें तुजला चि राहु निरवीला[2]. ५४
सरलें आयुष्य तरि च, निंदिसि तूं मत्समक्ष गुरुगुरुतें[3].
मांजर वांचेल कसें, करिल व्याघ्रासमीप 'गुरुगुरु,' तें? ५५
नाहीं उपयोग तुजा, कटकीं पळमात्र ही नसावास.
श्वेततुरग[4] मृगमदसा; तूं अस्तुतिपात्र हीनसा वास. ५६
साहेन तुझे शत मीं, एक चि माजा गदाप्रहार सहा.
पापा! पळों नको; घे अमृतरस असा नसे, महारस[5] हा.". ५७
पार्षत म्हणे, "वदेल न दुर्वचनें मत्त अशुभ जन कां ही?
नेणे क्षमारतांचें, त्वत्तुल्य मनुष्यपशु, भजन कांहीं. ५८
हृदयीं क्षमा असावी; सर्वत्र सदा असों नये, पण[6], ती.
म्हणती क्षमितां 'दुर्बळ;' न क्षमितां करिति दुर्जन प्रणती. ५९
गिळिलासि महादुरितें, दुष्टा! करिसील काय वध माजा?
पाहों नये तुजकडे. माज्या दृष्टीपुढोनि अधमा! जा.. ६०
जो घोळसी तुज, जसा सुरतीं अतिकामरस कळत्रास,
पाहोनि पावले, ज्या नरसिंहा, सामर सकळ, त्रास; ६१
भूरिश्रवा, सिताश्वच्छिन्नभुज, प्रायगत[7], महातेज्या,
'बहु धन्य' म्हणत होते, अमरसमरसिकबुध पहाते, ज्या[8]; ६२
त्यातें वधुनि न लाजसि, नरकफळा वरुनि, वीरहानिच्या.
मिरविसि पुरुषार्थ, म्हणसि लोकीं आपण चि वीर, हा! नीच्या!
केवळ चांडाळ चि तूं जालासि, प्रायगतसुजनघातें.
पाप्या! तुला चि घडलें कर्म, तसें न च घडेल अनघा[9] तें. ६४

---

१. हे द्रोणास मारणाऱ्या, (पक्षीं) चंद्रास ग्रासणाऱ्या! २. त द्विजराजघ्न जसा तसा हा ही होय; असे करावे की, हा धरितां पुन्हा द्विजराज आहे च; त्वां नाहीं च केला—**पंत.** ३. अर्जुनगुरु द्रोणातें. ४ अर्जुन. ५. वीररस—**पंत.** ६. परतुं—**पंत.** ७. प्राण देण्यासाठीं योगधारणा करून बसलेला. ८. ज्या भरिश्रव्यास. ९. निष्पापा.

म्यां, नसतां छिन्नभुज प्रायगत, द्रोण मारिला मदरी.
बदरी, निवेल, विप्राधमशमनें, सर्वशांतधामदरी. ६५
द्रोणशिर कापिलें तें, नाक तुजें काय? जेंवि घटकर्ण,
तैसा चि रणीं मर तूं; येणें चि फिटेल आप्तकटकर्ण. ६६
दुर्वाक्य पुन्हां वदतां, द्रोणशिर तसें, तुजें हि कापीन.
न मथितिल खळा तरि, हे भुज केले व्यर्थ काय गा! पीनें? ६७
मूढा! केवळ धर्में राज्यव्यवहार चालतो काय?
नें करी अधर्म ऐसा, जो एक तुम्हीं रचाल तो काय! ६८
दुर्योधनें अधर्में द्यूतक्रीडेंत वंचिला पार्थ.
लुटिला कुटिलानें हा चौरसमूहें वनीं जसा सार्थ. ६९
छळिली सती अधर्में; होता फेडीत पापजन वासा.
पाठविले वल्कलधर करुनि, अधर्में चि, सर्व वनवासा. ७०
धावोनि येत होता, जो मद्रप एक भेट, कळवळून,
नेला पुजुनि अधर्में, न्हाया यांचें चि फटकळ वळून. ७१
वधिला बाळ अधर्में कोंडुनि, विपिनीं जसा शशक; सारे
झटले वृकसे; नाहीं तरि होता त्यांसि तो वश कसा रे!? ७२
भीष्मप्रभुच्या पातें, घडला चि अधर्म धवळतुरगा हीं.
पूस खरें कीं खोटें, देतिल देवर्षि, सिद्ध, सुर, गांही. ७३
भूरिश्रवा अधर्में संहरिला त्वां हि पंडितंमन्यें,
देवद्रुम दुर्दैवें जेंवि मदांधें करीश्वरें वन्यें. ७४
त्यांहीं तसा चि यांहीं केला आहे अधर्म हा कांहीं.

१. माझा शत्रु. २. बदरींत (वदरिकाश्रमात) सुब्राह्मण ज्ञाताचें धाम अशा ज्या हिमाचळादि दरी त्या हीं ब्राह्मणाधमवधें निवर्तील—**पंत.** ३. आप्त लोकाचें ऋण—**पंत.** ४. पुष्ट ५. अधर्म न च करी असा ब्रह्मयानें तो क्षत्रियकाय रचिला नाहीं तुम्हीं एक ब्रह्मयापरीस महासमर्थ पुढे नवा रचाल, असा उपहास यात—**पंत.** ६. वस्त्राला. ७. मुख्य वीर—**पंत.** ८. प्रेम बहु द्रवोनें—**पंत.** ९. पांडवांचे परमाप्तमहावीरापहार अकल्याण—**पंत.** १०. ग्वाही, साक्ष.

'हा!' कां हीं म्हणति बळें? होईल तुझ्या हि काय हाकांहीं? ७५
जें धर्माधर्माचें तत्व, कळेना च बालिशमना तें;
मातें, नेणुनि, निंदिसि तूं पामर जेंवि वाळिशमनातें. ७६
पूस परांचे पथ तूं पांचाळांच्या चि, सांड गावांचे.
अजशशमृगींत चि बळी; पळ हि हरिपुढें न लांडगा वांचे." ७७
कोपे सात्यकि, ठेउनि शर कार्मुक, घे, महाभुज, गदे, तो.
वाटे गरुडासि सिव्या, बहु, चक्षुर्विष महाभुजग, देतो. ७८
त्यावरि सात्यकि धांवे; पार्षत टाकी उडी रथावरुनीं.
गमले ते अंतकसे, अन्योन्यक्षयकरा पथा वरुनीं. ७९
प्रभुवचनें द्रुत धांवे भीम, बळें माधवासि कवटाळी.
यमुनाह्रद गरुडाची, वृष्णिवराची तसी च कवं टाळी. ८०
आवरितां आटोपी त्यासि पदीं भीमसेन तो साव्या.
त्यांतें सहदेव म्हणे, 'आम्हांकरितां दुरुक्ति सोसाव्या.' ८१
पांचाल्य म्हणे, "सोडा, सोडा, धरितीं कशास भावोजी!?
खलदलनें हर्षो द्या; देत्ये राघवंयशा सभा 'वो' जी. ८२
येवूं द्या हो! मजवरि, हा सात्यकि सत्य वात, पर्वत मीं.
नुरवीन या वराकीं, नुरवी रवि; जेंवि, तिळ हि गर्व, तमीं. ८३
हे कौरव आले कीं; यांचें ही मथन हें महाकार्य.
आम्हीं मुदित करावा, सर्वांनीं मथुनि अहित हा, आर्य. ८४
अथवा यांचा कांहीं नाहीं पार्था महातपा लेखा.
म्हणतो काळीं, दावुनि अरि जेंवि गजा महन्तें, 'पाले खा.' ८५

१. कटकें "हाय! हाय" का म्हणतात?—**पंत.** २ रामातें ३ द्वितीया गदेनें—**पंत.** ४. सात्यकीस. ५ कालियावर गरुडाची झडप यमुनाह्रदें पडो न दिली, तसी च भीमें सात्यकिची पार्षतीं—**पंत.** ६. महाव्या. ७ सात्यकिनें, पार्षतानें—**पंत.** ८. ज्याचा ठायीं बहु प्रेम त्यास वो देतीं. सत्सभेचें खळदलनयशीं प्रेम हे ही महाखलदमनयश सेवूनि हर्षेल—**पंत.** ९. धम—**पंत.** १०. पालेपल्लव दाखवून महामात्र गजास 'खा' जसें म्हणतो. तसा अर्जुन शत्र दाखवून काळास 'खा' म्हणतो—**पंत.**

जो छिन्नबाहु वधिला कौरव्य, मला तयापरि समजला;
कटे अधिक शतगुणें तेजस्वि अलात[1], यापरिस, मजला. ८६
तेजस्वी धरवेना, कळलासि स्पष्ट तूं चि फुसका रे!"
हें परिसुनि, मारुतिभुजधृत[2] सात्यकि, सर्पसा चि फुसकारे. ८७
भीमभुजांतुनि न सुटे, संसारांतुनि जसा चि संसारी.
त्यांतें धावुनि यत्नें समजाविति धर्मराज, कंसारी. ८८
कोपीं, ऐकुनि कुरुरव, त्यांवरि ते शीघ्र, नरवरा! गेले.
तैसे हरि, परिसुनियां मत्त गजांचा हि, न रव, रागेले. ८९
क्रुद्ध व्याघ्र चि सात्वत[3], पार्षत ते; भौमसोदराक्ष[4] ससे
पर, गमले; तदिषु हि असृगास्वादनलब्धमोद[5], राक्षससे. ९०

---

## अध्याय तेविसावा.

पडले गळां चि धावुनि, सेवुनि बहु रुट्सुरा[6], सुरथ डँकले[7]
अभिमानडिंकें, न सुटति कुरुपांडु[8], जसे सुरासुर थडकले. १
नारायणास्त्र योजी गुरुपुत्र परावलाविलापार्थ.
वाटे, त्यां असुरांच्या दुर्दैवें, तो बलाविला पार्थ. २
वृष्टि, विविधशस्त्रांची, बहु होवूं लागली, असुसहा[9] ती.
कलिलीलेला बुधसे, न च, वीरांचे तिला असु सहाती. ३
जाळी परकटकातें, ग्रीष्मीं दवदहन जेंवि कक्षातें,
कोणाची ही चाली नेदी नारायणास्त्र, कक्षां[10], तें. ४
पेटे अधिक चि, जों जों वाराया करिती यत्न ते जन, गा!

१. अलाततेज वाढविता वाढेल-**पंत.** २. भीमाच्या भुजानीं धरलेला. ३. सात्यकी. ४. मगळासारखे (लाल) नेत्र ज्याचे असे. ५. रक्ताच्या आस्वादनाने ज्याना आनंद प्राप्त झाला आहे असे. ६. क्रोधरूप मद्य-**पंत.** ७. चिकटले-**पंत.** ८. कौरवपांडव-**पंत.** ९. दुःसहा. १०. बाजू, कोटी, मात्रा.

तावी पवा, जसें रविकांताच्या, दिवसरत्नतेज, नगा. ५
धर्म म्हणे, 'क्षत्रिय हो! करितां काशास कायहोमातें?
मीं मंदभाग्य, केवळ पापी, ताराल काय हो! मातें?' ६
'धृष्टद्युम्ना! उरलें बळ रक्षावें, वृथा न भाजावें.
बा! विहगाहीं, सोडुनि दवपरिवृतपादपा, नभा जावें.' ७
'जा, शैनेया! माजें मामातें सांग नमन, मामीतें;
जें केलें साह्य तुवां, शतजन्में आठवीन बा! मीं तें.' ८
'आहे सुज्ञ समर्थ, स्वश्रेय करील हा यदुपदेश,
विपदब्धिसेतु होउनि, लोकांला तारितो यदुपदेश. ९
सानुज मी, या अस्त्रज्वलनीं शिरतों अरे अहीनकुळा!
सहदेवा! मेला ही तो धन्य चि, जो न भी अही, नकुळा. १०
जननीस शोक बाधे, पुत्राचा वेचतां वृथा काय.
रणमरणें हर्षेल प्राकृतमाता, तसी पृथा काय? ११
भीष्मद्रोणसमुद्रीं तरलों; या द्रौणिगोष्पदीं बुडतों.
अचळ प्रकंपना जे, ते व्यजनें तुच्छ तूळसे, उडतों.' १२
जिष्णुमनीं, गुरुपुत्रें, पांडव पांचाळ शेष आहेत
हे मारुनि, पुरवावा गुरुचा, वधिले न सर्व हा, हेत. १३
अभिमन्यु बाळ जेणें, कथुनि वधांचा उपाय, मारविला,
लाजविलें उग्रत्वें दुष्प्रेक्षत्वें गुणें यमा रविला. १४
ससुतें जेणें, पुसतां धर्मद्यूतांत, वदन वासून,
कृष्णा उपेक्षिली, दे हर्ष, नमुनि नित्य पद, नवा, सून. १५
जेणें जयद्रथातें, त्या व्यसनमहार्णवांत ताराया,
लेवउनि कवच, केला क्षम कुरुपति, अर्जुनासि माराया.. १६
पांचाळ सत्यजिन्मुख जे होते मज्जयार्थ झटत रणीं,

१. शत्रुजना—पंत. २. दिनमणि—पंत. ३. वणव्यानें वेष्टलेल्या अशा वृक्षाला. ४. द्वारकेसि—पंत. ५. ज्याचा उपदेश. ६. मुंगसाला. ७. महावातासें. ८. जी पद नमुनि नित्य नवा हर्ष देते अशी. द्रौपदी उपेक्षिली—पंत.

ब्रह्मास्त्रराहुकरवीं जेणें, ते गिळविले सुभटतरणी. १७
द्याया आम्हां सर्वां स्वर्गनिवास, प्रवर्तला होता,
कल्याणवृत्त गुरु, म्यां मारविला युद्धमन्युचा होता! १८
अस्त्राग्नींत जळावें, हें प्रायश्चित्त सर्वथा युक्त,
उक्त प्रकार जे जे, त्यांत बरा शीघ्र करिल हा मुक्त.' १९
प्रभु, भुज उभारुनि, म्हणे, 'सैनिक हो! शीघ्र आयुधें सोडा.
यानावरूनि उतरा; कर, या अस्त्रासि सर्व ही, जोडा. २०
भस्म करिल योधजना बहुता, शरणागताविना शम हा,
'न धरिल; उरविल कोण्हां न हुताश, रणागतां, विनाश महा.'
तों भीम म्हणे, 'कथितों हितहित हि तमालनील; परि सारे
मानधन कुलजजन हो! मन हो न त्रस्त; वाक्य परिसा, रे!
सोडावें कुलजांहीं जीवित, समरीं, न शस्त्र सोडावें.
मोडावें आप्तवचन; अयश, शरीरार्थ, कोंवि जोडावें? २३
धरितां मीं, या अस्त्रा न उराया तिळ हि उर, गदा हातें.
रे! गरुडसंश्रितांच्या, विषदहनें, करिल, उरग, दाहातें? २४
पावेल मजपुढें, हा घेउनियां हार, विप्र, तापातें.
भेटुनि रघुरामा, भृगुराम कसा हारवि प्रतापातें? २५
रे जिष्णो! त्वां समरीं भिवुनि परा, सत्व बळ न सोडावें.
करपद्म तुजें उजवें विशर, विगांडीव, पळ नसो, डावें.' २६
जिष्णु म्हणे, 'आर्या! मीं न करिन अन्यत्र कामुकन्यास;
नारायणास्त्रगोद्विजतेजा द्यावा, न, मान, अन्यास.' २७
तें जयवंच परिसुनि, तो अत्यद्भुतमानसत्व रागेला
घनसा चि द्रौणिवरि, स्वीकारुनि मान, सत्वरा, गेला. २८
हास्य करुनि, गुरुनंदन ताडी, अस्त्राभिमंत्रितशरानीं.

---

१. रणयज्ञातील होता च केवळ—**पंत.** २. हा ब्रह्मास्त्रानल. ३. कोण्हा रणागता न उरवील, महाविनाश हा—**पंत.** ४. तमालवृक्षाप्रमाणे नीलवर्णाचा श्रीकृष्ण. ५. न कराल? काकु—**पंत.** ६. माघार. ७. अर्जुनाचें भाषण.

वाटे दीव्रग्रस्तीं, शिरला तो द्विरद, काळवश, गानीं. २९
भीमाचळावरि च वा! अस्त्रजलदपटल तें सकळ वळलें.
कटक कळवळे बहु, परि हृदय पवनसूनुचें न कळवळलें. ३०
क्षितिवरि उतरुनि, सर्व हि करिती, तत्काळ, आयुधन्यास.
म्हणती सुरनर हि, 'असो देवा! या[1] विपुल आयु धन्यास.'[2]
जय आच्छादी भीमा, अस्त्रज्वलनांत, वारुण अस्त्रें.
केशवकृपा चि झांकी त्या बाळा, त्या महानपी वस्त्रें. ३२
दहनीं[3] मिळोनि कळवी, कीं दहनसमान, वेगळा मी न.
मज हि गमे, तो अस्त्रीं प्रथम, जसा, मानवे गळा, मीन. ३३
वारुणपरिवृत म्हणवुनि, भस्म न करि दहनराशि, शिरल्याला.
सुखद[4] चि परप्रतापातप त्या, जो हरिदयाशिशिर[5] ल्याला. ३४
भीमावनार्थ धांवे ब्रह्म, करी जें चिरायु धात्यातें.
पदधावनें बहु यश दे, विस्त्रस्तपटा[6] निरायुधा त्या तें. ३५
दीपालयांत शिरवी, जेंवि कृपणधनिकमानवास वही.[7]
प्रभुसि तसा अस्त्रीं[8] तो पावना भक्तमान वासव ही. ३६
दोघे नरनारायण गांठिति भीमासि, वरुनि सुरयातें.
जरि हा असा दुराग्रह, वदले बहु 'धन्य,' वरुनि[10] सुर यातें.
झोंबति ते भीमाच्या, जैसे याचक करास दात्याच्या.
वंदन दुराग्रहा,[11] स्वदुराग्रह जाया, करा सदा त्याच्या. ३८

१. भीमाचे. २. या धन्यास—भीमास—**पंत.** ३ दहनाशु दहन जसा मिळतो सा मिळोन तो भीम लोकासि असें कळविता जाला कीं, मी दहन चि आहे; वेगळा नाहीं. योग्य मलीं तेजस्विप्रवरासि हे असे, अस्त्रासि मानवला, जसा प्रथम मुस्वाद म्हणोनि गळास मीन मानवतो, ऐसे त्याच्या परमात्माहे मज ही गमले—**पंत.** ४. दुःखद होत नाहीं च—**पंत.** ५ बर्फ. ६ सुटलें आहे वस्त्र ज्याचें अशा ७. उधाराची वही. ८ भीम शिरविता जाला—**पंत.** ९. उत्तम वेगानें—**पंत.** १०. गगनातून—**पंत.** ११. त्या भीमाच्या दुराग्रहाते वंदन करा—**पंत.**

घे धनु धनंजय, नृपा! शौरि शरातें, बळें चि झोंबोनीं.
ओढिति रथावरुनि मग, घालूनि मिठी, भुजांसि लोंबोनीं. ३९
तों तों गर्जे भीम, प्रभु जों जों बळ करूनि आकर्षी.
नारायणास्त्र खवळे, भ्याले बहु नारदादि नाकर्षी. ४०
कृष्ण म्हणे, 'हें काय? त्यज आग्रह; बा! न उचित हठ कविला.
उतर रथावरुनि क्षण; अभिमानें कोण कोण न ठकविला? ४१
युद्धें निवारतें, तरि कां आम्हीं सर्व न करितों युद्ध?
क्रुद्ध नको होवूं, बा! या अस्त्रशमीं उपाय हा शुद्ध. ४२
शस्त्रन्यास करुनि, हे वीर तुझे उतरले, पहा, सारे.
या रेवतीधवानुजवचना दे मान, मानदा! बा! रे!' ४३
दुर्योधनदुर्दैवें प्रभुकरवीं तो बळें चि उतरविला[3].
कीं, देणार पवनसुत शोक तुला, जेंवि शक्रसुत रविला. ४४
ज्या स्मरतां, कामाद्यरिषट्काहंकार सर्व हरपावे,
भीम वळे बहुकष्टें, पूर्वीं त्या प्रभुसि जेंवि हर पावे. ४५
भीम प्रेमबळें चि, न पावुनि नारायणास्त्रदर, वळला.
त्या सुयशें जेंवि, तसा सुरतरुकुसुमें न नाक दरवळला. ४६
नारायणास्त्र शमलें, जेव्हां तो वायुचा तनय शमला.
प्रभुचेंसें प्रभुच्याचें, सांगो दे, दुसरि मात न, यश मला. ४७
पुनरपि परप्रमुदित प्रेक्षुनि, पौरवपती[10] असुख पावे.
त्यांसि[11] म्हणे, 'उरल्यांचें, या चि महास्त्रानळें, असु खपावे.'
द्रौणि म्हणे, "मृत्युपरिस भंग[12] अधिक शतगुणें, असें आहे.
मृतमारण[13] नीचेप्सित. होते परसरांत की पदर आहे. ४९
'अस्त्रप्रदीप' म्हणसी 'उजळीं, तुरवावयासि परतेल[14],'

१ अस्त्रशांताविषया. २. कृष्णवचना. ३. रथावरूनि–**पंत.** ४. दुर्योधनवधें–**पंत.** ५. धृतराष्ट्राला. ६. कर्णवधे–**पंत.** ७ भगवत्प्रेमबळें चि वळला, न अस्त्रभयें–**पंत.** ८ स्नग–**पंत.** ९. प्रभुचे यशसे प्रभंजनाचे–**पंत.** १०. दुर्योधन. ११. गुरुपुत्रासि–**पंत.** १२. पराभव. १३. मेलेल्यास मारणे. १४. शस्त्ररूप तेल.

योजूं नये पुन्हां हें. योजिन तरि मजवरी च परतेल. ५०
मज हरिंपुढें उरावें न, पळभरि हि, शत्रुकटककाळविटें.
केला दिव्यास्त्रप्रतिघात खरा, गोपदार[1]बाळविटें." ५१
भूपं म्हणे, 'न जयश्री[2] देसिल तूं, बा! परंतु कां मातें?
देतो सुवधू, साधुनि यत्नें, प्रभु बाप, रंतुकामातें[3]. ५२
त्र्यंबकअस्त्रज्ञा[4] कीं तूं न पळों देसील पद हि, सुत्रांम्या[5];
तुजवरि, गुरुघ्नवध हा भार दिला फार न गुरुपुत्रा! म्या.' ५३
नृप गुरुसुता स्तवें, पटु[6] जेंवि हया, तापवि, प्रतोदानें,
धांवे, परांसि द्याया, चिंतुनि तें पाप, विप्र तो दानें[7]. ५४
शरभ जसा सिंहातें, गांठुनि करि भग्न पार्षता. राया!
सात्यकि भेटे व्यसनीं त्या, श्रोत्या जेंवि आर्ष[8] तागाया. ५५
द्रौणि म्हणे, 'शैनेया! रक्षिसिल न आपणा हि आपण, जा[9].
रक्षिल न शक्र; याचा जरि बा, आजा हि, करिल आ[10], पणजा.
पांचाळ सर्व वधिल्यावांचुनि, पावेल कोप उपशम न.
वेचुनि वाढविसिल तूं, ज्वलनाचें करिल काय, तुप, शमन?'
ऐसें[11] गर्जुन अर्जुनसम, जो समजोनि, करुनि पाठ, कवी.
पाठक विख्यात जगीं, तैशास हि[11] तो[11] महातपा ठकवी. ५८
एकें चि शरें भेदुनि कवच, उर, क्षतज[12] ओकवी, राया!
सात्यकिला लोळविंतां, भ्याले बहु, सर्व लोक, वीरा या. ५९
गमला, झाला तो गुणसद्रत्नांचा डघा परेतें[13] रणीं.

१. श्रीकृष्णानें. २ कृष्णें नारायणास्त्रप्रतिघात केला, परंतु तूं समर्थ अस्त्रानें मज जयश्री कां न देसील? देसील च. समर्थ पिता पुत्रासि वधूरत्न यत्नशतें साधून देतो त्व देतो.—**पंत.** ३ रमायाकारणें आहे काम ज्यास तो रतुकाम, विलासी—**पंत.** ४ अस्त्रज्ञ—**पंत.** ५. इन्द्रास. ६ कुशळ सारथी—**पंत** ७. गुरुवधपापाच्या मरणपराभवनरकादि फळाचा दाता—**पंत.** ८. रामायण—**पंत.** ९. दृष्टिपुढें नको राहूं—**पंत.** १०. तोंड पसरील. धृष्टद्युम्नत्राणार्थ—**पंत.** ११. ऐसें गर्जुन तो महातपा द्रौणी तशास हि ठकवी—**पंत.** १२. रक्त. १३. मृत.

वदला असेल चि, धरुनि तेजाची चाड, वा! परे तरणी. ६०
सूतें शीघ्र पळविला सात्यकि तो त्यजुनि समरमाहि, मागें,
ज्या शुचिगुणा म्हणावें, 'स्वशिरीं तूं शंभुसम रम' हिमागें. ६१
पाडी द्रुपदसुता, शर हाणुनि जें, विप्र, भोवयांमाजि,
पाहे दृष्टि, परां रविभीतां जेंवि, प्रभो! वयां, भाजी. ६२
पांचाळचमू खवळे; स्वर्गाप्रति शीघ्र बोळवी तीतें.
रणमृत्यु न च रुचे, जरि बहु हित तरि, जेंवि बोळ वीतीतें.
भीम, धनंजय, मालव, पौरव, युवराजनाम चेदिपती,
हे पांच धांवले, ज्यां, डोळ, पाहोनि, आमचे, दिपती. ६४
वधिला युवराज पळे, पौरव हि पळे, पळे चि मालव तो,
त्या गुरुसुतापुढें पर, वायुपुढें जेंवि दीप मालवतो. ६५
नंदावरि हरि, बुडवुनि निजमख, करितां, जसा, परमख, वळे,
शरवृष्टि गुरुसुतावरि भीम तसा बहु करी, परम खवळे. ६६
तेज, परहृदयकंपद शम, तसें द्रौणि ही किमपि, त्याला.
उचित चि, जरि हरिणीच्या, येइल, वृकदर्शनें, हिम, पिल्याला.
एक जगत्प्राणात्मज, एक महाचार्यराजकायज, गा!
ते क्रुद्ध, युद्ध करितां, कल्पांतभ्रम न होय काय जगा? ६८
समरमखीं कोपविलें प्रथम चि आचार्यपुत्र; तो धनुतें
खंडुनि, मुहूर्त मूर्छित केला भीमें, समस्तयोधनुतें. ६९
नभ त्यांच्या शरजाळें कोंदे, वाहो शके न वात रणीं.
एक कुपित रुद्र गमे, एक प्रलयीं जसा नवा तरणी. ७०
भीमाचें हि द्रौणि छेदी कोदंड दोनदा; देवा!
वाटे गजा महागज भंग, महानंद चि तो नंदा, दे, घा. ७१

१. मृतकमत्र २ हिमाचळाच्या–**पंत.** ३. गरुमत रवि, पांचाळ दिवाभीत, असे मज दिसले–**पंत.** पक्ष्यांना–घुबडांना ४ बाळंतिणाते. ५ कृष्णादि गोपावर. ६. इन्द्र ७. हिव. ८. 'वायुपुत्र' भीम. ९. द्रोणाचार्यपुत्र अश्वत्थामा.

सूतासि, अलिक भेदुनि पाडी, प्रकटूनि अस्त्रमायेतें.
जैसें दूणें धृतितें, गुरुपुत्री नुरवि, शस्त्र, मायेतें. ७२
अश्व स्वैर उधळले, मूर्छित होतां चि रश्मिआवरिता;
पडला भीम, गुरुसुतक्षोभें, समर्था असोनि आव, रिता. ७३
जैसा करिता झाला दैत्यांसी धरुनि शक्रसंग रंजी:
तैसा गुरुसुत, पांडवपांचाळांसी, असीमसंगर, जी! ७४
गेली द्रुपदसुताला पांचाळचमू, तिला हि सोडुन भा.
तपनप्रतापसमर्था, न म्हणति, कोणी हि, 'मंदु' 'सोडु,' नभा.
द्रौणि परचमू मर्दी, देवूनि भयव्यथा पिटी कांहीं;
मूळमहत्व न हरिलें. आस्या झाल्या तथापि. टीकांहीं. ७६
केलें भग्न बहुत परि, न मनीं तो अजितसारथि वरमला.
त्या कंटकांत न कोणी आढळला, अजि! तसा रथिवर मला.
होउनि गुरुसूनुपुढें, श्वेताश्व म्हणे, त्यजूनि भीड, 'अरे!
उद्धत्ता! अवळांतें कां वधिसी? मजसवें चि भीड अरे! ७८
हरिबो मीं तव दर्पा: त्या ही, ज्या माजलासि भांडवलें.
यामागें, बहु निष्ठुर होवुनि, तुजसीं मला न भांडवलें. ७९
आम्हांवरि जो द्वेष, प्रीति तुझी जी सुयोधनावरि ती,
शक्ति हि, दावीं. समर्था निजतेजानें सुयोध नावरिती. ८०
नाशिल सर्व तुझा हा मद, तो चि द्रोणपातकर, होतें.
सोडुनि साहंकारा, अन्यजनीं, कोण पातक रहातें?' ८१
पुससि, 'कसें अति अप्रिय गुरुसुतकोपार्थ अर्जुन वदे? हें
कापुरुषत्व असें जरि अर्जिल तो पार्थ अर्जुन वदे हें;' ८२

१. ललाट-पंत. २ क्षण ३ स्नेह-पंत. ४ मार्गीय (रश्मि-दोर). ५. पुरूरव्याचा पौत्र-पंत. ६ चद्रान्वित ७ नागान्वित ८ म्लान आला-पंत. ९. युद्ध कर १० अत्रा'-पंत. ११ ज्या शस्त्रास्त्रधनें मत्त झालास त्याला ही हरील-पंत. १२. धृष्टद्युम्न-पंत. १३ न अहंकारी धर्मद्रष्टा सर्वपापावरि-पंत. १४. मज जरि राया! पमतोम-पंत. १५ नीचपणा. १६ भिपादो-पंत. १७ देहांतरीं-पंत

तरि परुष[1]भाषणाचीं, कथितों तुज, कारणें नृपा! परिस.
बहु गुरुपुत्रीं पार्थप्रेमा गुरुपरिस, त्या कृपापरिस. ८३
पार्थाचा विनय, कृपीं द्रोणीं भीष्मीं युधिष्ठिरीं विदुरीं,
तो चि गुरुसुतीं; लोभ हि बहुत चि, बा! जेंवि जिष्णुचा भिदुरीं[2].
परि भवदनयें पडला विघड, तशा ही सख्यांत, हा राज्या!
अहित, अहि तसा, झाला, उचित गल[3]विहार रत्नहारा ज्या.
वधिले मालव पौरव युवराज सुकीर्तिभाजन तिघे ते.
सात्वत पार्षत मारुति दमिले[4], जे वीरराज नति घेते. ८६
पडले होते हृदया[5] धर्मोक्तें, धिरडियासि जेंवि, घरे.
कीं उदकें ढेंकुळसें, परुषें वचनें पळांत जें विघरे. ८७
दैवें पार्षत सात्यकि यांत हि कलिभेद[6] घातला खोटा.
तो उँकलिला मनें, जो करिता धृतिदृष्टिघात, लाखोटा[7]. ८८
वास्तव अभूतपूर्व क्रोध श्वेताश्वमानसीं[8] पेटे;
कक्षीं जेंवि दवानळ, बळ ज्याला द्यावया सखा[9] भेटे. ८९
जाला गुरुसुतहृदयीं, तो बहु कटु परुषवाद, शर भाला.
निद्रित लाविला मृगराजानें काय पाद शरभाला? ९०
कोपे वहु, तो, वाटे उन्मूळिल कृष्णयुग्म[10] रोप[11], करी[12].
हरसा, दृश्यादृश्याहितगणदाहार्थ[13], सिद्ध रोप[14] करी. ९१
परमाग्न्यस्त्रें, सकळ हि शत्रु कराया परासु, रोपास्यीं[15]
करुनि प्रदीप्त, सोडी; तृण मानुनि त्या परा सुरोपास्यां[16]. ९२
अस्त्र प्रकटी ज्वाळामाळाकुळ[17] शर अनंत, राया! तें

१. कठोर २. वज्रावर. ३. कंठाच्या ठायीं विहार करणारा. ४. हतवीर्य केले. ५. हृदय-पंत. ६. कलहहेतुभेद-पंत. ७. ध्रुतव्यवहार आठवला; सविष पत्राचा लाखोटा उकलून वाचिता दृष्टिघात करितो, तसा छतव्यवहार मनात येता चि धृतिघात करितो-पंत. ८. धैर्यमनोष-पंत. ९. वायु-पंत. १०. कृष्ण आणि अर्जुन. ११. बालवृक्ष. १२. गज. १३. दृश्य आणि अदृश्य अशा सर्व शत्रूच्यां नाशार्थ. १४. बाण. १५. शरमुखाते-पंत. १६. नारायणास-पंत. १७. ज्वाळाकल्लोळांनीं युक्त

करि सांतराय योगीश्वरयोगातें अनंतरायातें. ९३
त्यजिती, जलाशया गुरुगंभीरा ही नदी नदा, यादें;
गुरुत्या, परबळ केलें, क्षणमात्रें हीन दीन, दायादें. ९४
अहि बाहेर निघाले, सोडुनि, बहु तापतां महि, बिळाला.
कोणास हि अभयप्रद आश्रय त्या संकटांत न मिळाला. ९५
त्या अग्न्यस्त्रें सहसा सेना अक्षौहिणीमित जळाली.
बहुत न हुत होणारी जी, ती च सुटोनि तेथुनि पळाली. ९६
ऐसा करिता झाला, एक चि सोडून बाण, विप्र, लय.
रुद्राधिक गमला तो; कीं, नसतां समय, जाणवि प्रलय. ९७
धरि परचमू धृति, जसी श्रुनसिहरवा दवावृता न गजी.
पार्थें, सर्वास्त्रप्रतिपक्ष ब्रह्मास्त्र योजिलें मग, जी! ९८
घनशस्त्रवर्ष शमलें, शमतां अग्न्यस्त्र सर्व तम ही तें.
सुर म्हणति मुख्य कृष्ण चि, हे धरिति, न शेष पर्वत, महीतें.
मेले चि कृष्ण, ऐसें बा! गर्वानीं हि मानिलें होतें.
अक्षत अस्त्रप्रशमीं पाहुनि, बहु तेज वानिलें, हो! तें. १००
घनपटलमुक्तरविशशिनिभकृष्णांहीं स्वशंख वाजविले.
गाजविले लोक सकळ, तावक गुरुनंदनादि लाजविले. १०१
शोकध्यानपरायण अश्वत्थामा करांगुळी मोडी;
जोडी हस्त श्रुतिला; दीर्घोष्णश्वास, चाप ही, सोडी. १०२
तो 'धिग्धिक्! सर्वमिदं मिथ्या' ऐसें म्हणे; रथावरुनी
टाकुनि उडी, पळे हो! शीघ्र, तपोयोग्यवनपथा वरुनी. १०३
तों, ज्याच्या उपदेशें बहु जनिमरणाद्यनर्थ चुकतात,
तो भेटे भर्गप्रभ भगवान् भव्यप्रभाव शुकतात. १०४
व्हावें धन्य जयाचें, तीर्थाचें तीर्थ, पद नमुनि, पतितें,

१ विघ्नयुक्त. २. विघ्नरहित अशा ३. अश्वत्थाम्याने ४ वणव्याने घरलेली हत्तीण ५. दाट अशी शस्त्रवृष्टि. ६ मेघपटलांतून बाहेर आलेल्या सूर्यचंद्रासारख्या कृष्णार्जुनांनी. ७. शिवसदृश. ८. व्याम.

त्यां, वंदी, तो चिंताशोकपरिम्लानवदन, मुनिपतितें. १०५
सविनय पुसे, ' अहो ! म्यां आग्नेयास्त्रप्रयोग हा केला:
रुद्रें हि न पावावें, यें्द्रीतगुहाचिया हि हाकेला. १०६
सर्व चमू न जळाली, कृष्णार्जुन वांचले कसे ? बाहे
जें हरचक्षुसि त्याची प्याले कीं आंच लेकसें बा ! हे ? १०७
हे माया कीं कालें केलें विपरीत, पूर्व कीं चुकलों ?
सांगा कां गायत्रीजपपर मीं, मंत्रसिद्धिला मुकलों ?' १०८
व्यास म्हणे, "नारायण होउनि कार्यार्थ धर्मसुत, पाला
जळ हि न सेवुनि; पूर्वी करि मैनाकीं अखिन्न सुतपाला. १०९
सासष्टसहस्र समा, धृतयमनियमांसि, सर्वदा जपला.
तितुकें चि पुन्हां तप, तो ऊर्ध्वभुज, स्थाणु वातभुक् तपला.
तो ब्रह्मभूत जेव्हां प्रभुची तेव्हां चि पूर्ण होय दया,
मग दर्शन दे भगवान् भव हर, सेवकमयूरतोयद, या. १११
प्रेमस्मितीं निववितो शशिशतमददलन देवदेवरद
नमितां शिरीं कर, स्तुति करितां श्रुति-चित्त दे, वदे वरद.११२
'मद्भक्त ! मत्प्रसादें हो तूं मत्तुल्य, मदधिक हि, समरीं,
त्वदधिक तेज यश नसो कोणा ही, योगिमुनिजनीं अमरीं.११३
त्या तारिसील,वधिसिल म्हणसिल ज्या.ज्यासि'तारिन,''वधीन.'
शस्त्रास्त्रापासुनि भय तुज किमपि नसो:-असो जय अधीन.'
विश्वेश, असे पुष्कळ, होउनि परम प्रसन्न, दे वर ज्या,
तो हा यदुपति, याच्या, नमिति, पदाच्या, समस्त देव रज्या.

१. त्या मुनिपतिते-पंत. २. ज्या आग्नेयास्त्राला भ्यालेल्या [ आपल्या मुलाच्या ] कार्तिकस्वामीच्या. ३. जे अस्त्र रुद्रतृतीयनेत्रास युद्धार्थ बलावित असे अत्युग्र, त्याची आच पुत्रसे सोसोनि कसे बापा ! हे कृष्णार्जुन बाचले ?-पंत. ४ वर्षे. ५. खांबासारखा निश्चल. ६. दासजन हे च कोणी मोर, त्याचा मेघ असा शिव. ७. शेकडो चंद्राचा गर्व नष्ट करणारे. (अत्यंत शुभ्र). ८. महादेवाचे दात ९. कान व मन

याच्यांचि तपापासुनि झाला, यासम चि नर महातेजा;
तो हा अर्जुन, 'नारायण' चि, म्हणति कवि बरें पहाते, ज्या.
रक्षिति युगीं युगीं हे साधूंतें, आदरें अवतरून;
यांचा पदपद्मरजःकण हि न होइल शचीधवतरून. ११७
श्रीकृष्ण रुद्रसंभव, पूजितसे शंकरासि हा लिंगीं;
अहि चंदना तसा, तूं मानें तरि कृष्णद्वयासि आलिंगीं. ११८
तूं ही रौद्र तपस्वी, तेजस्वी रुद्रभक्त पूर्वींचा;
ईश्वरवरप्रसादें जालासि त्रासकर रिपूंर्वींचा." ११९
इत्यादि तत्व ऐकुनि, तो कुरुगुरुचा कुमार, बहु मानी,
श्रीशंभुकारणें नति करुनि, श्रीकेशवासि बहु मानी. १२०
हृष्टात्मा व्यासातें वंदुनि, अवहार शीघ्र तो करवी.
आवरि वीरां, स्वकरां निववाया जेंवि सर्व लोक रवी. १२१

---

## अध्याय चोविसावा.

अर्जुन निजविजयावह मोटें आश्चर्य किमपि पाहोनि,
वाहोनि विस्मयभर, ध्यानीं होता, तटस्थ राहोनि. १
तों व्यासातें पाहे, नमुनि म्हणे, "करुनि आ तपस्वी! मीं
पुसतों, सांगा, न तुम्हीं उरवाल तमासि आतप, स्वामी! २
जेव्हां जेव्हा करितों, जिकडे जिकडे शिरोनि, परम रणा,
तिकडे तिकडे दिसतो दिव्य पुरुष, तो चि हेतु पर-मरणा. ३
वर्णें कृष्ण, भयंकर बहु, चालतसे त्यजूनि तो धरणी.
मरती, तच्छूलोत्थितशूलसहस्रें चि सर्व योध रणीं. ४
दीपपुरोवर्ति तिमिर, वायुपुरोवर्ति घनपटल, फाटे.

---

१. सुरतरु–पंत. इंद्रतरु (कल्पतरु) याहून उणा. २. शत्रुभूमीचा. ३. सैन्यसमारोप. ४. तपोधना!–पंत. ५. तुम्ही आतप तमासि न उरवाल–पंत.

तैसें तयापुढें परबळ, तें पाहुनि मला नवल वाटे. ५
मागुनि मीं, आधीं रविशतसप्रभ[१] बळसमुद्र अनवधि[२] तो,
शूलप्रसूत[३]शूलप्रकरें, मच्छत्रुयोधजन वधितो. ६
जन मानितसे, ‘वधितो पार्थ परांचीं शरोत्करें[४] कटकें.’
मृतमारण चि मज रणीं घडलें; दिसतें जनांस[५] तें लटकें. ७
स्वामी! तो पुरुषोत्तम कोण बरें? हें तुम्हीं च सांगाल;
आपण सर्वज्ञ म्हणुनि, पर गर्वें फुगविनांत कां गाल?” ८
व्यास म्हणे, “ज्या साहे न शशी, न हुताश, न रवि, शंकर तो;
प्रभुभाव असा, स्वपदीं होउनि असपत्न[६] नर, विशंक, रतो. ९
सैंधववधपणसमयीं[७] कृष्णें स्वप्नांत दाविला परवां,
जालासि हेतु, वंदुनि, ज्या, असुरींच्या तदा विलापरवां. १०
प्रचुर प्रसाद तुजवरि, म्हणुनि, प्रभु चालतो पुढें पार्था!
बहु जपतो भक्तजना भगवान्, सार्थप[८] जसा सदा सार्था. ११
जा त्यासि शरण, चरणस्मरण च रणमरणसंकटीं तारी.
मारी तो चि खळांतें, दासांसि पडों न दे चि जडभारी. १२
कृपवृषगुरुसुतरक्षितसेनेतें वक्रदृष्टिनें पाहे,
बा! हेतिधर[९] असा, या प्रभुवांचुनि अन्य कोण गा! आहे?
नमन[१०] त्रिकाळ करिती स्वर्गीं शक्रादि सुर, तरि च वसती.
दाखविती झाली या प्रभुचरिताची जना बरि चव सती[११] १४
प्रभुवर दक्षा, जेंवि सदर्पा सर्पाधमा सुपर्ण[१२], कुटी;
यांचा[१३] प्रसाद इच्छुनि, वरिली कविनीं वनीं सुपर्णकुटी. १५

---

१ शंभर सूर्यासारखी कांति ज्याची. २. अमर्याद. ३. मूळपाठ–**विनिःसृत.** ४. बाणसमूहानें. ५. तुम्हाहूनि इतर–**पंत.** ६. शत्रुरहित अर्जुन. ७. निवातकवच-हिरण्यपुरवासिवधसमयीं–**पंत.** ८. सकट. ९. शस्त्र–**पंत.** १०. नमन न करितां मृतिपतगति असी; मग अन्य गति काय?–**पंत.** ११. पार्वती. १२. गरुड १३. ईश्वरप्रसाद महाभाग्य तें जेथे प्राप्त होईल ती पर्णकुटी ही बहु बरी–**पंत.**

जें खेचर लोहरजतकनकमय त्रिपुर पांडवा! तें गा!
बकें चि शरें केलें भस्म; उडविलें हि कांडवातें गा. १६
एकें समयीं अंकीं घेउनियां खेळवी कुमारमणी,
देवांला, 'सांगा हा कोण?' म्हणे शंभुची उमा रमणी. १७
तेजस्वी शिशु दिसतो; हा मत्पद, वाढतां, हरिल; याला
न उपेक्षावें;' चिंतुनि हें धांवे न्यावया हरि लयाला. १८
तत्काळ सवज्र भुज स्तंभित झाला; अगा! धबळबाहा!
भ्रमले सर्व; न कळला कोणाला ही अगाधबळ बा! हा. १९
सामर शक्र विधिकडे जाय पळत; बहु भुजास कळ लागे.
स्वमनीं उमा म्हणे, 'गुरुमति! तुज ही मूढ हा न कळला गे?'
परिसुनि वृत्त, विधि म्हणे, 'रे शक्रा! देवदेव अज तो कीं;
हरि! हरि! हरिपरिभवबळ तुंज आढळलें असेल अजतोकीं!
प्रेमें तसी च भजली शुचिगुणमणिसुखनिधी उमा पतितें.
देतो नाना सुख, बहुरूप प्रभु सुखनिधी उमाप तितें. २२
येतां, चला, भ्रमाया संसारीं चाकवत चुकाना की?
कैंचें अमृत मिळेल? न चाखाया चाकवत, चुंका, नाकीं.' २३
आला धावुनि सामर विधि विनवाया प्रभूसि कैलासीं,

१. महादेवांना पृथ्वी हा रथ, ब्रह्मदेव हा सारथी व विष्णु हा बाण अशा प्रकारें युद्धसाधनें जुळवून, असुराच्या आकाशगामी व लोखंड, रुपें व सोनें याच्या केलेल्या त्रिपुराचा नाश केल्याची कथा आहे. २ बाणाच्या वाऱ्यानें. ३ गान कर-**पंत.** ४. त्रिपुरनाशसमयींचा चमत्कार पाहण्यासाठीं पार्वती आली असता, शंकर, ज्याच्या मस्तकीं पांच शेंड्या आहेत असें बालरूप घेऊन तिच्या मांडीवर बसले, असा कथासंदर्भ आहे ५. इंद्र-**पंत.** ६. अचल. ७. बकार व वकार यांत भेद नाहीं, हें शास्त्र यमककुतुकार्थ कृपा करून येथें अंगीकारावें-**पंत.** ८. बृहस्पतिबुद्धे!-**पंत.** ९. सहस्राक्षास तुज-**पंत.** १०. मेंढ्याच्या पोराच्या ठिकाणीं, ११. बहु-**पंत.** १२. मीं प्रभु मार्थीक्षा परि-**पंत** (अन्वयाकरितां अध्याहार?) १३. चाकासारखे. १४. शाकविशेष.

काळाचें हि न चाले बळ, ज्याच्या द्वारपाळबैलासीं. २४
पसरी, विधि करुनि सुरांसह, नमन स्तवन, दीनपा, पदर.
'प्रभुपदयुगलीं निववी; कां हरिल विबुधनदी[1] न पापदर[2]? २५
प्रभुनें न शूल धरिला, न असि, न नाशावया मद, पिनाक;
नाकभ्रष्ट न व्हाया,' वज्री घांसी पुढें तदपि नाक. २६
ऐसा प्रताप, ऐसी लीला, ऐसें दयालुपण समज;
बापा! पहा प्रभुयशें केलें केवळ पळांत पणस[3] मज. २७
मातेची[4] सरि येना उपमातेला, अगाधबळ बा! हा;
काय तुपाची साजे उपमा तेला[4] अगा धवळबाहा!? २८
हरिहर सहाय झाले, तेव्हां तत्तुल्य तूं हि अजित रणीं.
काय इतर तेजस्वी? वत्सा! तुजला म्हणेल 'अजि!' तरणी."
माधव[5]मित्रमयूरा मुनि[6]मुदिर मुदित करूनियां गेला.
केला धन्य जयँ[7] असा शिबिरा शिबिरांजनुतपदें[8] नेला. ३०
श्रीगुरुरामपदाब्जीं भावें हें द्रोणपर्व वाहून
झालों प्रसाद[9]भाजन; सर्व हि होतिल असे चि पाहून. ३१

इति श्रीमन्महाभारते द्रोणपर्व समाप्तम । श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



१. देवनदी भागीरथी. २. पापभीति. ३. सात्विक भावें आंगावरि कांटे उठले **-पंत.** ४. देवदयेसारिखी अन्य दया म्हणों नये, जसें तुपासारिखें तेल न म्हणावें; कीं, देवाचें अनंत सामर्थ्य **-पंत.** ५. कृष्णमित्र अर्जुन हा च कोणी मयूर त्यास. ६. व्यासरूपी मेघ. ७. अर्जुन. ८. सर्वशरण्यनतें **-पंत** ९. प्रसादपात्र.

# शुद्धिपत्र—आर्याभारत खंड २ रा.

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
|---|---|
| ४।७ | गुरुंमि |
| ४।७ | जांवाँ |
| ५।११ | समजाविती |
| ५।१४ | 'ने |
| ७।२ | त्वत्स्मरणे |
| ७।१० | [13] हो, |
| १०।४ | दाटेल |
| १०।१० | लाजे; |
| १३।१७ | विप्र |
| १३।१८ | क्षिप्र[14]. |
| १४।७ | दुःसह मुकुट |
| १४।२२ | ६. उत्तम जय देणारे (चरित्र). |
| १५।८ | सुखा? |
| १५।१५ | द्रुपदनृपपुरोहित |
| १९।७ | सि मिद्ध, न मिद्ध जनक, |
| १९।१७ | हरि कुरुकुलहित |
| २१।६ | चि, न |
| २९।५ | तरावयासि |
| २९।२६ | ज्यानें अशा! |
| ३२।१६ | विटे[31]. (याप्रमाणे पुढे क्रम). |
| ३२।२४ | ४. हरिहराचा० (याप्रमाणे पुढे क्रम). |
| ३३।१५ | [11] पाते, |
| ३८।२७ | बालकाने. |
| ३९।१७ | तीव्र[10], |
| ४५।२ | काही. |
| ४६।२३ | बृहस्पतीने व शुक्रानें |
| ५०।२० | चिरांचिनी |
| ५४।६ | परभारा, |
| ५८।२ | होती |
| ५८।४ | म्हणे, 'अमतकरा! |
| ५४।१९ | कैसा, |
| ५०।९ | राज्याला' |
| ५९।१३ | कमा, |
| ५९।१३ | तो? |
| ६१।२५ | नसे कारण |
| ६५।२ | —मर्दितकळ मन्त्रपान |
| ६५।३ | जे जाले यान, |
| ६५।५ | केवळकृपाळुपूर्वजमघर. |
| ६६।८ | स्वप्राणांसह, जरि हि ते [6] ससेन, |

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
|---|---|
| ७०।१५ | झाल्या !? |
| ७०।२० | आर्यका मार्ते, |
| ७५।५ | आधि काय |
| ७८।७ | तारिल कोपेल जरि अजातारी? |
| ७८।१५ | सुरसत्तमसा |
| ८१।१६ | भुज |
| ८३।५ | हितसंचकसांगुबांधवायास ( संधीप्रमाणें टापेत फरक करावा ). |
| ८३।१६ | 'बहा' आल्या. |
| ८७।१८ | यादव; |
| ८९।१६ | भँरता!'" |
| ९१।१४ | ती, |
| ९४।६ | तीरकोपदेशाला. |
| ९४।७ | ह्दुपदेशपटु |
| ९४।८ | मधुरसी |
| १०६।५ | भारताषसदा : |
| १०६।६ | राज्यभार |
| १०८।१६ | तथा, |
| १११।४ | 'योग्य वेशगा ! समता.' |
| १२३।१८ | द्रुपदसुत शिखंडी तो रथ-सत्तम; |
| १२३।२५ | १५. दुर्जय. |
| १२४।९ | स्वभावाते |
| १२६।२५ | रेणुकेळी |
| १३१।९ | विटेल, |
| १३२।१४ | साधूनी, |
| १३४।२ | श्रीगुरुकृपा |
| १३४।८ | निजगभीरतेसि |
| १३५।२२ | ८. प्रहारांत. |
| १३८।५ | सारथ्ययुद्धतांडव |
| १३८।२७ | पाहिलेले. |
| १५०।३ | परांसि नाका |
| १५०।५ | शिवशिष्यच्छात्रे. |
| १६४।२१ | ५. युद्धाची. पर्वतयारी करिताना. |
| १६८।४ | मदनांकी? |
| १६८।५ | सेखा |
| १६८।५ | हित |
| १६९।११ | मी. |
| १७६।६ | अजेय |
| १७६।६ | वज्रधरा |
| १७७।१७ | तुंडे, |
| १८७।८ | भीड, |
| १८७।९ | भीडे.' |
| १८७।१० | सरले तीन, प्रहरा |
| १८९।२ | 'हे ब्रह्म, पावलो |
| १८९।२ | मीं; |
| १८९।३ | प्रभुच्या, पावति |
| १९०।३ | राक्षस; |
| १९१।२० | हतदर्पा रुचिर० |

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
|---|---|
| १९२।५ | कौरवसमूह, |
| १९२।५ | कृष्णसारथि, |
| १९६।४ | तो, |
| १९६।५ | गंदीन ? |
| १९८।१९ | शत्रु त, न भाउ |
| १९८।२३ | यश चि मदा, |
| २०४।४ | ठावा, |
| २०८।८ | व्याघ्रा, |
| २१४।१४ | वृद्धासि |
| २१४।२८ | चंद्राने |
| २१७।१६ | सुशर्मा राये, |
| २१८।१६ | न गज नग, |
| २२१।५ | श्रितमहृदनवन पय- करून (?) (पंत 'पय' असें भिन्न पद का करि- तात ?)' |
| २४९।०५ | पडला |
| २४९।२० | कोपविला |
| २५७।५ | भग्नार्त० |
| २६२।१३ | अरक्षितहरिमथन० |
| २६४।१५ | 'रे! |
| २७२।२१ | कलिंहीं ? |
| २७६।१२ | हो !' |
| २८१।८ | कलहाते, |
| ५८१।९ | '?' |
| २८२।१३ | रुद्र प्रभलें |

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
|---|---|
| २९८।१३ | कुशीला. |
| २९८।१४ | कुशीला |
| ३१०।१४ | राशी ? |
| ३२७।५ | रवि, |
| ३२८।९ | रोमांचकंचुकाला |
| ३३१।६ | 'करित्यावरि' असें हि पद संभवेल. |
| ३३१।६ | गोडिसिल गदा, |
| ३३७।११ | गुरुसात्यकि |
| ३३८।२७ | त्रळे, |
| ३६६।११ | प्रथपर्ताच्या |
| ३७५।१९ | कुरुकृतान्निगारवप |
| ३७५।२६ | जिष्णुकडे |
| ३७७।५ | शैलाग्रज० |
| ३८२।१९ | रोकडा |
| ३८३।६ | व्हाव्या (?). |
| ३८७।१५ | अधमतम |
| ३९०।२१ | सुंदर्जेर |
| ४०५।२० | माजो. ९५ |
| ४०६।५ | ते '। |
| ४०९।२ | भीमगदेनें |
| ४१२।१८ | कृष्ण श्रितासि |
| ४१८।१५ | स्तमैन |
| ४२१।४ | मृगाधिपतिकेली. |
| ४२४।१८ | यमपुरीवसती. |
| ४२५।६ | ती, |

| पृष्ठ-पंक्ति | शुद्ध. | पृष्ठ-पंक्ति | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४३४।८ | वृष विचार | ४५४।१७ | कुंतनार्म |
| ४३४।१३ | मृदल | ४५४।१८ | सा. |
| ४४५।१७ | कृष्णजीअसा | ४५७।६ | यन्निष्ठा पुरुषाते |
| ४४७।१४ | पार्षत तेजे | ४५८।४ | 'धिग्धिक!' |
| ४४७।१७ | हंळदीने. | ४६१।२० | हां आर्य. |
| ४४७।१८ | हळदीने. | ४६२।२१ | करिति |
| ४५३।१ | भीम प्रलय० | ४६७।७ | त्र्यबक अेर्णा |



